# विक्रीस तयार पुस्तकें.

| पुस्तकाचें नांव. | किंमत. | ट.ख. |
|---|---|---|
| १ दुःखा अंतीं सुख. † | १-४-० | ०-२-० |
| २ माणिक बाग. † | १-४-० | ०-२-० |
| ३ संसाररंजन. † | १-०-० | ०-२-० |
| ४ गुणसुंदरी. † | ०-१२-० | ०-१-६ |
| ५ नवयुग. † | ०-१२-० | ०-१-६ |
| ६ राजा तोडरमल. † | ०-१२-० | ०-१-६ |
| ७ सुंदरमाधव. † | ०-१०-० | ०-१-० |
| ८ सरस्वती. † | ०-१०-० | ०-१-० |
| ९ धाकट्या सूनबाई. † | ०-८-० | ०-१-० |
| १० मृणालिनी. † | ०-८-० | ०-१-० |
| ११ विलक्षण भोळेपणा. | ०-८-० | ०-१-० |
| १२ रावबहादुर पर्वत्या. | ०-६-० | ०-०-६ |
| १३ द्रोणसंकोप. | ०-६-० | ०-०-६ |
| १४ चतुरगडच्या विनोदी स्त्रिया. | ०-६-० | ०-०-६ |
| १५ कुसुमगुच्छ. | ०-४-० | ०-०-६ |
| १६ रमा आणि माधव. | ०-४-० | ०-०-६ |
| १७ मुराररराव. | ०-४-० | ०-०-६ |
| १८ हंसदूत. | ०-२-० | ०-०-६ |
| १९ मोहनतारा. | ०-२-० | ०-०-६ |
| २० विलक्षण योगायोग. | ०-१-० | ०-०-६ |

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव-मुंबई.

† कापडी बांधणीचें पुस्तक पाहिजे असल्यास ४ आणे जास्त पडतील.

गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक १२ वें.

# दुःखा अंतीं सुख.

" It is not saying too much to aver that the happiness or misery, the enlightenment or ignorance, the civilization or barbarism of the world, depends in a very high degree, upon the exercise of woman's power within her special kingdom of home. "

**Smiles.**

श्रीयुत् वासुदेव गोविंद आपटे, बी. ए.,

यांनीं लिहिलें.

[ द्वितीयावृत्ति ]

मुंबई,

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी.

सपटंबर १९०५.

# विषयानुक्रम.

# प्रकाशकांचे दोन शब्द.



मिसेस हेन्री वुड या सुप्रसिद्ध आंग्ल ग्रंथकर्त्रींच्या इंग्रजी कादंबऱ्या किती लोकप्रिय झाल्या आहेत, हें इंग्रजी वाचकांस ठाऊकच आहे. सदहु ग्रंथकर्त्रींच्या कादंबऱ्या विशेषतः स्त्रीवर्गाला फारच हितावह असल्यामुळें त्यांतील कित्येक निवडक कादंबऱ्यांचें मराठी रूपांतर आपल्या महाराष्ट्र वाचकभगिनींना सादर करण्याचें आह्मीं योजिलें आहे. पैकीं 'Mrs. Halliburton's Troubles' ही कादंबरी प्रथम हातीं घेतली व **'दुःखाअंतीं सुख'** या नांवानें तिची प्रतिकृति पहिल्यानें **मासिक मनोरंजनांत** क्रमशः प्रसिद्ध करून तीच आज स्वतंत्र पुस्तकरूपानें महाराष्ट्र वाचकांपुढें ठेवित आहों.

आमचे मित्र श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे, बी. ए., यांनीं हें पुस्तक मराठींत लिहिलें आहे. इंग्रजलोकांचे रीतिरिवाज व आपले रीतिरिवाज यांत बरेंच अंतर असल्यामुळें प्रस्तुत पुस्तकलेखकानें होतां होईल तों आपल्या लोकांच्या चालीरीतींस विसंगत वाटणार नाहीं असेच प्रसंग यांत आणण्याचा शक्य तितका प्रयत्न केला आहे, तरीहि क्वचित्स्थळीं आपल्या दृष्टीस किंचित् विलक्षण वाटणारे प्रसंग यांत दिसण्याचा संभव आहे; तथापि असे प्रकार फारच अल्प आढळतील, ही त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट होय.

हेन्री वुडच्या या कादंबरीमागून 'East Lynne'चें रूपांतर प्रसिद्ध करण्याचें आह्मीं आरंभिलें असून तें पुस्तकहि लवकरच वाचकांपुढें येईल. त्याचप्रमाणें हेन्री वुडचीं 'Channings' 'Within the maze' वगैरे पुस्तकेंहि मराठींत आणण्याचा आमचा मानस आहे. श्रीयुत आपटे यांच्याप्रमाणेंच या कामीं आह्मांला आमच्या सरस्वतीभक्त मित्रांकडून साह्य होईल, अशी आशा बाळगितों.

**मनोरंजक ग्रंथप्रसारकमंडळीचें ऑफिस, गिरगांव, मुंबई,**
ता० ३० सपटेंबर १९०५.

**काशीनाथ रघुनाथ मित्र,**
म. ग्रं. प्र. मंडळीचे व्यवस्थापक.

# प्रस्तावना.



'जिच्या हातीं पाळण्याची दोरी, तीच देशाला उद्धारी' अशा अर्थाची एका इंग्रज कवीची उक्ति आहे. तिची सत्यता दाखविणाऱ्या आपल्या समाजांतल्या प्रत्यहीं घडून येणाऱ्या देखाव्यांपैकीं दोन परस्पर विरोधी देखावे, या पुस्तकांत सादर केले आहेत. या कादंबरींत निवळ काल्पनिक असा भाग थोडा आहे. बहुतेक गोष्टी अनुभवांतल्या पण मुद्दाम थोडी फिरवाफिरव करून लिहिल्या आहेत. गोदूताई व त्रिंबकराव यांच्यासारख्या आईबापांचा या जगांत सुकाळ आहे; पण राधाबाईसारखी आई मात्र भाग्यानेंच आढळते. राधाबाई फारसें शिकली सवरली नसतां तिचें मन इतकें सुसंस्कृत कसें झालें, याचा कित्येकांनां अचंबा वाटेल. पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. मन सुसंस्कृत करण्याचें ग्रंथवाचन हें एक साधन आहे खरें; परंतु तें सुविचारसमागमाइतकें बलवत्तर नाहीं, हें ध्यानांत ठेविलें म्हणजे लिहितांवाचतां येत नसूनसुद्धां मुलांनां उत्तम गृहशिक्षण देणाऱ्या आया क्वचित् कां होईना पण कशा निपजतात, या गोष्टीचें एवढें गूढ वाटणार नाहीं.

इंग्रजींत मिसेस् हेनरी वुड या बाईची Mrs. Halliburton's Troubles ही कादंबरी सातआठ वर्षांपूर्वीं मीं वाचली, तेव्हांपासूनच तिची प्रतिकृति मराठींत उतरावी असा मनाचा संकल्प होता; परंतु कादंबरीलेखनाचा अभ्यास नसल्यामुळें धीर होईना. शेवटीं **'मनोरंजना'**चे संपादक श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र यांनीं उत्तेजन दिल्यावरून तें काम भीतभीत हातीं घेतलें व त्या जगच्चालक, सर्वसाक्षी, सर्वशक्तिमान् परमेश्वराच्या कृपेनें तडीस गेलें, हें पाहून मनावरचा एक मोठा भार खालीं उतरल्यासारखें समाधान वाटत आहे. पहिल्यानें ही कादंबरी **मनोरंजनां**त क्रमशः प्रसिद्ध झाली होती; तीच आज **मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी** स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करित आहे.

मूळ इंग्रजी पुस्तकाचा आधार निवळ कथानकापुरता घेतला आहे व त्यांतहि पुस्तक मोठें न व्हावें, आपल्या चालीरीतीशीं बहुतेक गोष्टी जुळाव्या, भिन्नभिन्न रस यावे, यासाठीं पुष्कळच फेरफार केले आहेत. कित्येक प्रकरणेंचीं प्रकरणें मूळांतलीं गाळून नवीं घालावीं लागलीं आहेत. सारांश, इंग्रजी पुस्तकाचें भाषांतर या दृष्टीनें न पहातां आपल्या समाजाचें चित्र ह्मणून मार्मिकांनीं ही कृति अवलोकन करावी, व

**गुणदोषौ बुधो गृह्णन्निंदुक्ष्वेडाविवेश्वरः**
**शिरसा श्लाघते पूर्वं परं कण्ठे नियच्छति ।**

याप्रमाणें सदयतेनें पहावें, एवढीच विनंति आहे.

वा. गो. आपटे.

# दुःखा अंतीं सुख.

## प्रकरण १ लें.

## माधवराव धर्मात्मे.

दिवसा दहा वाजण्याची वेळ. पुण्यासारख्या शहरांत गरीब विद्यार्थ्यांनां ही वेळ कोण गडबडीची असते! ते पहा, माधुकरी मागून विद्याभ्यास करणारे गरीब विद्यार्थी दहांचा ठोका पडतांच पटापट हातांतलीं पुस्तकें टाकून देऊन स्नानासाठीं सदाशिवपेठेच्या हौदाकडे धावत जाऊं लागले आहेत; कोणी स्नान उरकून धुतलेल्या धोतराची चापूनचोपून केलेली घडी हातांत घेऊन तोंडानें कांहीं पुटपुटत घाईघाईनें घराकडे निघाले आहेत; कोणी एका हातांत पंचपात्री व दुसरे हातांत चौपदरी घेऊन 'ओं भवति भिक्षां देहि' अशा खणखणीत शब्दांनीं घरच्या यजमानीणबाईस आपलें आगमन सुचवित आहेत; कोणी किंचित् उशीर झाल्यामुळें माधुकरी न मिळाल्याकारणानें खिन्न मनानें माघारे चालले आहेत; अशी एकच धांदल उडून राहिली आहे. तो पहा, त्या पलीकडल्या दुमजली निळ्या रंगाच्या घरांत माधुकऱ्यांचा घोळकाचा घोळका एकदम शिरला आहे. वाचकहो! चला, आपणहि त्यांचे मागोमाग जाऊन तेथें काय प्रकार चालला आहे तो पाहूं.

बाहेरच्या ओसरींत कोणी बसलेलें दिसत नाहीं. फक्त सोवळें नेसतांना सोडलेलीं दोनतीन धोतरें व्यवस्थित रीतीनें एका कोपऱ्यांत ठेवलेलीं दिसत आहेत; उजव्या बाजूच्या दारानें आंत गेलें ह्मणजे वर माडींत जाण्यास जिना लागतो; पण आतांच आपल्याला माडीवर जाऊन काय करावयाचें आहे? पलीकडे माजघर आहे; या माजघराचे उजवे हातास स्वयंपाकघर आहे. या माजघरांत कांहीं मंडळी जेवावयास बसली आहे, त्यांतल्या एका पोक्त माणसाचें माधुकऱ्यांशीं कांहीं बोलणें चाललें आहे; आपण येथें उभे राहूं, ह्मणजे त्यांचें भाषण आपल्यास सहजच कळेल.

"कां गडबोले, आज तूं आपल्या सोबत्याला टाकून एकटाचसा आलास? पुस्तकानें अजून त्याला सोडलें नसेल! भारीच बुआ पोरगा मेहनत करतो—"

माधुकरी नम्रपणें ह्मणाला "कोण, कृष्णा बापट होय? तो आज शनवारांत आपले मामेभावाचे घरीं जेवायास गेला आहे. त्याच्या आज्याचें आज श्राद्ध आहे आणि कृष्णाचा मामेभाऊ त्याला बजावून गेला आहे कीं, तुझी शाळेची वेळ मुळींच चुकणार नाहीं; अकरा वाजण्याचे पूर्वीं तुझी सुटका करून देण्याचें माझ्याकडे लागलें. इतकी खात्री दिल्यावर मग त्याच्यानें नाहीं कसें ह्मणवेल?"

"तुझ्याबरोबर आणखी दुसरा एक सोबती असतो, तोहि आज कुठें दिसला नाहीं!"

"गोंदू नेने का? त्याची आज सकाळची शाळा आहे. तो आतांसा नुक्ता कुठें शाळेंतून आला असेल. याउपर आंघोळ वगैरे करील—"

"ह्मणजे! आज बुधवारना? आज सकाळची शाळा कसली आली आहे?"

"तो नूतन मराठी विद्यालयांत आहे. आठवडाभर सारखी मेहनत करून मग एकदम दीड दिवस सुट्टी देण्यापेक्षां अर्ध्या आठवड्यांत ह्मणजे बुधवारीं एकदा अर्धी सुट्टी आणि बाकीच्या अर्ध्या आठवड्यानंतर रविवारची सबंध सुट्टी, अशी व्यवस्था त्या शाळेंत आहे. याच्या योगानें मुलें कंटाळत नाहींत आणि अभ्यासहि पण चांगला होतो."

"ही व्यवस्थातर उत्तम आणि फार दूरदृष्टीची आहे, यांत शंका नाहीं. त्या शाळेंतल्या मास्तरांची विद्यार्थ्यांच्या हिताकडे इतकी बारीक दृष्टि आहे काय?"

"हेंचसें काय, पण इतर शाळेंत दिसत नाहींत अशा पुष्कळ चांगल्या गोष्टी त्या शाळेंत आहेत. त्या शाळेंतलीं मुलें हुषार, उद्योगी, स्वभावानें गरीब आणि सद्वर्तनी निपजतात ह्मणून जो लौकिक आहे, तो उगाच नाहीं."

"तर मग आमच्या बापूलाहि त्याच शाळेंत घालूं. बापू, तूं जाशील ना त्या शाळेंत?"

यावर बापूच्या उत्तराची वाट न पहातां ते पोक्त गृहस्थच पुढें ह्मणतात "पण कायरे गडबोले! तुझ्याबरोबर तो एक अंमळ उंच, गोरा, किंचित् तिरवा तिरवा पहात असे—काय त्याचें नांव पहा—जरा तें चमत्कारिकच आहे—"

"त्रिविक्रम—"

"हो हो, त्रिविक्रम-त्रिविक्रम! तो कुठें असतो रे? आतांशीं माधुकरीला कधीं आलेला पहात नाहीं त्याला मी."

"तो आज आठदहा दिवस झाले, तापानें फणफणत पडला आहे. त्याच्या ओळखीदेखीचें येथें कोणी माणूस नाहीं. डाक्तराकडे औषध मागायला जावें तर ते पैशाशिवाय बोलत नाहींत. ह्मणून त्याला सासून इस्पितळांत पोंचवून द्यावें, असा आह्मीं विचार केला आहे. त्रिविक्रम अन् आह्मी एकाच घरांत रहातों; पण आह्मीतरी कितीसे त्याच्या उपयोगीं पडणार! त्याच्याकरितां चार घरें जास्त मागून कसेबसे चार घास त्याला खायला घालतों. यापलीकडे आमचे हातून काय मदत होणार."

माधुकऱ्याच्या या भाषणावर ते पोक्त गृहस्थ कळकळीनें ह्मणाले "तुह्मी कोणते ठिकाणीं रहातां तेवढें मला सांगून ठेवा, ह्मणजे संध्याकाळीं कारखान्यांतून आल्यावर देवदर्शन करून परत येतांना मी त्याच्या समाचाराला येईन."

"नारायण पेठेंत—डोलकर आळींत—मारुतीसमोर दाकव्याच्या वाड्यांत आह्मी रहात असतों."

"बरें आहे. तूं जा आतां लवकर, तुला शाळेंत जायला उशीर होईल."

वर सांगितल्याप्रमाणें संभाषण झाल्यावर माधुकरी निघून गेला. बोलण्याच्या नादांत आपणास अजून चार घरें मागावयाचीं आहेत ही गोष्ट बिचारा विसरला असावा. माधवरावांनीं त्याला निरोप दिल्यावर तो शुद्धीवर आला आणि बोलण्यांत गेलेल्या वेळेचा वचपा काढण्यासाठींच कीं काय कोणाशीं न बोलतां झपाझप पावलें उचलित चालला.

माधुकऱ्यांनां लोकांची जेवणाची वेळ साधावी लागते. दहा घरें हिंडावीं, तेव्हां कोठें एका वेळेपुरता भाकरतुकडा त्यांनां मिळावयाचा. ती वेळ चुकली कीं झालें! जिकडे जातील तिकडे 'जेवणें झालीं' असा रोकडा जबाब मिळावयाचा. बरें लवकर जावें, तर 'अजून अवकाश आहे' ह्मणून ह्मणणार; थोडासा उशीर झाला तर 'जेवणें होऊन गेलीं' ह्मणून ह्मणणार. मिळून दोन्हींकडून नकार! ज्यांनां दोन्ही तिन्ही सांज यथेच्छ सुग्रास भोजन मिळून शिवाय वरतीं चहाकाफी ढोसण्यास सांपडते व शिवाय सहली करण्यांत आणि मित्रमंडळी-बरोबर मौजा मारण्यांत कितीहि पैसा उडाला तरी त्याची ज्यांनां यत्किंचितहि क्षिति वाटत नाहीं, अशा लक्ष्मीपुत्रांचें लक्ष्य या बिचाऱ्या गरीब विद्यार्थ्यांच्या हालअपेष्टांकडे कधीं चुकूनतरी जातें काय! वरिष्ठांनां पानसुपाऱ्या करण्यांत, नानातऱ्हेच्या फयाशनेबल पोषाखांत किंवा नाच, तमाशे व बैठकी यांत खर्च होणाऱ्या हजारों रुपयांचा थोडासा तरी अंश या गरीब विद्यार्थ्यांस

अन्नदान देण्याकडे खर्च होईल तर किती हित होईल; किती पुण्य लागेल व किती विद्यार्थी अन्नदात्यांस दुवा देतील! पण हें श्रीमंत व सुखवस्तु लोकांच्या कपाळीं बहुधा लिहिलेलें नसतें! असो.

माधवराव धर्मात्मे श्रीमंत नव्हते व सुखवस्तुहि पण नव्हते. त्यांनां पुण्यांत एका छापखान्यांत लहानशी नोकरी होती. त्या नोकरीच्या उत्पन्नावर ते आपल्या कुटुंबाचा कसाबसा चरितार्थ चालवित असत. या छापखान्यांत त्यांची आज जवळजवळ वीस वर्षे नोकरी झाली होती; पण छापखान्याची मोठीशी चलती नसल्यामुळें वीस वर्षांत बढतीचें नांवसुद्धां कधीं निघालें नाहीं! वीस वर्षे हे शब्द उच्चारण्याला सोपे आहेत, पण या अवधींत माधवरावांच्या स्थितींत किती फरक पडला होता! माधवरावांनीं नोकरी धरली तेव्हां ते एकटेच होते. त्यामुळें पंचवीस रुपये एकट्याला रगड होत. पण पुढें त्यांचें लग्न होऊन मुलेंबाळें झालीं आणि संसार वाढला, तेव्हां पंचवीस रुपये अर्थात्च पुरेनासे झाले. तरी पार्वतीबाई काटकसरीनें वागणाऱ्या आणि संसाराचे कामीं फारच दक्ष होत्या. मुलांचे कपडे त्यांनीं घरींच शिवावे आणि धुवावे; दळणकांडण घरींच करावें; शाळेंत फी पडते ह्मणून दोन यत्ता होईपर्यंत मुलांनां घरींच शिकवावें; राहिलेल्या वेळांत शेजारणींच्या चोळ्या शिवून आणि कशिद्याच्या टोप्या वगैरे काढून महिन्याचे कांठीं दहापांच रुपये मिळवावे. अशा रीतीनें माधवराव व पार्वतीबाई अडचणींतच खरीं पण समाधानानें दिवस काढित होतीं. माधवरावांचें अंतःकरण फारच कोवळें आणि दयार्द्र होतें. धर्म आणि ईश्वर यांचेठायीं त्यांची मोठी श्रद्धा असे, आणि यामुळेंच आपल्यास जी अर्धचतकोर भाकरी मिळेल त्यांतून दोन घास आपल्याहून जे गरीब असतील त्यांनां देण्यास ते कधीं चुकत नसत.

पुण्यास माधुकरी मागून विद्याभ्यास करणारे कोंकणचे विद्यार्थी शेंकडों आहेत. त्यांतहि सदाशिव पेठेंत मुख्य ब्राह्मणवस्ती असल्याकारणानें तेथें माधुकरी फार. पार्वतीबाईला नुसत्या माधुकऱ्यांसाठींच रोज पांचसहा भाकरींचें पीठ घ्यावें लागे. पंचवीस रुपयांत कुटुंबाचा निर्वाह चालविणाराला रोज दोन माणसांचें अन्न माधुकऱ्यांनां घालणें जिवावर येणें साहजिक आहे. तेव्हां कोणी शेजारणी-पाजारणीनें कांहीं माधुकरी बंद करून टाका ह्मणून त्यांनां सल्ला दिली ह्मणजे पार्वतीबाईनीं त्यांनां उलट ह्मणावें "अहो बाई, तुह्मीं असं पहा, परमेश्वरानं सगळ्यांचे जीव सारखे घडले आहेत. भूक लागली ह्मणजे आपला जीव तळमळतो कीं नाहीं? तसाच दुसऱ्यांचा समजावा. देवानं मला आणखी दोन

सोन्यासारखीं लेंकरं दिलीं असतीं, तर तीं मीं टाकून का दिलीं असतीं? आपल्याच्यानं घासभर अन्न नाहीं घालवलं तर अर्धा अर्धा घासच घालित गेलं, पण आपण जेवून माधुकऱ्यांनां विन्मुख लावणं, बाई, माझ्या कसं अगदीं जिवावर येतं. तिकडचंहि मत अगदीं माझ्यासारखं आहे. मला नेहमीं बजावणं होत असतं कीं, माधुकऱ्यांनां कधीं रिकामं जाऊं देऊं नये!"

माधवराव रहात तें त्यांच्या स्वतांच्या मालकीचें घर होतें आणि त्यांची जी काय इस्टेट होती ती एवढीच. त्यांतलें अर्धें घर स्वतांस रहाण्यासाठीं ठेवून बाकीचें अर्धें ते भाड्यानें देत असत. भाडें कांहीं फारसें येत नसे. सगळे चारच रुपये. पण अडचणींत दिवस काढणाऱ्या त्या कुटुंबाला ते चार रुपये कितीतरी मदत करीत! त्यांच्या घरांत आज सतत सतरा वर्षें भाड्यानें रहात असलेले विष्णुपंत खजीनदार यांची साताऱ्याला नुकतीच बदली झाल्यामुळें त्यांची जागा रिकामी पडली होती. तेथें आतां दुसरा कोणी भाडेकरी ठेवण्याचा त्यांचा विचार होता.

गरिबांनां औषधपाणी फुकट देतां यावें ह्मणून माधवराव आर्यवैद्यक व होमिओप्याथीहि बसल्याबसल्या शिकले होते. बारीकसारीक दुखण्यांत गोर-गरिबांनां फुकट औषधें देऊन ते त्यांनां बरेंहि करित असत. होमिओप्याथी औषधें फार स्वस्त असल्याकारणानें थोड्या खर्चानें पण मोटा उपकार करतां येई. या दोन्ही कारणांवरून लोकांनीं त्यांचें नांव 'धर्मात्मे' असें ठेविलें होतें. त्यांचें खरें आडनांव जरी परांजपे असें होतें, तरी आबालवृद्ध त्यांनां 'धर्मात्मे' याच नांवानें ओळखत असत.

## प्रकरण २ रें.

## कन्यादान.

संध्याकाळीं माधवराव रोजच्याप्रमाणें सहा वाजतां घरीं आले. त्या वेळेस एक तेराचवदा वर्षांची अविवाहित मुलगी स्वतांशींच कांहीं गुणगुणत घरांत इकडून-तिकडे येरझारा करित होती. एकीकडे तोंडानें गाणें ह्मणतह्मणत घरांतलीं कामें करण्याची तिला सवयच पडून गेली होती. ती वर्णानें निमगोरी पण नाकाडोळ्यानें नीटनेटकी होती. अंगानें सडपातळ आणि मध्यम उंचीची असल्यामुळें तिचें स्वरूप सुंदर नसलें तरी फार मोहक दिसे. तिची मुद्रा नेहमीं शांत आणि प्रफुल्लित असून तिच्या वयानुरूप तिच्याठिकाणीं समवयस्क मुलींबरोबर खूप खेळण्याची आणि आपल्या आईच्या बरोबरीनें तिला घरांतलें कामकाज करूं लागण्याची मोठी हौस होती. तिचें वय तेराचवदा वर्षांचें होतें ह्मणून वर सांगितलेंच आहे; पण खरोखर दिसण्यांत ती अकराबारा वर्षांचीच दिसत असे. तिला नीटनेटकें रहाण्याची फार आवड होती, हें तिच्या वेणीफणीवरून, व्यवस्थित आणि स्वच्छ पोषाखावरून आणि एकंदर वर्तणुकीवरून स्पष्ट दिसून येत होतें. माधवराव आफिसांतून परत आले, तेव्हां ती आपल्या सोबतिणींबरोबर फुगडी खेळत होती. खेळण्याच्या नादांत मुली देहभान विसरतात; परंतु आतां आपल्या बापाची घरीं येण्याची वेळ झाली ह्मणून ती मुलगी मधूनमधून खेळ थांबवून कानोसा घेत होती. यामुळें माधवरावांच्या जोड्याचा आवाज ऐकतांच तिनें खेळ थांबविला आणि ती बापापाशीं जाऊन उभी राहिली.

माधवरावांनीं येतांच पगडी खुंटीला लाविली आणि कपडे काढिले. इतक्यांत ती हातांत पंखा घेऊन हळूहळू त्यांनां वारा घालूं लागली. नुकतेंच दिवसभर काम करून व लांबून पायीं चालत आल्यामुळें थकूनभागून गेलेल्या माधवरावांस तो पंख्याचा शीतळ वारा आणि आपल्या मुलीचें तें हंसतमुख पाहून किती संतोष वाटला असेल याची कल्पना, असा प्रत्यक्ष अनुभव घेणाऱ्या भाग्यवान् वाचकांनांच होण्याजोगी आहे. मुलीचा चाणाक्षपणा पाहून माधवराव फार खूष झाले आणि किंचित् विनोदानें ह्मणतात "यमूताई, मी समजलों आतांशीं तूं माझी इतकी खुशामत कां करतेस तें! तुला वाटतें कीं अशानेंतरी मी तुझें लग्न लवकर करून देईन. पण वेडे मुली! तूं जितकीजितकी माझ्या जास्त उपयोगीं पडशील तितकातितका तुझ्या लग्नाविषयींचा विचार

माझ्यापासून दूरदूर पळेल! हो, अशी बिनपगारी, न सांगतां न बोलतां काम करणारी आणि अहोरात्र घरांत रहाणारी नोकर कुणाला नकोशी होईल!"

यमूताई लज्जेनें खालीं मान घालून उभी राहिली. तिच्या मनांतून कांहीं बोलावयाचें नव्हतें. कारण बाबा हें सगळें विनोदानें बोलत आहेत, हें तिला समजत होतें. पण यावर आपण कांहींच न बोललों तर बाबांनीं थट्टेंत ह्मटल्या-प्रमाणें खरोखरच आपण मतलबास्तव त्यांची सेवा करित आहों असा ते कदाचित् अर्थ घेतील ह्मणून ती ह्मणाली "पुरे बाई! बाबांनां उठल्याबसल्या एक गोष्ट दिसते आहे! पण माझ्यातर ती मेली ध्यानींमनींहि नाहीं! बाबा! कितीहो अशी माझी तुह्मी थट्टा कराल? अशानं मी नाहींजा वारा घालायला उभी रहाणार—"

"बरें तर बुवा, राहिलें! आतां पुनः ह्मणून तुझ्या लग्नाबद्दल कधीं अक्षरहि तोंडावाटे काढणार नाहीं. आतां तूंच होऊन 'माझं लग्न करून द्या' ह्मणून जेव्हां पाठीस लागशील, तेव्हांच मी तुझ्या लग्नाचें नांव घेईन. हें एकाअर्थी बरेंच झालें. मुलीला नवरा पहाण्याची माझी मोठी दगदग वांचली. आतां तूंच स्वतः आपला नवरा पाहून आण आणि मला सांग, ह्मणजे कन्यादानापुरता तेवढा मी हजर होईन. मगतर झालें?" माधवराव हंसतहंसत ह्मणाले.

माधवराव घरीं आल्याची खबर लागतांच पार्वतीबाई पुढल्या माडीकडे येत होत्या. इतक्यांत **'कन्यादान'** हे शब्द त्यांच्या कानीं पडले. 'कन्यादान' या शब्दाहून बायकांच्या कानांला गोड लागणारे दुसरे शब्द क्वचितच असतील! पतीच्या तोंडचे ते शब्द ऐकतांच पार्वतीबाई मोठ्या उत्सुकतेनें पुढें होऊन ह्मणतात "कन्यादानापर्यंत आली का मजल! यमीला स्थळ पाहिलं वाटतं? पुण्यांतच–का कुठं बाहेरगांवीं, तें मला कांहींच का मेलं कळूं द्यायचं नाहीं?"

"स्थळबिळ पहाण्याची काळजी आतां आपल्याला मुळींच करायला नको!" माधवराव विनोदानें ह्मणाले. "यमी स्वताच स्थळ पाहून आणणार आहे. मी ह्मणतों हें एकेप्रकारें बरेंच झालें. आपली दगदग वांचली—"

पार्वतीबाई यावर ह्मणाल्या "आपण पहा, कीं ती पाहो; पण ब्रह्मदेवानं ज्याच्याशीं नेमानेम योजिला असेल तोच शेवटीं येऊन उभा राहील. पण गोखले, मुनसफांच्या मुलाच्या टिप्पणाशीं जुळवून पहाणार होतां ना? तें पाहिलं का?"

"एवढ्या मोठ्या घरीं मुलगी द्यायची तेवढी मात्र तुला हौस! पण त्यांनां द्यावा लागेल दोन हजार रुपये हुंडा. आहे का तुझ्याजवळ इतका पैसा द्यायला?"

यावर पार्वतीबाईच्यानें उत्तर देववेना. आपली नक्षत्रासारखी गुणी मुलगी, तिच्यांत नांव ठेवण्यास कोठेंहि एवढीसुद्धां जागा नसतां आपल्यापाशीं हुंडा द्यायाला नसल्यामुळें तिला चांगलें स्थळ मिळूं नये हा विचार मनांत येतांच त्यांनां आपल्या दारिद्र्याबद्दल अत्यंत दुःख वाटलें, व आपल्या लोकांच्या या राक्षसी लोभावद्दल मनस्वी संतापहि आला. केवळ हुंड्याकडेच दृष्टि देणारे व मुलीच्या कुलशीलाचा विचारहि न करणारे आईबाप मनुष्य नसून राक्षसच होत, असें त्यांनां वाटलें, व दुःखानें आणि संतापानें त्यांचें तोंड गोरेंमोरें होऊन नेत्रांतून अश्रु टपकूं लागले.

ही हुंड्याची असुरी चाल आमच्या समाजांत कशी शिरली कोण जाणे! मुलीबद्दल पैसा घेणें जितकें शास्त्रनिषिद्ध आहे, तितकीच ही चाल निंद्य असून पहावें तों गरीब श्रीमंत, विद्वान् मूर्ख, सुधारक दुर्धारक, सगळे या चालीच्या अंकित होऊन राहिलेले आढळतात, हें केवढें आश्चर्य आहे! अशी स्थिति असल्यावर गरीब आईबापांनां आपल्या मुलीला सुस्थळ कसें मिळेल ही चिंता अहोरात्र जाळित रहाते यांत नवल काय?

यमूताईनें पाहिलें कीं आतां या भाषणाचा ओघ दुसरीकडे वळविला नाहीं तर आपल्या लग्नाबद्दल आई आणि बाबा विनाकारण फिकिर करित बसतील. ह्मणून ती मध्येंच ह्मणाली "खरंच, बाबा! एक गोष्ट मी अगदींच विसरलें. आपला दादा शाळेंतून आल्याबरोबर सांगत होता कीं, आज कुणी एकजण आपलं घर पहाण्यासाठीं येणार आहे."

माधवरावांनीं उत्सुकतेनें विचारिलें "कोण येणार आहे? त्यानें कांहीं नांवगांव सांगितलें आहे कीं नाहीं? आणि दादाचीन् त्याची कुठली ओळख?"

"त्यांच्या शाळेंत दामले ह्मणून कुणी नवीन मास्तर आले आहेत, त्यांनां रहायला जागा पाहिजे आहे ह्मणून त्यांनीं चारचौघांनां सांगून ठेविलें होतें. त्यांतल्या कुणीं आपल्या घराचं नांव सुचविलं. तेव्हां साहजिकच ते दादापाशीं आपल्या घराविषयीं चौकशी करूं लागले. दादानं त्यांनां सांगितलं कीं, संध्याकाळीं सात वाजतां बाबा घरीं भेटतील तेव्हां या, आणि घर पाहून ठरवा. त्याप्रमाणं ते आतां घटकाभरानं येणार आहेत—"

माधवराव मध्येंच ह्मणाले "बरें आहे, येऊंद्या. पण मीं देवदर्शन करून त्या त्रिविक्रमाच्या समाचाराला जाण्याचें कबूल केलें आहे. तिकडेतर मला पहिल्यानें गेलेंच पाहिजे. इकडे पाठीमागें ते मास्तर आले तर त्यांनां घरबीर उघडून दाखवा व जरा बसवून घ्या, इतक्यांत मीहि लवकरच परत येईन"

असें ह्मणून माधवराव उठले आणि पुनः कपडे चढवून देवदर्शनास चालते झाले. पार्वतीबाईहि उठून कण्हतकण्हत माजघरांत जाऊन अंथरुणावर पडल्या. कण्हत ह्मणण्याचें कारण पार्वतीबाई अलीकडे कित्येक दिवस आजारी होत्या. काळजीनें ह्मणा अगर रोगानें ह्मणा, त्यांचें शरीर दिवसेंदिवस अधिकाधिक निस्तेज आणि क्षीण होत चाललें होतें. त्यामुळें घटका अर्धा घटका उठून बसण्याइतकीदेखील शक्ति त्यांच्या अंगांत उरली नव्हती. मुलांमुलींनां सांभाळण्यास आणि काळजीनें संसाराचें काम करण्यास घरांत दुसरी कोणी पोक्त बाई नव्हती, ह्मणूनच पार्वतीबाई तशा स्थितींतहि उठून घरांतलें काम करित असत. वास्तविक पहातां घरांतल्या कामाची दगदग आतां त्यांनां झेंपत नसे. यामुळें त्या कामाचा मुख्य भाग आमच्या यमूताईवरच पडे. आणि यमूताईलाहि कामाची हौस व उरक पुष्कळ असल्यामुळें साऱ्या गोष्टी अगदीं बिनबोभाट चालल्या होत्या.

माधवराव घराबाहेर पडलेले पाहून मुलांनां फार संतोष वाटला आणि तो संतोष तीं उड्या मारून आणि परस्परांशीं सलगीचीं भाषणें करण्याची मुभा घेऊन व्यक्त करूं लागलीं. सदू हा यमूच्या पाठचा भाऊ. हा वयानें बारा वर्षांचा होता; पण फार बुद्धिमान्, धीट आणि बोलका असे. त्याला नवीन येणाऱ्या बिऱ्हाडासंबंधीं कांहीं माहिती असेल ह्मणून यमूताई ह्मणाली "पण कायरे सदू! तुमचे मास्तर आपले घरांत येणार आहेत, त्यांनां कांहीं मूलबाळ आहे कारे? त्यांनां आपल्याच वयाचीं मुलं असलीं तर आपल्याला खेळायला अनायासंच सोबती होतील."

यमूताईचा हा प्रश्न ऐकून सदू एकसारखा हंसतच सुटला. इतका कीं, त्याचें हंसें त्याला आवरेना. आपल्या प्रश्नाचा सरळ जबाब न देतां सदूनें उलट हंसून आपला उपहास केला, हें पाहून यमूताईला अंमळ राग आला. त्याचप्रमाणें त्याला असें हंसूं लोटण्याचें कारण काय असेल तें कळण्याविषयींहि तिला अनावर उत्कंठा उत्पन्न झाली. तिनें एका हातानें सदूचे दोन्ही हात घट्ट धरिले आणि दुसऱ्या हातानें त्याचें तोंड दाबून धरून विचारिलें "तुला माझ्या गळ्याची शपथ आहे, खरं सांग तुला एवढं हंसायला काय झालं तें!"

यमूताईच्या मुद्रेवर आविर्भूत झालेला राग आणि तिच्या प्रत्येक अवयवाचेठायीं मूर्तिमंत संचारलेली गंभीरवृत्ति पाहून सदूनेंहि आपलें हंसें आवरून ह्मटलें "ताई, तूं विचारतेसच भलतेंसलतें हंसण्यासारखें, मग हंसूं कां नाहीं येणार? आमचे मास्तर केस पिकलेले, तोंडावर सुरकुत्या पडलेले, नाकामध्यें तपकिरीची चिमूट

कोंबून फोंफों करित दुसऱ्यांनां किळस आणणारे, एक हात कमरेवर देऊन दुसऱ्या हातानें काठी हापटितहापटित चालणारे कुणी बुढ्ढेबावा असतील, असें तुला वाटलें होय? खरें पुसशील तर आमचे नवे मास्तर कीनई अगदीं याच्या उलट आहेत. ते पोरवय असून कधीं कुणावर रागावत नाहींत; कुणाला मारित नाहींत, कीं कांहीं नाहीं! त्यांचा स्वभाव फार गरीब आहे. ते मुलांमधें नेहमीं मिळूनमिसळून रहातात. इतके कीं, एखाद्याला वाटेल हे आमच्या शाळेंतले मास्तर नसून कुणी विद्यार्थीच आहेत! पण आमचें मास्तर मोठे हुषार आहेत हो! पोतदार, गोखले, लिमये, छापखाने कुणाच्याहि अंकगणितांतलें उदाहरण त्यांनां विचारण्याचा अवकाश, कीं फळ्यापाशीं जाऊन त्यांनीं एका तडाक्यासरशीं त्याचा फडशा उडवून दिलाच ह्मणून समजावें! ते आपल्या घरांत राह्यला आले तर आपल्याला बुवा त्यांची मुळींच भीति वाटायची नाहीं; आणि तेहि असे हौशी आहेत कीं, ते तुझ्याबरोबरसुद्धां भातुकली खेळतील—भावलाभावलींचीं लग्नें लावतील—संकोच ह्मणून मुळींच धरायचे नाहींत! तुझ्याकरितां नवरा ह्मणून आईनें गोपूनानांचा बाबू नव्हता का पाहिला? आई त्याचे कितीतरी गुण गात होती! हुबेहूब त्या बाबूसारखे आहेत आमचे मास्तर. दिसण्यांत तसेच उंच, गोरे, नाकानें धरधरीत, अंगानें वाळके, स्वभावानें शांत आणि हौशी असे आहेत. आईला त्यांचा स्वभाव एकदा कळला पुरे, ह्मणजे त्यांच्याशींच तुझें लग्न करून द्यावेंसें तिला वाटेल! आणि अजून लग्नाचे मुहूर्तहि असतीलच. मग काय चैनच चैन आहे बुवा आमच्या सारख्यांची! लाडून्—जिलबीन्—पक्कान्नें रग्गड खायला मिळतील; मिरवणुकींत मिरवायला सांपडेल; अन् काय मौजच मौज होईल! आमचे मास्तर तुझ्यावर प्रीतीच करतील, तुला कांहीं मारायचे नाहींत—"

सदूचें हें लांबलचक पण मधूनमधून हास्यरसयुक्त थट्टेचें बोलणें आटपावें ह्मणून यमूताईनें तीनतीनदा उसना राग आणून त्याला ह्मटलें "हें रे काय सदू! असा वात्रटपणा करायचा असला तर मी नाहीं पुनः तुझ्याशीं बोलणार जा! चांगलं सांगायचं सोडून कांहींचेबांहींच बहकत सुटला आहे. तुला असं करायचं असलं तर मी आपली तुझ्याशीं गडी फू करून घरांत आईच्याजवळ जाऊन बसतें पहा! मला नाहीं तुझा हा असला चावटपणा आवडत—"

"अबबब! लग्नाचें नुसतें नांव घेतल्याबरोबर तुला इतका फणका आला अँ—"

सदू याप्रमाणें बोलत आहे तोंच त्याच्या एका सोबत्यानें त्याला हांक मारली ह्मणून तो बोलणें तितकेंच थांबवून त्याच्याबरोबर बाहेर निघून गेला.

## प्रकरण ३ रें.

# नवीन भाडेकरी.

इकडे यमूताई हातावर गाल टेंकून खिडकींतून रस्त्याकडे पहात उभी राहिली. दृष्टि रस्त्याकडे होती खरी, पण मन कोठें रस्त्याकडे होतें! तें भ्रमण करित होतें. मन भ्रमणांत पडल्यामुळें यमूताईची शरीरयष्टी या वेळीं इतकी निश्चल होऊन गेली होती कीं, जणूं कोणा कुशल कारागिरानें घडलेली ही संगमरवरी पाषाणाची पुतळीच या खिडकींत आणून बसविली आहे असें एखाद्याला वाटावें! फोटोग्राफ काढण्याच्या वेळीं पांचचार सेकंदें अगदीं निश्चल बसण्यास सांगतात; पण तेवढें क्षणभरहि जिच्यानें बसवलें नसतें, तीच आतां दोनतीन मिनिटें अगदीं चित्रासारखी डोळ्यांची पापणीसुद्धां न लववितां उभी आहे! याला सगळें कारण मन. राजा राजधानींत नसला ह्मणजे ती राजधानी स्मशानवत् भयाण वाटते. तद्वतच शरीर आणि मन यांची ताटातूट झाली ह्मणजे शरीर अगदीं निर्जीव आणि सुस्त होतें.

अशा स्थितींत यमूताई खिडकीशीं उभी असतां दामले मास्तरांची स्वारी घर पहाण्याकरितां येऊन थडकली. त्यांनीं "माधवराव घरीं आहेत का?" ह्मणून दारांतूनच प्रथम चौकशी केली. पण यमूताईचें लक्ष्य या वेळीं ठिकाणावर नसल्यामुळें तिला कांहींच ऐकूं आलें नाहीं. तेव्हां मास्तरसाहेब जिना चढून वर आले आणि माधवरावजींविषयीं विचारपूस करूं लागले. या वेळीं यमूताई चटकन् शुद्धीवर आली आणि पहाते तों सदूनें वर्णन केलेले मास्तर अगदीं पांचचार हातांच्या अंतरावर येऊन उभे आहेत! त्यांना कांहींएक उत्तर न देतां चटकन् धावत जाऊन आईच्या आड लपावें, असें एकदा यमूताईच्या मनांत आलें. पण परक्या गृहस्थाच्या प्रश्नाला कांहींच उत्तर न देतां त्याला तसाच उभा करणें हेंहि वाईट, असा विचार करून तिनें विनयानें उत्तर दिलें "बाबा घरीं नाहींत."

"केव्हां येतील?"

"ते आत्तां परत येतील. घर पहाण्यासाठीं कुणी आल्यास त्यांस तें दाखवून आपण येईपर्यंत अमळ बसवून घ्या, ह्मणून सांगून नुक्तेच बाहेर गेले आहेत. ते येईपर्यंत आपण बसावं."

असें ह्मणून यमूताईनें मास्तरांना बसण्यास खुर्ची आणून दिली आणि आपण घरांत जाणार इतक्यांत त्यांनीं विचारिलें "घरांत आणखी कांहीं बिऱ्हाडें आहेत का?"

यमूताई ह्मणाली "नाहीं. अर्ध्या घरांत आह्मी रहातों आणि अर्ध्या घरांत विष्णुपंत खजिनदार रहात असत. त्यांची आतां नुकतीच बाहेरगांवीं बदली झाल्यापासून ती जागा रिकामी पडली आहे. ती आतां दुसरे कुणालातरी भाड्यानं द्यायची आहे."

"तुमच्या घरांत कोणकोण माणसें आहेत?"

"बाबा, आई, मी, माझ्या पाठचा एक भाऊ व त्याच्या पाठची एक बहीण. अलीकडे आईला बरं वाटत नाहीं ह्मणून स्वयंपाकाला बाई ठेविली आहे. तीहि आमच्याच घरीं रहाते."

"तुह्मांला कांहीं लिहावाचायला येतं का?"

लिहिण्यावाचण्याचा आणि बिऱ्हाडाच्या जागेचा अर्थाअर्थी काय संबंध? पण मास्तर यमूताईला प्रश्न विचारित होते ते कांहीं घराच्यासंबंधानें माहिती मिळविण्याकरितांच ह्मणून नव्हे. एकतर माधवरावजी घरीं येईपर्यंत स्वस्थ मुकाट्यानें बसण्यापेक्षां बोलण्याचालण्यांत वेळ गेलेला बरा असें त्यांनां वाटलें. आणि दुसरें, यमूताईची ती मोहक आणि गंभीर मुद्रा पाहून आणि हुषारीनें आणि टेपराईनें तिनें दिलेलीं उत्तरें ऐकून तिच्याशीं मुद्दाम कांहींतरी गोष्टी काढून बोलत बसावें असें मास्तरसाहेबांनां वाटलें. यमूताईलाहि त्यांचा मन-मिळाऊ स्वभाव पाहून थोडासा धीर आला आणि तिनें आईच्याआड जाऊन लपण्यासाठीं पळ काढण्याचा जो प्रथम विचार केला होता तो हळूहळू शिथिल होत जाऊन आतांतर तिला तेथून हालूं नयेसेंच वाटलें! या शेवटच्या प्रश्नास काय उत्तर द्यावें? लिहावाचायला येतें ह्मणावें कीं नाहीं ह्मणून सांगावें? असा तिला विचार येऊन पडला. कारण कित्येक असे असतात कीं स्त्रियांनां लिहितांवाचतां येणें ह्मणजे त्यांच्या दृष्टीनें मोठाच अवगुण असतो. तेव्हां असा अवगुण आपल्या अंगीं आहे असें आपल्याच तोंडानें कबूल करणें बरें होईल काय? हा विचार यमूताईला येऊन पडला. तथापि खोटें बोलण्यापेक्षां खरें काय असेल तें सांगून टाकणें बरें, मग त्यापासून कोणाला राग येओ किंवा लोभ वाटो, असें यमूताईच्या आईचें शिक्षण असे. त्या शिक्षणाखालीं वाढलेल्या मुलीच्या तोंडून खोटें कसें निघेल? ती अंमळ भीतभीत ह्मणाली "हो थोडंसं येत आहे. बाबा थोडंथोडं मराठी शिकवित असतात. रघुवंशाचा दुसरा सर्गहि मला त्यांनीं शिकविला आहे. आणखी लवकरच इंग्रजी शिकवीन ह्मणून कबूल केलें आहे."

यमूताई आणखी सांगणार होती, इतक्यांत घरांतून पार्वतीबाईनीं तिला हांक मारिली. तेव्हां ती मास्तरसाहेबांची परवानगी घेऊन आंत गेली. यमूताईचें तें विनयाचें भाषण, तिची हुषारी, तिच्या अंगचा धीटपणा, नम्र स्वभाव आणि सभ्य चालचलणूक पाहून मास्तरसाहेबांनां फारच विस्मय वाटला आणि एवढी लहानशी पोरसुद्धां इतकी उत्तम वळणाची आणि शिकलेली आहे, तेव्हां तिला शिक्षण देणारे तिचे आईबाप किती सज्जन असतील असा मनाशीं विचार करित ते बसले आहेत, इतक्यांत माधवरावहि घरीं आले. नंतर कांहीं वेळ परस्परांचें भाषण झाल्यावर माधवरावांनीं त्यांनां घर उघडून दाखविलें.

यमूताई मास्तरांशीं जितकी खुल्या दिलानें बोलत होती तितक्याच मोकळ्या मनानें मास्तर माधवरावांपाशीं आपली सगळी हकीगत सांगत होते. मास्तरांचें नांव गोविंदराव. बारातेरा वर्षांचे असतांनाच त्यांची आई वारली व पुढें दोन वर्षांनीं वडीलहि वारले. वडिलांनीं कांहीं इस्टेट मागें ठेविली नव्हती. तेव्हां ते आपल्या आजोळीं मामाचे जवळ येऊन राहिले. हे मामा चांगले प्रख्यात सावकार होते; आणि त्यांची अशी इच्छा होती कीं, गोविंदरावांनींहि सावकारीचाच धंदा पुढें चालवावा. ह्मणून साधारण पांचचार इंग्रजी यत्ता होतांच त्यांनां गहाणाचा वगैरे व्यापार करण्याला लावण्याचा मामांनीं विचार केला होता. परंतु कुळांनां फसवून, त्यांच्या माना मुरगाळून पैसा काढण्याच्या सावकारी कसबाचा गोविंदरावांला मनापासून तिटकारा असल्यामुळें आणि इंग्रजी व संस्कृत वाङ्मयाची त्यांनां गोडी लागल्यामुळें कसेंहि करून एकदाचें बी. ए., व्हावयाचें आणि नंतर आपला सगळा जन्म शिक्षण आणि अध्यापन या दोन आवडत्या व्यवसायांत घालवावयाचा, असा त्यांचा विचार होता. तो विचार अर्थातच मामांला पटला नाहीं. दोघेंहि आपापला हट्ट सोडीनात! शेवटीं मामानें गोविंदरावांला साफ सांगितलें कीं "तुला जर माझें ऐकायचें नसेल तर तूं आपली काय वाटेल तशी तजवीज पहा. माझेकडून इतःपर तुला कवडीचीहि मदत मिळणार नाहीं!" गोविंदरावांनीं त्याच दिवशीं मामांचें घर सोडलें आणि माधुकरी मागून निर्वाह चालविला. शाळेंत स्कॉलर्शिप मिळे तिच्यावर कपडेलत्ते व दिवाबत्तीचा खर्च चाले. याप्रमाणें केल्यावर बी. ए. ची परीक्षा देऊन त्यांनीं मग नोकरी धरली होती.

ही हकीगत ऐकून गोविंदरावांच्या बाणेदारपणाविषयीं कौतुक करित माधवरावांनीं विचारलें "आतांतरी मामा तुमच्याशीं सरळपणानें वागतात कीं नाहीं?"

गोविंदराव ह्मणाले "छेः ! आमचे मामा ह्मणजे कसले करारी आहेत ! मीं त्यांनां आजपर्यंत कमींतकमी दहा पत्रें लिहिलीं असतील. पण तीं नुसतीं फोडूनतरी पहायचीं होतीं ! तीं जशींचीं तशीं माझ्याकडे परत आलीं."

"तुह्मी ह्मणतां त्यांनां मूलबाळ कांहीं नाहीं, मग ह्मतारा इतकें धन शेवटीं देणारतरी कुणाला ? खरें ह्मटलें तर त्यांनीं आतां मागचें सगळें विसरून जाऊन तुह्मांला पोटाशीं धरावें. त्यांनां दुसरे कुणी वारस उभे रहाण्यासारखे आहेत काय ?"

गोविंदराव ह्मणाले "माझी एक मावसबहीण आहे. कुणी कां वारस होईना ? आपल्याला त्याच्याशीं काय करायचें आहे ? द्रव्याचा लोभ नसला ह्मणजे तें न मिळाल्याबद्दलची निराशा ही दुःसह होत नाहीं."

यावर माधवराव ह्मणाले "तुह्मी ह्मणतां तें अगदीं खरें आहे. माझा स्वताचा-देखील तुमच्यासारखाच अनुभव आहे. दुसऱ्याच्या पैशावर दृष्टि ठेवून तो मरे-पर्यंत जिभल्या चाटित रहाण्यापेक्षां स्वतांच्या मनगटाच्या जोरावरच सगळी भिस्त आणि परमेश्वराच्या ठायीं दृढ श्रद्धा ठेवणें हें बरें, असें मी आमच्या मुलांच्या मनावर नेहमीं बिंबविण्याचा प्रयत्न करित असतों. आणि तुमचें अजून पोरवय असल्यानें तुह्मीहि मला मुलासारखेच आहां, तेव्हां तुह्मांलाहि माझें तेंच सांगणें आहे."

माधवरावांचें हें प्रेमळ भाषण ऐकून गोविंदरावांचा कंठ सद्गदित झाला. आपल्याला आईबाप वगैरे वडील माणसें कोणी नाहींत, एक मामा होते पण त्यांच्या लोभालाहि आपण या तऱ्हेनें अंतरलों, तेव्हां इतःपर माधवरावांनांच आपण वडिलांचेठिकाणीं समजून यांच्या पोक्त सल्ल्याप्रमाणेंच वागावयाचें, असा त्यांनीं मनामध्यें विचार केला आणि ह्मटलें "आपली आज्ञा मला शिरसावंद्य आहे. आतां आपणच मला वडिलांचे जागीं आहां, आणि ह्मणूनच आपल्या आश्रयाला येऊन रहाण्याचा माझा विचार ठरला आहे."

माधवरावांनां गोविंदरावांचा हा विनीत व नम्र स्वभाव पाहून पराकाष्ठेचें कौतुक वाटलें आणि गोविंदरावांनीं त्यांच्या घरांत येऊन रहावें असें अखेर ठरलें.

## प्रकरण ४ थें.

# सहजीं वाटलें तें खरेंच झालें !

माधवरावांनीं दूरवर विचार करूनच गोविंदरावांच्या बिऱ्हाडाची सोय करून दिली होती. असें करण्यांत त्यांचा दुहेरी फायदा झाला. एकतर घराचें भाडें पुनः सुरू झालें आणि दुसरें यमूताईच्या लग्नाविषयींची त्यांची काळजी बरीच कमी झाली.

माधवराव आणि पार्वतीबाई यमूताईला जीव कीं प्राण करित असत. यमूताई जितकी हुषार, टापटिपीची, घरांतल्या कामांत दक्ष आणि उद्योगी होती, तितकीच ती कोमल अंतःकरणाची, शांत आणि सर्वांशीं ममतेनें वागणारी होती. ती आतां उपवर झाल्यापासून तिला तिच्या योग्य स्थळ कसें मिळेल, ही चिंता तिच्या आई-बापांस लागून राहिली होती. आणि मुलीच्या लग्नाविषयींची चिंता ह्मणजे आई-बापांच्या मागें कसली जबरदस्त पीडा असते, ती ज्यांनीं स्वतः अनुभविली असेल त्यांनांच ठाऊक ! आधीं चांगले शिकलेसवरलेले, हुषार आणि सद्वर्तनी असे लग्नाचे मुलगे थोडेच असतात; आणि त्यांतल्या साधारण बऱ्या स्थितींतल्या मुलांनां श्रीमंत व सुखवस्तु लोक मोठमोठाले हुंडे देऊन, अगर घरजांवई करण्याचें आमिष लावून आपलेसे करतात. मग माधवरावांसारख्या सालस पण गरीब गृहस्थाच्या मुलीला चांगला वर कसा मिळावा? 'पैसा' हा शब्द मात्र लहान, पण त्याची कृति केवढी जगड्व्याळ आहे ! पैशाच्या लोभानें बाप आपल्या मुलीला एखाद्या क्रूर, रानटी आस्वलाच्या गळ्यांतसुद्धां बांधण्यास तयार होतील ! सारासार विवेकशक्ति नष्ट करणाऱ्या या पैशाच्या लोभानें '**ह्मातारा इतुका न, अवघें पाउणशें वयमान !**' अशा जिवंत मढ्याला आपली सुकुमार, प्रेमानें संगोपन करून वाढविलेली आणि जीव कीं प्राण समजून वागविलेली प्रत्यक्ष पोटची मुलगी देऊन तिचा गळा कापणारे खाटीक आपल्या समाजांत शेंकडों आहेत ! तसेच हुंड्याच्या द्रव्यराशीला भुलून मुलीचें वय, कुळशील, स्वरूप, शिक्षण, स्वभाव, संवयी वगैरे कांहींएक न पहातां मुकाट्यानें अशा मुलीचें लोढणें आपल्या मुलाच्या गळ्यांत अडकविणारे आणि त्याच्या संसाराची धूळधाण करणारे लोभांध आईबापहि कांहीं थोडेथोडके नाहींत ! अशी ज्या समाजाची स्थिति आहे, तेथें वधूवरांचें योग्य जोडपें मरु देशांतल्या रखरखीत वाळवंटांत ज्याप्रमाणें एखादें हिरवेंगार रम्यस्थान भाग्यानेंच आढळावयाचें त्याप्रमाणें क्वचितूच कोठें आढळलें, तर नवल नाहीं! अशा स्थितींत गरीब आईबापांनां आपल्या मुलीला सुस्थळ कसें मिळेल ही विवंचना

अहोरात्र जाळित असते, असें ह्मणणें अलंकारिक जरी असलें तरी अतिशयोक्तीचें आहे असें मात्र कोणाच्यानेंहि ह्मणवणार नाहीं.

माधवराव व पार्वतीबाई यांनां यमूताईच्या लग्नाची काळजी अलीकडे एकदोन वर्षांपासून वाटूं लागली होती. पण गोविंदरावांनीं पहिल्याच भेटीला माधवरावांजवळ आपली एकंदर हकीगत सांगून टाकली तेव्हांपासून—काय असेल तें असो—माधवरावांनां आपल्या चिंतेचा भार एकदम हलका झालासा वाटला. आतां गोविंदरावांनां या नव्या घरांत बिऱ्हाड करून जवळजवळ वर्ष होत आलें होतें; पण हा काळ गोविंदराव व यमूताई यांनां भावी आनंदाच्या आशेनें किती सुखाचा गेला! गोविंदरावांचा मनमिळाऊ स्वभाव, आणि त्यांचें अत्यंत शुद्ध, सरळ व बालबोध वर्तन पाहून माधवराव व पार्वतीबाई यांनां फार संतोष वाटे आणि तीं आतां गोविंदरावांला आपल्या कुटुंबापैकींच एकजण समजून तशा मोकळेपणानें त्याच्याशीं वागतहि असत. यमूताई, सदू आणि त्याच्या पाठची बहीण बगूताई हीं सगळीं मुलें आतां गोविंदरावांच्या माडींत जाऊंयेऊं लागलीं होतीं. गोविंदरावांनीं त्यांनां कागदाच्या नावा व हलवा ठेवण्यासाठीं नक्षीदार चित्रविचित्र आकृतीचे पुडे करून द्यावे; कधीं त्यांनां गमतीचीं गाणीं ह्मणण्यास शिकवावें; कधीं त्यांच्याकडून लहानशीं पण बोधप्रद भाषणें अभिनयासुद्धां ह्मणवावीं; कधीं त्यांनां मौजेच्या गोष्टी सांगून हंसवावें; अशा रीतीनें ते त्या मुलांची करमणूक करित गेल्यामुळें गोविंदरावांवांचून मुलांनां पुढें करमेनासें झालें. उठल्याबसल्या मुलें गोविंदरावांचे माडींत येत असत. सदू आणि बगी यांनां गोविंदराव आपल्यांतलेच एक खेळगडी वाटत. यमूताईला आतां चांगलें समजूं लागलें होतें आणि आईबापांच्या तोंडून लग्नाविषयींच्या गोष्टी तिच्या कानीं वारंवार पडूं लागल्या होत्या, त्यामुळें तिला गोविंदराव नुसते पोरपणचे खेळगडीच काय पण जन्माचे सोबती होतील तर आपण केवढ्या सुखी होऊं, असेंहि वाटूं लागलें होतें. इकडे गोविंदरावांनां सध्या पगार बेताचा असल्यामुळें तूर्त लग्न करण्याचा त्यांचा विचार नव्हता. पण पुढेंमागें जेव्हां आपल्याला लग्न करण्याची ऐपत येईल तेव्हां यमू आपल्याला पत्नी मिळाल्यास आपला संसार नमुन्यादाखल होईल आणि आपण सदा आनंदांत निमग्न होऊं, अशा तऱ्हेचे कल्पनातरंग गोविंदरावांच्या मनांत येऊन ते सप्रेम दृष्टीनें तिच्या त्या सदा आनंदी, हंसतमुख आणि प्रफुल्लित मुद्रेकडे पहात असत. माधवरावांनींतर आपल्या मनामध्यें ही वधूवरांची योजना फार दिवसांपासूनच करून ठेविली होती; आणि मधूनमधून पार्वतीबाईशीं त्यांचें यासंबंधीं

एकदोन वेळां बोलणेंहि झालें होतें. पार्वतीबाईला गोविंदराव म्हणजे नापसंत होते असें मुळींच नाहीं. पण त्यांच्या घरांत वडील माणूस वगैरे कोणी नव्हतें आणि वडिलार्जित जिंदगीहि कांहीं नव्हती, यामुळें त्यांच्याहून अंमळ संपन्न स्थितींतला आणि घरंदाज असा जांवई मिळवा, असें त्यांच्या मनाला साहजिकच वाटत होतें. अशी हरकत जेव्हांजेव्हां पार्वतीबाई घेत, तेव्हांतेव्हां माधवराव त्यांची समजूत घालण्याकरितां म्हणत "मुलगी द्यायची ती घरांतल्या माणसांकडे पाहून द्यायची कीं खुद्द जांवयाकडे पाहून? गोविंदरावांततर खोड ठेवायला मला जागा दिसत नाहीं. प्रथम वर आहे, विद्वान् आहे, पैसे कमावता आहे, नाकाडोळ्यानें चारचौघांसारखा असून अल्पवयी आहे, आणखी काय पाहिजे? घरांत सासू नाहीं आपल्या यमूला छळायला, हेंहि एकाअर्थी बरेंच आहे. आतां मुलीला मोळा लावायला घरांत वडील माणूस लागतें, तें मात्र नाहीं, एवढी गोष्ट खरी; पण यमू हुषार आहे; आणि शिवाय ती सासरीं गेली तरी कितीशी लांब जाणार? एकाच भिंतीच्या आड ना? झालें तर! सासरीं गेली तरी आपली देखरेख तिच्यावर रहाणारच. तशांत आणखीहि एक आपली त्यांत सोय होणार आहे. आपल्या घरांत तरी आतां हवें नको पहायला आणि मुलांना संभाळायला कोण आहे? तूं आहेस दुखणाईत; मी जाणार छापखान्यांत नोकरीवर. चार दिवस यमू आहे म्हणून तिच्या भरंवशावर आपण स्वस्थ आहों. पण ती उद्यां लग्न होऊन दुसरीकडे कुठें गेली म्हणजे आपली केवढी गैरसोय होईल? आतां गोविंदरावांजवळ पैसे नाहींत बायकोच्या अंगावर दागिने करून घालायला, हें खरें. पण बायकांना जो मुख्य दागिना म्हणजे सद्गुणी, प्रेमळ, विद्वान् आणि शांत स्वभावाचा पति हवा, तो आपल्या यमूला मिळाल्यावर दुसरे हलकेसलके दागिने नसले म्हणून काय झालें? तेहि हळूहळू होतील, नाहीं असें नाहीं. गोविंदराव यंदा एल्. एल्. बी. च्या परीक्षेस जाणार आहेत. पास होऊन कुठें वकिली करूं लागले कीं दागिने करण्याला पैसे शिलकेंत पडूं लागतील. आणि मग ते आपल्या यमूची हवीतेवढी हौस पुरवितील. पण मी म्हणतों घटकाभर असें समज कीं, नाहीं तसें कांहीं झालें, तथापि पोटभर अन्नवस्त्र आणि पतीचें प्रेम एवढें स्त्रीला मिळालें म्हणजे आजकालच्या दिवसांत तिच्यासारखें सुखी कुणी नाहीं म्हणून समजावें. आतां आपली स्वतांचीच स्थिति पहाना! अब्रूनें खायलाप्यायला मिळतें आहे व कुणाचें दमडीभर देणें नाहीं म्हणून आपण सदा सुखांत आहों कीं नाहीं? तुझ्या अंगावर दागिने नाहींत म्हणून तूं कधीं दुःखीकष्टी झाली आहेस का? आपल्या इतपत अब्रूनें यमूचा संसार

झालेला आपण डोळ्यांनीं पाहिला, ह्मणजे तिच्याविषयीं आपण बिनघोर होऊं. मीं मनाशीं पुष्कळ विचार करून पाहिला. मलातर बुवा गोविंदरावांसारखें सुस्थळ दुसरें कुठें दिसत नाहीं ! यावर तुझें काय ह्मणणें आहे तें सांग."

यावर पार्वतीबाई काय बोलणार ? त्यांच्याकडून जेवढ्या कांहीं शंका निघण्यासारख्या होत्या त्या माधवरावांनीं स्वतांच काढून त्यांचें निरसनहि उत्तम रीतीनें केलें होतें. शिवाय त्यांनीं स्वतांच्याच स्थितीचें उदाहरण घेऊन दागिने नसतांहि बायकांनां महत्तम सुख कसें लाभतें, तेंहि दाखविलें होतें. तेव्हां यावर पार्वतीबाईला कांहींच बोलणें सुचेना. त्यांनीं माधवरावाच्या प्रत्येक मुद्द्याला मानेनेंच रुकार दिला होता; तथापि माधवरावांनीं आपल्या भाषणाचा समारोप करून त्यावर पार्वतीबाईचें मत विचारलेंच ह्मणून मानेनें दिलेला रुकार पुनः शब्दांनीं व्यक्त करून त्या ह्मणाल्या "आतां ह्मटलं तें सगळं मला पटलं. आतां दुसरं स्थळबीळ कांहींएक न शोधतां गोविंदरावांला आपली यमू द्यावी, असं मलाहि वाटतं पण—"

माधवराव हंसून ह्मणाले "आपला 'पण' राहिलाच आहे का अजून ? लग्नाच्या बाबतींत आपण कांहीं खुसपट काढिलें नाहीं तर आपल्याला लोक बुद्धिमंद समजतील असें बायकांनां वाटत असतें ! ऐकूंद्या एकदाचा तुमचा तो 'पण'—"

पार्वतीबाई किंचित् ओशाळल्यासारख्या होऊन ह्मणाल्या "मी खुसपटबिसपट कांहीं काढित नाहीं. माझं ह्मणणं एवढंच आहे कीं, आपण हे सगळे बेत करतां आहां खरे, पण गोविंदराव आपल्या यमूला पतकरतील का ? त्यांनां मोठाल्या हुंड्याच्या शेंकडों मुली सांगून येत असतील—"

"त्याचा विचार केल्याखेरीज का मीं हा सगळा बेत तुला सांगतों आहें असें तुला वाटलें ? गोविंदराव आपल्या इच्छेबाहेर नाहींत, हें मला ठाऊक आहे. शिवाय हुंड्याकडे दृष्टि देऊन एखादी घोरपड गळ्यांत अडकवून घेण्यापेक्षां यमूसारखी मुलगी बिनहुंड्यानेंसुद्धां पतकरण्यांत त्यांनां आनंद वाटेल, असा त्यांचा स्वभाव मी ओळखून आहें. आणखी तिसरी गोष्ट—यमू त्यांच्या मनांत भरली आहे असें मानण्यासमुद्धां पुष्कळ पुरावा आहे. तुझी या गोष्टीला संमति असली तर मी गोविंदरावांलाच एकीकडे नेऊन त्यांच्या मनाची परीक्षा पहातों आणि
६ आपला अंदाज आहे तो खरा असल्यास लग्नाचें जुळवून टाकतों ह्मणजे झालें. आहेना हा विचार तुला पसंत ?"

माधवरावांच्या ह्मणण्याला पार्वतीबाईचें पूर्ण अनुमोदन मिळतांच ते आपल्या उद्योगाला लागले. दोनचार दिवसांत गोविंदरावांनां एकटे गांठून माधवरावांनीं

लग्नाची गोष्ट काढिली आणि ह्मणाले "माझी स्थिति जी आहे ती तुह्मांला दिसतेच आहे. ती मीं तुमचेपासून लपविण्यांत अर्थ नाहीं. मुलीबरोबर हुंडा देण्याचें माझें सामर्थ्य नाहीं. पण माझ्या शक्तीप्रमाणें माझ्या यमूला मी कांहीं कमी करणार नाहीं. या सगळ्या गोष्टींचा विचार करून काय उत्तर देणें असेल तें द्या. भिडेमुरवतीस्तव हो नाहीं ह्मणणें बरें नाहीं. या जन्माच्या गांठी आहेत. या कामीं भीड मुरवत किंवा उतावीळपणा उपयोगाचा नाहीं. यांत होणाऱ्या चुकांचे परिणाम दोघांनांहि जन्मभर भोगावे लागतात. ह्मणून उत्तर देण्यापूर्वी विचार करण्यास पाहिजे तर सवड घ्या."

पण गोविंदरावांनीं याविषयीं पूर्वींच विचार करून आपल्या मनाचा निश्चयमुद्रां करून ठेविला होता. ते होऊनच माधवरावांपाशीं लग्नाची गोष्ट काढणार होते, पण लज्जेमुळें बोलण्याचा त्यांनां धीर होत नव्हता. अशा वेळीं माधवरावांनीं आयतीच आपल्यास बोलण्यास संधि दिली हें पाहून गोविंदरावांनां मनापासून किती आनंद वाटला असेल, याची वाचकांनींच कल्पना करावी. तरी पण स्वतांच आपल्या लग्नाची गोष्ट आणि तीहि प्रत्यक्ष भावी सासऱ्यापाशीं काढतांना त्यांच्या मनाला एकप्रकारचा संकोच वाटत होता. तो दाबण्याचा प्रयत्न करून ते ह्मणाले "कामधेनु आपण होऊन घरीं चालत आली असतां तिला कोणता शहाणा पुरुष मना करील? आपल्यादेखत असें बोलणें ह्मणजे मर्यादेचा अतिक्रम तर खराच, पण आपण मोकळ्या मनानें माझ्याशीं वागता ह्मणून आपल्यापाशीं बोलण्यास धीर येतो. आपण जी गोष्ट माझेपाशीं काढली ती मीच होऊन आपल्यापाशीं काढणार होतों, यांतच सगळें समजा. आतां हुंड्यापांड्यासंबंधानें आपण ह्मटलें त्यावर माझें एकच उत्तर आहे. तें हें कीं, आपण जी देणगी देऊन मला जन्माचें सुखी करण्याचें मनांत आणिलें आहे, तिच्या किंमतीपुढें द्रव्याच्या राशीहि मी तुच्छ मानतों ! आपण मला आपला मानून पदरांत घेत आहां, हेंच मला फार आहे !"

याप्रमाणें बोलणें झाल्यावर लग्नाचा निश्चय ठरला आणि माधवराव व पार्वतीबाई काळजींतून मुक्त झालीं.

## प्रकरण ५ वें.

# दुर्दैवाचा घाला.

यमूताईचें लग्न होऊन आतां वरेच दिवस झाले होते. तिचें सासरचें नांव राधाबाई असें ठेवण्यांत आलें होतें, तरी त्या नांवाचा उपयोग करण्यास सासरचीं माणसें कोणीच नसल्यामुळें अद्यापि माहेरच्या 'यमूताई' याच नांवानें सर्वजण तिला हांक मारित असत. परंतु एखाद्या परक्या अनोळखी बाईनें खुद्द यमूताईला तिचें नांव विचारलें असतां मात्र ती 'यमू' असें न सांगतां 'राधा' असें सांगत असे, इतका सासरचा तिला अभिमान वाटूं लागला होता. आतां गोविंदरावांचें घर तेंच आपलें घर होय, ही गोष्ट तिच्या मनांत इतकी ठसली होती कीं, तिच्या डोक्यांत अहोरात्र घोळणारे विचार व तिच्या हातून घडणाऱ्या कृति यांतहि तिच्या या समजुतीचें प्रतिबिंब स्पष्ट दिसत असे. आतां आपल्याला जी अल्पस्वल्प प्राप्ति आहे तेवढ्यांतच नीटनेटका प्रपंच चालवून थोडथोडी शिल्लक टाकित गेलें पाहिजे, अशा विचारानें तिनें प्रत्येक गोष्टींत हात राखून खर्च करण्याचा बेत केला होता; परंतु बेत करणें एवढेंच काय तें मनुष्याच्या आधीनचें असतें. त्याप्रमाणें घडवून आणणें हें दैवाधीन असतें. त्या बिचारीनें मोठ्या कष्टानें काटकसर करून पैशाशीं पैसा जुळवून दहापांच रुपये मागें टाकावे, तों गोविंदरावांनीं एल. एल. बी. च्या परीक्षेचें एखादें पुस्तक घेण्यासाठीं ते सांचलेले रुपये मागून घ्यावे. पुनः तिनें शिल्लक मागें टाकण्यास लागावें आणि पुनः एकदोन महिन्यांनीं असेंच कांहींतरी निमित्त निघून गोविंदरावांचे हातून ती शिल्लक खर्च व्हावी. असा प्रकार कित्येक महिने चालला होता. दुसरी एखादी स्त्री असती तर असा अनुभव वारंवार आल्यावर पुनः शिल्लक टाकण्याचें ह्मणून नांवसुद्धां घेतीना. परंतु राधाबाईला लहानपणापासून मिळालेलें शिक्षण, त्यांची समजूत व वागणूक हीं कांहीं अलौकिक होतीं. राधाबाई मुंगीसारख्या सदोदित खपत असत. स्वताच्या घरचें कामकाज पाहून शिवाय माहेरचेंहि कामकाज त्या करीत. दोन्ही घरचे हिशोबठिशोब ठेवण्याचें काम त्यांच्याकडेसच असे. गोविंदराव पगार हातीं येतांच तो राधाबाईच्या हवालीं करीत. त्या पगारांतून किती खर्च झाला आणि किती शिल्लक राहिली या गोष्टीची चौकशी ते मुळींच कधीं करित नसत. ते ह्मणत कीं, आमच्या घरीं आतां अन्नपूर्णा आली आहे, आतां हो आह्मांला काय कमी आहे! आणि खरोखरीच राधाबाईनीं कांहींएक उणें पडूं न देतां नवऱ्याचा संसार असा

ठाकठिकीनें चालविला होता कीं, गोविंदरावांनीं तिला 'अन्नपूर्णा' ह्मटलें यांत कांहीं नवल नाहीं. उत्तम भार्येचीं लक्षणें एका संस्कृत कवीनें वर्णन केलीं आहेत:—

**'कार्येषु मंत्री, करणेषु दासी,**
**भोज्येषु माता, शयनेषु रंभा,**
**धर्मानुकूला, क्षमया धरित्री,**
**भार्या च षाड्गुण्यवती हि दुर्लभा !'**

हें वर्णन राधाबाईला सर्व प्रकारें लागू पडणारें होतें. असें स्त्रीरत्न प्राप्त झाल्याबद्दल गोविंदरावांनां किती धन्यता वाटत होती ! आणि तसें भाग्य प्राप्त झाल्यावर कोणाला नाहीं वाटणार ?

चैत्राचा महिना. दुपारची वेळ. उन्हाळा आपलें उग्र स्वरूप नुकताच दाखवूं लागला होता. दोनप्रहरीं जेवणखाण झाल्यावर घटकाभर अंग टाकण्याची बुद्धि प्रत्येकास होत असे; पण राधाबाई मात्र झोंप न घेतां दुपारचें शिवणकाम घेऊन बसत असत. संध्याकाळीं हळदीकुंकवाला स्त्रियांच्या झुंडीच्या झुंडी निघत. त्यांचे बरोबर आपणहि नवा चोळीपरकर नेसून मौज पहाण्यास जावें असें बगुताईला वाटे आणि ह्मणून ती नव्या चोळीपरकरासाठीं हट्ट घेऊन बसली होती हें कोटें माधवरावांनीं ऐकिलें होतें. त्यांनीं रविवारीं सुट्टीच्या दिवशीं कापडाच्या दुकानीं जाऊन बगुताईसाठीं चांगले खण आणून आतांचेआतां चोळीपरकर शिवून दे, ह्मणून यमूताईला सांगितलें होतें. तें शिवण्याचें काम घेऊन त्या बसल्या होत्या. पार्वतीबाई खिडकीपाशीं उभ्या होत्या. इतक्यांत समोरून कोणी लगबगीनें येत होतें तिकडे त्यांची दृष्टि गेली. पण दुखण्यानें पार्वतीबाईंची दृष्टि क्षीण झाल्यामुळें त्यांनां स्पष्ट दिसेना. ह्मणून त्या ह्मणाल्या "यमे, इथून पहाग समोरून कोण लगबगीनं आपल्या घराकडेस येत आहे तें. तुह्मी तरण्याताठ्या मुली, तुमचे डोळे शाबूत आहेत. आमचे मेले गेले डोळे! आतां पहाणं कसलं न् काय कसलं—"

राधाबाई उठून चटकन् खिडकीपाशीं आल्या आणि पहातात तों माधवरावच लगबगीनें घराकडे येताहेत. हें पहातांच त्या ह्मणाल्या "आई, एवढं नाहींका तुला दिसलं? अग आपले बाबाच आहेत ते. आज एवढे घाईनं कां बरं येत आहेत?"

माधवराव ह्मणजे कांहीं एरवीं फारसे जलद चालणारे नव्हते. चालण्याचे जे कित्येक गमतीचे प्रकार कधींकधीं पहाण्यांत येतात, त्यांतला त्यांचा प्रकार नव्हता. कोणी तुर्की चालीवर जवळजवळ पण जलद पावलें टाकित चालतात; कोणी उंटासारख्या लांब फलांगा टाकित आणि खांदे उडवितउडवित चालतात; कोणी

हरणाच्या चालीवर मधेंच टुनकन् उड्या मारितमारित चालतात; कोणी रस्त्यानें जातांना बाजूच्या घरांच्या माड्यांकडे कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें भामट्यासारखें पहात पहात चालतात; आणि कोणी डुलतडुलत आपल्या विशाळ दोंदाला ढकलित-ढकलित मंदगतीनें चालतात. माधवरावांचें नेहमींचें चालणें यांपैकीं कोणत्याच सदराखालीं येणारें नव्हतें. ते साधारणतः पोक्त माणसासारखे फारशी घाई न करतां व अगदीं अजगरासारखें न रेंगाळतां चालत असत. पण आजचा त्यांचा प्रकार नेहमींहून अगदीं निराळा होता. कसेंहि करून एकदाचें लवकर घर गांठूंया, मग आपल्या चालण्याला लोक हंसोत किंवा काय पाहिजे तें होओ, असें त्यांनां वाटत असल्याचें त्यांच्या चेहऱ्यावरून व अव्यवस्थितपणाच्या आणि घाईच्या चालण्यावरून स्पष्ट दिसत होतें.

माधवरावांच्या जलद येण्याबद्दल त्या उभयतां मायलेकींचे आपले ठिकाणीं चिंतायुक्त विचार चालले आहेत, इतक्यांत ते दडदड जिना चढून वर येऊन पोहोंचले. त्यांची घाबरी मुद्रा आणि घाईघाईनें येणें पाहून पार्वतीबाई इतक्या गडबडून गेल्या कीं, त्यांनां बोलायाला कांहींच सुचेना; आणि सुचलें तरी ओंठा-वाटे शब्द ह्मणून बाहेर पडेना. इतक्यांत माधवरावांनींच बोलण्याला सुरुवात केली. ते ह्मणाले "यमे, थोडें गाईचें दूध आणि खडीसाखर आण बरें. थोडीशी मात्रा उगाळायची आहे—"

तें ऐकतांच राधाबाई साश्चर्य मुद्रेनें बापाचे तोंडाकडे पहावयाला लागल्या. आतां त्यांच्यानें स्तब्ध रहावेनाच. त्यांनीं विचारलें "बाबा, तुह्मांला बरं नाहींका आज वाटत ? मात्रा कशासाठीं घेतां ? काळीजबिळीज पुनः दुखूं लागलं का ?"

त्यावर माधवराव मुलीची व तिच्याबरोबरच तिच्या आईची काळजी दूर करण्याकरितां हंसतहंसत ह्मणाले "यमे, तूं अगदीं वेडी आहेस ! मीं स्वतांकरितां का मात्रा मागितली असें तुला वाटलें ? माझें काळीज आज महिन्या दीडमहिन्या-पासून दुखतें आहे; मी कुठें त्याची एवढी परवा करतों आहें ? मघां मंडईकडे जात होतों, तों वाटेंत तुळशीबागेजवळ एक गृहस्थ भेटला. त्याच्या सांगण्या-वरून एका गरीब रोग्याला पहाण्याकरितां ह्मणून गेलों. त्याचा जीव पित्तानें फार घाबरतो आहे. तेव्हां अगोदर मात्रा उगाळून त्याला नेऊन देईन व मग पुढें जाईन ह्मटलें. काय बिचारा डोळे पांढरे करतो आहे अगदीं !"

स्वतांचें काळीज आज महिना दीड महिना दुखत असून माधवरावांनीं घरांत कळविलेंसुद्धां नाहीं आणि दुसऱ्याचा जीव पित्तानें घाबरा होत आहे त्याला लवकर

आराम कसा पडेल ही त्यांनां चिंता येऊन पडली आहे, हें पाहून राधाबाईला काय बरें वाटलें असेल? काळीज दुखल्याचें ऐकतांच पार्वतीबाईंच्या जात्याच कोमल पण दुखण्यामुळें अधिकच नाजूक झालेल्या अंतःकरणाला एकदम धक्का बसल्यासारखें झालें. त्या ह्मणाल्या "स्वतांच्या जिवाकडे अगोदर बघायचं होतं. उद्यां अगोदर सगळीं कामं बाजूला टेवून नाशिककर वैद्यबुवांचं औषध घ्यायचं. त्यांचा नांवलौकिक मोठा आहे. कितीहि दिवसांचं असाध्य दुखणं त्यांच्या औषधानं बरं होतं ह्मणून शेजारच्या काकू ह्मणत होत्या. एक सातरंभरतरी पुड्या घेऊन पहायच्या. बरं वाटलं तर पुढं चालू ठेवलं, नाहींतर सोडून दिलं. मेलं दाक्तरांच्या घरचं पाणी किती दिवस घेतलं तरी त्यानं कायमचा गुण येत नाहीं ह्मणतात. दाक्तरचा उपाय ह्मणजे वरवरचा. हाडांत मुरलेलं दुखणं कांहीं त्यानं जात नाहीं. आपल्याच्यानं जाववत नसलं तर काकूंकडून निरोप पाठवून वैद्य-बुवांनांच घेतां येईल इथं बोलावून. माझ्या गळ्याची शप्पथ, प्रकृतीविषयीं इतका हलगर्जीपणा आणि सुस्ती कामाची नाहीं—"

पार्वतीबाई तोंडानें एवढंच बोलल्या, पण त्यांच्या मनाला किती वाईट वाटलें होतें, याची कल्पना त्यांच्या स्वतांखेरीज दुसऱ्या कोणालाहि पुरतेपणीं होणार नाहीं. हा काळजाचा रोग फार फसविणारा असतो; मनुष्य वरून धट्टाकट्टा दिसतो खातोपितो, आनंद करतो, कामहि हवेंतितकें करितो; त्यावरून त्याच्या इष्ट मित्रांस आणि जिव्हाळ्याच्या माणसांस, फार काय पण त्याचें त्यालाहि आपली आयुष्यमर्यादा अजून बरीच लांब असल्याचें वाटत असतें; परंतु इतक्यांत थोडेंसें कांहीं निमित्त होऊन पांच मिनिटांचे आंत त्याचें प्राणोत्क्रमण होतें. या गोष्टी पार्वती-बाईंच्या कानीं गेल्या होत्या व खुद्द त्यांचा मामा अशा काळजाच्या रोगानेंच एकाएकीं वारला होता. तेव्हां 'काळीज दुखतें' हे शब्द कानीं पडतांच पार्वती-बाईंची पांचांवर धारण बसली व नाहींनाहीं त्या वाईट गोष्टींचें चित्र त्यांच्या डोळ्यां-पुढें उभें राहिलें, यांत नवल नाहीं. सृष्टीचा नियमच असा आहे कीं, कोणी प्रेमाचें मनुष्य थोडेंसें आजारी झालें तरी त्याच्या जिवलगांनां त्याच्याविषयींच्या अत्यंत वाईटवाईट तेवढ्या कल्पना प्रथम सुचतात. 'अति स्नेहः पापशंकी' अशी संस्कृत भाषेंत यावरूनच ह्मण पडली आहे. असो.

माधवरावांनीं पार्वतीबाईंचें बोलणें शांतपणें ऐकून घेतलें आणि ह्मटलें "त्याचं पहातां येईल उद्यां. अगोदर दूध आणि खडीसाखर लवकर आणायला सांग ह्मणजे झालें."

माधवरावांनां काळजाचा रोग होता आणि तशांत ते घाईघाईनें भराभर जिना चढून आलेले होते. यामुळें त्यांचें काळीज जास्तच दुखूं व धडधडूं लागलें होतें. शिवाय बरेच लांबून आणि तेंहि भर उन्हांतून चालून आल्यामुळें व भूकहि लागल्यामुळें त्यांचा स्वतांचाच जीव घाबरला होता. पण माधवरावांचा स्वभाव स्वतांच्या प्रकृतीसंबंधीं मनस्वी हलगर्जी होता. इतका जीव घाबरत होता व भूकहि लागली होती, पण कांहीं औषधपाणी घ्यावयाची किंवा एखादी वडी तोंडांत टाकून पाणी पिण्याची गोष्ट त्यांच्या मनांतच येईना. राधाबाईनीं दूध व खडीसाखर त्यांच्यापुढें नेऊन ठेविली, त्या वेळेस "कांहीं खायला देऊं का ?" ह्मणून विचारिलें; पण "कांहीं नको, एवढी मात्रा उगाळून त्याला नेऊन देतों आणि लगेच परत येतों. मग मी आहेन् माझें खाणेंपिणें आहे !" असें तोंडानें ह्मणत त्यांनीं एका चांदीच्या लहानशा वाटींत मात्रा उगाळून भरली आणि ती वाटी आपल्या हातरुमालाखालीं झांकून घेऊन ते चालते झाले. पण आतां क्षुधेमुळें व काळजाच्या दुखण्यामुळें त्यांचें पाऊल पूर्वीसारखें झपाट्यानें उचलत नव्हतें. ही गोष्ट दोघींच्याहि लक्ष्यांत आली होती. दोघीजणी खिडकींत उभ्या राहून माधवरावांकडे ते दृष्टीआड होत तोंपर्यंत पहात होत्या.

आणखी एक तास लोटला. "एवढी मात्रा देऊन आतां परत येतो," असें सांगून माधवराव गेले. पण त्यांचा अद्याप पत्ता नाहीं; त्यामुळें पार्वतीबाई व राधाबाई यांनां अधिकच काळजी वाटूं लागली. आणि माधवरावांच्या शोधासाठीं सदूला पाठविण्याचा त्यांचा विचारहि चालला होता. पण पाठवावयाचें कोठें, हा प्रश्न येऊन पडला. तुळशीबागेपाशीं कोठेंतरी गेले आहेत, एवढाच कायतो पत्ता त्यांनां ठाऊक होता. पण पुण्यासारख्या शहरांत एवढ्या पत्त्यावर कोणाच्या घरीं जाऊन माधवरावांचा शोध करावयाचा? तशांतून सदू अगदींच लहान पोर. मोठ्या माणसांची गोष्ट निराळी असते. ते चार ठिकाणीं विचारून हवा त्याचा शोध लावूं शकतात. पण सदूसारख्या मुलाला पुण्यांतले लुच्चे लोक मदत करण्याचेंतर राहोच, पण उलट भलत्याच घरांत शिरण्यास सांगून फजीती झालेली पहाण्यांत मात्र आनंद मानते. बरें गोविंदरावांनां माधवरावांच्या शोधार्थ पाठवावें, तर तेहि अद्याप घरीं आले नव्हते. अशा स्थितींत आणखी कांहीं काळ लोटला. इतक्यांत गोविंदराव घरीं आले. घरीं येतांच खुणेनें राधाबाईला एकीकडे बोलावून नेऊन ते ह्मणाले "तुला एक मोठ्या दुःखाची बातमी कळवायची आहे. तूं विचारी आहेस, तेव्हां तूं ती शांतपणें ऐकून घेशील आणि न घाबरतां आपल्या आईचें आणि

भावंडांचें शांतवन करशील, अशी माझी खात्री आहे ह्मणून तुलाच प्रथम मी ती सांगणार आहें."

राधाबाई आपल्या वयाच्या मानानें पुष्कळच शांत आणि धीराच्या होत्या. तथापि गोविंदरावांची ती दुःखी मुद्रा, पाण्यानें भरून आलेले डोळे आणि 'आईचें आणि भावंडांचें शांतवन' हे भयसूचक शब्द ऐकून त्यांचें अंतःकरण चर्र झालें. जी शंका आतांपर्यंत त्यांच्या मनाला सारखी खात होती, तीच खरोखर खरी झाली असावी, असें पुरतेपणीं वाटून त्या ह्मणाल्या "काय, बाबांविषयींची का बातमी आपण आणिली आहे ? अरे दैवा, कसा रे तूं असा घात केलास ! बाबा, हीच का हो तुह्मीं शेवटची भेट दिलीत—"

असें ह्मणून त्या डोळ्याआड पदर धरून स्फुंदस्फुंदून रडूं लागल्या. तें पाहून गोविंदरावांलाहि रडूं कोसळलें. तथापि त्यांनीं विवेकानें आपलें रडें आवरून ह्मटलें "एवढ्याकरितां का मीं तुला एकीकडे बोलावून सांगितलें ? तूं आतां मन घट्ट करून आईला चार गोष्टी सांगाव्या तें सोडून तूं स्वतांच अशी रडूं लागलीस, याला काय ह्मणावें ?"

राधाबाईनीं वज्रासारखें अंतःकरण दृढ करून रडें दाबलें आणि डोळे पुशित-पुशित सगळी हकीगत विचारली. गोविंदराव ह्मणाले "मी दाणेआळींतून मंडई-वरून घराकडे येत होतों तों वाटेंत एका ठिकाणीं लोकांची बरीच गर्दी जमलेली पाहिली. काय गडबड आहे ह्मणून पहातों तों आपले बाबा ठेंच लागून प्राण कासावीस होऊन रस्त्यांत पडलेले. इतके तमासगीर तमाशा पहाण्यासाठीं भोंवतीं जमा झाले होते, पण कुणीं एकानेंसुद्धां त्यांनां नीट सांवरून धरलें किंवा शुद्धीवर आणण्याची व औषधोपचार करण्याची तजवीज केली, असें घडलें नाहीं. सुदैवानें मी इतक्यांत तेथें जाऊन पोहोंचलों ह्मणून बरें झालें. लवकर डाक्टरी इलाज केला पाहिजे ह्मणून जवळच डाक्टर महाशब्दे यांचा दवाखाना आहे तेथें बाबांनां गाडींतून घेऊन गेलों. पण मी हतभागी, माझ्या हाताला यश कुठलें यावयाला ? डाक्टरसाहेबांच्या दवाखान्यांत पाऊल ठेवण्यापूर्वींच बाबांचें प्राणोत्क्रमण झालें होतें. शेवटीं त्यांनां तेथेंच ठेवून मी ही दुःखाची बातमी कळविण्यास इकडे तांतडीनें निघून आलों. बाबा आतां आपल्यालातर सोडून गेले, आतां आपल्यावर कृपेची पाखर कोण घालील ?"

डोळे पुशितपुशित गोविंदराव पुढें ह्मणाले "ही बातमी तूं आपल्या आईला व भावंडांनां फार युक्तीनें कळीव. तुझ्या आईची प्रकृति फारच नाजूक झाली आहे.

तिच्या मनाला या शोकापासून एकदम धक्का बसल्यास फार कठीण प्रसंग गुदरेल. ह्मणून विशेष खबरदारीनें हें काम कर. तोंपर्यंत मी तिकडे जाऊन पुढच्या तजविजीस लागतों." असें ह्मणून गोविंदराव पार्वतीबाईस न भेटतां बाहेरचेबाहेर निघून गेले.

राधाबाई पदरानें डोळे पुशित व मधूनमधून सुस्कारे टाकित अंमळ तेथेंच उभ्या राहिल्या. आपल्यावर सोंपविलेलें काम करण्यास आपण जगलों त्यापेक्षां बाबांच्या अगोदरच मेलों असतों तर किती बरें झालें असतें, असेंहि त्यांनां वाटूं लागलें. पुनः त्यांचें मन त्यांनां सांगूं लागलें कीं "यमूताई, तूं अशी बाबांच्या मृत्यूविषयीं शोक करित युगांचीं युगं उभी राहिलीस तरी एकदा गेलेले तुझे बाबा फिरून परत येतील का? आणि तूंच अशी शोकाकुल होऊन स्वकर्तव्यास विसरलीस, तर व्याधीनं क्षीण झालेली तुझी आई आणि अज्ञान भावंडं यांनां धीर देण्यास, चार गोष्टी सांगून त्यांचं समाधान करण्यास दुसरं कुणी घरांत आहे का? चल तर मग, ऊठ, शोक आवर आणि तुला सांगितलेलं काम होईल तितक्या तजविजीनं आणि युक्तीनं कर."

ही विवेकाची शिकवणी त्यांनां पटली आणि त्या हळूच घरांत जाण्यासाठीं मागें वळल्या. याचवेळीं पार्वतीबाई बाहेर येत होत्या. रडूनरडून राधाबाईचे डोळे रक्तवर्ण झाले होते. ओंठ थरथर कांपत होते व तोंडावर भयंकर दुःखाची छाया स्पष्टपणें उमटली होती. ती त्यांची स्थिति पाहून आणि गोविंदराव रोजच्याप्रमाणें आज घरांत इतर कोणासच न भेटतां बाहेरच्या बाहेर बायकोशीं बोलून गडबडीनें चालते झाले हें पाहून पार्वतीबाईला कसेंसेंच वाटलें. त्या ह्मणाल्या "यमे, तुला रडायला काय झालं? गोविंदराव तुला असं काय बोलले—कांहीं सांगशील कीं नाहीं? बोल गडे लवकर—मला अशी संशयांत नकोस ठेवूं. यमे, बोल लवकर—"

हें ऐकतांच राधाबाईला रडण्याचा अनावर हुंदका येऊन "बाबा! आह्मांला कुणाच्या हो स्वाधीन करून गेलां?" हे शब्द त्यांच्या तोंडून चटकन् बाहेर पडले.

यावर जो आकांत झाला त्याचें वर्णन करण्याची लेखकाच्या लेखणींत शक्ति नाहीं.

## प्रकरण ६ वें.

# विश्वासरावाच्या तोंडाला पाणी सुटलें.

माधवरावांच्या आकस्मिक मृत्यूची खबर हांहां ह्मणतां सर्व शहरभर पसरली आणि जो तो आपापल्या परी त्यांच्या मृत्यूचें कारण सांगूं लागला. कोणी ह्मणत साप चावला; कोणी ह्मणत माधवरावांनां मिर्गी आली आणि ते धाडकन् जमिनीवर पडले व पडतांना कोठें मर्माघात होऊन प्राण गेला; आणि कोणी कुत्सित होते त्यांनींतर अशी कंडी पिकविली कीं, ते एकदम जमिनीवर पडले आणि मृत्यु आला, ही गोष्टच मुळीं खोटी आहे! ते दारू पिऊन कुणाच्याशा घरांत शिरले तेव्हां त्या घरवाल्यानें त्यांचा खून करून त्यांनां बाहेर रस्त्यांत फेंकून दिलें. याप्रमाणें कोणी कांहीं, कोणी कांहीं त्यांच्या मृत्यूचें कारण सांगूं लागले. जन त्रिविध आहे असें ह्मणतात तें कांहीं खोटें नव्हे. डाक्टरलोकांनीं मात्र त्यांनां काळजाचा रोग असला पाहिजे असें निक्षून सांगितलें आणि तेंच कारण खरें होतें.

माधवरावांच्या मृत्यूनें त्यांचें कुटुंब मात्र उघडें पडलें. माधवरावांनां प्राप्ति थोडी आणि तशांत ते पडले धर्मात्मे, त्यामुळें खर्च फार; मग शिलक कशी पडावी? दुसरीहि कांहीं मालमत्ता नव्हती. नाहीं ह्मणावयाला एक घर कायतें होतें.

माधवराव वारल्याचें ऐकून माधवरावांचा भाऊ विश्वासराव साताऱ्याहून धावत आला. भावाच्या मृत्यूमुळें झालेलें दुःख प्रदर्शित करण्याकरितां, किंवा त्याच्या कुटुंबाच्या माणसांस धीर देऊन त्यांचा सांभाळ करण्याकरितां तो आला होता काय? छेः छेः छे! विश्वासराव अशा प्रेमळ बंधूंपैकीं नव्हता. त्याला एक मतलब साधावयाचा होता आणि तो साधण्यास पार्वतीबाईवरचा सध्याचा प्रसंग हाच त्याला उत्तम वेळ दिसला.

विश्वासराव साताऱ्यास जज्ज कोर्टांत मुख्य नाझरच्या जागीं होता. तो आणि माधवराव हे दोघे सखे भाऊ, पण दोघांच्या वयांत अंतर चांगलें पंधरा वर्षांचें होतें. माधवरावांनींच आईबाप वारल्यापासून नोकरी धरून आपल्या भावाचा लहानपणीं सांभाळ केला आणि त्याला बी. ए. पर्यंत शिक्षण देऊन त्याचें लग्नहि करून दिलें होतें व पुढें आपल्या एका स्नेह्याच्या वशिल्यानें त्यांनीं विश्वासरावाला जज्ज कोर्टांत नोकरीहि लावून दिली होती. तेथून वाढतांवाढतां तो आतां नाझराच्या जागेपर्यंत येऊन पोहोंचला होता. याप्रमाणें माधवरावांनीं विश्वासरावाला अगदीं पोटच्या पोराप्रमाणें पाळलें होतें. पुढें विश्वासरावाला चांगले पैसे मिळूं लागले

व इकडे माधवरावांचें कुटुंब वाढत जाऊन त्यांचा पगार जेमतेम खर्चाला पुरूं लागला तथापि "मला पांच रुपये खर्चाला पाठीव" असें माधवरावांनीं विश्वासरावाला कधीं चुकूनसुद्धां मरेपर्यंत लिहिलें नव्हतें. इतक्या निस्पृहतेच्या बाण्यानें माधवराव रहात होते. हा त्यांचा बाणा परमेश्वरानें अखेरपर्यंत कायम ठेविला. पण आतां मात्र पार्वतीबाईला पुढें आपलें कसें होणार, ही चिंता येऊन पडली.

दुसरी एखादी कमी धीराची आणि कमी मानी स्वभावाची बायको असती तर तिनें या वेळीं आपल्या दीराची काकळूत करून कशीतरी त्याची मर्जी संपादिली असती व मुलाबाळांसुद्धां त्याच्या आश्रयाला जाऊन पडली असती. पण पार्वतीबाई फार मानी स्वभावाच्या होत्या. त्यांनां दुसऱ्यापुढें तोंड वेंगाडण्याचा पुरा तिटकारा असे. त्यांतहि त्यांच्या दीराचा स्वभाव त्यांनां पूर्णपणें माहीत असल्यामुळें कशीहि अडचण असली तरी अशा मनुष्याच्या दाराशीं जाणें त्यांनां बिलकूल पसंत नव्हतें. सदूला चांगलें शिक्षण मिळालें तर ईश्वराच्या कृपेनें लवकरच तो आपल्या आईच्या व स्वतांच्या पोटापुरतें कोठेंहि मिळवील, तोंपर्यंत ईश्वरावर भार ठेवून असेच धीरानें दिवस काढावे, असा त्यांनीं मनाशीं बेत केला होता. संकटांत दिवस काढण्याचा बेत करणें सोपें असतें; पण तो बेत पार पाडण्याला अलौकिक धैर्य व निश्चय हे गुण लागतात. हे दोन्ही गुण पार्वतीबाईच्या अंगीं उपजतच होते. करारीपणाविषयीं त्यांच्या आईबापांची प्रसिद्धि होती आणि तोच करारीपणा पार्वतीबाईच्या अंगीं जन्मतांच उतरला होता. यामुळें पार्वतीबाईनीं जो एकदा निश्चय केला त्यामध्यें ह्मणजे कांहीं फरक पडला, असें कधींच घडलें नाहीं. आतांचा प्रसंग त्यांच्यावर फार आणीबाणीचा होता, तरी परमेश्वरावर सगळा भार टाकून त्यांतून पार पडण्याचा त्यांचा विचार ठरला तो ठरलाच.

वर सांगितल्याप्रमाणें माधवरावांच्या आकस्मिक मृत्यूची खबर कळतांच पंधरा दिवसांची रजा घेऊन विश्वासराव आला होता. पैकीं सातआठ दिवसतर अशौचाचे गेले. त्यांत विश्वासरावाला आपला मतलब साधतां येईना. अशौच फिटल्यावर एके दिवशीं गोविंदराव घरांत नाहींत असें पाहून पार्वतीबाई अंधारांत बसल्या होत्या त्या खोलीच्या दाराशीं येऊन विश्वासराव खालीं मान घालून बसला. बराच वेळपर्यंत कांहीं बोलेना. मग हळूच ह्मणाला "वहिनी! माझी रजा संपत आली आहे. दोनतीन दिवसांची सगळी बाकी आहे. एवढ्यांत येथला सगळा पसारा आटपून आपली निघण्याची तयारी केली पाहिजे. कुणाचें देणेंघेणें

असेल त्याचा निकाल केला पाहिजे. बाबांची उमेद मोटी आणि ते फार दयाळू अंतःकरणाचे होते, यामुळें कुणाकडचें देणेंघेणें त्यांनीं लिहूनसुद्धां ठेविलें नसेल. आत्तांच असा दिवस येईल असें त्यांचें त्यांनांतरी कुठें कळलें होतें? पण आतां त्याचें काय? आतां माझा विचार असा आहे कीं, इथल्या देण्या-घेण्याचा सगळा निकाल करून तुह्मां सगळयांनां साताऱ्यास माझेपाशीं घेऊन जावें. ईश्वर मला जी मीठभाकर देईल त्यांतून अर्धी तुह्मांला आणि तुमच्या मुलांनां दिल्याखेरीज, तुमची शपथ, मी पाणी पिणार नाहीं! लहानपणीं वडिलांचे मागें माझा सर्वस्वीं सांभाळ तुह्मीं व बाबांनीं मिळून केला. तेव्हां जसा तुह्मांला सदू तसाच मीहि समजून आपले घरीं चला; जास्त काय सांगूं! पण मी बोलतों यांत प्रतारणा होईल तर कुलस्वामीची शपथ. तुमचें नाहींबिहीं मी कांहींएक ऐकणार नाहीं."

विश्वासरावाचें हें भाषण वरून दिसण्यांत किती कळकळीचें, अगत्याचें आणि गोड दिसत होतें! पण हें केवळ मानभावीपणाचें आहे, हें ओळखण्याइतकी धूर्तता पार्वतीबाईचे अंगीं होती. आपण याच्या ह्मणण्यास 'नाहीं' ह्मणून जबाब देत आहों, तोंपर्यंतच हें भाषण गोड लागणार आहे; याच्या पैठणी आग्रहाला मान देऊन जाण्यास कबुली देतांच याचा रंग तेव्हांच पालटेल, हें त्या जाणून होत्या. ह्मणून विश्वासरावाच्या मिष्ट भाषणास न भुलतां त्या ह्मणाल्या "भाओजी, तुह्मी ह्मणतां तें सगळं खरं, आमची ही स्थिति पाहून तुमचा जीव तुटत आहे, हें का मला कळत नाहीं? तुह्मी एवढं कळकळीनं सांगतां हेंच पुष्कळ आहे. आतां आह्मांला इथं राहूनतरी काय करायचं आहे? तिथंच येऊन पडलों असतों. पण सदू नुकताच इंग्रजी शिकूं लागला आहे. तिथं आल्यानं त्याचा अभ्यास बुडेल. पुण्यासारखी मुलांची शिकण्याची सोय दुसरीकडे चांगली होत नाहीं ह्मणून ह्मणतात. आतां सगळी भिस्त कायती सदूवर आहे. त्याचं शिकणं चांगलं झालं पाहिजे. तें इथं राहिल्याखेरीज व्हायचं नाहीं. तशांत इथं जांवई-बुवाहि आहेत त्याला घरीं शिकवायला. आतां तुह्मीच आहां मुलांला वडिलांचे जागीं. त्यांच्यावर लक्ष्य ठेवा व पत्रोपत्रीं समाचार घेत जा—आणखी जास्त मी काय सांगावं—"

विश्वासरावाला पार्वतीबाईचा मानी स्वभाव माहीत असल्यामुळें त्यांच्याकडून नकाराचा जबाब येईल हें तो जाणून होता आणि ह्मणूनच त्यानें नाटकांतल्या पात्राप्रमाणें डोळ्यांत पाणी आणून व पाल्हाळिक भाषण करून साताऱ्यास

चलण्याविषयींचा पैठणी आग्रह चालविला होता. साताऱ्यास चांगलें सरकारी हायस्कूल असून दुसऱ्याहि खासगी इंग्रजी शिक्षणाच्या सोयी होत्या व तेथें राहून सदूचें पुण्याइतकेंच चांगल्या तऱ्हेनें इंग्रजी शिक्षण झालें असतें. तथापि पार्वतीबाईनीं न येण्याला जें निमित्त शोधून काढिलें तें खोटें असलें तरी आपल्या पथ्यावरच पडलें, या विचारानें विश्वासराव मनांतल्या मनांत बराच आनंदला आणि ह्मणाला " हो, तेंहि खरेंच. पुण्यांतल्यासारख्या शाळा दुसरीकडे कुठें दिसायच्या नाहींत. पुण्यांत राहून मुलें फार लवकर हुषार होतात. तेव्हां सदूलातरी पुण्यांत राहिलेंच पाहिजे. बरें त्याला इथें ठेवून तुह्मी माझेबरोबर चला, असेंतरी मी कसें ह्मणूं ? कारण सदू ह्मणजे तुमचा अगदीं जीव कीं प्राण आहे. आहेच तसा तो हुषार आणि गरीब ! मलातर त्याची तरतरी, हुषारी आणि स्वभावाचा शांतपणा किती आवडतो ह्मणून सांगूं ! तेव्हां सदूच्या विद्येकरितां ह्मणून तुह्मांला मला फारसा आग्रह करतां येत नाहीं. असो. मला जो काय समाचार घ्यायचा तो तिथून ह्मणजे घेतां येणार नाहीं, असें नाहीं. पगार हातीं येतांच प्रथम पंचवीस रुपयांची मनीआर्डर सदूच्या नांवानें मीं करित जाईन. एवढें खर्चाला पुरेलना ? न पुरल्यास सदूकडून पत्रांत लिहवा. बिलकूल संकोच ह्मणून धरूं नका. बरें मुलांनां कपडे वगैरे कांहीं करायचे असल्यास सांगा, ह्मणजे मी आणखी दोन दिवस इथें आहें तों त्यांची सगळी बेगमी करून जाईन ह्मणतों. पत्रोपत्रीं अशा गोष्टी लिहिण्यास तुह्मांला संकोच वाटेल. ह्मणून ह्मणतों कीं काय हवें नको तें आत्तांच कळलेलें बरें. ह्मणजे मीं समक्ष सगळ्या जिनसा बाजारांतून नीट पाहून आणून देईन—"

पार्वतीबाई मध्येंच बोलल्या नसत्या तर विश्वासरावाचें हें लघळपणाचें भाषण आणखी किती लांबलें असतें, कोण जाणे ! त्याच्या या पोकळ आणि नसत्या डामडौलाच्या भाषणाचा पार्वतीबाईला अगदीं कंटाळा आला होता. भाषण ऐकणाराला कंटाळा आला होता, पण तें करणाराला कोठें आला होता ? विश्वासरावाला एक मतलब साधावयाचा होता, त्याची ही तो प्रस्तावना करून ठेवित होता. या अघळपघळ भाषणानें तो आपला पुढील मतलब साधण्याचा मार्ग सोपा करित चालला होता. आतां त्याला पुढें बोलूं देणें बरोबर नाहीं, असा विचार करून पार्वतीबाई अंमळ रागानें ह्मणाल्या " भाओजी, मीं एकदा सांगितलंना तुह्मांला ? तुह्मी आमचा तोंडीं समाचार घेतां एवढ्यानंच आह्मी भरून पावलों.

आतांच कपड्यांची अन् जिनसांची बेगमी कशाला करतां ? लागतील तेव्हां कळवूं तुह्मांला. तसंच दर महिन्याचे महिन्याला खर्चाला पाठविण्याचं कांहींएक कारण नाहीं. तुमच्या मागं तुमचा संसार आहे. आमचा वाली परमेश्वर आहे. त्याच्या कृपेनं हेहि दिवस निघून जातील. लोकांच्या देण्याघेण्याविषयीं पुसाल, तर आह्मांला कुणाचं पैएवढंसुद्धां देणंघेणं नाहीं. मग तुह्मी व्यर्थ आमचेकरितां एवढ्या भानगडींत कशाला पडतां ? आणि कांहीं असलंच तरी आमचं आह्मी तें पाहून घेऊं—"

## प्रकरण ७ वें.

## डाव साधला.

पार्वतीबाईच्या या तुटकपणाच्या आणि बाणेदार भाषणानें विश्वासरावाची सगळी ऐट जिरली. पार्वतीबाई आतां सर्व तऱ्हेनें अडचणींत सांपडल्या आहेत, तेव्हां आतां त्यांनां थोडीशी लालूच दाखवून व देण्याघेण्याचा वगैरे निकाल करतों असें सांगून कागदपत्राचें दप्तर मागून घ्यावें आणि त्यांतले महत्त्वाचे कागद लांब्रवावे व आपला कार्यभाग साधला तर पहावा, असा त्याचा विचार होता. पण पार्वतीबाईच्या या भाषणानें त्याबद्दलची अगदीं निराशा झाली. एक युक्ति फसली तर फसली, दुसरी योजून पहावी, तिनें कार्यसिद्धि होणार नाहीं कशावरून? अशी त्याची दुष्टबुद्धि त्याला ह्मणूं लागली. आणि ही दुर्बुद्धिरूप पिशाचिका दुसरी युक्ति योज एवढेंच सांगून स्वस्थ रहात नाहीं. ती आपल्या भक्तांनां युक्त्यांचा हवा तेवढा पुरवठाहि करित असते. विश्वासराव या पिशाचिकेचा एकनिष्ठ भक्त होता, तेव्हां त्याच्याजवळ युक्त्यांचा संग्रह मोठा होता, हें सांगावयास नकोच. त्याची पहिली युक्ति फसली, पार्वतीबाईनीं त्याला इतकें झिडकारिलें, तरी त्याची विश्वासरावाला कोठें लाज होती? तो लोंचटपणानें पुनः ह्मणाला 'बरं बुवा, तुमची मर्जी! सदू व बगुताई या मुलांसाठीं माझा जीव तुटतो, ह्मणून मुद्दाम बिनपगारी रजा घेऊन मी धावत आलों. रजा संपल्यावर मलातर गेलेंच पाहिजे. पाटीमागें सावकारांनीं बायकोमाणूस पाहून विनाकारण त्रास देऊं नये ह्मणून जाण्यापूर्वी त्यांच्या हिशोबाचा एकदाचा निकाल करून टाकावा, असा माझा विचार होता. पण माझ्याबद्दल तुह्मीं आपल्या कांहीं विलक्षण ग्रह करून घेऊन बसलां आहां. मी सावकाराचें देणें चुकविण्यास व तुमच्या मुलांचा सांभाळ करण्यास तयार आहें, पण तुह्मीच त्यांच्या कल्याणाच्या आड येतां ही गोष्ट लोकांनां खरीतरी वाटेल काय? उद्यां सावकारांनीं देण्याघेण्याकरितां फिर्यादी मांडल्या आणि घरादारावर जप्ती आणिली ह्मणजे आमच्या घराण्याची अब्रूपरी अब्रू जाईल आणि लोक मला तोंड काढूं देणार नाहींत-तें वर! माझें अंतःकरण परमेश्वर जाणतो आहे. मनुष्याला अंतःकरण दिसत नसलें तरी त्याला तें दिसत आहे. तुह्मीं ह्मणतां देणेंघेणें कांहीं नाहीं, पण कालच सराफ्यांतला तो मुन्नाशेट 'आमच्या बाकीचा निकाल आठ दिवसांत कराल तर बरें आहे, नाहींतर कोर्टाचे मार्फत घरादारावर जप्ती आणतों' ह्मणून सांगून गेला आहे. बाबांची अशी बाहेरच्या बाहेर पुष्कळ देवघेव चालत असे. ती तुह्मांला त्यांनीं घरांत कळविली नाहीं.

मला पूर्वीपासून थोडथोडी माहित आहे. बाबा होते तोंवर सावकारलोकांना दम होता, त्यामुळें त्यांनीं आजपर्यंत तगादा ह्मणून लावला नाहीं. यावरून आह्मांला कुणाचें देणें नाहीं असें तुह्मी ह्मणत असाल तर खुशाल ह्मणा, पण सावकार लोक हें तुमचें ह्मणणें ऐकून गप्प बसतील का? बाबा गेल्याची खबर लागल्याबरोबर पहा कसे सावध झाले आहेत. कालपासून दोघेतिघे मारवाडी माझ्याकडे हिशोबाच्या वह्या घेऊन खेपा घालूं लागले आहेत. या गोष्टी घरांत तुमच्या कानीं कशा याव्या? मी बाहेरच्याबाहेर त्या लोकांची कशीतरी समजूत करून चार दिवस धम धरा ह्मणून सांगून तूर्त त्यांनां वाटेस लाविलें आहे. तुमच्या तुह्मी स्वतःसिद्ध असल्यावर माझें काय, बरेंच झालें! माझ्या डोक्यावरचें ओझें उतरलें ह्मणून मी समजेन. उद्यां असे कुणी हिशोब घेऊन आले ह्मणजे मी मुकाट्यानें त्यांनां आंत तुमचे-कडेच पाठवून देईन पाहिजे तर—"

विश्वासरावाचें हें कुत्सित, कपटी आणि निर्लज्जपणाचें भाषण ऐकून पार्वतीबाई संतापानें आंतल्याआंत अगदीं लाल झाल्या आणि आतां येथून एकदम उठून जाऊन विश्वासरावाचें तोंड बंद पडेल असें करावें, असें त्यांनां वाटलें. परंतु तितक्यांत सावकारांच्या हिशोबाचा तगादा, कोर्टांत फिर्याद, घरादारावर येणारी जप्ती आणि घरदार गेल्यानंतर मुलाबाळांचे होणारे हाल, यांचें भयंकर चित्र त्यांच्या डोळ्यांसमोर एकदम उभें राहिलें. या भयप्रद चित्राच्या दर्शनानें त्यांचा संताप कोटल्याकोठें पार नाहींसा झाला. आपल्याला कोणाचें देणेंघेणें नाहीं, अशा सुखमय भरंवशाखालीं आपण आजपर्यंत सुखानें झोंप घेतली, आणि आज आपण हें काय नवीन ऐकत आहों? विश्वासरावाचें बोलणें खोटें धरून चाललों आणि त्यांनीं ह्मटल्याप्रमाणें उद्यां ते निघून गेल्यावर खरोखरीच सावकार त्रास देऊं लागले, तर काय करावें? त्यांचें ह्मणणें खरें मानून चालावें, तर देण्याघेण्याबद्दल कधीं अवाक्षरसुद्धां आजपर्यंत बोलण्यांत निघालें नाहीं, हें कसें? अशा शंका प्रतिशंका घेण्यांत व त्यांचें निरसन करण्यांत पार्वतीबाईचें मन आतां इतकें गढून गेलें होतें कीं, एकदम तेथून उठून जाण्याचा त्यांचा विचार त्यांच्या डोक्यांतून पार निघून गेला आणि हें नवें संकट कोणत्या उपायानें टाळतां येईल, तें पहाण्यापलीकडे त्यांनां दुसरें कांहीं सुचेनासें झालें.

ही पार्वतीबाईच्या मनाची द्विधा झालेली स्थिति आपल्या फार पथ्यावर पडणारी आहे, अशा वेळीं तिचा उपयोग आपल्या फायद्याच्या कामीं आपण करून न घेतला तर मतलब साधण्याची चांगली सोन्यासारखी आलेली संधि आपण

फुकट घालविली असें होईल, असा मतलबी विचार करून विश्वासराव ह्मणतात "बरें, घटकाभर तुमच्या समजाप्रमाणें कां होईना? लोकांचें देणें कांहीं नाहीं, असेंच आतांच्या वेळ आपण धरून चालूं. पण कुणाकडे घेणें निघत असलें, तर तें नकोका उगवायला ? सदू शहाणा होईल आणि तो आपला घरचा कारभार पाहील, तोंपर्यंत देणेदार मरायचे थांबतील का ? तेहि थांबले असें आपण धरून चाललों, तरी मुदतीच्या बाहेर घेणें गेलें ह्मणजे तुमची फिर्याद कोण घेणार ? तेव्हां ज्यांच्या मुदती भरत आल्या असतील त्यांच्याकडे आतां तगादा केला तर कांहीं उपयोग. मुदत निघून गेल्यावर मग स्वस्थ बसावें लागेल. मग काय ते रोखे देवघरांत मांडून त्यांची पूजा करायची आहे ? या आमच्या व्यवहारांतल्या गोष्टी व्यवहार करणारांनां कळतील. बायकांचीं का हीं कामें आहेत? माझ्यावर विश्वास नसला तर गांवांतल्या दुसऱ्या कोणा हुषार वकीलांनां आपले कागदपत्र दाखवा, माझी ना नाहीं; पण लोकांकडचें घेणें विनाकारण बुडवून व्यर्थ नुकसान सोसूं नका, एवढेंच माझें ह्मणणें आहे. तुमच्या हिताचें माझें हेंहि सांगणें तुह्मांला रुचत नसलें, तर माझें कांहींच ह्मणणें नाहीं. तुह्मी आहां आणि तुमचा कारभार आहे. ह्मण आहे कीं 'ज्याचें करायला जावें बरें, तो ह्मणतो माझेंच कर खरें!"

विश्वासरावाच्या ह्या साळसूदपणाच्या बोलण्याचा पार्वतीबाईच्या मनावर बराच परिणाम झाल्यासारखा दिसला. त्या मनांत ह्मणाल्या "विश्वासरावाला आपण जितका नीच समजतों तितका तो खरोखरच असेल काय ? अथवा त्याच्याविषयीं आपली निष्कारण गैरसमजूत झाली आहे ? नीच आणि मतलबी ह्मणावा तर आपल्या फायद्याची ही गोष्ट काढण्याची त्याला काय जरूर होती ? त्याला आपण झिडकारून दिल्याबरोबर मतलब साधत नाहीं असें पाहून आपला नाद सोडता. आणखी मतलब साधायलातरी माझेजवळ आहे काय ? आमच्यापेक्षां त्यालाच पगार जास्ती आहे व शिवाय वर दोन पैसे कमाविण्याचीहि युक्ति त्याचेपाशीं आहे. तेव्हां आमचेपाशीं त्यानें मतलब साधायचातरी कोणता ? तो असेंहि ह्मणाला आहे कीं 'तुह्मी पाहिजे तर माझे जवळ दस्तऐवज देऊं नका. परभारें तुमच्या खात्रीच्या एखाद्या वकीलाला नेऊन दाखवा. पण कसेंहि करून मुदतींत फिर्यादी मांडून पैसे वसूल करून घ्या.' यांत त्याचा वाईट मतलब तो काय असणार ? मलातर आतां असं वाटूं लागलं आहे कीं, मी आतांपर्यंत व्यर्थ भाओजींशीं कुऱ्यानें राहिलें. त्यांचं अंतःकरण मी समजत होतें तितकं काळं दिसत नाहीं. निदान या बाबतींततरी ते अगदीं निष्कपटभावानें वागत आहेत. त्यांच्या-

विषयीं नसता संशय घेणं कांहीं योग्य नाहीं. या देण्याघेण्याच्या भानगडी बायकांनां मेल्या समजत नाहींत असं ते मघांशीं ह्मणाले तें खरंच. आतांपर्यंत देणंघेणं कांहीं आहे ही गोष्टसुद्धां मीं तोंडून कधीं ऐकिली नव्हती. घरांत दप्तरांत कांहीं कागद बांधून ठेविले आहेत. मग ते देण्याघेण्याबद्दलचे आहेत किंवा दुसरे कशाचे आहेत, कुणाला ठाऊक? भाओजींनांच तें दप्तर सोडून दाखवावं ह्मणजे झालं." असें ह्मणून पार्वतीबाई उठल्या आणि कपाटांतील दप्तर घेऊन आल्या. त्यांनीं तें दप्तर विश्वासरावाच्या पुढें ठेविलें आणि ह्मणाल्या "जे काय घरांत कागदपत्र आहेत ते सगळे या दप्तरांत बांधलेले आहेत. पहा यांतले कागद तुह्मी ह्मणतां तसे कांहीं असले तर—"

विश्वासराव दप्तर सोडून कागद पाहूं लागले. वरचे एकदोन कागद पाहून झाले असतील—इतक्यांत पार्वतीबाईकडे दुखवट्यासाठीं कांहीं बाया आल्या. विश्वासरावाला दाराशींच बसलेला पाहून त्या दाराबाहेरच थबकल्या. हें विश्वासरावाच्या लक्ष्यांत येतांच त्यानें त्या बायांनां वाट देण्यासाठीं ह्मणून घाईघाईनें दप्तराचा रुमाल तसाच पुनः गुंडाळला आणि दप्तर काखेंत मारून तो तेथून चालता झाला. समाचाराला आलेल्या बायकांशीं बोलण्यासवरण्याच्या नादांत विश्वासराव दप्तर घेऊन गेला, हें पार्वतीबाईच्या लक्ष्यांतहि आलें नाहीं.

विश्वासरावानें एकीकडे जाऊन दप्तरांतला एकूणएक कागद बारकाईनें पाहून त्यांतले महत्त्वाचे एकदोन दस्तऐवज काढून घेतले. त्यांतच त्या घराच्या मालकीबद्दलचा दस्तऐवज होता तोहि काढून घेतला आणि बाकीचें दप्तर कांहीं वेळानें पार्वतीबाईच्या स्वाधीन केलें आणि ह्मणाला "तुह्मी ह्मणालां तेंच खरें. तुह्मांला आतां कुणाचें देणंघेणं दिसत नाहीं. हे सावकारलोक मोठे लबाड आहेत. आतां येऊनजाऊन घरचा मालकच काय करील तें करो. बाबांनां त्यांनीं मेहेरबानीखातर राहूं दिलें होतें व भाड्याचें उत्पन्नहि बाबांला मिळत असे, तीहि निवळ त्या शेटची मेहेरबानी ह्मणून. पण त्यांच्यामागें तुह्मांलाहि तो तशाच तऱ्हेनें वागवील ह्मणून कशावरून? मी त्याला दोन गोष्टी सांगून पाहीन, आणि होतां होईल तों तुह्मांला या घरांतून तो काढणार नाहीं असें करीन ह्मणा; पण अखेर तो पक्का तीनशेंड्या मारवाडी आहे, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे!"

हें विश्वासरावाचें भाषण ऐकून पार्वतीबाई पुनः चपापल्या. घर आपलें स्वतांच्या मालकीचें आहे आणि त्याच्या भाड्याचें उत्पन्नहि अर्थात् आपलें स्वतांचें आहे, ही त्यांची आतांपर्यंत समजूत होती. पण विश्वासरावानें वर लिहिलेले शब्द अशा

चमत्कारिक रीतीनें किंचित् हंसून आणि निष्काळजीपणाचा डौल दाखवून उच्चारले कीं, त्याच्या मुद्रेकडे पहाणारांस असें वाटलें असतें कीं, विश्वासरावाला बाबासाहेब धर्मात्मे यांच्या कारभाराची इतकी बित्तंबातमी असून खुद्द बाबासाहेबांच्या धर्मपत्नीला ह्मणजे पार्वतीबाईला यासंबंधाची कांहींच माहिती नसावी, हा केवढा चमत्कार आहे ! विश्वासरावाच्या माहितीविषयीं आपण शंका घेऊं लागलों तर आपण उपहासास पात्र होऊं, असें स्वतः पार्वतीबाईलासुद्धां या वेळीं वाटलें. तथापि ज्या घराच्या आणि त्यापासून उत्पन्न होणाऱ्या भाड्याच्या भरंवशावर आपण आपल्या आयुष्याचे राहिलेले दिवस कंठण्याचा बेत करित आहों, तें घर आपलें नव्हे आणि आपण त्याला आपलें स्वतांचें समजतों हा आपला निवळ भ्रम आहे, हा विचार मनांत येतांच भावी ग्रहदशेचा काळाकुट्ट अंधार त्यांच्या डोळ्यांसमोर येऊन त्या घाबरल्या आणि या नवीन कळलेल्या माहितीविषयीं शंका घेतल्यानें आपलें हंसें होईल ही खात्री असूनहि त्याविषयींची शहानिशा करून घेण्याकरितां ह्मणाल्या "भाओजी, हें काय तुह्मी ह्मणतां ? घर आपलं नाहीं तर कुणाचं ? आज इतके दिवस आपलं घर, आपलं घर, ह्मणून शंभर वेळां मीं तोंडून ऐकलं आणि घराचं भाडंसुद्धां घेत आलों, अन् आतां तुह्मी हें ह्मणतांतरी काय ? मला कांहीं याचा उलगडा होत नाहीं—"

यावर विश्वासराव पूर्वीच्यासारखाच हंसून ह्मणाला "वहिनी ! माझें ह्मणणें खोटें वाटत असेल तर तुह्मी आपली हवीतशी खात्री करून घ्या यासंबंधानें. आपलें स्वतांचें घर असून दुसऱ्याचें ह्मणण्याची मला हौस का आहे ? त्या छोटूमल शेटजीनें बाबांकडूनच तें दीड हजार रुपयांला विकत घेतलें आहे. त्याबद्दलचा बाबांच्या हातचा दस्तऐवज पाहून मीं माझ्या मनाची खात्री करून घेतली आहे. या घरांत माझा स्वतांचा अर्धा वांटा होता; पण तशीच कांहीं अडचण येऊन पडली ह्मणून बाबांनीं मला न विचारतां सबंध घरचें घर त्या शेटजीला फुकटावारी दीड हजार रुपयांला विकलें. माझें स्वतांचें यांत कितीतरी नुकसान झालें आहे ! पण आतां येथें मीं कुणाला बोलावें !"

हंसतहंसत प्रारंभ केलेलें भाषण विश्वासरावानें असें गंभीरपणें संपविलें कीं, पार्वतीबाई जसा कांहीं वज्राघात व्हावा तशा स्तब्ध उभ्या राहिल्या. त्यांनां पुढें कांहीं बोलण्यास सुचेना. जे माधवराव पार्वतीबाईजवळून यत्किंचित् गोष्टसुद्धां कधीं लपवावयाचे नाहींत, त्यांनीं घर विकण्यासारखी महत्त्वाची गोष्ट पार्वतीबाईला न कळवितां केली, हें संभवनीयतरी कसें वाटावें ? बरें, ही गोष्ट खोटी

ह्मणावी, तर ज्यानें तें घर विकत घेतलें आहे त्याचें नांव व पत्ता देऊन त्याचे-जवळ खरीदखत वगैरे दस्तऐवज आहे आणि त्या दस्तऐवजावर माधवरावांची सही आहे अशी स्वतः पाहिलेली हकीगत विश्वासराव निक्षून सांगतो! हें गूढ काय आहे, तें पार्वतीबाईला कांहीं कळेना. माधवरावांवर एवढें घर विकण्या-सारखें संकट कधीं आलें होतें का, ह्मणून त्यांनीं पुष्कळ आठवण करून पाहिली; पण त्यांच्या आठवणींत अशी कांहीं गोष्ट घडलेली त्यांनां स्मरेना. तेव्हां "असा घर विकण्यासारखा प्रसंगतरी कोणता होता?" ह्मणून त्यांनीं विचारलें. तेव्हां विश्वासराव ह्मणाला "बाबा कोणत्याशा एका प्रकरणांत आपल्या एका मित्राला जामीन राहिले होते. ती जामीनकी पुढें त्यांच्या अंगावर आली. तेव्हां त्यांनीं गुपचूप आपलें घर गहाण टाकून ते रुपये भरले. पुढें गहाण सोडवून आणण्यास रक्कम न मिळाल्यामुळें विनाकारण व्याजाशीं व्याज चढवून घेण्यापेक्षां घरच सावकाराला खरीद देऊन टाकणें त्यांनां बरें वाटलें. ही गोष्ट मलाहि आतांपर्यंत ठाऊक नव्हती. पण बाबांचें हें असें झाल्याचें कळल्याबरोबर तो परवां माझेकडे येऊन घर रिकामें करून देण्याबद्दल तगादा करूं लागला. तेव्हां आज जी शंका तुह्मांला आली तीच तेव्हां मला आल्यावरून मीं त्याला सगळी हकीगत विचारली व त्यानें सांगितली. एवढ्यानें माझें समाधान होईना. हे मारवाडी सावकार लुच्चे असतात. ह्मणून मीं त्याचे कागदपत्र पाहिले. तों खरेंच! त्याच्याजवळ घराचा दस्तऐवज बाबांनीं आपल्या हातांनीं सही करून दिला आहे. यापेक्षां आणखी पुरावा तो काय पाहिजे? तेव्हां आतां घर त्या मारवाड्याचें, आपलें नाहीं, याविषयीं तिळमात्र संशय उरला नाहीं."

हें ऐकून पार्वतीबाईचा धीर खचला. त्यांनां आतां जगांत कोठेंच कांहीं आधार उरला नाहीं. कावळेचिमण्यांनांसुद्धां रहावयास स्वतांचीं घरटीं असतात. पण पार्वतीबाईला आतां मुलांनां छायेखालीं ठेवण्यास स्वतांची झोंपडीहि उरली नाहीं. विश्वासरावानें घराचा दस्तऐवज कपटानें दप्तरांतून काढून नेऊन सावकारास विकला व सावकारानेंहि पैशाच्या लालुचीनें तो चोरीचा, खोटी सही केलेला दस्तऐवज थोड्या किंमतीला विकत घेतला, ही गोष्ट बिचाऱ्या पार्वतीबाईला काय ठाऊक!

## प्रकरण ८ वें.

# सदूबापू.

मागल्या प्रकरणांत सांगितलेल्या हकीगतीनंतर आतां तरीच वर्षे गेलीं. एवढ्या काळांत जगांत हजारों—नव्हे लाखों घडामोडी झाल्या असतील. मनुष्य आळसानें बसून राहील, परंतु काळ हा कांहीं निरुद्योगी रहात नाहीं. त्याची आपली घडामोड नेहमीं चाललेली असते. माधवराव निवर्तल्यानंतर विश्वासरावानें विश्वासघात करून पार्वतीबाईच्या मालकीचें घर एका मारवाड्याला विकून आलेले पैसे मधल्यामध्यें गिळंकृत केले आणि बिचाऱ्या त्या साध्वीला आणि तिच्या लेकरांना छायेची जागा होती तीहि नाहींशी केली. आतां त्या बिचारीला कशाचाच आधार उरला नाहीं. तथापि पार्वतीबाईची परमेश्वरावर अढळ श्रद्धा होती; ह्मणून त्यांनीं न डगमगतां धैर्यानें ते दुःखाचे दिवस काढले. घरांत होतें नव्हतें तें सगळें हळूहळू मोडून खाल्लें. गोविंदरावहि यथाशक्ति त्यांचा समाचार घेत असत. सदूला अल्पवयांतच आपली स्थिति कळूं लागून त्या काळजीनें त्यानेंहि झटून अभ्यास केला व प्रत्येक वर्गांत स्कॉलर्शिप मिळवितमिळवित अखेर म्याट्रिक्युलेशनची परीक्षा अव्वल नंबरची पास झाला. हेडमास्तरसाहेबांच्या शिफारशीनें त्याला एकदम नोकरीहि चांगली लागली. नोकरीवर असतांनाहि त्यानें आपलें काम दक्षतेनें करून वरिष्ठ अधिकाऱ्यांची मर्जी संपादली आणि आतां त्याच्या बढतीबद्दल शिफारसहि करण्यांत आली होती. हे सुखाचे दिवस पहाण्यास बिचाऱ्या पार्वतीबाई जगल्या असत्या ह्मणजे सद्वर्तनाचें आणि ईश्वरावर श्रद्धा ठेवून सरळ मार्गानें चालल्याबद्दलचें बक्षीस परमेश्वर याच जन्मांत कसें देतो, तें त्यांच्या प्रत्यक्ष अनुभवास आलें असतें !

सदूबापूंला अजून पगार बेताबाताचाच होता, तरी त्यांनीं जे दुःखाचे दिवस काढिले होते त्या दिवसांच्या मानानें ते आतां श्रीमंत होते आणि हाच विचार मनांत आणून ते नेहमीं आहे त्या स्थितींत समाधान मानून रहात असत. आपला पगार थोडा या गोष्टीबद्दल त्यांनां कधींकधीं वाईट वाटे; पण तें केव्हां ? जेव्हां एखादें सुंदर पुस्तक त्यांनां वाचावेंसें वाटे, पण तें विकत घेण्याची ऐपत नसल्यामुळें तें वाचण्याची आपली इच्छा जागचे जागीं दाबून टाकावी लागे, तेव्हां. एरवीं ते समाधानी होते. त्यांनां एकाच गोष्टीची मोठी अनिवार तृष्णा असे, आणि ती गोष्ट ह्मणजे वाचन. ते फार जबरदस्त वाचणारे होते. ते रहात होते

त्या गांवीं लायब्ररी नव्हती, यामुळें कांहीं वाचावयाचें झालें ह्मणजे स्वतः पुस्तक घेऊन वाचावें तेव्हां.

सदूबापूंनीं अद्याप लग्न केलें नव्हतें. ते एकटेच होते. घरांत बोलाचालायलासुद्धां दुसरें कोणी माणूस नव्हतें. कारण बगुताईचें लग्न होऊन ती आतां सासरींच राहूं लागली होती. बगूताईला फार चांगलें ठिकाण मिळालें होतें. तिचा सासरा एक नामांकित वकील असून तो नव्या विचारांचा होता. सासूहि तिला सुदैवानें तशीच नव्या विचारांची मिळाल्यामुळें सासुरवास असा तिला कधींच वाटत नसे. बगुताईनें शिकावेंसवरावें, तिला कशीदा विणकाम वगैरे कुशलतेचीं कामें करतां यावीं, घरकामाचीहि चांगली माहिती व्हावी आणि तिनें व्यवहारदक्ष व्हावें ह्मणून तिच्या सासूनें तिला फार उत्तम शिक्षणक्रम घालून दिला होता. ती बगुताईला सुनेप्रमाणें नव्हे तर प्रत्यक्ष मुलीप्रमाणें वागवी. यामुळें बगुताईला आईची आठवण क्वचितच होत असे.

सदूबापूंचें आतां विवाहास योग्य असें वय झालें होतें व अन्नानें उदरनिर्वाह करण्यापुरती नोकरी व लोकांत प्रतिष्ठा हींहि त्यांनां प्राप्त झालीं होतीं. शिवाय त्यांचा अत्यंत नम्र आणि विनीत स्वभाव पुष्कळांस ठाऊक झाला असल्यामुळें त्यांनां चांगल्या मोठ्यामोठ्यांच्या मुली सांगून येत आणि स्नेहीमंडळीतर त्यांनां दोन हातांचे चार हात करण्याबद्दल अति आग्रह करीत, हें सांगावयाला नकोच! तथापि सदूबापूंची समजूत कांहीं वेगळी असे. ते ह्मणत कीं, ज्या काळीं आपल्या देशांत लोकांची वस्ती फार कमी असून संपत्ति विपुल होती, तेव्हां देशाच्या समृद्धीसाठीं प्रत्येकावर विवाह करण्याबद्दल समाजाची सक्ति बरोबर होती. परंतु आतां गरजेपेक्षां लोकसंख्येचा पुरवठा जास्त झाल्याकारणानें विवाहाचे कामीं निर्बंध घालणें हेंच प्रस्तुतच्या काळांत अधिक श्रेयस्कर आहे. शिवाय सध्याच्या आपल्या देशस्थितींत विवाहितांपेक्षां अविवाहित लोकांच्या हातून देशकार्य अधिक होण्याचा संभव आहे. आपल्या देशांत व्यापार, उद्योग, कलाकौशल्यादिकांचें शिक्षण वगैरे कामांसाठीं परदेशांत जाऊन रहाण्याचें धाडस करणारे तरुण पाहिजे आहेत; सामाजिक चालीरीतींचें निरीक्षण करून त्यांतील दोष दाखविणारे व सुधारणातत्त्वांचा अनुवाद करणारे उपदेशक पाहिजे आहेत; पौर्वात्य आणि पाश्चिमात्य धर्म व तत्त्वज्ञान यांचें उत्कृष्ट अध्ययन करून त्या दोघांची सांगड घालून देणारे व धर्माविषयींच्या उज्ज्वल कल्पना व विचार यांचा प्रसार करणारे उत्तम ग्रंथकार आणि व्याख्याते हवे आहेत. ब्रिटिशसाम्राज्यांतील एक महत्त्वाचा

घटकावयव ह्मणून मानल्या गेलेल्या या आपल्या हिंदुस्थानच्या देशबांधवांनां ब्रिटिशनागरिकांचे सामान्य व विशेष हक्क मिळविण्याची पात्रता आणणारे व ते प्राप्त करून देण्याकरितां आपलें तनमनधन खर्ची घालणारे दादाभाई नौरोजीं-सारखे खरे आर्यपुत्र निर्माण व्हावयास पाहिजे आहेत. सारांश, राजकारण, समाज, धर्म, नीति, उद्योग, व्यापार, कलाकौशल्य व वाङ्मय या एकेका विषयाला स्वतांस संपूर्णपणें वाहून घेणारे, त्या त्या विषयाच्या ठिकाणीं रममाण होणारे आणि आपल्या चित्ताला, आपल्या व्यवसायाला, आपल्या प्रेमाला अन्यत्र कोठेंहि व्यभिचार करूं न देणारे असे पुरुष पाहिजे आहेत. सध्याचे काळीं नुसती बडबड फार होत आहे; तिच्यासारखी कांहींतरी कृति आपल्या हातानें करून कृतार्थ होणारी मंडळी हवी आहे; आणि अशी मंडळी निर्माण होण्यास सदूबापूंच्या दृष्टीनें संसारत्याग हा एकच उपाय होता. आपली बायकामुलें एवढाच आपला संसार, अशी आपल्या लोकांची समजूत असते हीच मोठी चूक आहे. अशा आकुंचित अर्थाचा जो संसार त्याचा त्याग केला पाहिजे आणि 'वसुधैव कुटुंबकम्' या उक्तीप्रमाणें आपली जन्मभूमि जो आर्यदेश त्याला कुटुंब मानून त्याच्या सुखवृद्धीसाठीं, त्याच्या उत्कर्षासाठीं, त्याच्याच उद्धारासाठीं वाहून घेणें हाच खरा संसार, अशी समजूत लोकांत प्रसृत झाली पाहिजे. हा संसार विवाहित राहून करतां येत नाहीं असें नाहीं; पण त्याला मनोनिग्रह विशेष लागतो. आपल्या आकुंचित कुटुंबाच्या पोषणाकडे खर्च होऊन बाकी उरेल ती आपली शक्ति आपण देशकार्याकडे लावणार! ही शक्ति अर्थातच कितीशी असणार आहे? आणि तीहि पोकळ बडबडींत आणि देशाभिमानाच्या कोरड्या गप्पांत खर्च झाली ह्मणजे खऱ्या कार्याला ती कोठून लागणार? ह्मणून आमच्या देशाच्या अवनतीचें मूळ आमची संसाराविषयीं आकुंचित कल्पना हीच होय, असें त्यांचें ह्मणणें होतें आणि या मताप्रमाणें आचरण ठेवण्याचा त्यांचा कृतसंकल्प असल्या-मुळें ते अविवाहित राहिले होते. इतकेंच नाहीं, तर आपल्याप्रमाणें आणखी कांहीं सोबती जमा करून एक ब्रह्मचारीमंडल स्थापून संघशक्तीच्या जोरावर देशकार्य करण्याचा त्यांचा विचारहि होता. तो विचार ईश्वराच्या इच्छेनें तडीस गेला नाहीं, हें आमच्या देशाचें मोठें दुर्भाग्य होय! सदूबापूंस त्यांच्या ऐन ज्वानींत नवज्वरानें एकाएकीं देवाज्ञा झाली!!

सदूबापू तर गेलेच! पण त्यांच्या डोक्यांतील उत्कृष्ट कल्पना मागें राहिली आहे; आणि त्यांच्यासारखा पुनः कोणी निःसीम भक्तिमान् पुरस्कर्ता मिळेल ह्मणून ती उत्कंठेनें मार्गप्रतीक्षा करित बसली आहे.

## प्रकरण ९ वें.

# गोविंदरावांचे विचार.

इकडे गोविंदरावांची स्थिति बरीच पालटली होती. त्यांनांहि आतां बढती मिळाली होती. पण त्यांच्या मागची मास्तरकी अद्याप सुटली नव्हती. एल्. एल्. बी. ची सनद मिळविण्याची त्यांची उमेद अद्याप नाहींशी झाली नव्हती, एवढेंच कायतें. बाकी त्या उमेदीप्रमाणें घडून येण्याचा संभव दिवसेंदिवस कमीकमी होत आतां बहुतेक अगदीं नाहींसा होत आला होता. गोविंदराव एकटे होते त्या वेळीं खर्चाच्या दृष्टीनें पहातां ते बरेच सुखी होते. ह्मणजे त्या वेळीं पगार जरी थोडा होता, तरी पण खर्चहि फारच थोडा–एकट्यालाच काय लागेल तो–होता. शिवाय दुसरा कांहीं व्याप त्यांचे मागें नव्हता. त्यामुळें एल्. एल्. बी. होऊन आपण अशाअशा तऱ्हेनें देशकार्य करूं, ह्मणून ज्या भावी उत्कर्षाचीं स्वप्नें त्यांनां पडत होतीं, तो उत्कर्ष सिद्ध करून घेण्यास त्यांनां हवी तेवढी मोकळीक होती. त्यांनीं तेव्हां मनांत आणिलें असतें तर एल्. एल्. बी. च्या परीक्षेच्या मागें लागून त्यांनीं हायकोर्टाची सनद केव्हांच पटकाविली असती; किंवा देशहिताचा हवा तो मार्ग त्यांनां खुला होता. त्या मार्गांत कोणत्याहि प्रकारची आडकाठी नव्हती. त्यांनीं प्रथम आपली देशकार्याची पहिली उकळी जिरूं देऊन मग गृहस्थाश्रमी व्हावयास पाहिजे होतें. तसें न करतां त्यांनीं यमूताईच्या गुणांवर लुब्ध होऊन विवाह करण्याची घाई केली, हें त्यांच्या तारुण्याला जसें स्वाभाविक तसेंच घडलें. यांत त्यांच्याकडे ह्मणण्यासारखा दोष येत नाहीं. असो.

गृहस्थाश्रमांत राहून प्रपंचाची काळजी वहात असतां एल्. एल्. बी. सारख्या परीक्षेची तयारी करणें किती अवघड काम आहे, हें जसजसें अनुभवानें त्यांच्या लक्ष्यांत येत गेलें, तसतसे त्यांचे विचारहि पालटावयास लागले. देशकार्य जें करावयाचें त्यास एल्. एल्. बी. होणें अवश्यच आहे काय, असा प्रश्न ते आपल्या मनाला करूं लागले. आपला देश उत्कर्षावस्थेला येण्याला सध्या कशाची विशेष जरूर आहे, या महत्त्वाच्या प्रश्नाचा आपल्या मनाशीं विचार करतांकरतां त्यांनां आढळून आलें कीं, सध्या एल्. एल्. बी. ची किंवा एम्. ए. ची संख्या वाढल्यानें ह्मणजे देशाचा भाग्योदय होईल असें नाहीं; देशाचा व्यापार वाढला, संपत्ति वाढली, कारखाने निघाले, जो तो मनुष्य आपापल्या उद्योगानें, नेकीनें आणि लायकीनें राजकीय हक्क संपादण्यास व ते राखण्यास आपण

पात्र आहों असें दाखवून ते हक्क संपादण्याची योग्य दिशेनें खटपट करूं लागला, समाजांतला प्रत्येक मनुष्य प्रथम स्वतांची सुधारणा करून घेऊन नंतर दुसऱ्याची सुधारणा करण्यास मनोभावानें झटूं लागला आणि जातिमत्सर व आपापसांतील वैर टाकून प्रत्येकजण दुसऱ्याशीं बंधुप्रेमानें वागावयाला लागला, ह्मणजे राष्ट्राचा भाग्योदय झाला ह्मणून समजावें; आणि हें घडून येण्यास एल्. एल्. बी. च किंवा एम्. ए. च पाहिजेत असें नाहीं. तर शिक्षणाच्या योगानें ज्यांचीं मनें खरीं सुसंस्कृत झालीं आहेत, ज्यांची बुद्धि विकास पावून अंतःकरणाच्या वृत्ति उदात्त झाल्या आहेत, ज्यांच्या समजुतींतला सगळा कोतेपणा जाऊन त्यांचे जागीं सरळ वर्तन आणि उदात्त विचार (Plain living and high thinking) या गोष्टींनीं अढळ वास्तव्य केलें आहे अशीं सुशिक्षित माणसें राष्ट्रांत अधिक निर्माण व्हावयास पाहिजे आहेत, असें त्यांना आतां वाटूं लागलें होतें. त्यामुळें पूर्वीचे त्यांचें विचार ह्मणजे आपण एल्. एल्. बी. होऊन हायकोर्टांत वकिली करूं, पुष्कळ पैसे मिळवूं, पुष्कळ लौकिक संपादून राष्ट्रीयसभा, सामाजिक परिषद् व इतर सभा यांचा पुढारीपणा स्वीकारून व व्याख्यानें देऊन लोकांकडून वाहवा करून घेऊं, वर्तमानपत्रांतून सरकारी अधिकाऱ्यांच्या आणि समाजनायकांच्या वर्तनावर खरमरीत टीका करून आणि देशहिताचे नवे मार्ग सुचवून लोकांत जागृति उत्पन्न करूं; स्वाभिमान, स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान यांचें लोकांच्या मनांत बीजारोपण करून म्याझिनी किंवा ग्यारिबाल्डीप्रमाणें आपलें नांव इतिहासांत अजरामर करून ठेवूं, हे सगळे त्यांचे प्रथम वयांतले विचार अनुभवानें वितळत चालले आणि त्यांना आतां असें वाटावयास लागलें कीं, हे आपले सगळे विचार ह्मणजे कांहीं अश्रुतपूर्व आहेत असें नाहीं. आजपर्यंत या विचारांप्रमाणें शेंकडों लोक एल्. एल्. बी. होऊन, पैसे मिळवून, नांवलौकिक संपादून, व्याख्यानांत श्रोतृसमाजाकडून टाळ्यांचा गजर घेऊन, वर्तमानपत्रांत सणसणीत लेख लिहून आणि देशहिताविषयींची वडवड करून नांवाजले गेले आहेत; पण त्यांच्या परिश्रमाचें कांहींच चीज होत नाहीं आणि आपल्या राष्ट्राचें डोकें वर निघत नाहीं, हें कसें? या विषयींच्या कारणांचा पुष्कळ दिवस शांतपणें विचार केल्यानंतरच मागें सांगितल्याप्रमाणें त्यांची खात्री होऊन चुकली होती कीं, आपल्या लोकांच्या प्रयत्नांची दिशा चुकते आहे. रोगाचें निदान न करतां मोठमोठ्या धन्वंतऱ्यांच्या अमोलिक संजीवनी मात्रा दिल्या ह्मणून काय होणार? पाया मजबूत घातल्यावांचून वर सात मजली टोलेजंग इमारत उठवूं ह्मटलें तर

तें कसें साधणार? आज आमच्या देशांत भाषणांची आणि लेखांची मुळींच वाण नाहीं. वाण जी कांहीं आहे ती मुख्य सुसंस्कृत मनें आणि खरी कळकळ यांची आहे; आणि ती मुलांनां गृहशिक्षण चांगलें मिळूं लागेपर्यंत कधींहि भरून यावयाची नाहीं. पूर्वींच्या महत्त्वाकांक्षेच्या विचाराच्या मानानें त्यांचे हे विचार फारच नम्रतेचे होते खरे, पण जास्त दूरदर्शीपणाचे आणि उपयुक्त होते, यांत शंका नाहीं. ह्मणून त्यांनीं इत:पर आपली सर्व करामत मुलांनां योग्य प्रकारचें शिक्षण देण्यांत खर्च केली. उत्तम गृहशिक्षण देणें हेंच आपलें इतिकर्तव्य समजून त्या दिशेनें गोविंदरावांनीं आपले प्रयत्न सुरू ठेविले.

त्यांनां आतां परमेश्वरकृपेनें तीन मुलें होतीं. वडील मुलाचें नांव गंगाधर, मधला बाळकृष्ण आणि धाकटी मुलगी होती तिचें नांव गंगू. ह्या मुलांनां कसें काय शिक्षण मिळालें व त्या शिक्षणाचें त्यांनीं कसें चीज केलें, तें पुढें कळून येईल.

## प्रकरण १० वें.

# अभ्र आलें.

गोविंदरावांच्या कुटुंबाचा जसाजसा विस्तार होऊं लागला, तसतशी त्यांची मिळकत खर्चाला पुरेनाशी होत चालली. ह्मणून पुरवणीखत त्यांनीं एकदोन खाजगी शिकवण्या पतकरल्या होत्या. शाळेंतला पगार चाळीस रुपये व या शिकवण्यांचे वीस रुपये मिळून साठ रुपये दरमहा मिळूं लागले; तेव्हां घरखर्च कोठें जेमतेम चालूं लागला. पण एवढी कमाई करण्यास गोविंदरावांनां किती खपावें लागत होतें, याची कल्पना खुद्द त्यांचेखेरीज इतरांनां क्वचितच करतां आली असती. कोणतेंहि काम अगदीं मन लावून इमानानें करावयाचें, त्यांत हयगय ह्मणून बिलकूल करावयाची नाहीं, हा गोविंदरावांचा अंगस्वभावच असे. त्यामुळें शाळेंत चार तास व खाजगी शिकवण्यांचे दोन तास मिळून सहा तास आणि या सहा तास कामाची घरीं तयारी करण्यासाठीं आणखी तास दोन तास, असें दिवसांतून आठ तास काम त्यांचें नेमलेलें असे.

हें पोटासाठीं झालें. पण याशिवाय स्वतांच्या सुधारणेसाठीं ह्मणून ते कधीं स्पेन्सर, मार्टिनो, मोर्ले, बर्क, बेकन इत्यादि नामांकित ग्रंथकारांचे ग्रंथ वाचीत; कधीं कामाच्या दगदगीनें त्रासून गेलेल्या मनाला शांतता देण्यासाठीं करमणुकी-खातर स्कॉट, जॉर्ज इलियट, मिसेस हेन्री वुड यांच्या कादंबऱ्या वाचीत, व कधीं जगांत काय चाललें आहे तें कळण्यासाठीं रिव्ह्यु ऑफ रिव्ह्युजचा अंक वाचित आरामखुर्चीवर पडले असत. इंग्रजी वाङ्मयाची गोडी लागली ह्मणजे पुष्कळ लोक मराठी व संस्कृत भाषेंतल्या ग्रंथांनां अगदीं तुच्छ मानून त्यांच्याकडे ढुंकूनसुद्धां पहात नाहींत. गोविंदरावांचें तसें नव्हतें. ते फावल्या वेळीं संस्कृत व मराठी पुस्तकेंहि वाचीत. संस्कृतांत बाणभट्टाची कादंबरी, भारतचंपू, उत्तररामचरित व मुद्राराक्षस हीं नाटकें; काव्यांत रघुवंशाचा दुसरा आणि आठवा हे सर्ग, मेघदूत व किराताचे कांहीं सर्ग, हे त्यांनां अत्यंत प्रिय होते. ते या ग्रंथांची वारंवार उजळणी करीत, यामुळें त्यांतला पुष्कळसा भाग त्यांनां मुखोद्गत झाल्यासारखा होता. मराठींत त्यांचे आवडते ग्रंथ ह्मणजे मुक्तेश्वराची कविता, ज्ञानेश्वरी, मोरोपंताचें महाभारत, रघुनाथ पंडिताचें नलोपाख्यान, तुकारामाचे अभंग आणि रामदासाचा दासबोध हे होते. दासबोधाची आणि तुकारामाच्या अभंगांची त्यांनीं वारंवार आवृत्ति करावी. तसेंच रोजच्या पाठाचा त्यांचा ग्रंथ

ह्मटला ह्मणजे श्रीमद्भगवद्गीता हा होय. या ग्रंथाचा पाठ सोवळ्यानें करण्याचा पुष्कळांचा नेम असतो. ते सबंध गीता रोज तोंडानें पाठ ह्मणतील, पण आपण तोंडानें जी गीता ह्मणतों, तींत किती उदात्त विचार भरले आहेत आणि त्या विचारांप्रमाणें आपण आपल्या वर्तनांत नेहमीं उदारता, पवित्रता आणि साधुता ठेवली पाहिजे, ही गोष्ट त्यांच्या गांवींहि नसते ! गोविंदरावांचें तसें नव्हतें. ते गीतेचा पाठ करीत तेव्हां ते प्रत्येक श्लोकाचा अर्थ आपल्या मनावर ठसवून घेत आहेत असें दिसे; आणि खरोखर त्यांचें साधूसारखें वर्तन व गीतेविषयींची अमर्याद आवड पाहून लोक त्यांनां गीताभक्त ह्मणत असत.

याप्रमाणें आठ तास पोटाचें काम व दोनचार तास इतर वाचन वगैरे मिळून रोज सरासरी दहाबारा तास ते काम करित असत. एवढी मेहनत सोसण्यासारखी त्यांची शरीराची काठी मोठीशी सुदृढ होती असें नाहीं. शिवाय व्यायाम वगैरे करण्याचा किंवा सकाळसंध्याकाळ मोकळी हवा खाण्यासाठीं गांवाबाहेर फिरण्यास जाण्याचा त्यांनां कंटाळा असे. त्यामुळें दिवसेंदिवस ते खंगत चालले होते. प्रथम त्यांची भूक मंदावली. मग थोडें खाल्लेंसुद्धां पचेनासें झालें आणि त्यामुळें क्षीणता येऊन ते फार दुबळे दिसूं लागले. त्यांचा चेहरा फिका पडला व डोळे खोल गेले. ही गोष्ट त्यांची त्यांनां बरेच दिवसांपासून कळूं लागली होती व ते यासाठीं बाहेरच्याबाहेर डाक्तरचें औषधहि घेत होते. पण आपली अशी दशा झाली आहे व त्यासाठीं आपण औषधोपचार करित आहों, ही गोष्ट त्यांनीं घरीं कुटुंबास मुद्दाम कळविली नव्हती. पण त्यांनीं कळविली नाहीं ह्मणून ती बातमी गुप्त राहिली, असें मात्र नव्हतें. कारण गोविंदरावांचा तो निस्तेज चेहेरा, बसलेले गाल आणि खोल गेलेले डोळे, त्यांच्या शक्तीची क्षीणता आपण होऊन व्यक्त करित होते. राधाबाईला गोविंदरावांची ही स्थिति पाहून मनस्वी दुःख होई आणि डाक्तराला प्रकृति दाखवून लवकर कांहीं इलाज करावा ह्मणून त्या वारंवार गोविंदरावांस आग्रहपूर्वक सांगत; पण राधाबाई असें कांहीं ह्मणाल्या ह्मणजे गोविंदराव ह्मणत "तुह्मांला काय दिसत असेल तें असो ह्मणा, पण मला कांहीं बुवा एवढी क्षीणता वाटत नाहीं. काम करण्याची हुषारी माझे अंगची तिळमात्र कमी झालेली नाहीं. मला होत आहे काय ? मी चांगला खातोंपितों, काम करतों, मौजा मारतों; माझ्या नित्यक्रमांत कुठें उणें पडतें आहे ? तेव्हां दुखण्याची नसती कल्पना करून त्या कल्पनेच्या बागुलबुवाला भिऊन व्यर्थ जिवाला त्रास कां करून घ्यावा ? परवांच डाक्तर भट यांनीं मला नीट काळजीपूर्वक तपासून

पाहिलें. फुप्फुसाला किंचित् विकार झाला आहे, या पलीकडे कांहीं नाहीं, असें त्यांनीं सांगितलें आहे आणि तो विकार नुक्ताच झालेला आहे; तेव्हां आठचार दिवस औषध घेतल्यानें जाईल. आहे काय त्यांत एवढें काळजी करण्यासारखें?" अशा उत्तरानें राधाबाई निरुत्तर होत. पण त्यामुळें त्यांच्या जिवाला लागलेली चिंता मात्र दूर होत नसे.

एकदा गोविंदराव शाळेंतलें काम करून व शिकवणी शिकवून संध्याकाळीं साडेसात वाजतां परत आले. तेव्हां ते इतके थकून गेले होते कीं, खुर्चीवर बसल्या-बसल्या त्यांनां मूर्च्छा आली. राधाबाई जवळच उभ्या होत्या. त्यांच्या लक्ष्यांत ही गोष्ट येऊन त्यांनीं त्यांनां सांवरून धरलें ह्मणून बरें झालें. नाहींतर ते धाडकन् जमिनीवरच पडले असते. आपल्यास मूर्च्छा आलेली राधाबाईला कळली, हें वाईट झालें, त्यापासून त्यांची चिंता दुणावेल, हें चटकन् गोविंदरावांच्या लक्ष्यांत आलें आणि ते वेळ मारून नेण्याकरितां आणि राधाबाईच्या मनाला धीर देण्याकरितां ह्मणाले "छेः बुवा, आज कोण मनस्वी गरमी होत आहे ? या गरमीमुळें डोळ्यांपुढें चक्करसुद्धां यायला लागली. खिडक्या उघडून मला एक पंखातरी आणून द्या. वारा घेतल्यानें अंमळ बरें वाटेल—"

या बोलण्याचा रोंख राधाबाईच्या लक्ष्यांत आला नाहीं असें नाहीं. त्या ह्मणाल्या "मी पंखा देतें आणून पाहिजेतर. पण आज कांहीं एवढी गरमी नाहीं होत. आपण कांहीं ह्मणायचं, पण ही सगळी अशक्तता दिसते आहे. जिवापलीकडे मेहनत झाल्यामुळं असं होत आहे. यापेक्षां शिकवण्या सोडून कां नाहीं दिल्या?"

गोविंदराव हंसून ह्मणाले "शिकवण्या सोडून देऊन कसें चालेल ? आपला पगार कुठें आपल्या खर्चाला पुरतो आहे ? तूं पहातेसच कीं, या दोन शिकवण्या आहेत ह्मणून या महिन्याची त्या महिन्याला गांठतरी पडते आहे."

राधाबाईला ह्मणजे ही गोष्ट ठाऊक नव्हती, असें नाहीं. पगार सगळा त्यांच्या स्वाधीन केला जात असे, आणि त्याच आपल्या हातानें सारा खर्च करित असत. पण गोविंदरावांच्या प्रकृतीला जपणें हें आपलें मुख्य कर्तव्य त्या समजत होत्या. त्यामुळें गोविंदरावांच्या जिवाला इतके कष्ट देऊन थाटानें रहाण्यापेक्षां निरर्थक खर्च अजिबात बंद करून आणि कांहीं मोलाचें काम स्वतः आपणच घरीं करून खर्चाचें मान कमी करावें, ह्मणजे अर्थात् तितकी गोविंदरावांची मेहनत कमी होईल, असा विचार करून त्या ह्मणाल्या "घरांतला खर्च कमी केला तर नाहीं का चालणार? मुलांनां संभाळायला नोकर, स्वयंपाकीण बाई, धोतरं धुणारा

ब्राह्मण आणि दळण हा सगळा खर्च कमी करतां येण्यासारखा आहे. पाहिजेत कशाला इतकीं माणसं? मी एकटी हीं सगळीं कामं करीन. तसंच हें एवढं मोठं सात रुपये भाड्याचं घर कशाला पाहिजे? कुठं दोनतीन रुपये भाड्याचं घर पाहिलं असतं."

पत्नीचें हें उत्तेजन देणारें भाषण ऐकून गोविंदरावांनां किती समाधान वाटलें असेल तें ज्यांनां राधाबाईसारखी सुशील आणि प्रेमळ पत्नी सुदैवानें मिळाली असेल त्यांनांच योग्य रीतीनें कळून येईल. राधाबाईच्या भाषणानें गोविंदरावांनां बरीच हुषारी वाटूं लागली. राधाबाई खर्च कमी करण्यास आणि स्वतः मेहनत करण्यास तयार झाल्या, पण गोविंदराव थोडेच ती गोष्ट करण्यास कबूल होते! त्यांनीं नुसती मान हालवून "छे: छे: ! परमेश्वर असा दिवस आणणार नाहीं." असें शब्दांनीं न उच्चारितां मानेनें सुचविलें आणि दुसऱ्या कांहीं उद्योगास लागून तो अप्रिय असा भाषणाचा ओघच फिरविला.

## प्रकरण ११ वें.

# अंमळ निवळलें.

गोविंदरावांनीं भाषणाचा ओघ फिरवून ती वेळ मारून नेली खरी, पण ती गोष्ट कांहींकेल्या त्यांच्या मनांतून जाईना. आपण दिवसेंदिवस असे क्षीण होत चाललों आणि समजा एखादे दिवशीं आपल्या जिवाचें कांहीं बरेंवाईट झालें, तर आपल्या मागें आपल्या पत्नीनें आणि मुलाबाळांनीं कोणाच्या तोंडाकडे पहावें ? हा विचार त्यांच्या डोक्यांत सारखा घोळूं लागला. या विचारानें त्यांचा सगळ्या रात्रींत डोळ्याशीं डोळा लागूं दिला नाहीं. समुद्रांत भरतीचे वेळीं लाटा जशा एकामागून एक येऊन ताडताड किनाऱ्यावर आदळतात, तसे विचारामागून विचार येऊन गोविंदरावांच्या मेंदूवर आपटत आणि त्यांनां खडबडून जागें करीत. या सर्व विचारांचें सार हें होतें कीं "आपण आपल्या बायकोची आणि मुलाबाळांच्या निर्वाहाची कांहीं तरतूद न लावितां मरण पावलों, तर ईश्वराचे घरीं केवढे गुन्हेगार होऊं ? आणि तशी कांहीं तजवीज लाविली नाहीं तर आपल्याला मरणतरी शांततेनें कसें येईल ?"

गोविंदरावांला आपल्या पत्नीच्या सहवासानें एका गोष्टीची चांगली संवय झाली होती आणि ती गोष्ट ह्मणजे संकटाला न भितां त्याच्याशीं झगडणें, ही होय. कित्येक माणसें अशीं असतात कीं, त्यांनां यःकश्चित् क्षुल्लक अडचण येऊन पडल्याबरोबर असें वाटूं लागतें कीं, जणूंकाय आपल्यावर आकाशच कोसळून पडलें आहे, आणि यांतून निभावणें अत्यंत मुष्किल आहे. कितीहि संकटें आलीं तरी घाबरून न जातां त्या संकटांतून पार पडण्याचा मार्ग शोधून काढावयाचा असा राधाबाईचा स्वभाव असे; आणि तोच कित्ता गोविंदरावांनीं उचलला होता.

बराच विचार करून पहातां या अडचणींतून बाहेर निघण्याचा त्यांनां एक मार्ग दिसला; आणि तो आपल्या आयुष्याचा विमा उतरणें हा होय. गोविंदरावांजवळ वडिलोपार्जित जिंदगी कांहींएक नव्हती, हें वर सांगितलेंच आहे. आणि त्यांची स्वतांची मिळकतहि त्यांच्या चालू खर्चास पुरून शिल्लक उरण्याइतकी नव्हती; मग नवीन मालमत्ता कोठून विकत घेणार? आतांशीं कोठें थोडेसे पैसे मागें पडूं लागले होते. पण हा क्रम वर्षानुवर्ष चालला असता तरी बायको आणि चार लेंकरें यांच्या निर्वाहाला पुरेल एवढ्या उत्पन्नाची वतनवाडी त्या पैशानें खरीद करवली नसती. चारच माणसें ह्मटलीं तरी त्यांच्या पोटाला कमींत कमी पंधरा

वीस रुपये महिना लागले असते. आज इतकें व्याज दरमहा मिळण्याला कमींत कमी पांच हजार रुपयांची पुंजी पाहिजे होती. एवढी शिल्लक जमेपर्यंत आपण जगूं, ही आशा गोविंदरावांस आतां मुळींच उरली नव्हती. तेव्हां आतां बायकोमुलांची तरतूद करण्याचा एकच मार्ग—आयुष्याचा विमा उतरणें हा उरला होता. अशा स्थितींत हा मार्ग कोणासहि सुचला असता; गोविंदरावांना तो सुचला, पण करतात काय ? विम्याबद्दल रक्कम फार भरावी लागेल आणि तेवढीतरी आपल्या पगारांतून दरमहा देतां येईल कीं नाहीं कोण जाणे, अशा चिंतेंत ते पडले होते.

कोणतीहि गोष्ट बायकोपासून लपवून ठेवावयाची खोड पुष्कळांनां असते; आणि बायका अज्ञान व अविचारी असल्या म्हणजे तसें करणें पुष्कळ वेळां योग्यहि असतें. पण गोविंदरावांची गोष्टच निराळी होती. ते राधाबाईपासून कोणतीहि गोष्ट लपवित नसत; आणि राधाबाईहि कांहीं इतर बायकांसारख्या अगदीं अज्ञान व अविचारी नव्हत्या; यामुळें त्यांच्यापासून कोणतीहि गोष्ट लपविण्याचें गोविंदरावांनां यत्किंचित् कारण नव्हतें. उलट प्रत्येक गोष्टींत राधाबाई सल्लामसलत देत ती फार पोक्तपणाची आणि दूरवर विचार करून दिलेली असे. 'कार्येषु मंत्री' असें उत्तम गृहिणीचें लक्षण सांगितलें आहे. राधाबाईंलातर हें लक्षण पूर्णपणें लागू पडत असे. मग गोविंदरावांनींतरी त्यांच्यापासून एखादी गोष्ट कां लपवावी ?

सकाळीं उठून प्रातर्विधि वगैरे आटोपल्यावर राधाबाई नित्यनेमाप्रमाणें दुधाची वाटी घेऊन गोविंदरावांचे टेबलाजवळ आल्या. तेव्हां गोविंदराव म्हणाले "काल सगळ्या रात्रींत माझा डोळयाशीं डोळा कसा तो लागला नाहीं. विचारांनीं डोकें कसें भणभणून गेलें होतें."

राधाबाईंनीं लडिवाळपणानें विचारिलें "कसले विचार चालले होते ? आतां प्रकृति बरी होईपर्यंत विचारांविचारांनां चार दिवस रजा दिली तर नाहीं का चालायचं ? एरवीं आपले रात्रंदिवस विचार आहेतच. पण चार दिवसतरी विश्रांति घ्यायची ! असे कशाचे एवढे विचार चालले होते, मला सांगण्यासारखे आहेत का ?"

गोविंदराव म्हणाले "तुला सांगण्यासारखे नाहींत असे माझे कोणते विचार आहेत ? तुला सांगण्यासारखे काय, पण तुझ्याचबद्दलचे ते विचार आहेत—".

"आपण उगीच कांहीं चिंता करित बसून जिवाला त्रास मात्र करून घ्यायचा !"

"मी चिंता करित बसलों होतों असें नाहीं, पण ती चिंता दूर करण्याच्या मार्गाचें चिंतन करित होतों, एवढें मात्र खरें आहे. आणि अखेर तो मार्ग मला

सांपडलाहि आहे. तो तुला केव्हां कळवीन असें मला झालें आहे. आतां या कामांत तुझा विचार माझ्यासारखाच पडतो कीं निराळा पडतो तें पाहूं—"

"माझा वेडीचा कसला विचार न् बिचार ! पण आपण सगळ्या रात्रभर जागून एवढा काय विचार केला आहे तोतरी एकदा कळेल ह्मणजे बरें."

"आहे अगदीं क्षुल्लक गोष्ट–ह्मटली ह्मणजे या पूर्वी कधींच ती मला सुचायला हवी होती. आतांपर्यंत ती कशी सुचली नाहीं, याचेंच मला नवल वाटतें. काल संध्याकाळीं माझी तब्यत एकाएकीं बिघडली आणि तेव्हांपासून मला वाटायला लागलें कीं, या देहाचा भरंवसा नाहीं असें साधुसंत ह्मणत आले आहेत तें कांहीं खोटें नाहीं. तेव्हां प्रत्येकानें आपल्यामागें आपल्या मुलांमाणसांची तरतूद लावून ठेवायला पाहिजे. आतांपर्यंत मीं अशी तरतूद काय लावून ठेविली आहे ह्मणून विचार करून पाहूं लागलों, तर कांहीं दिसेना. शेवटीं मनाचा निश्चय केला; आणि आज अगोदर जाऊन स्वतांच्या आयुष्याचा विमा उतरण्याचा मीं विचार केला आहे."

'आयुष्याचा विमा' हे शब्द इतर बायकांच्या कानांला किती अशुभ वाटले असते ! पण राधाबाई शिकल्यासवरलेल्या आणि विचारी असल्यामुळें त्यांच्या कानांला ते शब्द तितके अशुभ लागले नाहींत. तथापि अर्धवट शिकलेल्या बायकांच्या काय किंवा पुरुषांच्या काय मनावरचे पूर्वसंस्कार अजीबात पुसले जातात असें थोडेंच आहे ! 'आयुष्याचा विमा' हे शब्द गोविंदरावांनीं उच्चारल्याबरोबर राधाबाईच्या डोळ्यांसमोर लागलीच एक चमत्कारिक हिडिस असें चित्र दिसावयाला लागलें; आणि त्या धीराच्या असूनहि तें काल्पनिक चित्र पाहून त्या थोड्याशा घाबरल्या. ही त्यांची अवस्था पाहून गोविंदराव हंसून ह्मणतात "मी समजत होतों कीं, इतर बायकांपेक्षां तूं जास्त समजूतदार असशील आणि पुष्कळ वेळां तूं मला शहाणपणाची सल्लामसलत देऊन माझ्या समजुतीला बळकटहि आणिली आहेस. पण या बाबतींत तुझी वेडी समजूत अद्याप कायम आहेशी दिसते. कित्येक लोक असे भित्रे असतात कीं, व्यवस्थापत्र करणें किंवा आयुष्याचा विमा उतरणें या दोन गोष्टींची नुसती कल्पनासुद्धां त्यांनां दुःसह होते. पण हे वेडे लोक असा विचार करित नाहींत कीं, व्यवस्थापत्र करणें किंवा आयुष्याचा विमा उतरणें, यांपासून परमेश्वरी सूत्रानें नेमून दिलेल्या आयुष्यमर्यादेंत एक क्षणतरी कमीअधिक होईल काय ? तुह्मीं विमा उतरलेला असो वा नसो, ज्या वेळेस परमेश्वराच्या घरचें बोलावणें यावयाचें त्याच वेळेस तें येईल. मग अशा

गोष्टींची चर्चा करण्यास भीति कां वाटावी ? मीं आयुष्याचा विमा उतरला ह्मणून ठरलेल्या वेळेच्या अगोदर का मला कुणी उचलून नेणार आहे? विम्याच्या रकमेहून अधिक पैसे भरीन इतकी लांब आयुष्यमर्यादा अजून माझी कदाचित् असेल, त्याचा काय नेम? तसें कोणी अगोदर निश्चयानें सांगेल तर विमाकंपनींत पैसे न भरतां ते ब्यांकेंतसुद्धां मी ठेवीन. पण हा नेम कुणाला सांगतां येणार आहे काय ?"

यावर राधाबाई किंचित् स्वस्थ होऊन ह्मणाल्या "ब्यांकेंत पैसा टाकूं टाकूं असं आपण पुष्कळ ह्मणतों, पण तसं जमतं आहे कुठं करायला? ब्यांकेंत ठेवायचे पैसे सगळे संसारालाच लागतात. विमाकंपनीचं देणं ह्मटलं ह्मणजे हजार अडचणी सोसून तें वेळेवर दिलंच पाहिजे; आणि अशी निकड लागल्याखेरीज दोन पैसे गांठीं रहायचे नाहींत, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं."

याप्रमाणें राधाबाईची समजूत घातल्यावर गोविंदरावांचा तीन हजारांचा आयुष्याचा विमा उतरण्याचें ठरलें. त्यांनीं लागलीच एका स्नेह्याकडून ओरियंटल कंपनीचें विम्याचे कोष्टकाचें पुस्तक मागवून त्यांत प्रीमियम (नियमितकालीं भरावयाचे रकमे) चे दर पाहिले. वर्षाचे कांठीं एकशें दहा रुपये अकरा आणे नऊ पै द्यावे लागतील, असें पाहून त्यासाठीं दरमहा काटकसर करून दहा रुपये खर्च कमी करावयाचा असा त्या नवराबायकोचा निश्चय होऊन कोणकोणत्या बाबींना फांटा द्यावयाचा, तेंहि लागलीच ठरलें व आतां मुळींच विलंब करावयाचा नाहीं, उद्यांच अर्ज पाठवावयाचा, असें ठरल्यावर तीं उभयतां आपापल्या नित्यकर्मास लागलीं.

## प्रकरण १२ वें.

# सर्जन साहेबांची भेट.

गोविंदराव दुसरे दिवशीं नित्याप्रमाणें शाळेंतील काम आटोपून सुटी झाल्याबरोबर घरीं न येतां तसेच लष्करांत परभारें ओरियंटल कंपनीच्या आफिसांत गेले. तो दिवस शनिवारचा असल्यामुळें शाळेला दुपारीं दोन वाजतांच सुटी झाली होती व आफिसांत जाऊन चौकशी करण्यास व डाक्तरकडून परीक्षा वगैरे करून घेण्यास पुरेल इतका वेळ अर्थात् होता. ओरियंटल कंपनीचें आफीस लष्करांत मेन स्ट्रीटमध्यें होतें. या कंपनीचा एजंट एक पारशी गृहस्थ होता. तो फार सुस्वभावाचा असून मराठी चांगलें शुद्ध बोलत असे. गोविंदरावांला पहातांच त्यानें त्यांचा आदरसत्कार करून त्यांनां बसावयास खुर्ची दिली व काय काम आहे ह्मणून विचारिलें. गोविंदरावांनीं आपला हेतु कळवून आपलें वय व किती रकमेचा विमा उतरावयाचा व किती वर्षें पैसे भरावयाचे, तें सगळें सांगितलें. त्या पारशी गृहस्थानें एक छापील कागद गोविंदरावांचे हातीं दिला व हा एवढा तक्ता भरून द्या, ह्मणून सांगितलें. त्यांत एक कलम असें होतें कीं "माझें वय अमुकअमुक आहे, आणि तें खरें आहे अशी माझ्या पत्रिकेवरून किंवा अन्य दस्तऐवजावरून मी खात्री करून देईन." तें कलम वाचून गोविंदराव ह्मणाले "अशी प्रतिज्ञा लिहून घेण्यांत काय अर्थ आहे? मी सांगतों तें वय खरें आहे, एवढें ह्मटलें तर पुरे नाहीं का होणार!"

तो पारशी गृहस्थ ह्मणाला "आपल्यासारखे सद्गृहस्थ खरें वय असेल तेंच सांगतील, यांत शंका नाहीं. पण आमच्याकडे विमा उतरण्यास येणारे सगळेच सज्जन असतात असें नाहीं. प्रीमियम कमी लागावा ह्मणून कित्येकजण वयांतलीं दहादहा वर्षेंसुद्धां चोरतात, असें अनुभवांतीं आह्मांला कळून आलें आहे. तेव्हां-पासून कंपनीला ही शर्त निरुपायास्तव घालावी लागली. पत्रिका किंवा दुसरा कांहीं दस्तऐवज नसला तर वयाबद्दल दोघां प्रतिष्ठित गृहस्थांनीं खात्री करून दिली तरी चालेल."

"वयाबद्दलची तुमची खात्री करून दिली ह्मणजे झालेंना?" गोविंदरावांनीं त्या एजंटास विचारिलें.

तो पारशी गृहस्थ ह्मणाला "नाहीं; तेवढ्यानें काम भागत नाहीं. डाक्तरचें सर्टिफिकीटहि लागतें."

गोविंदराव ह्मणाले "अं:, तें सर्टिफिकिट सहज मिळूं शकेल. आमचे भट डाक्तर आज दहा वर्षें मला चांगल्या प्रकारें ओळखतात. गरज लागल्यास मी त्यांचेंच औषध घेतों.; परंतु मला औषधाची विशेषशी गरजहि लागत नाहीं. नाहीं ह्मणायला मध्यें एकदोनदा खोकला झाला होता, तेव्हां काय तें औषध घेतलें होतें."

"आपण कांहीं दिसण्यांत मजबूत दिसत नाहीं—"

आपल्या सरळ स्वभावास अनुसरून गोविंदराव ह्मणाले "मी जन्मापासूनच असा आहें; आणि आलीकडे मेहनत जरा जास्त पडल्यामुळें क्षीणता आलेली आहे. ही क्षीणता वाटूं लागल्यापासूनच आयुष्याचा विमा उतरण्याचा हा विचार माझ्या डोक्यांत आला. ऐशीं वर्षांचा होईपर्यंत चांगला धट्टाकट्टा रहाण्याची खात्री असती तर विमा उतरून काय करावयाचें होतें?"

त्यावर तो पारशी एजंट हंसून ह्मणाला "नुसत्या दिसण्यावर जाऊं नका. कधींकधीं अगदीं नाजूक आणि अशक्त दिसणारे लोकच सर्वांत अधिक जगतात! असो. पण तो आपला विषय नाहीं. तें पहाण्याचें काम सर्जन साहेबांचें आहे. तुह्मी एवढा हा तक्ता भरून द्या ह्मणजे आपण आतांच सर्जन साहेबांकडे जाऊन तुमची परीक्षा करवूं."

गोविंदरावांनीं लागलीच तक्ता भरून दिला आणि खिशांतून आपली पत्रिका काढून तीहि त्या एजंटच्या स्वाधीन केली. त्या पारशी गृहस्थानें ते दोन्ही कागद आपल्या आफिसांतील पेटींत व्यवस्थित ठेविल्यावर गोविंदरावांला तो सिव्हिल सर्जनच्या बंगल्यावर घेऊन गेला. सर्जनसाहेब दिसण्यांत ठेंगणें, गोरे आणि शांत स्वभावाचे दिसत असून ते एरवीं मितभाषणी असत; पण रोग्यांनां मात्र प्रश्न विचारूनविचारून प्रत्येक गोष्टीची बारीक चौकशी करण्यांत त्यांला बेदम करून सोडीत. गोविंदरावांला या गोष्टीचा चांगला अनुभव आला. आजपर्यंत त्यांनां कोणकोणते रोग झाले व कोणकोणते झाले नाहींत, त्यांनां कसल्याकसल्या संवयी मागें होत्या व आतां आहेत, त्यांचे वाडवडील कोणकोणत्या वयांत मेले व त्यांनां कसल्या प्रकारच्या संवयी होत्या, वगैरे शेंकडो बारीकसारीक गोष्टी सर्जनसाहेबांनीं विचारून गोविंदरावांनां पुरेपुरे केलें, आणि शेवटीं विचारलें "तुह्मांला आपण अगदीं निरोगी आणि बळकट आहों असें वाटतें काय?"

गोविंदरावांनीं उत्तर केलें "उन्हाळ्यांत फार गळाल्यासारखें वाटतें. एरवीं तब्यत बरी असते."

"भूकबिक चांगली लागते?"

"पूर्वी साधारण लागे, पण आलीकडे नाहीं चांगली लागत."

"श्वासोच्छ्वास बरोबर चालतो?"

"केव्हांकेव्हां अडचण पडते."

"खोकला येतो?"

"नेहमींच येतो असें नाहीं. पण रात्रीं मात्र जास्ती येतो. दिवसाच्या दगदगीमुळें रात्रीं जास्त वाटत असेल कदाचित्."

"कपडे काढून छाती दाखवा पाहूं? कोटाच्या व जाकिटाच्या गुंड्या तेवढ्या काढा ह्मणजे पुरे आहे."

गोविंदरावांनीं तसें केल्यावर डाक्तरसाहेबांनीं प्रथम बोटांनीं ठोकून त्यांच्या छातीचा आवाज ऐकला. पण तो नीटसा ऐकूं येईना. ह्मणून समोरच्या टेबलावरून एक नळी उचलून घेऊन तिचें एक टोंक गोविंदरावांच्या छातीवर टेंकलें व दुसऱ्या टोंकाशीं आपला कान लाविला आणि ती नळी वरचेवर उचलून निरनिराळ्या ठिकाणीं लावून एकंदर सगळ्या छातीची परीक्षा केली. मध्येंच एक-दोनदा गोविंदरावांला खोकण्यास सांगितलें. याप्रमाणें परीक्षा केल्यावर पुनः गुंड्या लावण्यास सांगून डाक्तरसाहेब खुर्चीवर बसले आणि गोविंदरावांला ह्मणाले "तुह्मी आंत फ्लॅनेलची बंडी कां नाहीं घालीत?"

"हिंवाळ्यांत घालित असें. पण आतां गरमीचे दिवस ह्मणून नुकताच घालीनासा झालों आहें."

हें गोविंदरावांचें उत्तर ऐकून डाक्तरसाहेब किंचित् रागावल्यासारखे दिसले. तथापि हंसतहंसत ह्मणाले "तुमच्यासारख्या शहाण्या व शिकलेल्या लोकांनीं असा वेडेपणा करावा, हें मोटें आश्चर्य आहे. एवढें तारतम्य तुह्मां लोकांनां जरूर पाहिजे. माझ्याकडे येणाऱ्या बहुतेक लोकांनां मी असेंच तुमच्यासारखें उत्तर देतांना ऐकतों. उन्हाळ्यांततर फ्लॅनेलची विशेष जरूर आणि याच दिवसांत लोक फ्लॅनेलची बंडी टाकून देतात, या मूर्खपणाला काय ह्मणावें?"

गोविंदरावांला डाक्तरसाहेबांचें हें स्पष्ट पण अंमळ कठोर भाषण ऐकून फ्लॅनेलची बंडी टाकून देण्यांत आपण चूक केली, असें वाटूं लागलें आणि ते ह्मणाले "मी आतां घरीं गेल्याबरोबर ती पुनः घालूं लागेन. पण सध्या मी आपलें सर्टिफिकीट घेण्यासाठीं आलों आहें, तेवढें कृपा करून द्यावें."

डाक्तरसाहेबांनीं मानेनें नकाराचा जबाब दिला. गोविंदरावांची या वेळीं कांहीं चमत्कारिकच स्थिति झाली. हा डाक्तर मोठा विक्षिप्तच आहे, असें त्यांनां वाटलें. सर्टिफिकीट न देण्याचें कारण त्यांनीं विचारलें तेव्हां डाक्तरसाहेब ह्मणाले "कां ह्मणजे? विमा उतरण्यासारखी तुमची प्रकृति मला दिसत नाहीं ह्मणून!"

हें ऐकून गोविंदराव घाबरले. त्यांची छाती धडधडूं लागली व नाडीचे ठोके जलद पडूं लागले. त्यांनीं चिंतायुक्त मुद्रेनें विचारलें "ह्मणजे?"

डाक्तरसाहेबांनीं अंमळ त्रासून ह्मटलें "ह्मणजे असें कीं, तुमच्या आयुष्याचा विमा उतरण्यांत कंपनीला धोका येईल."

यावर गोविंदरावांनीं पुनः विचारलें "ह्मणजे मला झालें आहे तरी काय?"

डाक्तरसाहेबांनीं गोविंदरावांच्या तोंडाकडे टक लावून एक अर्धा मिनिटपर्यंत पाहिलें आणि ह्मटलें "असा प्रश्न मला पुष्कळ रोगी विचारतात; पण खरें कारण सांगायला गेलों ह्मणजे मात्र तें त्यांनां रुचत नाहीं."

"माझी गोष्ट तशी नाहीं. मेहेरबानी करून आपण खरें असेल तें बेलाशक स्पष्टपणें सांगा. खरी हकीगत सांगितल्याबद्दल मी आपले फारफार आभार मानीन."

डाक्तर ह्मणाले "खरें सांगूं? तुमचीं फुप्फुसें बिघडलीं आहेत—"

हें ऐकतांच गोविंदरावांच्या उरांत धस्स झालें. ते ह्मणाले "फार नाहींतना? अजून औषधपाण्यानें सुधरण्यासारखीं आहेतना?"

डाक्तर ह्मणाले "मी तुमच्या तोंडादेखलें बोललों तर तुह्मांला फसविल्याच्या दोषाला अधिकारी होईन. तुह्मीं समजूतदार दिसतां, तेव्हां तुमचेजवळ खरें सांगण्यास हरकत दिसत नाहीं. तुमचीं फुप्फुसें फारच बिघडलीं आहेत—"

हें ऐकूनतर गोविंदरावांची कंबरच खचली. ते मटकन् खालींच बसले.

डाक्तरसाहेबांनां गोविंदरावांची ही स्थिति पाहून फार वाईट वाटलें. ते ह्मणाले "माझें ह्मणणें पुरें ऐकूनतरी घ्याल कीं नाहीं? मी असें ह्मणत होतों कीं, तीं फार बिघडलीं आहेत खरीं, पण अजून उपचार केला असतां दुरुस्त होण्याची उमेद आहे. ही उमेद ह्मणजे विशेष बळकट आहे असें नाहीं. तथापि तुह्मी नीट जपून राहिलां आणि औषधपाणी घेतलें तर उमेद आहे एवढेंच—"

"मीं कसें रहावें आणि काय करावें असें आपलें ह्मणणें आहे?"

"तुह्मी शहरांत ऐन मध्यवस्तींत एखाद्या मोठ्या वाड्यांत अंधाऱ्या जागेंत रहात असाल?"

"होय, मध्यवस्तींत रहातों ही गोष्ट खरी आहे; पण जागा कांहीं अंधेरी नाहीं."

"तें कांहीं असो. तुह्मांला चांगल्या मोकळ्या आणि शुद्ध हवेंत प्रथम रहावयास गेलें पाहिजे. तेंहि महिनापंधरा दिवसांकरितां नव्हे, तर हमेषा अशा मोकळ्या हवेंत राहून काम फार थोडें अगदीं बेतानें केलें पाहिजे. पुण्याची हवा तर तुमच्या प्रकृतीला अगदीं उपयोगाची नाहीं. तुह्मी जितकें लवकर पुणें सोडाल तितकें बरें."

"पण हें कसें व्हावें? मला नोकरीतर पुण्यांत आहे."

"नोकरी किंवा प्राण यांपैकीं तुह्मांला काय हवें तें पत्करा. पुण्यांत राहिल्यानें हीं दोन्हीं तुह्मांस लाभतील असें मला नाहीं वाटत. तुह्मांला पुण्याची हवा बिलकूल मानवत नाहीं. तुमचा जन्म कांहीं इथला नाहीं दिसत—"

"नाहीं; माझा जन्म खानदेशांत झाला आहे. मला पुण्याला येऊन थोडींच वर्षें झालीं असतील."

"तरीच! तुह्मी खानदेशांत राहिलां असतां, तर हा रोग होता ना. पण आतां काय त्याचें? होणार तें होऊन चुकलें. आतां तुह्मी कसेंहि करून एथून निसटण्याच्या तजविजीस लागा. इथें राहिलां तर पस्तावाल."

डाक्तरसाहेबांस सलाम करून गोविंदराव बाहेर आले. ते डाक्तरच्या खोलींत गेले तेव्हांची त्यांची मुद्रा व आतां बाहेर आले त्या वेळची मुद्रा यांच्यांत जमीनअस्मानाचें अंतर होतें! त्यांनां आतां सगळें जग शून्य दिसूं लागलें. आपण मेल्यावर आपल्या मागें आपल्या बायकोमुलांची काय स्थिति होईल, ही चिंता आतां त्यांनां लागून राहिली.

## प्रकरण १३ वें.

# अग बाई, तब्यतीला झालं आहे तरी काय?

डाक्तरसाहेबांनीं परीक्षा केल्या दिवसापासून गोविंदरावांनीं हाय खाल्ली. मरणाच्या धास्तीनें आणि बायकोमुलांचें कसें होईल या चिंतेनें त्यांचें मन खचत चाललें. आतां आपला अंतकाळ समीप येऊन ठेपला आहे आणि आपण या दुखण्यांतून खास वांचत नाहीं, ही कल्पना त्यांच्या डोक्यांत इतकी दृढ होऊन बसली कीं, कांहीं डाक्तरांनीं व स्नेह्यांनीं ती घालविण्याचा पराकाष्ठेचा यत्न केला, पण तो सर्व व्यर्थ झाला.

गोविंदराव घरीं आले तों त्यांचीं पावलें जड वाजलीं. त्यांच्या तोंडावरचा प्रफुल्लितपणा सगळा गेला; त्यांचीं सोन्यासारखीं लेकरें ओटीवर खेळत होतीं त्यांचेकडे पाहून रोजच्याप्रमाणें त्यांना आनंद वाटावा, पण आज तो बिलकुल वाटला नाहीं. मुलें खेळण्याच्या नादांत होतीं व राधाबाई घरांत कांहीं कामांत गुंतल्या होत्या. त्यामुळें गोविंदरावांच्या वृत्तींत एकाएकीं झालेला हा फरक कोणाच्या नजरेस अद्यापपर्यंत पडला नव्हता. गोविंदराव आले तसेच ईझिचेअर वर पडून राहिले. आपल्या सुदैवानें आपणास सुशील, सुशिक्षित आणि प्रेमळ अशी पत्नी आणि सुंदर, मृदुभाषणी, सुस्वभावी आणि आज्ञाधारक मुलें लाभलीं आहेत; देवाच्या दयेनें आपल्यास दोन अक्षरें प्राप्त होऊन देशाच्या सेवेला लागण्याची इच्छा मनांत नुकती कोठें प्रादुर्भूत होऊं लागली आहे, तों इतक्यांत आपल्यास हें जग सोडून जावें लागत आहे, हें केवढें दुर्दैव! असा विचार मनांत येऊन त्या विचाराच्या उकळीबरोबर 'परमेश्वरा तुझी मर्जी!' असे दुःखाचे उद्गार एका उसाशाबरोबर त्यांच्या तोंडून बाहेर पडले.

हे शब्द तोंडांतून निघावयाला आणि राधाबाई तेथें यावयाला एकच गांठ पडली. पतीच्या तोंडचे ते शब्द ऐकतांच त्या दचकल्या आणि त्यांच्याहि तोंडांतून नकळत 'अग बाई, आज तब्यतीला झालं आहे तरी काय?' असे शब्द निघाले. हे शब्द ऐकून गोविंदराव झोंपेतून खडबडून जागे व्हावे तसे एकदम आपल्या विचारसृष्टींतून निघून या जडसृष्टींत आले आणि "कांहीं नाहीं होत, मी आपला उगीच कांहींतरी—" असें थोडेंसें घाबऱ्याघाबऱ्या पुटपुटले. तें इतक्या हलक्या आवाजानें कीं, राधाबाई आतां बऱ्याच जवळ जाऊन पोहोंचल्या होत्या तरी त्यांच्यासुद्धां कानीं ते सगळे शब्द गेले नाहींत.

इतक्यांत " आईग, आईग, भाऊकनी मला खेळायला घेत नाहीं—" ह्मणून गंगू आपल्या भावाचें गाऱ्हाणें घेऊन आली. तिच्या मागून गंगाधर आणि कृष्णा तिला समजाविण्याकरितां आले आणि तिन्ही मुलें आपापल्यापरी आपली हकीगत सांगून आपल्यावरचा दोष टाळण्याचा प्रयत्न करूं लागलीं. आई ह्मणजे मुलां-मधलीं भांडणें मिटविणारें व अपराध्यांस शिक्षा करणारें हायकोर्टच असतें. तिनें दिलेल्या निकालावर अपील नसतें. या हायकोर्टाला कधीं सुट्टी नसते आणि त्याला कोर्ट फी, स्टांप वगैरे कांहीं खर्चहि लागत नाहीं. मुलांच्या आपआपसांतल्या फिर्यादी रोज या कोर्टांत येतात आणि फैसला होतात. या नित्यक्रमाप्रमाणें या वेळीं हा खटला उपस्थित होऊन हायकोर्टाकडे निवाड्याकरितां आला होता. पण राधाबाईचें चित्त कोठें यावेळीं स्थिर होतें? त्यांनीं त्रासून गंगाधराला ह्मटलें "नाना, कायरे असा गंगूला रडवितोस? जा तिला इथून घेऊन आणि खेळीव क्षणभर. मी तुमचं ह्मणणं मग ऐकून घेईन."

राधाबाईचीं मुलें आपअसांत कितीहि भांडलीं तरी आईच्या अगदीं आज्ञेंत असत. गंगाधर लागलीच "आपण आंधळी कोशिंबीर खेळूं चला," असें ह्मणून सर्वांना घेऊन गेला. राधाबाईनीं गोविंदरावांची ती उदास आणि खिन्न झालेली मुद्रा पाहून आज तब्यत ठीक नाहीं असें त्यागलेंच ताडलें आणि ह्मटलें "आज फार थकवा आलेला दिसतो. ह्मटलंतर आज दोन वाजतांच सुटी झाली होती; त्यामुळं दोन घटका जिवाला विश्रांति मिळाली असेल."

गोविंदराव पुटपुटले "ठेविली आहे विश्रांति! दुपारपासून सारखा कामांत आहें. तरी दत्तोपंत डुकले यांच्या घरची शिकवणी अजून राहिलीच आहे!"

गोविंदरावांनीं 'दुपारपासून कामांत आहें' असें मोघम ह्मटलें, पण आपण ज्या कामासाठीं लष्करांत गेलों होतों व दुपारचा सगळा वेळ तिकडे घालविला, त्या कामाची खरी हकीगत आपल्या पत्नीस सांगण्यास त्यांस धैर्य होईना. गोविंदराव राधाबाईच्या तोंडाकडे टक लावून पहात राहिले. इतक्यांत एकाएकीं कांहीं विचार त्यांच्या मनांत आला. सिव्हिल सर्जननें परीक्षा केली ती खरीच असेल कशावरून? डाक्तर लोक काय चुकत नाहींत? चांगल्या नामांकित डाक्तरांच्या परीक्षेंत चुका झालेल्या पुष्कळ वेळां नजरेस आल्या आहेत. आपलीं फुपुसें डाक्तर सांगतात त्याप्रमाणें खरोखरच इतकीं बिघडलीं असतीं तर आपल्याला कळल्यावांचून कसें रहातें! पण तशी कांहीं आपली तब्यत विशेष कधीं बिघडली नाहीं. मग डाक्तर सांगतात हें खरें कशावरून? विमा कंपनीला

नुकसान लागूं नये ह्मणून फाजील जपणारांपैकीं हे डाक्तर असतील झालें. या विचारांनीं गोविंदरावांच्या निराश अंतःकरणाला पुनः थोडी टवटवी आली. त्याबरोबर सगळा रंग पालटला. ते लागलीच जेवायास उठले. मुलांशीं लडिवाळपणानें बोलूंखेळूं लागले. गंगूचेतर त्यांनीं इतके मुके घेतले कीं, ती मुलगी अगदीं बेदम झाली. थोड्या वेळापूर्वी ते जितके दुःखी कष्टी झाले होते, तितके आतां आनंदी व विनोदी झाले. त्यांच्या वृत्तींत हा किती विलक्षण फरक एकदम पडला पहा! पण हा रंगतरी फार वेळ टिकला काय ? नाहीं. मध्येंच एखादेवेळ त्यांचें मन शंकित होऊन त्यांना ह्मणे "डाक्तर चुकले असेंतरी समजून तूं कां चालावेंस ? सिव्हिलसर्जनसारखे हुषार डाक्तर चुकण्याचा संभव जास्त कीं त्यांचेंच ह्मणणें खरें ठरण्याचा जास्त ?"

या विचाराची छाया त्यांच्या मनावर पडल्यामुळें त्यांना त्या दिवशीं रोजच्यासारखें जेवणसुद्धां गेलें नाहीं. लवकर लवकर जेवून हातावर पाणी पडल्याबरोबर ते कपडे घालून घराबाहेर पडले. हें पाहून राधाबाईला वाटलें कीं, डुकल्यांच्या घरची शिकवणी राहिली ही रुखरुख मनाला लागल्यामुळें गोविंदरावांचें, चित्त आज जेवण्यांत नव्हतें आणि जेवण होतांच ते बाहेर पडले तेव्हां ते तिकडेच खास गेले असावेत. ह्मणून त्यांनीं जातांना मुद्दाम "डुकल्यांकडे जायचंना ?" ह्मणून विचारलें.

पण "नाहीं. तिकडे आज मी जात नाहीं. दुसऱ्या कांहीं कामाला जातों. लवकरच परत येईन." असें बोलून गोविंदराव लगबगीनें घराबाहेर पडले ते थेट भट डाक्तरांच्या घरीं गेले.

आनंदराव भट हे एल्. एम्. आणि एस्. होते. ते आपल्या कामांत फार हुषार असून गोविंदरावांचे लहानपणापासून सोबती होते. गोविंदराव त्यांचे घरीं जाऊन पोहोंचले तेव्हां ते जेवायास बसले होते. इतक्यांत गोविंदराव आल्याची खबर त्यांना नोकरानें दिल्यावरून त्यांनीं त्यांना आंत बोलाविलें आणि बसण्यास पाट वगैरे दिला. पण गोविंदरावांनीं दारांतूनच सांगितलें "मी बाहेर दिवाणखान्यांत बसतों; तुह्मी लवकर जेवून बाहेर या."

गोविंदराव रात्रीचे कधीं बाहेर पडावयाचे नाहींत. ते आज या भलत्याच वेळीं आपले येथें कसे आले आणि पुनः 'लवकर जेवून बाहेर या' ह्मणतात, तेव्हां आज कांहीं विशेष काम असलें पाहिजे, असा आनंदरावांनीं तर्क केला व गोविंदरावांला आंत येण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला. पण गोविंदरावांच्या मनाची

स्थिति आतां विलक्षण प्रकारची झालेली होती; यामुळें दुसऱ्याच्या आग्रहाप्रमाणें वागून त्यांच्या शब्दाला मान द्यावा हें शिष्टाचाराचें तत्त्व ते या वेळीं अगदीं विसरले आणि आपल्या लहरीप्रमाणें वागूं लागले. त्यांचा नेहमींचा स्वभाव कांहीं आतांच्या-सारखा लहरी व हट्टी नव्हता.

गोविंदरावांचा हा हट्टीपणा पाहून आनंदरावांला विशेषच आश्चर्य वाटलें व लवकर जेवण उरकून ते बाहेर दिवाणखान्यांत आले व "काय काम आहे?" ह्मणून गोविंदरावांला विचारूं लागले. गोविंदराव ह्मणाले "हें पहा आनंदराव, मला आज तुमचें अगदीं खरेंखरें मत पाहिजे आहे आणि तेवढ्यासाठींचतर मी आतां या निवांत वेळीं मुद्दाम तुमचेकडे आलों आहें."

"माझें खरेंखरें मत! कशाच्या संबंधांत बुवा?" आनंदरावांनीं जिज्ञासेनें आश्चर्य करित विचारलें.

"सांगतों बसा." असें ह्मणून गोविंदरावांनीं जवळची एक खुर्ची अलीकडे ओढून आनंदरावांला दिली आणि ते बसल्यावर त्यांनां दुपारीं घडलेली कच्ची हकीगत सांगितली. आदले दिवशीं रात्रीं एकाएकीं घेरी येऊन आपण खुर्ची-वरून कसे पडलों येथून आरंभ करून आपण लवकरच मरणार ह्मणून दुःखी होऊन घरीं येऊन बसलों येथपर्यंतची सगळी हकीगत सांगितल्यावर शेवटीं गोविंदराव ह्मणाले " आतां तुह्मी आपलें खरें मत सांगा कीं, सिव्हिलसर्जननें सांगितलें तें खरें कीं कसें तें. माझ्याशीं बिलकूल प्रतारणा करूं नका."

आनंदरावांला मोठा विचार येऊन पडला. सिव्हिलसर्जनच्या हुषारीविषयीं फार लौकिक होता. ते फसले असतील ही गोष्ट असंभवनीय होती. अशा नामांकित डाक्तरची परीक्षा खरी कीं खोटी याविषयीं अगदीं खराखरा अभिप्राय देणें आणि तोहि अशा नाजुक गोष्टींत, हें काम किती कठीण! पण गोविंदरावांनीं खरा अभिप्राय विचारलाच तेव्हां लक्ष्यपूर्वक सर्व गोष्टी पाहून सांगणें भागच पडलें. आनंदरावांनीं मागचीपुढची सगळी हकीगत विचारुन घेतली आणि स्टेथॉस्कोप लावून फुप्फुसें तपासलीं. नंतर बऱ्याच वेळानें ह्मणाले "आतां खरेंच सांगूं? तुह्मी खरें मानालना पण? मलातर वाटतें कीं, तुमच्या जिवाला आतांच धोका आहे असें कांहीं नाहीं—"

गोविंदराव हंसून ह्मणाले "मोठेंच सांगितलेंत? सिव्हिलसर्जनतरी आतांच धोका आहे ह्मणून कुठें सांगत आहेत? माझीं फुप्फुसें चांगलीं शाबूत आहेत कीं नाहीं, हें तुह्मीं अगोदर पाहिलें का?"

"शाबूततर नाहींतच, पण फारशीं बिघडलीं आहेत असेंहि नाहीं. शरीर-प्रकृतीला नीट जपून राहिलां तर आखणी दहावीस वर्षे तुह्मांला भीति नाहीं."

"विमा कंपनी माझा विमा उतरील काय?"

"मला नाहीं वाटत उतरीलसें."

"झालें तर मग. समजून चुकला आमच्या आयुष्याचा अजमास!"

आनंदराव ह्मणाले "छेः छेः! तुह्मी माझ्या अभिप्रायाचा असा विपरीत अर्थ घ्याल, हें मला अगोदर कळतें तर मी इतकें सरळपणानें बोललोंच नसतों. मी पुनः सागतों कीं, तुह्मी जपून राहिलां तर आणखी कित्येक वर्षे जगाल; मी हें नुसतें तोंडदेखलें बोलत नाहीं, तर अगदीं मनापासून खरें वाटतें तेंच सांगत आहें."

"आणि मीं पुणें सोडून बाहेर कुठेंतरी स्वच्छ हवेच्या ठिकाणीं जाऊन रहावें, असें साहेबांप्रमाणेंच तुमचेंहि मत आहे?"

"होय, आहे; आणि तुमचा स्वतांचाच अनुभव पहाना? आपल्याला येथली हवा मानवत नाहीं ह्मणून तुह्मी किती वेळां माझेजवळ कुरकुर केली आहे?"

"होय, खरी गोष्ट आहे."

याप्रमाणें भाषण झाल्यावर कांहीं थोड्या प्रकृतीसंबंधाच्या व कांहीं इकडच्या-तिकडच्या गप्पा झाल्यावर अकरा साडेअकरा वाजतां गोविंदराव घरीं परतले. घरीं येतांना वाटेंत आतां पुढें काय करावें? हा एक प्रश्न त्यांच्या डोक्यांत सारखा घोळत होता. एवढा वेळ जी गोष्ट आपण आपल्या पत्नीपासून लपवून टेविली, ती आतां तिला सांगण्यावांचून आणि दुसरीकडे कोठेंतरी बिऱ्हाड नेल्यावांचून सोय उरली नाहीं, असें त्यांनां वाटलें आणि ह्मणून त्यांनीं निजण्याचे पूर्वीं एकंदर हकीगत पत्नीला कळविण्याचा निश्चय केला.

गोविंदराव घरीं गेले, तेव्हां अकरा साडेअकरा झाले होते. मुलांनां गाड झोंप लागली होती. घरीं आल्यावर गोविंदराव इझिचेअरवर अंग टाकून बराच वेळ सचिंत पडले. हें पाहून राधाबाई ह्मणाल्या "आज काय होत आहे तें, मला नाहीं का सांगायचं? आज संध्याकाळपासून मीं तीनतीनदा विचारलं, पण एक नाहीं दोन नाहीं! माझ्या जिवाला कशी मेली तेव्हांपासून रुखरुख लागून राहिली आहे—"

गोविंदराव ह्मणाले "माझ्या तब्यतीला काय झालें आहे? ती चांगली आहे. जो काय विकार आहे तो सगळा मनाला आहे. तुला आज एक वाईट बातमी कळवायाची आहे. पण ती कळवायची कशी, हाच विचार येऊन पडला आहे—"

"बगूताईच्या तिकडचं कांहीं आहे काय?" राधाबाईंनीं घाबऱ्याघाबऱ्या विचारिलें.

"नाहीं नाहीं, तूं स्वस्थ ऐस. मला जें सांगावयाचें आहे तें माझ्या स्वताबद्दलच आहे."

"ह्मणजे? काय तें एकदा लवकर सांगायचं गडे!"

गोविंदराव किंचित् हंसून ह्मणाले "तें कळलें नाहीं तोंवरच बरें आहे. कळल्यावर तूं धीर सोडशील, ह्मणूनतर मी सांगूं न सांगूं करित आहें. पण तूं समजूतदार आणि विचारी आहेस. इतर बायांसारखी घाबरून जाणारी नाहींस, ह्मणून तुला सांगतोंच. विमा कंपनी माझ्या आयुष्याचा विमा उतरित नाहीं."

"कां?"

"त्यांनां त्यांत जोखीम वाटतें. ते ह्मणतात तुमचा भरंवसा नाहीं."

हें ऐकतांच राधाबाईच्या मनाला एकदम धक्का बसला. त्यांच्यानें बोलवेना. निराशेनें त्यांची कंबर अगदीं मोडल्यासारखी झाली. बराच वेळपावेतों दोघेंहि एकमेकांच्या तोंडाकडे कांहीं चमत्कारिक रीतीनें पहात बसलीं.

## प्रकरण १४ वें.

# पुणें सोडलें पाहिजे.

राधाबाईची ही स्थिति पाहून गोविंदरावांला वाटलें कीं, झालेली हकीगत घरीं कळविण्यांत आपण थोडासा अविचार केला. स्त्रियांचें मन जात्याच फार कोमल असतें, आणि तशांतून पुढें येणाऱ्या संकटाची अकल्पित रीतीनें पूर्वी सूचना झालेली असली, ह्मणजेतर मग कांहीं पुसूंच नये. राधाबाई बराच वेळ स्तब्ध बसल्या. दुःखाचा वेग कांहींसा शांत झाल्यावर त्यांनीं विचारलें "आपला भरंवसा नाहीं ह्मणून ह्मटलं तें काय? दाक्तरानं आपली तब्यत पाहिली काय? ते काय ह्मणाले—"

"मीं जें सांगितलें त्याहून जास्ती मला सांगतां येत नाहीं. मी डाक्तरकडे गेलों होतों आणि—"

"मघाशीं मीं विचारलें तेव्हां तर 'नाहीं' ह्मणून ह्मणायचं झालं—"

"होय, मी नाहीं ह्मणून मघाशीं ह्मटलें खरें, पण तें खरें नव्हतें. मुलांदेखत ही गोष्ट सांगावयाची नव्हती, ह्मणून मीं तेव्हां तसें ह्मटलें. पण आतां खरें सांगतों. मी साहेबाकडे गेलों होतों. त्यानें माझ्या तब्यतीची कच्ची हकीगत विचारून घेतली आणि माझी छाती, बरगड्या, पोट सगळें तपासून पाहिल्यावर शेवटीं ह्मणाला कीं, माझ्या फुप्फुसाला बराच विकार झाला आहे आणि इथल्या हवेनें तो विकार सुधरावयाचा नाहीं ह्मणून पुणें सोडून कुठेंतरी दुसरीकडे रहाण्यास गेलें पाहिजे—"

"बरं आहे, जाऊं चार दिवस दुसरीकडे. जिवापेक्षां पुणं काय अधिक आहे?"

"चार दिवसांकरितां नाहीं, नेहमींसाठींच पुणें सोडावें लागेल, असें साहेबाचें ह्मणणें आहे."

हें ऐकून राधाबाई चपापल्या. नेहमींकरितां पुणें सोडावयाचें? आणि तें कशाच्या आधारावर? हा प्रश्न त्यांच्या मनांत उभा राहिला. बरें न सोडावें तर जिवाला अपाय व्हावयाचा! तेव्हां त्या पुनः बुचकळ्यांत पडल्या व विचारांत अगदीं गढून गेल्या. इतक्यांत गोविंदराव ह्मणाले "साहेबानें सांगितल्यानेंहि माझी खात्री होईना; ह्मणून मी आपल्या आनंदराव भटांकडे गेलों होतों व—"

ते पुढें कांहीं बोलणार होते परंतु राधाबाईच्यानें राहवेना. त्यांनीं मध्येंच गोविंदरावांला थबकवून उत्सुकतेनें विचारिलें "बरें, ते काय ह्मणाले? त्यांनींहि साहेबासारखंच सांगितलं?"

गोविंदराव ह्मणाले "नाहीं. साहेबाइतकें त्यांनीं मला घाबरवून सोडिलें नाहीं. तथापि आपल्याला पुणें सोडलें पाहिजे, इथली हवा माझ्या प्रकृतीला मानवत नाहीं, एवढ्यापुरतें साहेबाचें व त्यांचें ह्मणणें बरोबर जुळतें—"

"अशा गोष्टींत आह्मां बायकांनां काय समजतं? पण मला आपलं वाटतं कीं, आणखी तिसऱ्या एखाद्या हुषार दाक्तराला अगर वैद्याला आपली तब्यत दाखवावी आणि त्याचंहि मत तसंच पडलं तर पुणं सोडणं भागच आहे—"

गोविंदरावांला तिसऱ्या एखाद्या डाक्तराचा अभिप्राय कांहीं निराळा पडेल, अशी फारच थोडी उमेद होती. तथापि मनाची खात्री करून घ्यावी, ह्मणून राधाबाईच्या सूचनेप्रमाणें डाक्टर विश्राम यांचेकडे पहांटे जाण्याचा विचार करून त्यांनीं अंथरुणावर अंग टाकलें. सगळ्या रात्रींत त्या दोघांपैकीं एकालाहि झोंप कशी ती लागली नाहीं. राधाबाईच्या डोळ्यांपुढें भावी काल्पनिक संकटाचें भयानक चित्र दिसूं लागलें. इकडे गोविंदराव आपले ठिकाणीं पस्तावा करूं लागले कीं "मीं आज जवळजवळ पंधरावीस वर्षें नोकरी करून शेवटीं बायकामुलांची कांहींच तजवीज माझे हातून झाली नाहीं. आतां माझ्या जिवाचा भरंवसा नाहीं ह्मणून डाक्तरलोक स्पष्ट सांगत आहेत. कंपनी विमाहि उतरित नाहीं. अशा स्थितींत माझें कांहीं बरेंवाईट झालें तर ईश्वराचे घरीं मी केवढा गुन्हेगार ठरेन! माझीं बायकामुलें कशाच्या आधारावर आपला उदरनिर्वाह करतील? आपण इतके दिवस पैशाविषयीं बेफिकीर राहिलों, बायकोनें सांचविलेले पैसे उधळपट्टीनें खर्च केले, मागचापुढचा कांहींएक विचार केला नाहीं, आतां पुढें कसें होईल?"

आपल्यापैकीं कितीजण अशा तऱ्हेनें आपल्या मागच्या वर्तनाकडे नजर फिरवून 'आपण कोठेंहि चूक केली नाहीं, मागचेंपुढचें धोरण ठेवूनच वागत आलों आहों.' असें छातीस हात लावून सांगतील? गोविंदरावांसारखा पश्चात्ताप ह्याच आपल्या बहुतेकांच्या वांट्याला येईल, नाहीं बरें?

सकाळीं गोविंदराव बाहेर आपल्या माडीवर डाक्तर विश्राम यांचेकडे जाण्यासाठीं कपडे घालित होते. मुलें मधल्या माडींत खेळत होतीं आणि राधाबाई तेथेंच कांहीं कामांत होत्या. इतक्यांत गंगू आईला ह्मणाली "आई, काल किनई शेजारच्या विष्णूचा वाढदिवस झाला, ह्मणून त्याच्या आईनें त्याला नवी टिकल्यांची टोपी घेऊन दिली. माझ्या वाढदिवसाचे दिवशीं मला नवा चोळी-परकर शिवशीलनाग आई?"

राधाबाई ह्मणाल्या "तुझा वाढदिवस अजून लांब आहे. कुणीं पाहिलं आहे तोंवर आपण इथं रहातों कीं आणखी कुठं जातों तें—"

हे शब्द राधाबाईच्या तोंडून नकळत बाहेर पडले, पण ते किती खरे होते. पुढें काय होईल आणि काय नाहीं ह्याची बरोबर कल्पना कोणालातरी या वेळीं होती काय ?

हे शब्द बाहेर गोविंदरावांनीं ऐकिले आणि त्यांनींहि दुःखाचा एक उसासा टाकिला. आतां आपण येथें थांबलों तर आपलें दुःख आपल्याला आवरणार नाहीं, असें मनांत आणून ते चटकन् बाहेर जाण्यास निघाले. गोविंदरावांना बाहेर पडतांना राधाबाईनीं पाहिलें. डाक्तर विश्रामाकडे जावयाचें ठरलेंच होतें, तेव्हां ते तिकडेसच गेले असतील, हें राधाबाई समजल्या आणि आतां ते केव्हां परत येतील आणि डा. विश्रामाच्या परीक्षेचा निकाल सांगतील, असें त्यांना झालें. त्या खिडकीपाशीं गोविंदरावांच्या येण्याची वाट पहात बसल्या. गंगाधर व कृष्णा शाळेंतले आपापले धडे करित बसले होते व गंगू आपली पाटी व बुक घेऊन लिहावाचायला बसली होती व मधूनमधून आईला विचारित होती; पण राधाबाईचें लक्ष्य या वेळीं मुलांना शिकविण्याकडे बिलकूल नव्हतें. त्यांची रस्त्याकडे सारखी टक लागली होती. अर्धापाऊण तास–पण तो या वेळीं त्यांना अर्ध्या पाऊण वर्षासारखा लांबलचक आणि कंटाळवाणा झाला.

थोड्या वेळानें गोविंदराव परत आले. त्यांना पहातांच केव्हां एकदा त्यांचे-पाशीं जाऊन "काय झालें ?" ह्मणून सगळी हकीगत विचारूं, असें राधाबाईला झालें होतें. गोविंदराव जिना चढून वर येतात तोंच राधाबाई जिन्याच्या तोंडाशीं येऊन उभ्या राहिल्या. उत्सुकतेनें त्यांच्या तोंडावर एक प्रकारची विलक्षण तेजाची कळा आली होती आणि उरांत धडधड करित होतें. गोविंदराव वर दाराशीं आल्यावर दोघांची दृष्टादृष्ट होतांच राधाबाईच्यानें रहावेना. "डाक्तर भेटले का ? ते काय ह्मणाले ?" ह्मणून त्यांनीं लागलीच प्रश्न केला.

गोविंदरावांनीं राधाबाईची ही उत्कंठा पाहून शांतपणानें ह्मटलें "सांगतों, पण अंमळ धीरानें घे. त्यांचें मत आपणांस कांहीं एवढें प्रतिकूल नाहीं. फुप्फुसांत विकार आहे हें तर निःसंशय आहे; आणि हा विकार आजकालचा नाहीं, कैक दिवसांचा आहे, असें ते ह्मणाले. पण त्यानें ह्मणजे जिवाला आजच अपाय घडेल, असें नाहीं. नीट औषधपाणी घेऊन जपून राहिलों, तर साठसत्तरच्या घरांत जाईपर्यंतसुद्धां भीति नाहीं, असें त्यांचें मत पडलें."

हें ऐकून राधाबाईंच्या अस्वस्थ चित्ताला बराच धीर आला आणि "आई जगदंबे, तूंच आमचेवर कृपेची पाखर घालणारी आहेस!" असे उद्गार त्यांच्या कृतज्ञ अंतःकरणापासून आपोआप निघाले.

गोविंदराव पुढें आणखी ह्मणाले "डाक्तरनीं मला नीट पथ्यपाणी करित जाण्याविषयीं बजाविलें आहे. शुद्ध आणि मोकळ्या हवेंत रोज नेमानें हिंडलोंफिरलों आणि कोंदटलेल्या वस्तींतून बिऱ्हाड काढून मोकळ्या जागीं नेलें तर भीति खास कमी होईल, असें डाक्तरचें ह्मणणें आहे."

"पुणं सोडून कुठं लहानशा गांवांत जाऊन राहिलं पाहिजे, असं त्या गोऱ्या डाक्तरासारखंच याहि डाक्तरांनीं सांगितलं काय?"

"होय, तें मात्र झालेंच पाहिजे. पुण्यांत इतःपर रहातां कामा नये, असें त्यांचें ह्मणणें पडलें."

हें ऐकून राधाबाईला पुनः चिंता येऊन पडली. पुण्याची नोकरी सोडून कसें जातां येईल? आणि खेडेगावांत निर्वाह कशावर चालेल, या गोष्टीचा विचार त्या करित होत्या. इतक्यांत गोविंदराव ह्मणाले "डाक्तरचें ह्मणणें आहे कीं, पुण्यापेक्षां शिवापुरची हवा मला चांगली मानवेल; तेव्हां होतां होईल तों मीं तेथें जावें हें बरें. आणि कुठें अगदींच खेडेगांवांत जाऊन रहाण्यापेक्षां शिवापुर बरें. कुठेंहि नोकरीची सोय लावूं झालें. नोकरी ह्मणजे आपल्याकरितां कुणीं राखून ठेविली आहे थोडीच! ती मिळेपर्यंत शिकवण्या शिकवून कसातरी निर्वाह केला पाहिजे."

येणेंप्रमाणें बोलणें चाललें होतें इतक्यांत गोविंदरावांचें लक्ष्य घड्याळाकडे गेलें. तेव्हां साडेनऊ वाजलेले पाहून राधाबाई घाईघाईनें स्वयंपाकघराकडे चालल्या झाल्या व गोविंदराव आपल्या कामाला लागले. राधाबाई स्वयंपाकांत गुंतल्या होत्या खऱ्या, पण त्यांचें सगळें लक्ष्य पुढें आपलें कसें होईल, या चिंतेंत गढलें होतें.

## प्रकरण १५ वें.

# शिवापुरास जाण्याची तयारी.

राधाबाईंच्या डोक्यांत आज कित्येक दिवस त्याच एका गोष्टीसंबंधाचे विचार घोळत होते. गोविंदरावांनां आणि त्यांनां आतां बोलण्याला दुसरा विषयच राहिला नव्हता. शिवापुरास जावयाचें खरें, पण कशाच्या आधारावर? नोकरी नाहीं मिळाली तर पुढें काय करावयाचें? शिकवण्यातरी लागतील कशावरून? कांहींतरी तजवीज लावून लवकर पुणें सोडून गेलें पाहिजे हें खास, असें आतां दोघांच्याहि मनानें घेतलें होतें. गोविंदरावांनां घटकेंत वाटे कीं, शाळेंत आपली उत्तम शिक्षक ह्मणून बरीच वाखाणणी झाली आहे; हेडमास्तर, इन्स्पेक्टर वगैरे अधिकाऱ्यांचीं उत्तमोत्तम सर्टिफिकिटें मिळालीं आहेत; तेव्हां आतां आपल्याला शिकवण्या काय हांहां ह्मणतां मिळतील. निराशेनें उद्विग्न झालेल्या मनाला जसें सगळें जग उदास दिसत असतें, तसेंच त्या मनानें एकदा व्यर्थ आशा लावून घेतली ह्मणजे त्याला जिकडेतिकडे नंदनवनच दिसूं लागतें. आणि मग जिकडून त्या आशेला दृढीकरण मिळेल अशा एकेक गोष्टी त्याला सुचूं लागतात. त्यांनां आतां आणखी एका गोष्टीची आठवण झाली. ती ही कीं, त्यांची एक मावसबहीण शिवापुरासच दिली होती आणि ती चांगली मोठ्या घरीं पडली होती. यामुळें तिच्या नवऱ्याच्या ओळखीनें कोठेंहि आपल्या नोकरीची–निदान शिकवण्यांची तरी– तजवीज लागून जाईल, अशी त्यांनां उमेद वाटूं लागली. शोध करित बसल्यावर आणखीहि कांहीं ओळखीचीं माणसें तिकडे आहेत, असें कळलें. गोविंदरावांचा एक जुना शिष्य तेथेंच कांहीं सरकारी हुद्याचे कामावर आहे, असेंहि त्यांनां कोणीं सांगितलें.

याप्रमाणें शिवापुरास जाण्यांत कोणकोणते फायदे व अडचणी आहेत त्यासंबंधीं पुष्कळ चर्चा झाल्यावर आणि तेथें आपल्या ओळखीचीं व नात्याचीं माणसें कोण कोण आहेत व तीं काय करित असतात याबद्दलची माहिती काढल्यावर पुण्याचें बिऱ्हाड मोडून शिवापुरास नेण्याचा गोविंदरावांचा बेत पक्का ठरला. विंचवाचें बिऱ्हाड पाठीवर असतें, तशीच गोविंदरावांची गोष्ट होती. त्यांनां स्वताचें घरदार असें कांहीं नव्हतें. यामुळें एका ठिकाणचें बिऱ्हाड मोडून दुसऱ्या ठिकाणीं नेतांना त्यांनां विशेषसा त्रास मुळींच वाटला नाहीं. एका गोष्टीमुळें मात्र त्यांनां बरेंच वाईट वाटलें आणि तीमुळें बरेंचसें नुकसानहि सोसावें लागलें. ती गोष्ट ह्मणजे ही कीं,

गोविंदराव आज बरींच वर्षें पुण्यांत रहात होते, आणि पुणेंच आपलें कायमचें वस्तीचें ठिकाण करण्याचा त्यांचा इरादा होता; यामुळें हळूहळू सोईवार मिळालें तसें खुर्च्या, टेबलें, कपाटें, पेट्या वगैरे पुष्कळसें लांकडी सामान आणि संसाराला लागणाऱ्या दुसऱ्याहि पुष्कळ अवश्य व अनवश्य वस्तु यांचा मोठा संग्रह त्यांनीं करून ठेविला होता. एवढा पसारा आपल्याबरोबर शिवापुराला न्यावा तर आगगाडीचें भाडेंच अगोदर फार लागणार; आणि दुसरी अडचण ही कीं, एवढें सामान यथास्थित रीतीनें मांडण्याला घरहि मोठें घ्यावें लागणार. गोविंदरावांला आतां यापुढें होईल तितक्या काटकसरीनें रहाणें भाग झालें होतें. तेव्हां एवढें सामान बरोबर नेऊन दोन्ही रीतीनें खर्चांत येण्यापेक्षां अवश्य तेवढें सामान ठेवून, बाकीचें लिलावांत फुंकून चार पैसे उभे करावे, हें त्यांनां आतां बरें वाटलें. शिवाय भाड्याकरितां व शिवापुरास गेल्यानंतर शिकवण्या लागत तोंपर्यंत घरखर्चाला दोन पैसे जवळ असणें जरूरच होतें. तेव्हां फाजील सामान विकून टाकणें हेंच प्रस्तुतच्या स्थितींत बरें, असें वाटून त्यांनीं आपला बेत राधाबाईला कळविला. परंतु राधाबाईला ही गोष्ट पसंत पडेना. त्या ह्मणाल्या "पण लिलावांत सामान विकण्यानं पैशासंबंधीं विनाकारण नुकसान लागेल याची वाट काय ? बरं नव्या ठिकाणीं गेल्यावरतरी आपल्याच्यानं रहावणार आहे का ? हें इतकं सामान तिथं पुनः आपल्यास घ्यावं लागणारच आहे. मग आहे तें विकून नवं दुप्पट किंमतीनं घेण्यांत फायदा तो कोणता ? त्यापेक्षां हौसेनं जमविलेलं हेंच सामान जें काय भाडं लागेल तें देऊन न्यावं हें बरं, असं माझ्या वेड्या बुद्धीला वाटतं."

" तें खरें, पण तसें करण्यांत नुकसान किती आहे, याचा नाहीं तूं विचार केलास ? एकतर आपलें हें सामान अगदीं जुनें असून खिळखिळें झालेलें आहे. आगगाडींत नेण्यानें आपटधोपट होऊन त्याचा चुराडा होऊन जावयाचा. असें झालें ह्मणजे भाडें भरून नेलेल्या सामानाचा जळाऊ लांकडांपेक्षां जास्त कांहीं उपयोग होणार आहे का ? आतां तेथें नवें सामान विकत घेण्यासंबंधानें ह्मणतेस, त्यास एवढेंच उत्तर आहे कीं, तें घेतलेंच पाहिजे असें कांहीं नाहीं. अवश्य लागणारें तेवढें सामान ह्मणजे एकदोन खुर्च्या व एखादें दुसरें कपाट आणि पेटी, एवढें सामान या जुन्या सामानापैकीं चांगलें पाहून बरोबर घेऊं ह्मणजे झालें. आतां पूर्वीचा हा सगळा पसारा मोडून टाकून संसार कसा आटोपशीर केला पाहिजे..."

राधाबाई ह्मणाल्या "बरं, आपलं शिवापुरास जाण्याचं ठरल्यावर कृष्णा आणि गंगाधर यांनां नूतन मराठी विद्यालयांतून काढावं लागेल. तशानं त्यांच्या विद्येची हेळसांड होऊन मुलं मागं पडतील, याचं कसं करावं?"

"पुणें शहर सोडून आपण दुसरीकडे जाणार या एका लहानशा गोष्टीपासून कितीतरी प्रकारें आपलें नुकसान व्हावयाचें आहे! पण त्याचा विचार करून उगीच डोकें भणाणून घेण्यांत किंवा दैवावर रागावण्यांत काय अर्थ आहे? 'आलिया भोगासी असावें सादर' ह्मणावें, आणि वारा येईल तशी पाठ देण्यास शिकावें, हाच उत्तम मार्ग होय. मुलांचें विद्येचें नुकसान होईल खरें, पण तें टाळण्यास कांहीं इलाज दिसत असला तर सांग. नूतन मराठी विद्यालयासारखी उत्तम शाळा दुसरीकडे क्वचितच सांपडेल; तेथल्यासारखे विद्यार्थ्यांची काळजी घेणारे, मेहनती आणि मुलांच्या वर्तनावर बारीक नजर ठेवणारे शिक्षकहि क्वचितच सांपडतील. या गोष्टी मला कळत का नाहींत? पण काय करावयाचें! आपलें दुसरें नुकसान थोडेंथोडकें का झालें आहे? आपण सर्व प्रकारें बुडालों आहों. अशा एकेक गोष्टीचा विचार करून पाहूं लागलों तर मन ईश्वराविषयीं भलभलत्या कल्पना भरवून घेऊं लागेल. हो! आपण का कुणाचे गळे कापले, किंवा घरदार बुडविलें, किंवा विश्वासघात केला? आपण काय असा गुन्हा केला कीं, त्यामुळें परमेश्वरानें आपल्यावर एवढें निष्ठुर होऊन आपल्यास सुखानें ओलीकोरडी भाकरहि खाऊं देऊं नये? जे अत्यंत दुष्ट, घातकी, नीच आणि मनुष्यजातीस कलंक लावण्यासारखें वर्तन अहोरात्र करित असतात, ते टोलेजंग वाड्यांतून रहातात, चैनींत, ऐषआरामांत लाखों रुपये उधळतात, आणि गरीबांनां विनाकारण छळतात! पण जे बिचारे अगदीं प्रामाणिकपणें कावाडकष्ट करून चारदोन आणे रोज मिळवून आणि देवाविषयींचें भय मनांत बाळगून मुकाट्यानं गरीबींत दिवस काढतात, त्यांच्या पाठीस दुर्दैव हात धुऊन लागतें! हा कुठला न्याय? आपल्यावरूनच पहाना? आपल्यास पुणें शहर कां सोडायास लागावें, हातची सबंध भाकरी सोडून पळत्या अर्धाच्या मागें लागण्याचा दुर्दैवाचा प्रसंग आपलेवर कां यावा? ज्यांच्यांवर आपली सगळी उमेद तीं आपलीं मुलें आईबापांसारखा जीव लावणाऱ्या शिक्षकांनां कां अंतरावीं? गरीबांच्याच मागें सगळ्या आधि आणि व्याधि लागून त्यांच्या संसाराची धूळधाण कां व्हावी? पण अशा गोष्टींचा विचार करूं लागल्यास मनुष्य वेडा होऊन जाईल. त्याच्या मनोवृत्ति तामसी होऊन त्याच्या हातून कोणतेंहि सत्कृत्य घडणार नाहीं. समाजांतली सुव्यवस्था

एकदम मोडून जिकडेतिकडे बंडाळी माजेल. यासाठीं अशा सर्वशक्तिमान् प्रभूची ती लीला आपल्या अल्प मतीस अगम्य आहे, असेंच धरून चाललें पाहिजे आणि परमेश्वराच्या मर्जीप्रमाणें वागण्यांतच आपलें कल्याण आहे, किंबहुना तसें वागणें हाच आपला धर्म आहे, असें समजूनच मनाचें समाधान केलें पाहिजे."

गोविंदरावांचें हें भाषण ऐकून राधाबाईच्या मनांतले कष्टी विचार पार नाहींसे झाले आणि आलेल्या प्रसंगांतून निभावण्याचें धैर्य त्यांच्या ठायीं उत्पन्न झालें. राधाबाईच्या सुखाचा सोहळा संपून त्या बिचारीच्या दुःखाला येथून प्रारंभ व्हावयाचा होता. अशा वेळीं गोविंदरावांनीं त्यांनां जो उपदेश केला, त्यासारख्या उपदेशाची त्यांनां फार जरूर होती. राधाबाई आतां सुखाला आंचवणार! काय त्यांचें दुर्दैव!

## प्रकरण १६ वें.

# बाबासाहेबांचा पश्चात्ताप.

नाशिक येथें एका भव्य वाड्यामध्यें एका उत्तम रीतीनें शृंगारलेल्या दालनांत एक वयोवृद्ध गृहस्थ अगदीं आसन्नमरण स्थितींत पडला होता. त्यानें गहाणवटाचा वगैरे व्यापार करून बरीच संपत्ति जमविली होती. त्यामुळें लोकांत त्याला बराच मान असे; परंतु गहाणवटाच्या सावकारी धंद्यांत दुसऱ्यांच्या संकटाचे प्रसंगीं आपला फायदा करून घ्यावा लागतो; अशा रीतीनें मिळविलेल्या संपत्तीनें आणि त्या संपत्तीमुळें प्राप्त झालेल्या मानसन्मानानें अंतकाळीं जिवाला लागणारी तळमळ उलटी वाढते. कमी होण्याचें नांव नको. हा म्हातारा आतां आपण कोणाला कसें बुडविलें वगैरे गत गोष्टींची आठवण करून त्याबद्दल परमेश्वराचे घरीं काय दंड भोगावा लागेल, याविषयीं चिंता करित अंथरुणावर तळमळत पडला होता. "बाबारे, अशा रीतीनें मिळविलेली ही एवढी संपत्ति परलोकीं तुझ्याबरोबर येणार नाहीं, आणि या लोकींहि तुला मूलबाळ कांहीं नाहीं. मग एवढा घातपात तूं कशा-करितां केलास?" असें त्याचें मन त्याला ह्मणत होतें. ऐका, तो ओठांतल्याओठांत काय पुटपुटत आहे तें—

"आतां माझे डोळे उघडले. अंगांत ज्वानीची धमक असते तोंपर्यंत आपली दृष्टि सगळी मतलबाकडे असते. ही सगळी मिळकत आपली आहे, आपण हिचे मालक आहों व आपल्या ह्मणण्याप्रमाणें सर्वांनीं वागलें पाहिजे, असें आपल्याला वाटत असतें व आपल्या हुकुमाची जो अवज्ञा करील त्याचें जन्माचें नुकसान करण्यास आपण कमी करित नाहीं. पण हें कुठपर्यंत? जोंपर्यंत मृत्यु दूर आहे तोंपर्यंत. मृत्यूच्या दाराशीं जाऊन पोहोंचलों ह्मणजे माझ्यासारखे खाडकन् डोळे उघडतात. त्यानें माझा असा काय अपराध केला होता, कीं, मीं त्याला भीक मागण्यास लावावें? तो माझा प्रत्यक्ष भाचाना? माझ्या बहिणीनें मरतांना त्याला माझ्या पदरांत घालून 'याला आतां तूंच संभाळणारा आहेस—' ह्मणून डोळ्यांत अश्रु आणून ह्मटलें आणि मीं त्याप्रमाणें करण्याचें वचन देऊन त्याला घरीं आणून ठेविलें. त्याचा कांहीं अपराध नसतां मीं माझें वचन मोडून त्याला निष्ठुरपणें दुःखार्णवांत ढकलून दिलें. हें पाहून माझ्या बहिणीच्या आत्म्याला काय वाटलें असेल? इहलोकच्या न्यायमंदिरांत मीं अनेक वेळां खोट्यानाट्या शपथा घेतल्या व केलेले करार मोडले, त्याबद्दल मला कांहीं दंड झाला नाहीं; पण माझ्या

वहिणीशीं तिच्या मृत्यूच्या वेळीं मीं जो करार केला, तिला जें वचन दिलें, कीं, ज्या वचनामुळें ती निश्चित होऊन शांतपणें परलोकीं गेली—त्या वचनाचा भंग केल्याबद्दल परमेश्वराचे घरीं मला क्षमा होईल काय? तेथें जबाब विचारला असतां इथल्याप्रमाणें खोट्या बतावण्या, खोट्या शपथा, खोटे दस्तऐवज व खोटे साक्षीदार मला उपयोगीं पडतील काय—"

एक नोकर पाय दावित एकीकडे डुलक्या घेत बसला होता. 'मला तेथें उपयोगीं पडतील काय?' हे शेवटचे शब्द त्याच्या कानीं पडले आणि त्याला वाटलें कीं, आपण धन्याची नोकरी न करतां डुलक्या घेत होतों हें पाहूनच धनीसाहेबांनीं 'हे नोकर पगार खाऊनदेखील माझ्या कधींतरी उपयोगीं पडतील काय?' असें ह्मटलें. त्यावरून तो ह्मणाला "नाहीं सरकार, मी नोकरीला हजर आहें. मी निमकहराम-पणा नाहीं करायचा!"

आपण कांहींएक विचारिलें नसतां नोकरानें उर्मटपणानें मध्येंच तोंड घालून बोलावें, हें त्या तापट स्वभावाच्या ह्मातान्याला कोठून खपणार? तो मरणोन्मुख होऊन पडला होता तरी संतापून ह्मणाला "नीघ, इथून चालता हो—"

बाबासाहेबांचा तापट स्वभाव सर्वांनां ठाऊक. ते रागावले ह्मणजे त्या रागाच्या आवेशांत ते ह्मणतील तें मुकाट्यानें ऐकून त्याप्रमाणें वागलें ह्मणजे त्यांचा राग एका मिनिटांत शांत होतो, ही गोष्ट त्या नोकराला अनुभवानें ठाऊक झाली होती. ह्मणून 'नीघ' ह्मटल्याबरोबर तो उठून बाहेर दारापाशीं जाऊन उभा राहिला. मरतांनासुद्धां नोकरांवर आपला इतका दरारा आहे, हें पाहून बाबासाहेबांनां संतोष वाटला आणि एका मिनिटांत तो राग शांत झाल्यावर ते त्याला विचारूं लागले "कायरे, ते आले का?"

"नाहीं सरकार. आज पाऊसहि फार पडत आहे आणि वाटहि फार चिखलाची पडली. ह्मणून त्यांनां यायला उशीर लागला असेल."

"बरें, जा एकदा थोडासा गांवाबाहेर चक्कर मारून ये आणि त्यांची गाडी भेटली तर होईल तितकी जलदी करून त्यांनां आण."

नोकर 'जी सरकार' ह्मणून त्वरेनें घराबाहेर पडला. बाबासाहेब उठलेले पुनः उशीवर अंग टाकून पडले.

हे बाबासाहेब कोण, तें वाचकांस ठाऊकच असेल. ज्यांनीं गोविंदरावांनां घराबाहेर काढून दिलें होतें, ते गोविंदरावांचे मामा बाबासाहेब ते हेच होत.

बाबासाहेबांची थोडीशी हकीगत येथें सांगितली पाहिजे. बाबासाहेबांना दोन बहिणी होत्या. चमत्कार हा कीं, त्या दोघीहि लग्नें वगैरे होऊन आणि आपलीं मुलें बाबासाहेबांच्या स्वाधीन करून मरण पावल्या. बाबासाहेबांना स्वतःचें मूळबाळ असें कांहीं नव्हतें आणि त्यांचें कुटुंबहि वारलें होतें. तेव्हां त्यांनीं आपल्या बहिणींच्या मुलांना आपलींच समजून त्यांचें पालनपोषण केलें. बाबासाहेबांच्या वडील बहिणीचा मुलगा हाच गोविंदराव होय. धाकट्या बहिणीची मुलगी गोदावरी. हिचा विवाह बाबासाहेबांनीं त्रिंबकराव ह्मणून मुंबईस एक वकील होते, त्यांच्याशीं करून दिला होता. एका क्षुल्लक कारणावरून हट्टास पेटून बाबासाहेबांनीं गोविंदरावांस घराबाहेर काढून दिलें होतें; आणि त्याबद्दलचा पश्चात्ताप आतां त्यांना मरणोन्मुख स्थितींत होत होता. असेंच आहे. आपल्या हातून झालेल्या अक्षम्य चुकीबद्दल ज्वानीच्या भरांत आपल्या मनांतसुद्धां कांहीं येत नाहीं; आणि आलें, तरी तसल्या पश्चात्तापाच्या विचाराला पिटाळून लावण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं असतें. पण एकदा का अंथरुणावर खिळून स्वर्गाचीं कपाटें दिसूं लागलीं, ह्मणजे ती पश्चात्तापाची गोष्ट कांहींकेल्या दृष्टिआड होत नाहीं !

बाबासाहेबांना उशीवर डोकें टेंकूनसुद्धां चैन पडेना. या पश्चात्तापाच्या विचारानें त्यांचें डोकें या वेळीं कसें अगदीं भणाणून गेलें होतें; आणि आपण गोविंदरावांला फारच वाईट रीतीनें वागविलें, त्याबद्दलची भरपाई कोणत्या रीतीनें करतां येईल, याचाच विचार त्यांच्या मनामध्यें चालला होता. शेवटीं ह्मातान्याच्या डोक्यांत कांहीं कल्पना आली आणि त्यानें नोकराला हांक मारून गोखले वकीलांस आत्तांचे आतां घेऊन ये ह्मणून सांगितलें.

## प्रकरण १७ वें.

## मीं कागदावर सही केली काय हो !

कांहीं वेळानें एक घोड्याची गाडी येऊन बाबासाहेबांच्या दाराशीं थांबली. त्याबरोबर एक नोकर आपल्या यजमानास वर्दी देण्यास गेला आणि हात जोडून नम्रपणें ह्मणाला "सरकार, ते आले—"

बाबासाहेबांनीं घोड्यांच्या टापांचा आवाज आणि गाडीच्या चाकांची घरघर ऐकली होती, आणि गोखले वकिलांचीच गाडी असेल अशी त्यांची समजूत झाली होती. ह्मणून त्यांनीं विचारलें "वकील साहेबना ? घेऊन ये त्यांनां लवकर—"

नोकर ह्मणाला "वकील साहेब नाहींत, आपल्या ताईसाहेब आणि त्यांचे यजमान आले आहेत, सरकार."

इतक्यांत गाडींतून एक बाई आणि एक पुरुष अशीं दोघें उतरलीं. गोदूताईचे यजमान त्रिंबकराव हे चांगले उंच होते, पण त्यांचें दोंद सुटल्यामुळें त्यांचें शरीर बेढब दिसूं लागलें होतें. गोदूताईहि आपल्या यजमानाप्रमाणेंच उंच होत्या, पण अंगानें सडपातळ व वर्णानें गोऱ्या होत्या. त्यांचें नाक अंमळ वर उचललेलें होतें, हें त्यांच्या स्वरूपांत एक मोठें व्यंग होतें. बाकी दिसण्यांत त्या चारचौघी बायकांत ठळक दिसत असत. त्यांनीं गाडींतून उतरतांच प्रथम बाबासाहेबांची तब्यत कशी काय आहे ह्मणून देवडीवाल्यास विचारिलें. त्यानें "फार कठिण प्रसंग आहे, आपण अगदीं वेळेवर आलांत हें बरें केलें." असें सांगितलें, तेव्हां गोदूताईला आपल्या मामांची व आपली शेवटची भेटतरी खास होणार, एवढें समाधान वाटलें. गाडींतून सामान काढण्यास नोकरास सांगून गोदूताई व त्यांचे यजमान प्रथम बाबासाहेबांच्या खोलीकडे गेलीं. बाबासाहेब जरी मरणाच्या पंथाला लागले होते, तरी ते अगदीं सावध असून त्यांचा आवाजहि अद्यापि चांगला खणखणीत होता; हें पाहून त्रिंबकरावांनां मोठें आश्चर्य वाटलें. पण तसें वाटण्याचें कारण नव्हतें. बाबासाहेबांची अंगकाठी लहानपणापासूनच काटक होती व स्वभावहि मनस्वी तापट होता. तापट स्वभावाच्या माणसांचा आवाज बहुधा मरेपर्यंत खणखणीत रहातो. बाबासाहेब पडदा वर उचलून वारंवार दाराकडे कोणी आलें का ह्मणून पाहत होते. गोदूताई त्यांच्या बिछान्याजवळ बसल्या आणि "मामा, मामा, ही मी आलें पहा—" असें ह्मणाल्या. तेव्हां बाबासाहेबांनीं त्यांच्याकडे पाहून ह्मटलें "आलीस, बरें झालें. पण तुह्मांला यायला इतका उशीर कां लागला ?"

"तुमचं पत्र बारांला पोहोंचलं आणि आह्मी लगेच तिहींच्या गाडीनं निघालों. पण वाटेंत घाटांत पाऊस फार लागल्यामुळं एका ठिकाणीं गाडी चांगली दोन तास थांबली, त्यामुळं उशीर झाला."

इतक्यांत गोखले वकिलांनां बोलीवण्यासाठीं गेलेला मनुष्य परत येऊन सांगूं लागला "वकीलसाहेब घरीं नाहींत. क्लबामध्यें असतील ह्मणून तेथें जाऊन पाहिलें, परंतु तेथेंहि नाहींत—"

"बरें आहे जा. आतां गोखले वकिलांची फारशी जरूरहि राहिली नाहीं. आमचे जांवईबुवा आहेततर खरे वकील—"

"वकिलाचें काय काम आहे ? माझ्यानें होण्यासारखें असेल तर सांगावें, मी खुषीनें करीन."

"सांगेन तसें कराल ना ? ऐका तर. गोदे, तूंहि ऐक मी काय सांगतों तें. तुह्मां दोघांला वाटेचे श्रम होऊन भूकबीक लागली असेल. पण प्रथम मी काय सांगतों तें ऐकून घ्या. माझे प्राण आतां कंठाशीं आले आहेत. ते केव्हां निघून जातील याचा मुळींच नेम नाहीं. हें पहा, माझा आतां भरंवसा नाहीं. क्षणांत या कुडींतला प्राण निघून जाईल. पण तो जाण्यापूर्वीं माझ्या मनावरचा दुःखाचा भार मला हलका केला पाहिजे. मनुष्यानें कधीं कुणाशीं अन्यायाचें वर्तन ह्मणून ठेवूं नये. नाहींतर त्याची माझ्यासारखी स्थिति व्हावयाची—"

"पण आपण मला कांहीं काम सांगणार होतांना ?"

"होय, तें मी विसरलोंच. आतां माझें मन कसें बावरल्यासारखें झालें आहे. त्यामुळें जें अगोदर करावयाचें त्याचाच मला विसर पडतो. बरें, तुह्मी आतां असें करा. या किल्ल्या घ्या आणि तें समोरचें कपाट उघडून त्यांतून कागद, शाई, लेखणी काढून घ्या." असें ह्मणून बाबासाहेबांनीं आपल्या नोकरांचाकरांनां सर्वांनां बाहेर जाण्यास सांगितलें.

त्रिंबकरावांला त्या अंधाराच्या जागीं कांहीं लिहिण्यावाचण्यास दिसेना ह्मणून त्यांनीं एक दिवा लावून घेतला आणि त्याचा उजेड बाबासाहेबांच्या डोळ्यांवर पडूं नये अशा तजविजीनें तो ठेविल्यावर ते हातांत लेखणी घेऊन लिहिण्याच्या तयारीनें बसले.

बाबासाहेब डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाले "मीं फार निष्ठुरपणा केला, हट्टास पेटलों, अन्याय केला, त्याची कांहीं चूक नसतां मीं व्यर्थ त्याला छळिलें. आतां मला त्याचा पश्चात्ताप होत आहे, तो विचार आतां मला चैन पडूं देत नाहीं—"

गोदूताईनें आश्चर्यचकित मुद्रेनें विचारलें "मामा, तो कोण ?"

"आणखी कोण असणार ? माझा गोविंदा. त्याला सावकारीचा धंदा आवडेना. त्याच्या मनांतून इंग्रजी शिकून परीक्षा द्याव्या आणि वकील व्हावें असें होतें, त्यांत काय गैरवाजवी त्यानें ह्मटलें होतें ? पण मला दुराग्रहाला पेटलेल्या माणसाला त्याच्या बोलण्याचा इतका राग आला कीं, मीं त्याला घालवून दिला. ही केवढी चूक माझ्या हातून झाली ! पुढें माझी मनधरणी करण्याचे प्रयत्न त्यानें कांहीं थोडेथोडके केले नाहींत. पण म्यांच दुष्टानें तिकडे दुर्लक्ष्य केलें ! त्रिंबकराव, ऐकत आहांना ?"

"हो हो, ऐकत आहें तर—"

"गोदे, तूंहि ऐक. त्याला मीं उगीच्याउगीच घराबाहेर काढला. त्यानें बिचाऱ्यानें आपल्याकडून माझी मर्जी संपादण्याची होती तेवढी खटपट केली. मला रजिस्टर पत्रें पाठविलीं. पण मीं तीं पत्रें उघडूनसुद्धां न पहातां जशींचीं तशीं परत केलीं. त्याला नोकरी लागली व त्यानें स्वताचें लग्न केलें. त्या वेळीं पुनः त्यानें मला नुसतें पुसलेंसुद्धां नाहीं, ह्मणून मला रागाचा झटका आला. पण मला त्यानें वडील माणसासारखें समजून माझ्या आज्ञेशिवाय इकडची काडी तिकडे करूं नये, अशा प्रकारचें वडीलपणास शोभणारें वर्तन माझ्या हातून कुठें घडलें होतें, या गोष्टीचा विचारसुद्धां मला शिवला नाहीं. मीं त्याची भेट घेतली नाहीं आणि पत्रहि फोडून पाहिलें नाहीं, तर त्यानेंतरी माझी सल्ला घ्यायची कशी ? त्याची बायको काळी कीं गोरी, ती मीं पाहिली नसून आणि तिच्याविषयीं मला कांहींएक माहिती नसून मी तिच्याविषयीं उगीच कांहींच्या कांहीं कठोर शब्द बोललों. ही माझी चूक आतां माझ्या मनाला लागून राहिली आहे–"

"मग त्यांना आतां तार करून इकडे बोलवायचें आहे काय ? बोला—" त्रिंबकरावांनीं विचारिलें.

"आतां त्याला बोलावून काय उपयोग ? तो येईपर्यंत माझा प्राण थोडाच रहाणार आहे ? शिवाय तो कुठें असतो व काय करतो हेंतरी कुणाला ठाऊक आहे ? तारतरी कोणत्या पत्त्यावर धाडणार ? गोदे, तुला ठाऊक आहे का त्याचा पत्ता ?"

या शेवटल्या प्रश्नाला उत्तर देतांना गोदूताईनीं तिरस्काराची मुद्रा करून ह्मटलें "कुणाला मला ? मला हो तो कशानं ठाऊक असणार !"

हे शब्द गोदूताईनीं अशा कांहीं चमत्कारिक आवाजानें उच्चारले कीं, त्यावरून असा अर्थ गर्भित दिसला कीं, "गोविंदराव तो काय क्षुद्र माणूस, आणि त्याच्या-

सारख्या भिकारड्याविषयींचा पूसतपास करण्यावांचून माझ्यासारखीचं काय खेटर अडलें आहे !"

बाबासाहेब पुढें ह्मणाले "छेः, आतां तो मला कसचा भेटतो ! गोदे, त्रिंबकराव, तुह्मां दोघांनांहि माझें शेवटचें एक मागणें आहे—माझी शेवटची प्रार्थना आहे—माझ्या हातून घडलेल्या त्या भयंकर अन्यायाची भरपाई माझेकडून झाल्याखेरीज परलोकीं माझ्या आत्म्याला शांति मिळायाची नाहीं. मीं व्यवस्थापत्र केलें आहे. तींत गोदेला मी वारस करून चुकलों आहें. कांहीं थोडेसे रुपये नोकरांचाकरांनां इनाम ह्मणून काढून ठेविले आहेत. तेवढे वजा केले ह्मणजे बाकीची सरासरी साठ हजारांची जिनगी रहाते ती तिनें घ्यावी, ह्मणून त्या मृत्युपत्रांत मीं ह्मटलें आहे. मी मधें एका सट्टयाच्या भानगडींत पडलों त्यांत नुकसान लागलें. नाहींतर आज माझी दौलत दीडदोन लाखांवर असती—"

असें ह्मणून ह्मातारा किंचित् थांबला. गोदूताई व त्रिंबकराव हीं कांहींच बोललीं नाहींत. बाबासाहेब पुनः ह्मणाले "त्रिंबकराव, तुह्मी वकील आहांतच; तुह्मांला नवें व्यवस्थापत्र लिहून देतां येईल. पण तेवढें करण्यापुरती सवड आतां आहे ? अरे, पण हा काय चमत्कार ! एकाएकीं या खोलींत अंधार कशानें बरें झाला ?"

त्रिंबकराव खालीं मान घालून इतका वेळ बसले होते. त्यांनीं आतां एकदम वर पाहिलें. पण संध्याकाळची वेळ असल्यामुळें हळूहळू मंद होणाऱ्या प्रकाशाखेरीज खोलींत अंधार होण्याचें दुसरें कांहीं कारण दिसेना.

बाबासाहेब ह्मणाले " हं, मला आतां लवकर आटपतें घेतलें पाहिजे. माझी दृष्टि मंद होत चालली. गोदूताई, त्रिंबकराव, मी तुह्मांला कुलस्वामीची शपथ घालून सांगतों कीं, तुमच्या नांवानें जरी मीं सगळी जिनगी करून ठेविली आहे, तरी तिचा योग्य हिस्सा तुह्मीं माझ्या गोविंदाला दिल्याखेरीज राहूं नका. माझ्या जिनगीचा बरोबर अर्धा वांटा—एक पैहि कमी नाहीं—गोविंदाला द्यावा. द्यालना ? त्रिंबकराव बोला, बोला—"

त्रिंबकरावांनीं लागलीच "होय, देऊं." ह्मणून जबाब दिल्यावर बाबासाहेबांचें बोलणें पुढें चाललें. ते ह्मणाले " एवढें करण्यास तुह्मी चुकूं नका, ह्मणून तुह्मां दोघांनांहि मी शपथ घालून पुनः सांगतों. एवढें तुमच्यानें झालें नाहीं, तर माझ्यासारखे मरणोन्मुख व्हाल त्या वेळीं गरीबाच्या तळतळाटानें तुह्मांला सुखाचें मरण कध्धीं यावयाचें नाहीं, हें लक्ष्यांत ठेवा. मीं आतांच कायदेशीर* रीतीनें या गोष्टीचा बंदोबस्त करून ठेविला असता, पण वेळ नाहीं. नवें व्यवस्थापत्र लिहून

त्यावर सही होण्यापूर्वीच बहुधा मी राम ह्मणेन. पण मीं तुह्मांला कुलस्वामीची शपथ घालून सांगितलें आहे त्याची आठवण ठेवा, ह्मणजे झालें. माझी अर्धी जिनगी गोविंदाची आणि अर्धी गोदीची आहे. आणि त्रिंबकराव, तुह्मी त्या मिळकतीचे ट्रस्टी अथवा पंच आहां. पहा तों आतां तुह्मी कसे इमानानें वांटणी करतां ती. कागदबिगद सगळें लिहिण्याचें सामान तयार आहेना ? "

" होय सगळें आहे—"

" तर मग मी सांगतों तेवढे दोन शब्द भराभर लिहून टाका आणि त्यावर माझी सही घ्या. लिहा—मी, नारायण विष्णु गोरे, माझा भाचा गोविंदराव दामले याच्याशीं आजपर्यंत जें अन्यायानें वागलों त्याबद्दल पश्चात्ताप पावून मरणसमयीं आपल्या एकंदर जिनगीचा अर्धा हिस्सा त्याला ह्मणजे गोविंदरावाला देण्याची इच्छा करित आहें. आणि माझ्या मागें माझ्या इच्छेप्रमाणें माझ्या मिळकतीची वांटणी इमानेंइतबारें करण्यास मीं रा० त्रिंबकराव गणेश रानडे वकील, हल्लीं मुकाम शिवापूर यांस पंच नेमिलें आहे. तरी माझी शेवटची इच्छा दर्शविणारा हा दस्तऐवज कोणत्याहि रीतीनें अपूर्ण असला तरी माझी अखेरची इच्छा यांत स्पष्ट लिहिली असल्यामुळें तो पुरा कायदेशीर दस्तऐवज समजून यांत लिहिल्या-प्रमाणें अक्षरबरहुकुम व्यवस्था व्हावी. माझ्या दौलतीचे बरोबर दोन हिस्से करून एक हिस्सा गोविंदराव व एक हिस्सा माझी पुतणी सौ० गोदूबाई, सदर पंच रा० त्रिंबकराव यांचें कुटुंब, हिला द्यावा व माझ्या नोकरांनां इनामाखातर देण्या-करितां ठरविलेली रक्कम या दोन्ही अर्ध्याअर्ध्या हिश्शांतून सारखी कापून घ्यावी."

इतकें बोलून बाबासाहेब अंमळ थांबले. तेवढ्या श्रमानेंच त्यांनां दम लागला. कांहीं वेळानें ते ह्मणाले "त्रिंबकराव, एवढें लिहिलेलें बस आहेना ? हं आटपा तर लवकर लिहिणें आणि इकडे द्या तो सहीला कागद. "

त्रिंबकरावांनीं भराभर तें एकदाचें लिहून काढिलें. बाबासाहेबांनीं तें वाचून दाखविण्यास सांगितल्यावरून त्रिंबकराव लिहिलेला दस्तऐवज वाचूं लागले. एवढा मजकूर वाचण्यास वेळ कितीसा लागणार ? पण तो वाचून होण्याचे अगोदरच बाबासाहेबांचे डोळ्यांवर झांपड आली. ती निःशक्तपणांत दगदग झाल्यामुळें किंवा अन्य कांहीं कारणांमुळें आली, कोणास ठाऊक ? गोदूताईची सहज तिकडे दृष्टि जातांच त्या उठल्या आणि त्यांनीं आपल्या एका हातानें बाबासाहेबांचे डोळे झांकिले आणि दुसऱ्या हातानें डोळ्यांला पदर लावून स्फुंदून स्फुंदून रडण्यास सुरुवात केली. बाबासाहेब तितक्यांत थोडेसे सावध झाले आणि

ह्मणाले " अन्यायाची भरपाई करविल्याखेरीज परमेश्वर माझे डोळे मिटविणार नाहीं."

त्यांची स्मृति आतां अगदीं गेल्यासारखी होती. ह्मणून आपण आतां नुकेंच काय केलें त्याची आठवण इतक्यांत ते विसरले. ते ह्मणाले " त्रिंबकराव, माझ्या जिनगीचा अर्धा हिस्सा माझ्या गोदीचा आणि अर्धा गोविंदाचा, असे स्पष्ट शब्द दस्तऐवजांत लिहिले आहेतना ? पहा नीट पुनः वाचून–"

" होय, आपण ह्मणतां तसेच बरोबर शब्द लिहिले आहेत. आतां यावर आपली सही तेवढी व्हावयाची राहिली आहे." असें ह्मणून त्यांनीं बाबासाहेबांपुढें कागद धरला व ह्मणाले " ही इथें सहीकरितां रेघ ओढली आहे—"

त्रिंबकरावांनीं कागद देण्यासाठीं हात पुढें केला, पण बाबासाहेबांच्या डोळ्यांवर झांपड आल्यामुळें त्यांनां तो दिसेना. ते ह्मणाले "कुठें आहे तो कागद ? आणा इकडे. अरे राम्या, मेणबत्तीचा एक्का घेऊन ये पाहूं. इथें अंधारांत सही करण्यास कसें दिसेल ? अरे, आण लवकर, काय गाढव आळशी आहे ! अरे अंधार जास्तजास्तच पडायला लागला. दिवा आ–आण– ल–ल–व–क–र–"

असें ह्मणतांह्मणतां बाबासाहेबांचा स्वर खोल गेला. पण पुनः एकदा डोळे उघडून त्यांनीं पाहिलें आणि जोरानें ह्मटलें "गोदे, तुझा अर्ध्यापेक्षां जास्त हिश्शावर मुळींसुद्धां हक्क नाहीं. तूं जर जास्ती बळकावून बसशील, तर पहा कुलस्वामी तुझें कधीं कल्याण करणार नाहीं. गोविंदा भेटला ह्मणजे त्याला माझा आशीर्वाद सांग आणि मला झाल्या गोष्टीबद्दल पश्चात्ताप कसा झाला व मीं केलेल्या अन्यायाची अखेर भरपाई कशी केली, वगैरे सगळी हकीगत त्याला कळीव, ह्मणजे माझ्याबद्दल त्याच्या मनांतला किंतु सगळा पार जाईल आणि पुढें तो मला मनोभावानें पाणीतरी पाजित जाईल."

इतकें बोलून त्यांनीं डोळे मिटले व तोंडानें रामनामाचा सारखा घोष चालविला. कागदावर सही करण्याची त्यांनां आठवणच राहिली नाहीं. पुनः कांहीं वेळानें डोळे उघडले व "मीं कागदावर सही केली काय ?" ह्मणून विचारलें.

"नाहीं–"ह्मणून जबाब आल्यावर बाबासाहेब पुनः ह्मणाले "सही केली काय न केली काय एकच आहे. तुह्मी त्याप्रमाणें वागा ह्मणजे झालें. कायद्याबरहुकूम तो कागद लिहिलाहि गेला नाहीं. तुह्मांला माझ्या शब्दांची आठवण रहावी एवढ्याकरितांच ते शब्द या कागदावर लिहून ठेविले आहेत एवढेंच. त्रिंबकराव, मला अंमळ धरून बसा आणि दिवा मागवा, ह्मणजे मी सही करतों."

त्रिंबकरावांनीं पडदा एकीकडे सारला. त्याबरोबर दिव्याचा उजेड बाबासाहेबांच्या तोंडावर पडला. तरी "अरे कुणी दिवा आणारे–" ह्मणून ह्मातान्याची ओरड सुरूच होती.

"हा दिवा इथं आहेतर खरा—"असें ह्मणून गोदूताईंनीं तोच दिवा ह्मातान्याचे पुढें ठेविला. तरी "या दिव्यांतली तेलवात संपली आहे, दुसरा चांगला मोठा झगझगीत दिवा आणा–" ह्मणून बाबासाहेब ओरडून ह्मणाले. तेव्हां त्यांच्या समजुतीखातर दिवा आणण्याकरतां ह्मणून गोदूताई उठल्या. आणि नोकराचे हातीं दुसरा दिवा आणविला. हा दिवा येण्यापूर्वींच बाबासाहेब डोकें टेंकून डोळे मिटून बेसावध होऊन पडलेले दिसले.

गोदूताईंनीं नवन्याच्या कानांत हळूच "सही केली का ?"ह्मणून विचारलें. त्रिंबकरावांनीं मानेनेंच नकाराचा जबाब दिला. गोदूताईंनीं बाबासाहेबांच्या हातून गळून पडलेला कागद हलक्या हातानें उचलला आणि त्याची हळूच घडी घालून तो आपल्या ओच्यांत ठेवून दिला. इतक्यांत "डाक्तरसाहेब आले–" ह्मणून नोकरानें वर्दी दिली. मागोमाग डाक्तरसाहेबहि आले आणि आपल्या रोग्यास त्या स्थितींत पाहून त्याच पावलीं परत गेले. लवकरच गोदूताईंनीं किंकाळी फोडून नोकरांचाकरांनां व शेजान्यापाजान्यांनां जमा केलें आणि शोक करण्याचा सपाटा चालविला.

झालें! बिचारे बाबासाहेब आपली एवढी श्रमानें मिळविलेली संपत्ति जागच्या जागीं ठेवून परलोकीं एकटे गेले. मिळविलेल्या संपत्तीपैकीं एक कवडीहि त्यांच्याबरोबर गेली नाहीं!

## प्रकरण १८ वें.

# शिवापुर.

शिवापुर हा गांव साधारण मध्यम वस्तीचा असून रेल्वे स्टेशनापासून सुमारें सातआठ कोसांवर होता. दुसऱ्या बाजीराव पेशव्यांचे वेळीं कर्मठपणाचें जें ढोंग माजलें होतें त्यामुळें नवीन अस्तित्वांत आलेल्या अनेक क्षेत्रांपैकींच शिवापुर हेंहि एक क्षेत्र होतें. येथें एक लहानशी नदी असून तिचें नांव मायावती असें होतें. हें नांव तिला बाजीरावी कारकिर्दींतच प्राप्त झालें होतें, याविषयीं शंका घेण्यास कारण नव्हतें. कां कीं, त्या गांवच्या ऐशीं नव्वद वर्षांच्या जुन्या ह्माताऱ्याकोताऱ्या बायांनां व पुरुषांनां हें नांव कसें, कोणीं, केव्हां व कशाकरितां दिलें, याविषयींची इत्थंभूत हकीगत माहीत होती. त्यांतीलच एका वृद्ध गृहस्थाच्या तोंडून ती आह्मांस समजली, ती येथें देतों.

एकदा बाजीराव पेशव्यांची स्वारी दक्षिणेस वाई वगैरे क्षेत्रीं मोठा दानधर्म करितकरित व सहस्रभोजनें घालितघालित पुण्याकडे येत असतां त्यांचा मुक्काम या शिवापुरानजीक तीन कोसांवर व्हावयाचा ठरला होता. ही बातमी शिवापुरच्या कांहीं भटांभिक्षुकांनां कळतांच त्यांच्या तोंडाला पाणी सुटलें, आणि आपला गांवहि वाईप्रमाणें मोठें क्षेत्रस्थान असता तर आपली चंगळ उडाली असती, असें वाटून त्यांनीं लागलीच शास्त्री व भिक्षुक मंडळीची एक गुप्त सभा भरविली व कांहींतरी उपाय करून शिवापुराला क्षेत्रत्व प्राप्त करून देण्याचा विचार निश्चित केला; आणि आपल्या या क्षेत्राचें माहात्म्य संस्कृत पद्यांत वर्णन करून ती पोथी जुनीच आहे असें भासवून बाजीराव पेशव्यांनां आपल्या शिवापुरास येण्याविषयीं आग्रहपूर्वक विनंति करण्याचें ठरविलें. शिवापुरास शिवपुरी असें नांव देऊन तत्संबंधानें माहात्म्य रचण्याचें आणि त्या पुरीचा पौराणिक कथेशीं संबंध जोडून देण्याचें काम सकलविद्यापारावारीण वेदवेदांगनिपुण वादिमातंग-पंचानन महामहोपाध्याय गुंडशास्त्री यांचेकडे बहुमतानें देण्यांत आलें; आणि गुंडशास्त्र्यांनींहि 'नको, नको, मी आपला अल्पज्ञ, हें काम जे आहे ते— नारायणाचार्य यांचेकडे द्यावें, ह्मणजे जें आहे तें—यथासांग होईल,' असें विनयपूर्वक एकदा नाकारून पाहिलें; पण मंडळी ऐकेना. तेव्हां निरुपायास्तव शेवटीं त्यांनीं तें पतकरिलें. मंडळीनें गुंडशास्त्र्यांची या कामासाठीं केलेली निवड अव्वल नंबरची होती, यांत शंका नाहीं. कारण गुंडशास्त्र्यांनीं शिवपुरीमाहात्म्य

इतकें जलद पण असें सुंदर, विस्तृत आणि बेमालूम रचिलें कीं, काशीमाहात्म्य, कृष्णामाहात्म्य, पंचवटीमाहात्म्य या सर्वांपेक्षांहि शिवपुरीमाहात्म्याची रचना कांहीं अलौकिक दिसली ! देशोदेशच्या पंडितांनां तर असें वाटलें कीं, या माहात्म्याचा कर्ता प्रत्यक्ष श्रीवेदव्यासच असला पाहिजे ! ज्याप्रमाणें हें माहात्म्य वर्णिलें त्याचप्रमाणें तें माहात्म्य त्या स्थलास कसें प्राप्त झालें, याविषयींची गुंडशास्त्र्यांनीं रचिलेली कथाहि इतकी रसाळ, हृदयंगम आणि चटकदार झाली कीं, तिच्यापुढें शिवपुराणांतल्या दुसऱ्या पुष्कळ कथा अगदीं भाकडकथा वाटं लागल्या. ज्यांनीं हें शिवपुरीमाहात्म्य वाचलें असेल, त्यांनां ती गुंडशास्त्र्यांच्या हातची कथा मुखोद्गत करून रोज तिचा पाठ करावा, असें वाटेल. पण एकतर ती पोथी आतां दुर्मिळ झाली आहे; आणि दुसरें, ती कथा गीर्वाण भाषेंत लिहिली असल्यामुळें तिचा रसास्वाद निवळ मराठी वाचकांच्या दैवाला कोठून येणार ? यासाठीं तिचा केवळ गोषवारा आह्मीं वाचकांसाठीं येथें देण्याचा प्रयत्न करित आहों. हें कामदेखील आह्मी फार भीतभीत हातीं घेत आहों, हें सांगावयास नकोच ! कारण कोठें त्या प्रचंडधीशक्तिसंपन्न त्रिखंडविश्रुतकीर्ति दिग्विजयी गुंडशास्त्र्यांची विद्वत्ता आणि कोठें आमची दुर्बल लेखनशक्ति ! तथापि त्या गुरुवर्य गुंडशास्त्र्यांच्याच पदकमलाचें स्मरण करून या धाडसाच्या कामास हात घालित आहों. असो.

शिवपुरीविषयींची कथा अशी आहे:—

"पूर्वीं त्रेतायुगाचे ठायीं जेव्हां क्षपिनामक दैत्यानें गोब्राह्मणांनां त्राहि त्राहि करून सोडिलें, तेव्हां भूमि कंपायमान झाली आणि ती गोरूप धारण करून जे आहे त्ते-ब्रह्मदेवास शरण गेली. तिच्या तोंडून क्षपि दैत्याच्या त्रासाचें वर्णन ऐकूनच ब्रह्मदेव भयभीत झाला आणि इंद्रादि तेहतीस कोटि देवतांस घेऊन क्षीरसागराचे ठायीं श्रीभगवान् विष्णु शेषशय्येवर विराजमान झाले होते, त्यांनां जे आहे त्ते-सर्व हकीगत निवेदन करिता झाला. श्रीविष्णूंनीं निमिषमात्र नेत्र मिटून अंतर्दृष्टीनें खरी हकीगत साद्यंत जाणिली, आणि त्या दैत्याला मारण्याची आपली शक्ति नाहीं, असें जाणून ब्रह्मदेव आणि इंद्रादि देवता वगैरे जमलेल्या मंडळीस श्रीशंकराकडे जाण्यास सांगितलें, आणि आपणहि कैलासास गेले. श्रीशंकर त्या वेळीं ध्यानस्थ असल्यानें बहुतकाळपर्यंत त्यांची भेट झाली नाहीं. तेव्हां आलेल्या देवांनीं त्यांची करुणस्वरानें प्रार्थना करण्यास सुरुवात केली. ती प्रार्थना ऐकून आपला कोणी भक्त संकटांत पडला आहे, त्याची संकटांतून

मुक्तता प्रथम केली पाहिजे, असा विचार करून शंकरांनीं जे आहे त्ते–डोळे उघडिले आणि पहातात तों ब्रह्मा, विष्णु व इंद्रादि देव अश्रुपूर्ण नेत्रांनीं आपली स्तुति करित आहेत! हा प्रकार पाहून शंकरांना जे आहे त्ते–महत् आश्चर्य वाटलें आणि त्यांनीं 'असें तुमचें काय संकट आहे तें कथन करा, ह्मणजे त्याचें क्षणार्धांत निवारण करीन.' असें त्यांना आश्वासन देऊन विचारिलें. तेव्हां श्रीविष्णूंनीं इत्थंभूत हकीगत निवेदन केली. ती ऐकून श्रीशंकरहि स्तब्ध बसले आणि ह्मणाले 'काय करावें? या गोष्टीला माझाहि निरुपाय आहे! आपल्या अलौकिक तपोबलाच्या योगानें हा क्षपि दैत्य माझ्यापासून असा वर घेऊन गेला आहे कीं, तुला मारण्याची शक्ति इतर देवादिकांत काय, पण प्रत्यक्ष ब्रह्मा, विष्णु आणि महेश या त्रिमूर्तींतसुद्धां असणार नाहीं. तुला मारणारा पुरुष या त्रिभुवनांत निर्माण होणार नाहीं.' असा वर प्राप्त झाल्यामुळें गर्वानें ताठून जाऊन तो माझेपुढें लागलीच शेखी मिरवूं लागला आणि माझाहि अपमान करूं लागला; तेव्हां त्या वराला जोडून मीं त्याला असा एक शाप दिला कीं, 'तूं आह्मां देवांना जरी अजिंक्य झालास तरी आदिमायेपुढें तुझें कांहीं चालावयाचें नाहीं आणि तिच्या नुसत्या नेत्रकटाक्षानें तूं जळून भस्म होशील.' ह्मणून त्याच्या वधार्थ तुह्मीं आदिमायेला प्रसन्न करून घेतलें पाहिजे.' श्रीशंकराचें हें भाषण श्रवण करतांच सगळे आदिमाया पार्वती हिचें स्तवन करूं लागले. तेव्हां तिनें चराचरादि जीवांच्या प्राणरक्षणार्थ क्षपि दैत्यास मारण्याचें आश्वासन देऊन आलेल्या मंडळीस निरोप दिला आणि आपण भिल्लिणीचा वेष घेऊन ऐन दुपारीं एक मारलेला हरिण हातीं घेऊन क्षपि दैत्याच्या वाटेवर येऊन उभी राहिली. तिकडून क्षपि अत्यंत क्षुधित होऊन भक्ष्याच्या शोधांत हिंडतहिंडत येत होता. त्या भिल्लिणीच्या हातीं हरिणाची शिकार पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटलें आणि तो तिच्याजवळ ती मागूं लागला. तिनें ती देण्याचें जे आहे त्ते–नाकारिलें आणि ती पुढें जाऊं लागली; तेव्हां क्षुधेनें व्याकुळ झालेल्या त्या राक्षसाला विचार न राहून तोहि तिचे मागोमाग जाऊं लागला. तिनें कांहीं अंतरावर गेल्यावर एका प्रचंड वटवृक्षाच्या फांदीवर ती शिकार लोंबती टांगली आणि आपण पाणी आणण्यासाठीं ह्मणून जवळच्या ओढ्यावर गेली. इकडे ती गेली असें पाहून राक्षसानें ती शिकार तेथून काढून घेऊन खाण्यास प्रारंभ केला. इतक्यांत ती भिल्लीण परत आली. तिनें तो प्रकार पाहून त्वेषानें त्याच्यावर बाण सोडला. राक्षसाला तो लागला, पण त्याची शरीरयष्टि अशी कांहीं विलक्षण होती कीं, त्या बाणा-

पासून त्याला यत्किंचितहि इजा झाली नाहीं. उलट तो हंसतहंसत त्या भिल्लिणीला ह्मणाला ‘ सुंदरी ! तूं कां व्यर्थ बाण मारण्याचा शीण घेतेस ? चल ये, आपण दोघेंहि इथें बसून दंपत्यानें भोजन करूं.’ आधींच त्यानें गुन्हा केलेला, आणि तशांत हृदयास झोंबणारे असे हे त्याचे शब्द ऐकतांच त्या भिल्लीणवेषधारी आदिमायेच्या नेत्रांतून अग्नीच्या ज्वाळा निघूं लागल्या आणि त्या ज्वाळांनीं तो राक्षस जळून भस्म झाला. आदिमायेचा हा रोष आतां त्रिभुवनास जाळील कीं काय, अशी भीति वाटूं लागली. शेवटीं इंद्रादि देवता व ऋषिगण यांनीं विमानांतून पुष्पवृष्टि केली व आदिशक्ति जी पार्वती तिची सहस्रकोटी मुखांनीं स्तुति करून तिचा कोप शांत केला. कोप शांत झाल्यावर पार्वती एका शिलाखंडावर बसली. इंद्रादि देवहि शिलाखंड पाहून त्यावर बसले आणि गोब्राह्मण संकटांतून मुक्त झाले याबद्दल आनंद प्रदर्शित करून पृथ्वीतलावर हें स्थान अत्यंत पवित्र आणि आदरणीय होओ, असा वर देऊन सर्वजण आपापल्या स्थलाप्रत गमन करते झाले. ज्या ओढ्यावर भिल्लीणवेषधारी आदिमाया पार्वती पाणी आणण्याकरितां गेली होती ती हीच नदी, आणि ज्या वटवृक्षाच्या फांदीला हरिण टांगला होता तो हाच वटवृक्ष, आणि ज्या शिलाखंडावर इंद्रादि देव बसले होते त्या ह्याच प्रस्तरराशि, ह्मणून शिवपुरीचे लोक अद्यापि त्या त्या वस्तु मोठ्या भक्तिभावानें दाखवित असतात ! या वटवृक्षाखालीं शेंदूर फांसलेली देवीची एक पाषाणमूर्ति आहे, तीच पार्वती, हें सांगण्यास तेथील लोक कधीं चुकत नाहींत ! याप्रमाणें शिवपुरीविषयींचा पौराणिक इतिहास जसा गुडशास्त्र्यांनीं लिहिला तसाच येथें यथामति वर्णिला आहे. या कथेवर जे कोणी विश्वास ठेवून तिचें पठन करतील त्यांचे हेतु आदिमायेच्या कृपेनें पूर्ण होतील. जे पुत्रार्थी असतील त्यांनीं एकवीस वेळा, आणि धनार्थी असतील त्यांनीं अकरा वेळा या कथेचें पठन करावें. ही कथा शंभर वेळा पठन केली असतां कैलासाहून प्रत्यक्ष शिवदूत विमान घेऊन येतील, असा या कथापठनाचा महिमा आहे. ही कथा जशी सांगणारास तशीच भाविक श्रोत्यांस मंगलकारक होओ.

ॐ शांतिः शांतिः शांतिः !”

## प्रकरण १९ वें.

## जानकीबाईची ओळख.

अशा त्या शिवापुरांत गोविंदराव आणि त्यांच्या कुटुंबांतली मंडळी एकदाची येऊन पडली. स्टेशनापासून शिवापुर सातआठ कोसांवर आहे, ह्मणून वर सांगितलेंच आहे. एवढ्या सातआठ कोसांची मजल करण्यास ओझ्याच्या गाड्यास सबंध एक दिवस लागला. पावसाची झिमझिम पुणें सोडल्यापासून सुरू झाली होती, ती, मंडळी थेट शिवापुराला जाऊन पोहोंचेपर्यंत सारखी चालू होती. मुलांनां पाऊस लागूं नये ह्मणून त्यांनां गाडींत मधोमध बसवून एका बाजूला गोविंदराव व दुसरे बाजूला राधाबाई बसल्या होत्या. दक्षिणेकडचा पाऊस मधूनमधून जोरानें येई, तेव्हां गोविंदरावांनां निखालस सचैल स्नान होई. याप्रमाणें हा अंमळ त्रासाचा प्रवास संपल्यावर मंडळी शिवापुरास एकदाची संध्याकाळीं येऊन पोहोंचली. तेथल्या ज्या एका गृहस्थाला पत्र आणिलें होतें त्याच्याच घरीं गोविंदराव जाऊन उतरले. हा मनस्वी कंजूष आणि तुसडा असे. त्यानें आपल्या पाहुण्यांस उतरण्याला आपल्या घरांतली एक माडी दाखवून देण्यापलीकडे कोणत्याच तऱ्हेची मदत केली नाहीं; आणि राधाबाईनींहि प्रवासांतदेखील होतां होईल तों दुसऱ्याचे उपकार न व्हावे ह्मणून एकदोन दिवसांपुरती शिधासामग्री बरोबर घेतलीच होती. यामुळें अमुक एक जिन्नस पाहिजे आहे तेवढी द्या, ह्मणून घरवाल्या यजमानीणबाईस ह्मणण्याचा त्यांनां प्रसंगहि आला नाहीं. त्यांनीं प्रवासांत स्वयंपाक वगैरे करण्यासाठीं बरोबर घेतलेली प्रिमसस्टोव्ह ( चूल ) पेटविली. राधाबाईनीं चूल पेटवून प्रथम थोडासा चहा केला आणि वाटेनें थकून गेलेल्या आपल्या मुलांनां आणि गोविंदरावांला एकेक पेला देऊन त्यांचा शीण अंशतः घालविला. दूध पुरेसें नसल्यामुळें बिचाऱ्या राधाबाईच्या वांट्याला नुसतें चहाचें पाणीच पिण्याचें आलें ! पण राधाबाईला त्याबद्दल यत्किंचितहि वाईट वाटलें नाहीं. आतां ज्या सर्वपरी बदललेल्या परिस्थितींत आपल्याला खाण्या-पिण्याचे असे सदोदितच हाल काढावे लागतील, तिला आजच प्रारंभ झाला आहे, असें मानून त्यांनीं हा पहिला प्रसंग मोठ्या हिमतीनें मनांत बिलकूल कष्टी न होतां पार पाडला. घटकाभरानें जेवणखाण उरकल्यानंतर अंमळ सुखदुःखाच्या गोष्टी होऊन देवाचें नांव घेऊन मंडळी निजली. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं गोविंदराव प्रथम रहाण्यासाठीं घर शोधूं लागले.

शिवापुरास अण्णासाहेब शिखरे यांचें नांव महशूरच आहे. हे मोठे पैसेवाले आणि घरंदाज व्यापारी होते. शिवापुरास यांची मालमत्ता फारच मोठी होती. कांहीं नाहीं म्हटलें तरी नुसतीं भाड्यानें दिलेलीं घरेंच शंभरदीडशें होतीं. या शिवाय जमीनजुमला, सावकारी, पेढी, कारखाने, व्यापार, शेती वगैरे असे. एवढा सगळा पसारा एकट्या माणसाला आवरतां येणें शक्य नव्हतें, म्हणून अण्णासाहेबांनीं आपल्या कित्येक विश्वासू स्नेह्यांनां पगार देऊन त्यांच्याकडे एकेक खात्याची व्यवस्था सोंपविली होती. त्यांत त्रिंबकराव वकिलांकडे घरादाराची व्यवस्था देण्यांत आली होती. वकीलसाहेबांकडे गोविंदराव गेले, पण त्यांची भेट झाली नाहीं. तेव्हां त्यांच्या कारकुनाकडूनच घराची माहिती वगैरे घेऊन त्यांनीं एक घर भाड्यानें ठरविलें आणि तें आपल्या ताब्यांत घेऊन शिरस्त्या-प्रमाणें भाडेचिठ्ठी लिहून दिली.

या घराशेजारींच दुसरें एक बिऱ्हाड होतें. त्या बिऱ्हाडांतली एक बाई फारच मनमिळाऊ आणि शेजारास योग्य अशी होती. ती बालविधवा असल्यामुळें तिला स्वताचें असें मूलबाळ कांहीं नव्हतें. पण तिला मुलांचा लळा अतिशय असे आणि तिचा स्वभाव अंमळ विनोदी असल्यामुळें मुलांनीं तिच्याजवळ जाण्यासाठीं, तिच्याशीं खेळण्यासाठीं आणि गमती करण्यासाठीं अगदीं हट्ट घ्यावा. गोविंदरावांच्या शेजारच्या बिऱ्हाडांत ती मुलांनां संभाळण्यासाठीं म्हणून राहिली होती. आपल्या शेजारीं मुलाबाळांचा परिवार असलेलें कुटुंब रहाण्यास आलें आहे, हें कळतांच तिला मोठा आनंद झाला, आणि त्यांची ओळख करून घेण्यासाठीं ती हळूच राधाबाईचे घरांत शिरली. राधाबाईच्या त्या दिवसाच्या कामाचें काय पुसावयाचें आहे? त्या घर झाडूनझुडून साफ करण्यांत आणि घरांत प्रत्येक वस्तु जागच्याजागीं ठेवण्यांत इतक्या गढून गेल्या होत्या कीं, त्यांनां कोण आलें किंवा कोण गेलें हें कांहींच दिसेना. शेजारीणबाईला राधाबाईचा हा बेपर्वाईपणा अंमळ चमत्कारिक वाटला; पण तेवढ्यावरच तिचा नाद सोडून देणारी ती बाई नव्हती. तिनें हळूच आपण होऊन बोलण्यास सुरुवात केली. ती म्हणाली "अहो बाई, तुम्हांला आज फारच मेहनत पडली आहे. तुमचं हें काम संपणार केव्हां अन् तुम्ही अंमळ विश्रांति घ्याल केव्हां? मला घेतां का हाताशीं? माझ्या हातून होण्यासारखं कांहीं काम असेल तर सांगा, कांहीं संकोच धरूं नका. एकमेकींनां एकमेकींचं काम करूं लागणं हा शेजारधर्मच आहे—"

या शब्दांनीं ज्या भाषणाचा उपक्रम झाला, त्याचा उपसंहार कोठें आणि कसा झाला, तें सांगतां येणें कठिण आहे! पण त्या भाषणाच्या ओघांत त्या बाईनें आपल्या आणि आपल्या नातेवाइकांच्या सात पिढ्यांची हकीगत, गांवांतल्या ठळकठळक कुटुंबांची व प्रेक्षणीय स्थळांची माहिती, गांवांतल्या लोकांचा रोजगारधंदा, स्वभाव व खोडी यांचें वर्णन, मुलांच्या गमती आणि समाजांतल्य विशिष्ट चालीरीति वगैरे संबंधाची इतकी भरपूर माहिती दिली कीं, दहा वर्षें त्या गांवांत राहूनहि राधाबाईला इतकी माहिती होतीना! आपल्यास या बाईचें पुराण ऐकण्यास सवड नाहीं; तथापि ही बाई कोण व तिच्या कडेवर मूल होतें तें कोणाचें, एवढेंच तूर्त आपण पाहूं म्हणजे झालें. ती पहा जानकीबाई आपली स्वताची कथा सांगूं लागली आहे. श्रोत्यांनीं सावधान असावें.

"माझं नांव जानकीबाई. आम्ही शेजारच्या घरांत रहातों. माझ्याबरोबर मुलगी आहे, ही नारायणराव म्हणून इथं दुकानदार आहेत, त्यांची मुलगी. हिचं नांव आहे अहिल्या, पण आम्ही गंमतीनं हिला सोनी म्हणतों. ही दोन महिन्यांची असतांच हिची आई ताप येऊन वारली. माझ्या मावशीच्या चुलत नणंदेच्या आतेच्या जाऊच्या चुलत नातसुनेची ती माऊस बहीण लागत होती. ती वारली तेव्हां मुलांनां संभाळायला घरांत कुणी बायकोमाणूस उरलं नाहीं. नारायणरावांनीं दुसरं लग्न करावं म्हणून पुष्कळांनीं सांगून पाहिलं, पण त्यांच्या तें कांहीं लक्ष्यांत येत नाहीं. माझा हिच्यावर पहिल्यापासूनच फार जीव होता, आणि मलातरी आतां कोण आहे? तेव्हां मीच हिला संभाळायला राहिलें. पहा माझी सोनुकली कशी दिसते आहे!! तुम्हीं पाहिली आहे का हो अशी गोजिरवाणी गोड मुलगी? नारायणरावांचंहि हिच्यावर अतोनात प्रेम आहे. ही घटकाभर दिसली नाहीं तर त्यांनां चैन पडत नाहीं. ते हिला कधींकधीं आपल्याबरोबर कारखान्यांतसुद्धां घेऊन जातात. त्यांचेवरतरी पहा कोण प्रसंग आला आहे! त्यांचे स्वताचे गठ्ठे दाबण्याचे तीन कारखाने पण गेल्या पांचचार वर्षांत कापूसच पिकला नाहीं. तेव्हां कारखानेतरी कुठून चालणार? तिकडून नुकसान लागलं. शेतीवाडींततर ठार बुडाले आणि एकदोन मोठमोठ्या कुळांनीं आयत्या वेळीं कावा वर केल्यानं सावकारींतहि मोटी ठोकर लागली. मनुष्यावर संकटं यायला लागलीं कीं कशीं एकामागून एक येतात! बाहेरून हीं संकटं आलीं तर आलीं, पण त्याच वेळेस बायको कां मरावी? शेवटीं त्यांनीं सगळे कारभार सोडून देऊन अण्णासाहेबांच्या पदरीं नोकरी धरली. ज्यांनां उभ्या जन्मांत नोकरी

करणं ठाऊक नाहीं, त्यांनां आतां ती करणं भाग आलं. मिळून काय कीं, प्रालब्ध कुणाला चुकवितां येत नाहीं!"

राधाबाईला ही हकीगत ऐकून फार चमत्कारिक वाटलें व कांहीं अंशीं आपल्यावरच्या संकटांतून निभावण्यास लागणारें धैर्य या कथाभागानें त्यांच्या ठायीं पक्कें बाणलें. त्यांनीं शिवापुरास आल्यापासून अण्णासाहेबांचें नांव पुष्कळांच्या तोंडून ऐकिलें होतें आणि आतां नारायणरावांला संकटाचे प्रसंगीं तेच उपयोगीं पडले, हें ऐकूनतर त्यांच्याविषयींची हकीगत ऐकण्याची राधाबाईंनां अधिकच उत्सुकता झाली; ह्मणून अण्णासाहेब हे कोण, काय वगैरे त्यांनीं विचारलें. तेव्हां जानकीबाई ह्मणाली " अण्णासाहेबांचं नांव माहीत नाहीं, असं पोरसुद्धां तुह्मांला इथं मिळायचं नाहीं. ते फार मोठे श्रीमंत आहेत. घरदार, शेतीवाडी, गाड्याघोडे, नोकरचाकर, असा त्यांचा फारच मोठा कारखाना आहे. हजारों रुपये महिन्याचा खर्च असून पुनः त्यांची दौलत उलटी वाढती आहे. त्यांचा नांवलौकिकहि मोठा आहे. अण्णासाहेब एवढे मोठे श्रीमान् असून त्यांनां ताठा कसा तो बिलकूल नाहीं. देवाच्या दयेनं त्यांनां बायकोहि चांगली मिळाली असून त्यांनां एक मुलगा आणि मुलगीहि आहे. खरे भाग्यवान् आहेत बाई ते अण्णासाहेब! पण मुलांपासून मात्र लागावं तसं त्यांनां सुख लागत नाहीं—"

राधाबाईनीं विचारिलें "कां बरं? मुलगा स्वच्छंदी व उधळया निघाला आहे कीं काय?"

जानकीबाई हंसून ह्मणाली " नाहीं हो! तसं नाहीं कांहीं. मुलगा लहानच आहे अजून. सुख न लागण्याचं कारण निराळं आहे. हा मुलगा लहान वर्षे सव्वा वर्षाचा असतांना एके दिवशीं त्याला संभाळणारा नोकर दोन्ही हातांनीं त्याला वर फेंकित व झेलित असतां एकाएकीं चुकून खालीं फरशीवर पडला. त्याबरोबर डोकं फुटून तत्काळ प्राणच जायचा. पण देवाची करणी! डोक्याला तर कांहीं फारसं लागलं नाहीं; पण बरगडी मात्र आंतून फार दुखावली गेली. वरून कांहीं एवढी दुखापत झालेली दिसत नाहीं; पण तेव्हांपासून त्या मुलाला चैन पडत नाहीं. अण्णासाहेबांनीं त्याच्यासाठीं हजारों रुपये खर्च केले. मुंबईच्या गोऱ्या दाक्तरांला फी भरली, मुलाला मुंबईस समुद्राचे कांठीं बंगल्यांत नेऊन ठेविलं, पण कांहीं झालं नाहीं. मुलगा कसा आहे ह्मणून तुह्मांला सांगूं! अगदीं नक्षत्रासारखं पोर आहे. त्याला खरोखर एखाद्याची दृष्ट लागली असली पाहिजे. दुखण्यामुळं तो कसा अगदीं किडून गेला आहे! बापानं त्याला कांहीं कमी केलं नाहीं.

खाण्यापिण्याची चैन, उंची कपडेलत्ते, इंग्रजी शिकवायला मास्तर वेगळा, गाणं शिकवायला वेगळा, पण दुखण्यापुढं कांहीं सुचेल तेव्हां ना ?"

जानकीबाई पुढें कांहीं बोलणार होती इतक्यांत सोनीनें तिचा हळूच पदर ओढून तिला घरीं चल ह्मणून खूण केली. जानकीबाई बोलण्याच्या ऐन भरांत होती त्यामुळें सोनीला कंटाळा आला असेल इकडे तिचें लक्ष्यच गेलें नाहीं, आणि तिच्या गोष्टी मारुतीच्या शेपटाप्रमाणें वाढतच चालल्या. पदराला हिसका बसतांच जानकीबाईनें वळून मागें पाहिलें आणि सोनीचा एक मुका घेऊन ह्मटलें "आलें हो सोने, असं ग काय करतेस ? जायचंच आहे आतां आपल्याला घरीं, मी इथं बसण्यासाठीं का आलें आहें ?"

राधाबाईनींहि सोनीच्या हंसतमुद्रेकडे पाहिलें आणि तिचा जसा गोड मोहक चेहरा होता तसाच तिचा शांतपणा पाहून त्यांनीं कौतुक केलें.

तो दिवस सगळा गडबडींत आणि घरांतल्या सामानाच्या व्यवस्थेंत गेला. दुसरे दिवशीं पहाटेस राधाबाईला अंमळ फुरसत मिळाली आणि त्यांनीं आपल्या घराच्या खिडकींतून एकदा सभोंवार नजर फेंकली तेव्हां नुकत्या पडलेल्या पावसानें हिरव्याचार झालेल्या वनस्पतीचा गालिचा आंथरलेला पाहून त्यांनां जो आनंद वाटला तो अवर्णनीय होता. ती गंमत पहाण्यासाठीं त्यांनीं गोविंदरावांला बोलाविलें. परंतु त्यांची तब्यत चांगली नसल्यामुळें ते अंथरुणांतून उठले नाहींत. अगोदरच काळजाचें दुखणें, तशांत प्रवासाची दगदग आणि त्यांत पुनः त्या दिवशीं वाटेंत पावसानें भिजविलें होतें. मग काय विचारतां ? गोविंदरावांचें सगळें अंग ठणकत होतें आणि काळीजतर विशेषच दुखत होतें. दुखण्याचें नांव ऐकतांच राधाबाईच्या अंतःकरणांत चर्र झालें. त्यांनीं अंगाला हात लावून पाहिला, तों अंगांत ताप सपाटून भरला होता. डाक्तरला बोलवावेंसें राधाबाईला वाटलें. पण आपण या गांवीं अगदीं नवे आलेलों. आपणांस नाहीं कोणाची माहिती. आणावयाचें खरें, पण कोणत्या डाक्तरास ? ह्मणून जानकीबाईच्या माहितीनें डाक्तरला आणण्याचें ठरलें. राधाबाईनीं "डाक्तरला बोलावूं ना ?" ह्मणून गोविंदरावांनां विचारलें तों ते ह्मणाले "हो डाक्तर येतील तर बरें होईल. हें माझें दुखणें जर लांबलें तर आपलें कसें होईल ?"

"हें काय कांहींचेबांहीच् बोलणं ! मनुष्याला हिंमत आहे तोंवरच सगळं आहे. हा ताप श्रमाचा आहे, अंमळ डोळा लागला ह्मणजे शीण निघून जाऊन ताप उतरेल."

त्याचदिवशीं डाक्तरास बोलावून आणून औषध सुरू केलें.

## प्रकरण २० वें.

# गोदूताईची भेट.

दोन महिनेपर्यंत गोविंदरावांचें तें दुखणें लांबलें. या दोन्ही महिन्यांत गोविंदराव इतके क्षीण झाले कीं, त्यांच्यानें बिछान्यांतून उठून बसवेना. राधाबाईची स्थितितर कांहीं विचारूंच नका! पतीची रात्रंदिवस शुश्रूषा आणि संसारक्रमणाची काळजी यांच्यायोगानें त्यांचा देह आतां नुसता अस्थिपंजर झाला होता. एकाचें दुखणें दुसऱ्यास कसें जाणवतें हें पहाणें असल्यास राधाबाईकडे अंमळ पहावें.

औषध सुरू होतेंच. हळूहळू प्रकृतींत फरक पडला. आणखी दोन आठवडे गेले. तेव्हां गोविंदराव अंमळ उठून बसूं लागले. तों लागलीच विवंचना त्यांच्या पाठीस लागली. पगारांतली जी थोडीबहुत शिल्लक होती, ती भाड्यातोड्यांत आणि या दोनतीन महिन्यांत खर्च झाली. आतां पुढें कसें करावयाचें, हा प्रश्न दत्त ह्मणून उभा राहिला. काम करण्याचीतर अंगांत ताकद नाहीं; आणि ताकद असली तरी ओळख नाहीं पाळख नाहीं अशा गांवीं एकदम नोकरी कोण देतो? शिकवण्या शिकवूं ह्मटलें, तर त्यालादेखील ओळख लागणारच. तेव्हां गोविंदरावांनीं तेथल्याच 'जंबूक' नामक पत्रांत जाहिरात देण्याचा विचार केला आणि कोणीं ओळख विचारलीच तर आपल्या गोदूताईच्या नवऱ्याची (त्रिंबकराव वकिलांची) द्यावी ह्मणून आपल्या मनाशीं ठरविलें. त्रिंबकरावांकडे जाण्याइतकी शक्ति अद्यापि त्यांचे अंगांत आली नव्हती; ह्मणून आपण स्वतः न जातां गोदूताईकडे आपल्या पत्नीला पाठवून तिला आपला विचार कळविण्याचें गोविंदरावांनीं मनांत आणिलें. ते ह्मणाले "रिकामेंतरी किती दिवस बसायचें? आतां पोटाचा धंदा पाहिलाच पाहिजे. आपल्या मुलांच्याहि अभ्यासाकडे बरेच दिवसांत पाहिलें नाहीं, तिकडेहि लक्ष्य देणें जरूर आहे."

राधाबाई ह्मणाल्या "देवाच्या दयेनं मुलं गरीब मिळालीं आहेत. तीं मुकाट्यानीं आपले रोजचे अभ्यास आणि घरचीं कामं बिनबोभाट करित असतात, हें मी पहातेंच आहें. माझी नजर असतेच त्यांच्यावर. त्यांनां कोणतीहि गोष्ट करा ह्मणून सांगावी लागत नाहीं."

आपल्या मुलांविषयीं असे समाधानकारक शब्द किती आईबापांच्या तोंडून यथार्थरीत्या निघत असतील! जेथें आई आणि बाप दोघेंहि स्वभावानें शांत, उद्योगी आणि धर्मनिष्ठ असतील तेथेंच अशीं भाग्यवान् मुलें निपजणार.

पत्नीच्या या भाषणावर गोविंदराव ह्मणाले "तें असो. पण गोदूताईकडे तूं केव्हां जाशील—"

"आत्तांच त्यांच्याकडे जाऊन काय करायचं आहे ? इकडची तब्यत बरी झाली ह्मणजे जाऊं एक दिवस. माझी नि त्यांची नाहीं ओळखदेख. इकडून जायचं होईल त्या दिवशीं मी येईनच बरोबर."

"ओळख न् पाळख कशाला पाहिजे ? त्यांच्या इथें मी जेवायला का जा ह्मणतों आहें ? माझी ती मावसबहीण आहे ना ? झालें तर. आणखी दुसरी ओळख ती काय पाहिजे ? ती स्वभावानं चांगली आहे ह्मणून ऐकतों. तूं ओळखीवांचून गेलीस तरी कांहीं ती तुला मना करणार नाहीं."

दुखणाईत माणसें मूळचीं स्वभावानें कितीहि शांत असलीं तरी दुखण्यामुळें चिरडखोर बनतात; त्यांच्या जरा मर्जीआड कोणी गेलेलें त्यांना खपत नाहीं, हें राधाबाईला ठाऊक होतें. ह्मणून त्यांनीं जास्ती होय नाहीं न करतां एकदम जाण्याची तयारी केली आणि जानकीबाईस त्यांच्या घराची खूणखाण विचारून घेतली.

त्रिंबकराव वकीलांचें घर शिवापुराच्या अगदीं दुसऱ्या टोंकाला होतें. विचारित विचारित राधाबाई तेथपर्यंत आल्या. पडवीच्या तोंडाशींच एक नोकर उभा होता. त्यानें राधाबाईला आलेल्या पहातांच आपल्या यजमानिणीला बाहेर कोणी बाई आल्याची वर्दी पोहोंचविली; पण त्याबरोबर त्या बाईचें नांव विचारून कां नाहीं आलास ह्मणून गोदूताईनीं त्याची चांगली कानउघाडणी केली. तेव्हां तो नोकर परत येऊन त्यानें राधाबाईला पडवींतच थांबविलें आणि नांव विचारून घेऊन आपण परत विचारून येईपर्यंत त्यांना तेथेंच उभें रहाण्यास सांगून तो पुनः आपल्या यजमानिणीकडे गेला. "राधाबाई ! राधाबाई कोण ?" असें गोदूताईनीं पांचचार वेळ आपल्या मनाशीं विचार करून पाहिलें आणि शेवटीं त्रासून कपाळाला आंठ्या घालून "दे त्यांना आंत पाठवून—" ह्मणून नोकराला सांगितलें.

राधाबाई आंत आल्या, तरी गोदूताईनीं त्यांना 'या बसा' देखील ह्मटलें नाहीं. नुसतें राधाबाईच्या तोंडाकडे एकदा पाहिलें आणि ती कांहीं कोणी श्रीमंताच्या घरची नाहीं, असें समजल्यावर कपाळाला आंठ्या घालून स्वताच्या हातांतल्या कांकणांकडेसच पहात बसल्या. गोदूताईचा हा कुर्रा पाहून राधाबाईला फारच चमत्कारिक वाटलें. पण त्यांनीं आपल्यास न ओळखल्यामुळें कदाचित् त्या कांहीं बोलत नसतील, अशा समजुतीनं राधाबाई ह्मणाल्या "मला नाहीं का ओळखलं? पूर्वीं कधीं पहाण्याचा योगायोगच आला नाहीं, ह्मणून ओळख पटली नाहीं

हें ठीकच आहे. मीच आतां सांगतें मी कोण आहें तें. मी आपली भावजय आहें. आपल्या आईसाहेब अन् आमच्या सासूबाई या सख्या बहिणीबहिणी होत्या. आह्मी इतके दिवस पुण्यांत रहात होतों, पण तिथली हवा तब्यतीला मानवेना, ह्मणून इथं येऊन पडलों, तों इथंहि आमचं दुर्दैव मागं लागलं आहेच. आज आपल्या भेटीला स्वताच यायचं होणार होतं, पण तितकी हिंडण्याफिरण्यापुरती शक्ति आली नाहीं ह्मणून मला पाठविलं आहे—"

गोदूताईनीं आतां अंमळ वर पाहिलें आणि न ओळखल्यासारखें करून विचारलें "कोण ! आमच्या मामाचे घरून पळून गेलेला तो गोंदू का इथं आला आहे ? अन् त्यानं लग्न कधीं केलं ? मामा मेले तेव्हां आला वाटतं शुद्धीवर ?"

हें भाषण ऐकून राधाबाईंच्या अंगाचा संताप झाला; आणि हे अपमानकारक शब्द प्रथम—स्वागताच्या वेळींच आले तेव्हां पुढें आणखी काय यायचें आहे कोण जाणे, असें वाटून ते कानीं पडण्यापूर्वींच चांगलें चरचरीत उत्तर देऊन चालतें व्हावें, असेंहि त्यांनां वाटूं लागलें. पण पहिल्याच भेटीला आणि तेंहि एका वाक्यावरून माणसाची परीक्षा करणें चांगलें नाहीं; पुष्कळ वेळां वरून अगदीं ओबडधोबड आणि खडबडीत दिसणाऱ्या खडकाच्या पोटांतच स्वच्छ आणि मधुर अशा अमृतासारख्या पाण्याचा झरा निघतो. त्याप्रमाणें वरून उर्मट दिसणाऱ्या माणसांचें अंतःकरण पुष्कळ वेळां फार कोमल आणि प्रेमानें तुडुंब भरलेलें असल्याचें पहाण्यांत येतें, ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत येऊन त्यांनीं आपल्या मनाला पुनः स्थिर करून उत्तर केलें "आपण बरोबर ताडलं. लहानपणीं काय झालं असेल न कळे, पण आतां मामंजींची फार आठवण येत असते—"

गोदूताईनीं तिरस्कारमुद्रेनें विचारिलें "पण तुह्मी पुणं सोडून इथं कां आलांत?"

राधाबाई ह्मणाल्या "मीं मघाशीं सांगितलंना ? पुण्याची हवा मानवेना तेव्हां दाक्तरानं सांगितलं शिवापुराला जाऊन रहा; तेव्हां इथं येणं भाग पडलं. पण इथं आमची नाहीं कुणाची ओळख. तेव्हां इथं नोकरीचाकरी किंवा शिकवण्यातरी कोण मिळवून देतो ? इकडे आज दोनतीन महिने दुखणं चालूच आहे. आणि दुसरीकडून नोकरीची काळजी. वकीलसाहेबांचा अन् मुनसबसाहेबांचा चांगला घरोबा आहे ह्मणून ऐकतों. तेव्हां ह्मटलं आपण पुरुषांकडून शब्द टाकविला तर सहज काम होईल. नोकरी नसली तर निदान मुनसबांच्या इथली शिकवणीतर मिळेल आपल्या शब्दानं—"

राधाबाई आपल्याकडे यात्रा करण्यास आल्या आहेत, हें पाहूनतर गोदूताईंचा कुर्रा अधिकच वाढला. त्यांनीं सतरा वेळ मुरका मारला आणि त्या तिरस्कारानें पाहूं लागल्या. मग हळूंच आढ्यतेच्या स्वरानें ह्मणतात "तुह्मांला इकडे येण्याची सल्ला कुणीं शहाण्यानें दिली त्याच्या अकलेची तारीफच करायला हवी आहे! अहो, इथं नोकऱ्यांकरितां जोडे फाडणारे आणि शिकवण्या मिळविण्याकरितां हेलपाटे घालणारे कमी होते, ह्मणून का तुह्मीं आणखी येऊन त्यांत भर पाडलीत? कुणीना कुणी येऊन असंच डोचकं उठवित बसतं! कोण बाई हा मेला त्रास!! माझं ऐकाल तर तुह्मी या शिवापुरांत क्षणभरसुद्धां राहूं नका. इथं कांहीं हे लोक तुमचा लग्गा लागूं द्यायचे नाहींत—"

राधाबाईंसारख्या मानी स्वभावाच्या स्त्रीला हे शब्द ह्मणजे तापलेल्या शिशाच्या रसाइतके कानांला चरचरीत लागले. त्या आजच्यासारख्या पोटाच्या विवंचनेंत नसत्या तर कधींच फाडकन् उत्तर देऊन तेथून चालत्या झाल्या असत्या. तसें त्यांनां आतां करतां येईना हें जरी खरें आहे, तरी त्यांच्या काळजाला ते शब्द इतके झोंबले कीं, कांहीं पुसूं नये. गोदूताई इतकी कुर्रेबाज आणि ताठलेली आहे, हें त्यांनां अगोदर कळतें, तर त्या मुळीं येत्याच ना. आतांतरी गोविंदरावांनीं फारच आग्रह केला आणि त्यांची मर्जीतर मोडवेना, ह्मणून त्या आल्या होत्या। 'याञ्चा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा' ही कालिदासोक्ति अगदीं खरी आहे. व्यवहारांत पदोपदीं तिची सत्यता दिसून येते. गोदूताईंच्या बोलण्याला कांहीं उत्तर दिलेंच पाहिजे ह्मणून राधाबाई ह्मणाल्या "आह्मांला इथला प्रकार अगोदर कळता तर आह्मीतरी इथं कशाला आलों असतों? पण आतां काय त्याचं! येऊं नये, येऊन पडलों खरीं, आतां पुढची तजवीजतर पाहिली पाहिजे—"

"तुह्मीं कुठं घर घेतलं आहे?"

"राजाराम वाखळींत अण्णासाहेब यांचं एक दुमजली लहानसं घर आहे तें."

अण्णासाहेबांचीं घरें भाड्यानें देणेंघेणें वगैरे कामें त्र्यंबकराव वकील करित असत. तेव्हां साहजिकच राधाबाईंच्या तोंडचे ते शब्द ऐकून गोदूताईला कसेंसेंच झालें आणि यांनां घर देण्यांत आपल्या यजमानांची किंवा त्यांच्या कारकुनाची मोठी चूक झाली, असें वाटून त्या आंतल्या आंत ओंठ चावूं लागल्या. जणूंकाय आपल्या मनांतले विकार बाहेर पडूं नयेत. ह्मणून त्या आपल्या तोंडाचा दरवाजा घट्ट ओढून घेण्याच्या प्रयत्नांत होत्या. राधाबाईंच्या लक्ष्यांत ही गोष्ट आली नाहीं. त्या ह्मणाल्या "हो, बरी आठवण झाली. मला आणखी एक गोष्ट विचारायला

सांगितलं आहे. मामंजी वारले ह्मणून कोणत्याशा वर्तमानपत्रांत वाचलं. मरतांना तरी त्यांनीं इकडची आठवण काढली होती का ?"

काय चमत्कार पहा ! बाबासाहेबांच्या मरणाची गोष्ट काढतांच गोदूताईंची मुद्रा एकदम बदलली. त्यांची वृत्ति चंचल झाली. घटकेंत त्यांचा चेहरा अगदीं फिकट, निस्तेज दिसे; घटकेंत तो रागानें लाल झाल्यासारखा होई. बराच वेळ त्यांच्या तोंडून शब्द फुटेना. मग त्या ह्मणाल्या " हो, मरतांना मामांनीं गोंदूची वरचेवर आठवण केली. ते ह्मणाले 'अजून तो परत येईल अन् माझी क्षमा मागेल तर मी त्याचा अपराध पोटांत घालीन.' त्यांचे नक्की शब्द माझे लक्ष्यांत नाहींत, पण असंच कांहींसं ते मरतांना ह्मणाले."

यावर राधाबाईनीं विचारिलें "त्यांना मूलबाळतर कांहीं नव्हतंच: मग जिंदगीची व्यवस्था त्यांनीं कशी काय केली ?"

हा प्रश्न ऐकतांचतर गोदूताईनीं खालीं मान घातली आणि आपल्या हातांतल्या कांकणांकडे त्या पुनः पाहूं लागल्या. वर मान करून त्यांच्यानें उत्तर देववेना. त्या ह्मणाल्या "त्यांनीं व्यवस्थापत्र करून ठेविलं होतं, त्याप्रमाणं व्यवस्था झाली."

खोटें काम करणारांचें मन कितीहि निर्ढावलेलें असलें तरी सत्यापुढें प्रथमतरी त्यांनां मान वांकवावीच लागते. गोदूताईनांहि वरील वाक्य उच्चारतांना तशीच मान खालीं घालावी लागली व तेवढें वाक्य भीतभीत उच्चारल्यानंतर त्यांच्या मनाला थोडासा धीर आला. मग त्यांनीं वर मान करून ह्मटलें "मामांच्या इच्छेप्रमाणं त्यांची सगळी जिंदगी मला मिळाली आहे. मामांच्या मर्जीविरुद्ध जाऊन त्यांची जिंदगी आपणांस मिळावी अशी गोंदूच्यानं इच्छातरी बाई कशी करवली !"

या शेवटच्या वाक्याचा पुनः राधाबाईनां झटका आला. पण याहि वेळेस त्यांनीं आपला राग बाहेर दिसूं न देतां ह्मटलें " आह्मांला नको बाई दुसऱ्याची जिंदगीबिंदगी. ह्मण आहे ना 'शीर सलामत तर पगड्या पंच्यायशीं !' देवानं माणसं खुषाल ठेवावीं ह्मणजे झालं—"

गोदूताई ह्मणाल्या " गोंदूनं मामांची मर्जी दोन बाबतींत मोडली नसती तर आज सगळी जिंदगी त्याचीच झाली असती. एकतर ते सावकारीचा धंदा पुढं चालीव ह्मणून ह्मणाले तें त्यानं ऐकलं नाहीं; अन् दुसरं आपल्याला विचारल्याशिवाय लग्न करूं नको ह्मणून सांगितलं असतां तेंहि त्यानं ऐकलं नाहीं; झालं तें झालं, आतां काय त्याचं ! गोंदूला आतां माझा निरोप सांगा कीं, इथं रहाण्यांत आतां

कांहीं अर्थ नाहीं. इथं नोकरी मिळेल या आशेवर वर्षानुवर्षं पदरचं खाऊन रहाण्यापेक्षां दुसरीकडे कुठंतरी तूं आपली सोय पहा ह्मणावं-"

इतकें बोलून गोदूताईंनीं घरांतल्या एका बाईला हांक मारून यांनां कुंकू लाव ह्मणून सांगितलें. राधाबाई याचा अर्थ समजल्या आणि कुंकू लावून तत्काळ मागें परतल्या.

राधाबाई गेल्यावर गोदूताईंनीं आपल्या नोकराला बोलावून " ही बाई पुनः कधीं आली तर बाईसाहेब घरीं नाहींत ह्मणून साफ सांग व तिला घरांत घेऊं नकोस ! " ह्मणून बजाविलें.

त्या दिवशीं रात्रीं त्रिंबकराव घरीं आल्यावर गोदूताईंनीं घाबऱ्याघाबऱ्या मुद्रेनें गोविंदराव आपल्या कुटुंबासहवर्तमान शिवापुरास रहाण्यासाठीं आल्याबद्दल व राधाबाईंनीं बाबासाहेबांच्या जिंदगीच्या व्यवस्थेची गोष्ट काढल्याबद्दल सांगितलें. तेव्हां ते गोदूताईंचें समाधान करण्यासाठीं ह्मणाले " ऊंः ! आतां त्यांनां कोण दाद देतो ! बाबासाहेबांनीं तोंडीं पुष्कळ सांगितलें, पण तें ऐकायलातर तूं अन् मी अशीं दोघेंच होतों कीं नाहीं ? तिसऱ्या कुणीं ऐकिलें असतें तर त्याची फिकीर ! लेख तुझ्या नांवचा आहे, तो कायम राहिला. तोंडचे बोल गोविंदरावांबद्दलचे होते ते काय वाऱ्याबरोबर निघून गेले ! त्यांचा मागमूसदेखील आतां उरला नाहीं. लेखी दस्तऐवजाविषयीं शंका घेण्याची आतां कुणाची प्राज्ञा आहे तें पहातों."

हे शब्द ऐकून गोदूताईंच्या जिवांत जीव आला. तथापि ही गोविंदरावांची ब्याद एकदाची शिवापुरांतून बाहेर घालविल्याखेरीज आपल्याला सुखानें झोंप येणार नाहीं, असें गोदूताई बोलल्यावर त्रिंबकरावांनीं त्याचीहि युक्ति शोधून काढिली.

त्रिंबकराव आणि गोदूताई यांनीं बाबासाहेबांच्या शेवटच्या इच्छेप्रमाणें कांहींएक केलें नाहीं, हें सांगावयास नकोच. त्रिंबकराव ह्मणजे कांहीं सामान्य असामी होती असें नाहीं. वकिलीचा धंदा, अण्णासाहेबांकडचा भरपुर पगार व व्याजबट्ट्याचा रोजगार मिळून चांगला पांचचारशें रुपये दरमहा त्यांनां पडत असे. पण पैशाचा लोभ मोठा कठिण आहे ! तो कोणाकडून कशीं पापें करवील, याचा नेम नाहीं. गोदूताईंलातर लहानपणापासूनच चांगलेंसें शिक्षण नव्हतें आणि त्यांनां दागिन्यांचा सोसहि फार होता. यामुळें त्या या लोभाच्या जाळ्यांत सांपडल्या, यांत नवल नाहीं. पण त्रिंबकराव एवढे शिकलेसवरलेले आणि लोकांत प्रतिष्ठित ह्मणून गणले जाणारे असून तेहि या पाशांत अडकले, तस्मात् लोभ हा सर्वांत महान् पराक्रमी मनोविकार आहे ह्मणून ह्मणतात, तें खोटें नव्हे !

## प्रकरण २१ वें.

## स्वप्न !

हळूहळू पावसाळा संपत आला. या दोनतीन महिन्यांत गोविंदराव घरांतून बाहेर ह्मणून कसेते बिलकूल पडले नव्हते. खोकल्यानेंतर त्यांचा सारखा पिच्छा पुरविला होता. तो त्यांनां रात्रीं बिछान्यावर मुळींच पाठ टेकूं देत नसे. डाक्तरचें औषध सुरू होतेंच. त्यानें पुष्कळ गुण वाटला असता, पण काळजीनें त्यांचें शरीर पोखरून टाकिलें होतें, त्याला औषध काय करणार ! इकडेतर 'शिल्लक बाकी बसती पूज्य' होण्याची वेळ आली होती. आजचा दिवस कसाबसा गेला, उद्यांचा कसा जाईल, ही विवंचना गोविंदरावांला आणि राधाबाईला रात्रंदिवस जाचित होती. ओलीकोरडी भाकर मिळण्याची मारामार, मग गोड घांसाचीतर गोष्टच बोलावयास नको. आणि आजारी माणसाच्या तोंडाला रुचि यावयालातर चार चमचमीत पदार्थ असावे लागतात. गोविंदरावांनीं ते कोठून आणावे ? अशा संकटाचे प्रसंगीं मनुष्याला आशा ही मोठें बळ देत असते. त्याप्रमाणें दुर्बल गोविंदरावांला आशा वाटूं लागली कीं, आपण दिवाळीपर्यंत खास बरे होऊन आपल्या कामधंद्याला लागूं. अरेरे! केवढी ही वेडी समजूत! केवढा हा भ्रम!

पुण्याच्या डाक्तरांनीं त्यांनां सांगितलें होतें कीं, तुह्मी प्रकृतीला जपाल तर बरेच दिवस जगाल. गोविंदराव पुढें पावसांत भिजतील, त्यांचें संधिवाताचें दुखणें जोर करील, आणि त्यांनां पोटाची विवंचना जाळित राहून ती त्यांच्या आयुष्याची दोरी आंखूड करील, हें त्यांनां अगोदर काय ठाऊक !

होतांहोतां दसरा नजीक येऊन ठेपला. गोविंदरावांची वृत्ति अलीकडे जरा उल्हसित दिसत होती. आतां मला रोग ह्मणून कांहीं राहिला नाहीं; फक्त क्षीणता आहे, ती हळूहळू जाईल, असें गोविंदराव ह्मणत. राधाबाईलाहि मधूनमधून तशीच उमेद वाटून त्यांच्या मुद्रेवर टवटवी येई. आतां दसऱ्याला दोनच दिवस राहिले होते. शिवापुराला नवरात्रांत मोठी जत्रा भरत असते आणि मुलें आई-बापांपासून दोनचार पैसे खाऊकरतां घेऊन जत्रेंत विकावयास येणाऱ्या वस्तूंपकीं एखादी स्वल्पमोलाची पण मोहक वस्तु विकत घेतात. राधाबाईचीं मुलें अजून लहान होतीं. आपली आई आज केवढ्या संकटांत पडली आहे, हें त्या बिचाऱ्या अर्भकांनां काय ठाऊक ? इतर सोबतीचीं मुलें जत्रेला चल ह्मणून त्यांनां आग्रह करून बोलावूं लागलीं तशीं तींहि जाण्यास उत्सुक झालीं, आणि आईजवळ खाऊकरितां

पैसे मागूं लागलीं. तेव्हां राधाबाईच्या पोटांत कसें भडभडून आलें तें यथार्थरीत्या वर्णन करून सांगण्यास आमची लेखणी असमर्थ आहे. मुलांनां पैसे दिल्यास ते त्यांचा दुरुपयोग करणार नाहींत, एवढी आपल्या मुलांविषयीं तिची पक्की खात्री होती. पण सदुपयोगाला लावण्यालातरी जवळ पैसे पाहिजेत ना ? ते कोठून आणावयाचे ? मुळींच न द्यावे तर बरोबरचीं सगळीं मुलें तऱ्हेतऱ्हेचे खाण्याचे पदार्थ व चित्रें वगैरे घेतील आणि आपणास मात्र नाहींत, हें पाहून आपलीं मुलें किती कष्टी होतील, याचाहि विचार केला पाहिजे. ह्मणून राधाबाईनीं शेवटीं असें ठरविलें कीं, मुलांनां अशा प्रसंगीं कष्टी न ठेवतां आपल्या शक्तीप्रमाणें एकेकच पैसा खाऊसाठीं द्यावा. असा विचार करून त्यांनीं मुलांनां जवळ बोलाविलें, आणि त्यांच्या हातावर एकेक पैसा ठेवून प्रेमानें सर्वांचा मुका घेतला आणि त्यांनां त्या पैशाचा उपयोग कसा करावा, जत्रेंत कसें सावधगिरीनें रहावें, सोबत्यांशीं कसें वागावें व कोणती मौज कशी पहावी, याबद्दल बोधाचे दोन शब्द सांगून त्यांनां सोबत्यांबरोबर जाण्यास परवानगी दिली.

आज आश्विन शुद्ध अष्टमी. गांवांतल्या बायका देवीच्या दर्शनाला जाण्यास निघाल्या. पुष्कळांचा देवीच्या दर्शनाला रोज जाण्याचा नेम असे. राधाबाई धर्मनिष्ठ असल्यामुळें व विशेषतः आतां त्यांच्यावर संकट आल्यामुळें जगदंबेच्या पायां पडून तिची करुणा भाकावी, असें त्या साध्वीच्या मनांत किती तरी वेळां येई; पण घरांत मुलाबाळांचें काम, स्वयंपाक व नवऱ्याचें औषधपाणी करून उरल्या वेळांत त्या लोंकरीच्या टोप्या, गळपट्टे वगैरे विणून चार पैसे मिळवीत. असें त्यांनीं केलें नसतें तर आज त्या काय खात्या आणि मुलांनां काय खाऊं घालत्या ? अशा एकसारख्या कामांत गुंतल्यामुळें आजपर्यंत त्यांनां देवीच्या दर्शनाला जाण्याला सवडच मिळाली नाहीं; पण आज हजार कामें टाकून जगदंबेच्या दर्शनास जाण्याचा त्यांचा विचार ठरला व मुलांनींहि कपडे वगैरे घालून जाण्याची तयारी केली. गंगाधरानें घरीं गोविंदरावांपाशीं रहावें, असें ठरलें. त्यानें आईबरोबर जाण्याविषयीं एकदा आपली इच्छा दर्शविली होती, "पण घरीं कुणीच नाहीं, त्यापेक्षां आतां तूं रहा आणि आह्मी परत आल्यावर तूं आपल्या सोबत्यांबरोबर जा." असें आईनें सांगितल्यावर तो मुकाट्यानें राहिला.

गोविंदरावांची तब्यत आज फारच चांगली दिसली. त्यांनीं कसातरी सत्कार्यीं वेळ जावा ह्मणून केकावलीचें पुस्तक वाचण्यास गंगाधरास सांगितलें. वाचतां वाचतां पुढील केका आली—

**तरेन तुमच्या बळें भव-महानदी, नाविका !**
**तुह्मीच मग आतरास्तव मला सुदीना विका;**
**असे विदित वासही मज सदाश्रमींचा; करा**
**दया, गुण पहा; सवे मज सदा श्रमीं चाकरा.**

ही केका ऐकून गोविंदराव आनंदानें डुलत राहिले आणि त्या डोलण्याच्या नादांत ते सहज ह्मणाले "मीतर नदीच्या तीराशीं येऊन पोहोंचलों आहें, आणि हेंच समाधान मला मोठें आहे—"

गंगाधराला या बोलण्याचा अर्थ कळेना. त्यानें विचारिलें "कोणती नदी बाबा?"

गोविंदराव ह्मणाले "अरे, दुसरी कोणती नदी असणार ? आपण ज्या भव-महानदींतून पार होत आहों तीच ! या नदींतून सुखरूप पार जाऊन पैलतीराला पोहोंचणारे भाग्यवान् ह्मटले पाहिजेत. जे ईश्वरावर निष्ठा ठेवून आपलीं इह-लोकचीं कर्तव्यें यथासांग करितात, त्यांना या संसाररूपी नदींतून सुखरूपपणें पलीकडे उतरून नेण्याची जबाबदारी प्रत्यक्ष भगवंतानें पतकरली आहे. याहून महद्भाग्य तें कोणतें असणार ? ही केका ऐकिल्यापासून माझ्या मनाला कांहीं विलक्षण शांति प्राप्त झाली आहे. आतां माझी सर्व काळजी दूर झाली."

गोविंदराव याच केकेवर पुष्कळ विचार करित पडले होते. त्यांच्या मनांतली सर्व काळजी दूर होऊन त्यांचे ठायीं विलक्षण शांति उत्पन्न झाली होती, याचें प्रत्यक्ष प्रमाण, आपण मेल्यावर पाठीमागें आपल्या बायकामुलांचें कसें होईल या चिंतेनें ज्यांचा डोळ्यांशीं डोळा लागत नव्हता तेच गोविंदराव आतां थोडक्या वेळांत चांगले निद्रिस्त झाले. गंगाधरानें हें पाहून आपलें वाचन बंद ठेविलें आणि तो मुकाट्यानें बसून राहिला.

इकडे राधाबाई व मुलें देवीचें दर्शन घेऊन परत आलीं; पण गोविंदरावांचा डोळा लागला आहे हें पाहून गडबड न करतां मुकाट्यानें घरांत गेलीं.

आई परत आलेली पाहून गंगाधर घरांत गेला आणि तिला ह्मणूं लागला "आई, बाबा किनई आतां लवकर बरे होतील—"

राधाबाईनीं गंगाधराच्या मुखाचें एक चुंबन घेऊन ह्मटलें "तुझ्या तोंडांत साखर पडो; पण हें तूं कशावरून ह्मणतोस ?"

"कशावरून ह्मणजे ? बाबाच स्वतः ह्मणत होते कीं, आतां आपली सगळी काळजी दूर झाली आहे. आतां पूर्वींच्यासारखी निःशक्तता आपल्याला वाटत नाहीं. असेंच चाललें तर एका महिन्यांत आपण चांगले बरे होऊं—"

यावर राधाबाई ह्मणाल्या "काय परमेश्वर करील तें खरं !"

असें माजघरांत त्यांचें बोलणें चाललें आहे इतक्यांत गोविंदराव झोंपेंत एकदम दचकून ओरडले आणि ह्मणाले "मी कुठें आहें ?"

गंगाधरानें धावत धावत येऊन पाहिलें आणि ह्मटलें "बाबा, असें काय करतां? तुह्मी चांगले निजलेले असून मीं कुठें आहें ह्मणून काय विचारतां ?"

गंगाधराचा शब्द ऐकून गोविंदराव झोंपेंतून जागे झाले आणि ह्मणाले "मी निजलों आहें ? हो, केका ऐकतांऐकतां माझा डोळा लागला होता खराच. मग मीं पाहिलें तें सगळें स्वप्नच वाटतें ?"

गंगाधरानें विचारिलें "काय पाहिलें बाबा ?"

इतक्यांत गोविंदरावांच्या बिछान्याभोंवतीं दुसरींहि मुलें गोळा झालीं आणि गोविंदरावांच्या स्वप्नाची हकीगत उत्कंठेनें ऐकूं लागलीं. गोविंदराव ह्मणाले "काय स्वप्नेंतरी विचित्र असतात पहा ! मी आतां इथें चांगला बिछान्यावर निजलों आहें. पण मला आपलें स्वप्नांत दिसलें कीं, मी रस्ता चालत आहें. तो रस्ता फारच-फार रुंद असून त्यावर जाणाऱ्या लोकांची गर्दीहि फार आहे. आह्मी सगळे एकाच दिशेनें जात होतों; त्यांतले कोणी अडखळून पडत होते, कोणी–"

मध्येंच गंगूनें विचारलें "बाबा, तुह्मीदिखील लहान मुलांसारखे पाय अडखळून कसे हो पडलां ?"

गोविंदराव ह्मणाले "रस्ता रुंद होता खरा, पण त्यांत खांचाखळगे मनस्वी होते. जागोजाग कुठें दगडच पडलेले आहेत, कुठें कांटेच पसरले आहेत, कुठें पाण्याचीं डबकींच सांचलीं आहेत, कुठें वेलीचीं जाळीं माजून जाणारायेणारांच्या पायांत लडफडत आहेत, अशा शेंकडों अडचणींतून रस्ता काढित जावें लागत होतें. समोर क्षितिजापाशीं—आभाळ जमिनीला लागलेलें दिसतें तिथें—फारच फार दूर—इथून देवीची टेंकडी जितकी आहे तिच्या हजारोंपट दूर—एक चकचकीत प्रकाश दिसत होता. अहाहा ! काय त्याचा उजेड ! आपणतर बोवा असा उजेड आपल्या जन्मांत नव्हता पाहिला ! असा प्रकाश पाहून एखाद्याचे डोळे दिपूनच गेले असते; पण चमत्कार पहा कीं, त्या प्रकाशानें आमचे डोळे दिपले नाहींत !"

कृष्णा मध्येंच ह्मणाला "बाबा, मी समजलों तो कसला उजेड होता तो. आपल्या देवीच्या डोंगरावर कुणीं दारूचे नळे न् चंद्रज्योती सोडल्या असतील—"

गोविंदरावांनीं कृष्णाच्या बोलण्याकडे लक्ष्यच दिलें नाहीं. ते पुढें ह्मणाले "आह्मी सगळे त्या प्रकाशाकडे धडपड करित जात होतों. पण आह्मी जोंजों जवळ जावें तोंतों तो प्रकाश दूरदूरच जाई. आह्मी त्या प्रकाशावर दृष्टि देऊन चालूं लागलों ह्मणजे आमचीं पावलें भराभर उचलत, पण तिथून आमची दृष्टि हालली कीं आमचें चालणें खुंटलेंच. मग कुणी पडताहेत, कुणाच्या पायांत कांटे मोडताहेत, कुणी चिखलांत फसत आहेत, असा प्रकार होई. तेच आह्मी पुनः त्या प्रकाशाकडे पाहूं लागलों कीं, जणूंकाय कुणीं आह्मांला उचलून सरळ मार्गाला लावावें, तसें आह्मीं आपल्या पायानें नीट चालूं लागावें. पण त्या प्रकाशाकडे टक लावून चालतां येई असे थोडे—फारच थोडे. बाकीच्यांचें चित्त घटकेंत इकडे तर घटकेंत तिकडे असें चंचल होई. अशा रीतीनें जातां जातां आह्मी त्या प्रकाशाच्या जवळजवळ गेलों—"

यावर गंगाधरानें विचारिलें "बाबा, तुह्मी अखेर त्या प्रकाशाच्या अगदीं जवळ जाऊन पोहोंचलां कीं नाहीं ?"

गोविंदराव ह्मणाले "तें आतां स्मरत नाहीं. पण मी बराच जवळ गेलों होतों, एवढें खास; पुढें जाणार इतक्यांत जागा झालों—"

इतक्यांत राधाबाईनीं घरांतून फराळासाठीं मुलांनां हांक मारली. तेव्हां तीं भराभर उठून तिकडे चालतीं झालीं.

गोविंदराव अंमळ तक्याशीं टेंकण्यासाठीं ह्मणून मागें सरकले. राधाबाईहि गोविंदरावांकरितां फराळाचें ताट घेऊन आल्या. इतक्यांत त्यांच्या दृष्टीपुढें किती भयंकर देखावा दिसूं लागला ! गोविंदरावांच्या तोंडांतून रक्ताची गुळणी येऊन त्यांच्या अंगांतले कपडे त्या रक्तानें लाल झाले आहेत आणि त्यांच्या चेहेऱ्यावर प्रेतकळा येऊन ते भयप्रद दिसत आहेत ! त्यांचे डोळे उघडे होते, त्या डोळ्यांवरून स्वताची ही स्थिति पाहून त्यांनां किती वाईट वाटत होतें, त्याची कल्पना करतां येत होती. त्यांच्या मनांतून कांहीं बोलावेंसें होतें, असें दिसलें; पण एखादा शब्द बोलण्याएवढीसुद्धां शक्ति आतां राहिली नव्हती. हा देखावा पहातांच राधाबाईनीं भयानें किंकाळी फोडली. त्यांच्या डोळ्यापुढें काजवे चमकूं लागले. त्यांनां मूर्च्छा येऊन त्या खालीं पडल्या. त्यांची किंकाळी ऐकून मुलें धावून आलीं आणि गळा काढून रडूं लागलीं. हा एकच आकांत ऐकून शेजारची एक बाई धावून आली. ती प्रथम नारायणरावांनां खबर देण्याकरितां त्यांचे घरीं गेली. तेथें तिनें सांगितलें कीं "कुणीं दुष्टानें गोविंदरावाचा गळा कापून खून केला !"

हें ऐकतांच नारायणराव व जानकीबाई हीं दोघेंहि धावून आलीं. सोनीनें मी येतें म्हणून हट्ट धरला होता, पण जानकीबाईनीं तिचा हात झिटकारून "खबरदार आलीस तर, पायच मोडीन !" असें म्हणून तिला दटाविलें.

नारायणरावांनीं प्रथम गोविंदरावांनां उचलून नीट निजविलें आणि मग हळूच युक्तीनें ओल्या फडक्यानें त्यांच्या तोंडावरचें रक्त पुसून काढिलें आणि आपण डाक्तराला बोलवण्यासाठीं घाईनें निघून गेले.

नारायणराव गेल्यावर जानकीबाईनें राधाबाईला समजावण्याच्या हेतूनें म्हटलें "असं कांहीं होईल असं मला केव्हांपासूनच समजून चुकलं होतं. पण तुम्हां सगळ्यांनां गोविंदरावांची बरी होण्याची उमेद वाटत होती. तींत मीं कशाला बाई मिठाचा खडा टाकूं, म्हणून बोलल्यें नाहीं."

या शब्दांनीं राधाबाईचें समाधानतर झालें नाहींच; उलट आतां आपल्या आशेचा एकदम अंत झाला अशी जी त्यांनां धास्ती वाटत होती, तीच जानकीबाईच्या या बोलण्यानें खरी असल्याबद्दल राधाबाईची खात्री झाली.

इतक्यांत गोविंदरावांनीं अंमळ ओंठ हालविल्यासारखें दिसलें. त्यांनां पाणी पाहिजे होतें. थोडीशी गंगा तोंडांत घातल्यावर त्यांनां अंमळ हुषारी वाटूं लागली आणि एकदा मुलांचें शेवटचें चुंबन घ्यावें म्हणून त्यांनीं मुलांनां आपलेपाशीं बोलाविलें.

राधाबाईला भीति पडली कीं, गोविंदराव मुलांनां बोलावून मघांसारखे पुष्कळ वेळ बोलत राहून उगाच शीण करून घेतील. म्हणून त्यांनीं न बोलण्याविषयीं फार नम्रतापूर्वक सांगितलें. हें पाहून गोविंदरावांनां हंसूं आलें. ते मनांत म्हणाले "आतां मीं बोलून शीण केला काय आणि उगाच स्वस्थ पडलों काय, सारखेंच आहे." म्हणून राधाबाईच्या काकुळतीच्या विनवणीकडे लक्ष्य न देतां ते म्हणाले "बाळांनों ! माझा प्रवास संपला. मी त्या प्रकाशाच्या अगदीं जवळजवळ गेलों आहें. मघांशीं मीं तुम्हांला स्वप्नाची जी हकीगत सांगितली, तें स्वप्न नव्हे—तर खरोखर लवकरच पुढें घडून येणारी गोष्ट आहे, हें मला आतां कळलें. तुम्हांला त्या हकीगतीचा गूढ अर्थ समजून सांगावा, अशी परमेश्वराची इच्छा दिसते. तुम्ही आम्ही सगळे या संसारांतले प्रवासी आहों. आपणांला त्या समोर दिसणाऱ्या चकचकीत प्रकाशाकडे जावयाचें आहे. वाटेंत डोंगर, नद्यानाले, जंगलें लागतील त्यांतून परमेश्वराच्याच साह्यानें पार पडलें पाहिजे. प्रत्येकाच्या मार्गांत कांहींना कांहीं अडचणी यावयाच्याच. पण त्यांतून पार पडण्याच्या कामीं

त्या प्रकाशाचें-परमेश्वरी कृपेचें-साह्य घ्यावें. बाळांनो ! नेहमीं परमेश्वराचें भय चित्तांत बाळगा, ह्मणजे कुठेंहि आणि केव्हांहि वाईट काम करण्यास तुमचे हात धजणार नाहींत. तुह्मी संकटाचे वेळीं त्याचें साह्य मागा, ह्मणजे तें तुह्मांला चटकन् मिळेल. नेहमीं त्याचे ठायीं तुमचा दृढ भाव राहूं द्या, ह्मणजे तो तुमचा हात धरून अडचणीच्या मार्गांतून तुह्मांला सुरक्षित नेईल. हे माझे शब्द तुह्मीं लक्ष्यांत ठेविले, ह्मणजे या लोकीं तुमच्या जन्माचें सार्थक होईल. आतां मी जातों. तुह्मी सुखानें नांदा, गुण्यागोविंदानें रहा, सत्कार्यें करून नांवलौकिक मिळवा आणि तुमचें तुह्मांला कळूं लागेपर्यंत तुमच्या आईच्या सांगण्याप्रमाणें वागा, एवढेंच अखेरचें माझें तुह्मांला सांगणें आहे. ईश्वर तुह्मांला त्याप्रमाणें वागण्याची सद्बुद्धि देओ."

असें ह्मणून गोविंदरावांनीं प्रेमपूर्ण नेत्रांनीं एकदा मुलांकडे पाहिलें आणि नंतर राधाबाईंकडे तशाच प्रेमानें पाहून मग डोळे मिटले.

गोविंदरावांचें भाषण ऐकून मुलांचें अंतःकरण गहिंवरलें; राधाबाईंच्या मनांत तर शोक, दुःख, निराशा, चिंता, भय आणि प्रेमाचा अंत होण्यापासून उद्भवणारा अनिर्वचनीय मनोभाव यांनीं अशी खळबळ उडवून दिली कीं, तिचें वर्णन करणें आमच्या शक्तीबाहेरचें आहे.

थोड्या वेळानें नारायणराव डाक्तरला घेऊन आले. डाक्तरसाहेबांनीं गोविंदरावांकडे अंमळ पाहिलें, मग त्यांच्या तोंडाशीं आपला कान नेला. नंतर त्यांच्या छातीवरचें पांघरूण काढून एक नळी त्यांच्या छातीला लावून छातीची धडधड ऐकिली आणि शेवटीं एक उसासा टाकून नारायणरावांना इंग्रजींत दोन शब्द सांगून जास्तकमी कांहींएक न बोलतां ते निघून गेले.

"झालें, आटोपला कारभार !"एवढाच त्या इंग्रजी शब्दांचा मतलब होता.

प्रकरण २२ वें.

## आईचा उपदेश.

राधाबाईंचा सौभाग्यरवि मावळून असां एक आठवडा लोटला होता. या अवधींत त्यांच्या शोकाचा पहिला उमाळाहि पुरा जिरला नव्हता, तोंच शोकाबरोबर चिंतेचाहि भार वहाण्याचा प्रसंग त्यांच्या एकट्यावर येऊन पडला. घरांत कर्ता करता पुरुष कोणी नाहीं, जवळ दांतावर मारावयाला पैसा नाहीं, आणि नोकरी करून भाकरी मिळवितां येण्यासारखें मुलांचें वयहि नाहीं ! अशा स्थितींत राधाबाईंला सर्व जग भयाण दिसावें, त्यांचें अंतःकरण चिंतेनें करपून जावें, आतां कोठें जाऊं आणि कोणाच्या तोंडांकडे पाहूं अशी वेड्यासारखी स्थिति व्हावी, हें साहजिकच आहे. पण राधाबाईंची ईश्वराचे ठिकाणीं दृढ श्रद्धा होती. त्याची कृपा असल्यावर अशीं शेंकडों संकटें आलीं तरी अखेर त्यांतून आपण पार पडूं, अशी त्यांची पक्की खात्री होती; आणि अशीच श्रद्धा आपल्या मुलांच्याहि मनांत त्यांनीं उत्पन्न केली होती. पण त्या कितीहि धीराच्या असल्या आणि ईश्वराचे ठायीं त्यांचा दृढ भाव असला, तरी एखादे वेळींतरी भावी स्थितीचा काळाकुट्ट अंधकार पाहून त्यांचें मन भयभीत व्हावें, मागील सुखाच्या दिवसांची आठवण होऊन अंतःकरण शोकाकुल व्हावें आणि आंतल्या मनोवृत्तींनीं धीराचा मजबूत कोट फोडून बाहेर पडावें, हें मनुष्यस्वभावास उचितच होतें. राधाबाई कितीहि धीराच्या असल्या तरी त्यांच्या अंगीं कांहीं अमानुष शक्ति नव्हती. उलट त्यांचें अंतःकरण कोमल आणि दयामृतानें थबथबलेलें होतें, तेव्हां एखादे वेळेस त्या एकट्या बसल्या म्हणजे त्यांच्या नेत्रांतून दुःखाश्रूंचे लोट बाहेर यावे, यांत कांहीं नवल नव्हतें.

एकदा त्या अशा दुःखाश्रु गाळित एकट्या बसल्या असतां गंगाधर तेथें अवचित कांहीं कारणानें आला आणि राधाबाईंला रडतांना पाहून एकदम तटस्थ होऊन उभा राहिला. गंगाधराला पहातांच राधाबाईंनीं आपलें दुःख आवरून डोळे पुसले आणि त्याला पोटाशीं धरलें. गंगाधरानें रडण्याचें कारण विचारलें तेव्हां त्यांनीं पहिल्यानें कांहींतरी उडवाउडवीचीं उत्तरें दिलीं. पण गंगाधर अधिकच उत्सुकतेनें विचारूं लागला तेव्हां राधाबाई म्हणाल्या "बाळा, काय सांगूं ? आपल्यावर देव कोपला आहे. त्यामुळं आपली आज अशी स्थिति झाली आहे ! आतां आपलं कसं होईल, ही चिंता मला येऊन पडली आहे. आतां यीं माझ्या सोन्यासारख्या लेंकरांनां पूर्वींच्यासारखं चांगलं खायालाप्यायाला कोण देईल ?

त्यांनां कोण शिकवील ? तुह्मांला आतां गरीबीनं रहावं लागेल, जाडीभरडी भाकर खावी लागेल, आणि तीहि या अभागिनीच्या हातून वेळेवर मिळेल कीं नाहीं कोण जाणे ! बाळा, आपल्याला राह्यला स्वताचं घरसुद्धां नाहीं. भाड्याकरितां घरवाल्याचा सारखा तगादा लागलाच आहे. त्याचं तीन महिन्यांचं भाडं आतां कुठून देऊं ? मामांला ही स्थिति कळविली आहे—त्यांच्याकडून कांहीं खर्चाला येईल अशी खात्रीहि आहे, पण तोंपर्यंत घरवाल्यानं दम धरला पाहिजेना ?"

राधाबाईंच्या मुलांमध्यें गंगाधर सर्वांत वडील खरा, पण अद्याप अजाण होता. संसाराची काळजी वहाण्याचें त्याचें वय नव्हतें, आणि व्यवहाराची माहिती तर त्याला बिलकूल नव्हती. तो ह्मणाला "आई, मग इथें रहाण्यापेक्षां आपण पुण्यासच जाऊं कसे! इथेंतरी काय अधिक आहे ? तिथलें घर इथल्यापेक्षां किती चांगलें आणि मोठें आहे!"

राधाबाई ह्मणाल्या "अरे, पण इथलं भाडं दिल्याखेरीज इथून हालूं कोण देईल बाबा आपल्याला ? आणि आपण पुण्याला जाऊन पडलों असंहि घटकाभर मानिलं, तरी तिथं आपल्याला खाऊं कोण घालील ? छेः, मीं पुष्कळ विचार करून पाहिला, पण पुढला मार्ग मला दिसत नाहीं. आतां जानकीबाई ह्मणतात तसंच केलं पाहिजे. घरांतलं थोडंबहुत सामान—पेट्या, खुर्च्या, टेबलं—विकून घरभाडं चुकतं करावं आणि मग पुढं कांहींतरी उद्योग करून पोट भरावं झालं."

गंगाधरासारख्या अल्पवयी मुलाला या गोष्टी कोठून समजणार ? आईनें उद्योग करून आपल्या पोटासाठीं पैसे मिळवावयाचे, हें त्याच्या दृष्टीला कांहीं चमत्कारिकच दिसलें. ह्मणून तो अंमळ चकित होऊन राधाबाईंच्या तोंडाकडे पाहूं लागला. तेव्हां त्यांनीं आपला सगळा बेत त्याच्या गळीं उतरविला. कशिद्याचीं व शिवणकामें करून, टोप्या विणून व मुलींच्या शिकवण्या शिकवून पोटाची सोय कशीतरी लावितां येईल; पण राधाबाईला फारसें इंग्रजी येत नव्हतें तेव्हां मुलांच्या विद्याभ्यासाची सोय कशी लागेल, ही चिंता त्यांनां येऊन पडली. त्या ह्मणाल्या "एका गोष्टीविषयीं मला फार मोठा विचार येऊन पडला आहे आणि ती गोष्ट माझ्या हातची नाहीं. तुह्मांला शाळेंत घातलं तर फी जबर पडेल, ती मी कुठून देणार ? बरं न घालावं तर तुमचं इंग्रजी शिकणं कसं व्हावं ? मी मराठी चार यत्ता घरीं करवून घेईन, पण इंग्रजीसाठीं शाळेंत पाठविणंच भाग आहे."

आईची चिंता दूर करण्याच्या उद्देशानें गंगाधर ह्मणाला "आह्मी इंग्रजी मुळीं शिकणारच नाहीं, ह्मणजे झालें !"

राधाबाईनीं उत्तर केलें "छे छे:, जसं मराठी तसंच इंग्रजी शिक्षण सध्याचे काळीं अगदीं अवश्य आहे. इंग्रजींत मोठमोठे विद्वानांनीं लिहिलेले ग्रंथ आहेत, ते तुझी एरवीं कसे वाचणार? आणि व्यवहारांतदिखील इंग्रजीला जो मान आहे तो निवळ मराठीला नाहीं. इंग्रजी आल्यावांचून नोकरी मिळत नाहीं, वकिली करतां येत नाहीं व डाक्तर होतां येत नाहीं. इंग्रजी शिकला नाहींस तर तूं काय करणार? भिक्षुक होऊन श्राद्ध पक्ष झोडशील हेंच कीं नाहीं? मी नाहींग बाई माझ्या बाळांला भिक्षुक होऊं द्यायची? भिक्षुकाविषयीं तो एक श्लोक आहे तो तुला आठवतो का?"

गंगाधरानें विचारिलें "कोणचा?"

"मलाहि सगळा आठवत नाहीं, पण पहिलीं दोन चरणं येतात. आमचे बाबा थट्टेनं वारंवार ह्मणत असत—(आठवण करून) हां, तो असा आहे कीं, एक भिक्षुक देवाजवळ मागणं मागतो आहे; तो ह्मणतो–'नको देउं देवा जन्म हा भिक्षुकाचा। कधीं तृप्ति नाहीं सदा दीन वाचा॥' भिक्षुक होऊन सदा दुसऱ्यापुढं हात पसरायचा हें तुला आवडतं, का स्वतः मेहनत करून जे कांहीं दहापांच रुपये मिळतील त्यांत संतुष्ट राहणं हें तुला आवडतं?"

"स्वतः कमावून खाणेंच बरें; तेंच मला आवडतें."

"तर मग तुला इंग्रजी शिकलं पाहिजे, आणि लवकर विद्या केली पाहिजे. विद्या ही घरदार, पंचपक्वानांचं जेवण, अंगावरचे दागिने या सगळ्यांहून मोलवान् आहे. एक विद्या असली ह्मणजे हीं सगळीं मिळवितां येतात; आणि नाहीं मिळवितां आलीं, तरी मनुष्याचं मनच विद्येनं असं बनतं कीं, मग त्याला या गोष्टींची फारशी हांव वाटत नाहीं. ह्मणून माझा निश्चय ठरला आहे कीं, माझेजवळ तुह्मांला द्यायला दुसरी कांहीं धनदौलत नसली, तरी माझ्या जिवांतजीव आहे तोंपर्यंत तुमच्या शिक्षणासाठीं पडतील तेवढे कष्ट करून तुह्मांला विद्या देईन. या कामांत फक्त एकजणाचं साह्य असलं ह्मणजे झालं–"

गंगाधरानें उत्सुकतेनें विचारिलें "एकजण कोण? जानकीबाई का?"

राधाबाई ह्मणाल्या "नाहीं. तो सर्व शक्तिमान्, सर्वज्ञ, दीनदयाळू परमेश्वर! जेव्हांजेव्हां आपल्यावर संकटं येतील, आपल्याला अडचणी सोसाव्या लागतील, मन उदास होईल, चित्तसंभ्रम होईल, तेव्हांतेव्हां त्याची आठवण केल्यानं तें सर्व सहन करण्यास अंगीं बळ येतें, मन बहकत नाहीं आणि दुःखांमधेंहि मनास प्रसन्नता वाटते, त्याचा अनुभव तुला येईलच. परमेश्वर जें जें करतो तें तें नेहमीं आपल्या बऱ्यासाठींच असतं आणि त्याच्या आज्ञेवांचून या सृष्टींत

इकडची काडी तिकडे होत नाहीं, हें तूं सदोदित लक्ष्यांत ठेव. ह्मणून संकटाचेच वेळीं परमेश्वराचा धांवा करावा असं नाहीं, तर एरवींसुद्धां त्याचेविषयीं मनांत श्रद्धा, भक्ति व प्रेम ठेवावं, त्याची भीति बाळगावी, प्रत्येक गोष्टींत त्याची प्रेरणा चिंतावी, आणि विवेकबुद्धीस योग्य दिसेल तें करावं. नसत्या 'क्षणिक लोभाला भुलून विवेकाच्या शिकवणीची अमान्यता करूं नये. अशा रीतीनं तुह्मी सगळे वागलां, माझ्या आज्ञेंत राहिलां, खरं बोललां, मन लावून विद्या शिकलां, धर्माचरण केलं, आणि गरीबींतहि आनंदानं दिवस काढिले, तर आहे या स्थितींतहि तुह्मांला जें सुख लागेल तें टोलेजंग वाड्यांत राहणाऱ्या व संपत्तींत लोळणाऱ्या श्रीमंतांसहि मिळणार नाहीं."

राधाबाईचा हा कळकळीचा उपदेश गंगाधराच्या मनावर उत्तम ठसला आणि त्यानं त्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. मुलाचें हें वर्तन पाहून राधाबाईला जें कौतुक व समाधान वाटलें, तसें फारच थोड्या आईबापांच्या वांट्याला येत असेल.

## प्रकरण २३ वें.

## भाड्याबद्दल तगादा.

गोविंदराव निवर्तल्याला दहा दिवसहि पुरे झाले नाहींत तोंच घरभाड्याबद्दल तगादा सुरू झाला. त्रिंबकरावांकडून भाडें मागण्यासाठीं विशीच्या वयांतला, अगदीं उर्मट स्वभावाचा एक तरुण पोरगा राधाबाईच्या घरीं रोज खेपा घालूं लागला. राधाबाईनीं त्याला एकदोनदा पुष्कळ विनवणी करून सांगितलें कीं "आणखी आठ दिवस थांब. तेवढ्यांत माझ्या मामाकडून पैसे येतील, न आल्यास मी थोड्याबहुत सामानाची वाट लावून तुझं भाडं चुकतं करून देईन."

पण तो कांहीं ऐकेना. उर्मटपणाचीं उत्तरें देऊं लागला. तेव्हां राधाबाईनीं गंगाधराला त्रिंबकरावांकडे पाठवून त्यांनां आठ दिवस थांबण्याविषयीं आणि या नोकराच्या उद्धटपणाच्या वर्तनाविषयीं सांगविण्याचा विचार केला. इतक्यांत जानकीबाईला ही खबर लागतांच ती तेथें आली. तिला राधाबाईनीं आपला विचार सांगितला. पण जानकीबाईला त्रिंबकरावांची चांगली माहिती होती. ह्मणून ती ह्मणाली "गंगाधराला पाठवून पहा पाहिजे तर, माझी ना नाहीं; पण त्यापासून कांहीं उपयोग होईल, असं मला नाहीं बाई वाटत. कारण त्रिंबकराव वकील ह्मणजे या उर्मट पोराला शोभणारेच यजमान आहेत ! त्यांची फूस असल्यावांचून का हे मेले एवढे माजले आहेत ? अन् खुद्द त्रिंबकरावांविषयींतरी गांवांतले लोक कोणतं चांगलं बोलताहेत !"

पण आतां त्यांचेकडे गंगाधराला पाठवून नशीबाची परीक्षा पहाण्याखेरीज राधाबाईनां दुसरा उपायच राहिला नव्हता. गंगाधराचे हातीं निरोप देऊन त्याला त्या माणसाबरोबर पाठविल्यावर जानकीबाई एक जरीकांठी खणाळें घेऊन आली, आणि ह्मणाली "राधाबाई, तुमच्यासाठीं पहा मीं हें काम आणलं आहे. घरचेघरीं रात्रींपहांटेस बसून उद्यां संध्याकाळपर्यंत या खणाच्या चार चोळ्या शिवून द्याल तर तुह्मांला आठबारा आणे मिळतील."

राधाबाईनीं मोठ्या खुशीनें तें काम पतकरलें. त्यांच्या उदास मुद्रेवर आतां किंचित् टवटवी आली. ज्या राधाबाईच्या घरीं दोनतीन नोकर राबत होते, त्यांनांच आतां आठचार आण्यांचें काम आल्याबरोबर आनंद वाटावा काय ? परंतु ती बिचारी काय करते ? 'ईश्वरेच्छा बलीयसी' हेंच खरें !

जानकीबाई खण देऊन गेल्यावर राधाबाईनीं चोळ्या शिवण्याच्या कामास लागलीच सुरुवात केली. एकीकडे त्यांचें हातानें काम चाललें होतें आणि दुसरीकडे

डोकें विचारांत भ्रमण करित होतें! मुलें जवळच आपापलीं पुस्तकें घेऊन अभ्यास करित बसलीं होतीं. आतां आपल्या संसाराला कमींतकमी खर्च किती लागेल, घरांत निरुपयोगी सामान कोणकोणतें आहे व त्याची वासलात कशी फायदेशीर रीतीनें लावितां येईल, मुलांच्या विद्याभ्यासाला किती पैसा लागेल, रोज आपण आठ आण्यांचें काम करित गेलों, तर महिन्याचे कांटीं पंधरा रुपये मिळवूं, तेवढ्यांत तिघां मुलांचा व आपला गुजारा कसा करतां येईल, वगैरे गोष्टींचे चिंतनांत राधाबाई आतां गढून गेल्या होत्या.

राधाबाईचें दुर्भाग्य या वेळीं इतकें बलवत्तर होतें कीं, सुखाची छाया—आणि तें सुखहि खरें नव्हे, तर भावी स्थितीच्या कल्पनेचें—सुद्धां त्यांच्या नशीबानें मिळूं दिली नाहीं! त्यांतहि त्यांचे दुर्दैवानें विघ्न आणून सोडिलें. त्रिंबकरावांकडे गेलेला गंगाधर हिरमुसलें तोंड करून परत आला आणि झालेली हकीगत सांगूं लागला. तो ह्मणाला "आपण त्रिंबकरावांच्या आफिसांत गेलों होतों. अगोदर किती वेळतरी आपली दादच कुणी घेईना आणि त्रिंबकरावांची व आपली भेट होऊं देईना. पुढें मोठ्या मुष्किलीनें एकदाची त्यांची गांठ पडली व आपण त्यांनां सांगावयाचें होतें तें पुष्कळ प्रकारें सांगितलें. पण ते ह्मणाले 'आज तीन महिने भाड्याकरितां मीं तगादा केला नाहीं, हाच अगोदर माझ्या हातून मोठा निष्काळजीपणा झाला आहे आणि आतां आणखी महिनापंधरा दिवस थांबलों तर अण्णासाहेब काय ह्मणतील? तशांत इथें नाहीं कुणी तुमच्या ओळखीचें. तुमच्या भाड्याबद्दल जामीनकी कोण देतो? घरांतलें सामानसुमान विकून तुह्मी पैसे उभे करणार आणि मग देणार! विचारतो कोण त्या तुमच्या जुन्या सामानाला? अगदीं नवा करकरीत माल असला तरी विकायाला काढल्याबरोबर त्याची अर्धी किंमत होते. मग बोलूनचालून जुन्या मालाला कोण विचारील? आतां मला जास्त बोलायला लावूं नका; झालेले भाड्याचे रुपये भरणा करा, नाहींतर आतां घटकाभरानें आमचा माणूस तुमचे दाराशीं येऊन बसेल आणि त्याचा खाण्यापिण्याचा खर्च तुमचेपासून घेतला जाईल, हें लक्ष्यांत ठेवा."

ही झालेली हकीगत गंगाधर सांगत आहे इतक्यांत त्रिंबकरावांकडचीं दोन माणसें येऊन दाखल झालीं आणि त्यांनीं दारांत धरणें घेतलें.

गंगाधराची भेट घेण्याचें टाळण्याचा त्रिंबकरावांनीं पुष्कळ प्रयत्न केला, पण अखेर निरुपायास्तव त्याची भेट घ्यावी लागली, हें वर सांगितलेंच आहे. अशी टाळाटाळी करण्यांत त्रिंबकरावांचें इंगित काय होतें, हें छोट्या गंगाधराच्या

लक्ष्यांत कोठून येणार ? पण आमच्या चाणाक्ष वाचकांनीं तें ताडिलेंच असेल. राधाबाई मागें एकदा गोदूताईकडे गेल्या होत्या आणि बाबासाहेबांच्या जिनगी-संबंधानें व व्यवस्थापत्रासंबंधानें गोष्टी निघाल्या होत्या. त्या दिवसापासून त्या नवराबायकोंच्या मनांत असें भय उत्पन्न झालें होतें कीं, राधाबाई केव्हांना केव्हांतरी हें माशानें गिळलेलें माणिक परत मिळवूं पाहील. गंगाधराच्या येण्याचा त्याच गोष्टीशीं कांहीं संबंध असावा, अशी शंका येऊनच त्रिंबकरावांनीं प्रथम त्याची भेट घेण्याचें टाळण्याचा प्रयत्न केला होता. पापकृत्य करणाराचें मन त्याला कसें खात असतें तें पहा ! ही गोष्ट बिचाऱ्या राधाबाईच्या स्वप्नींहि नव्हती.

त्रिंबकरावांच्या हुकुमानें धरणें घेऊन बसलेल्या माणसांनीं राधाबाईच्या घरांत फारच उद्धटपणा मांडिला. आह्मांला अमकेंच खायाला पाहिजे तें द्या ह्मणून ओरडावें; पोरांनां भेदरवून सोडावें; चिलमी फुंकून धुराचे लोटचेलोट सोडून घरभर घाण करावी; अभद्र लावण्या ह्मणून ऐकणाराचे कान किटतील असें करावें; आणि कोणीं असा त्रास देऊं नका ह्मणून ह्मटलें ह्मणजे भाड्याचे पैसे टाका ह्मणून ह्मणावें. कांहीं वेळ हा त्रास सोसल्यावर राधाबाई अगदीं कंटाळल्या. पण भाडें चुकतें करण्यास जवळ पैसे नसल्यामुळें करतात काय ! शेवटीं त्यांनीं जानकीबाईला बोलाविलें आणि तिच्याकडूनहि त्यांनां दोन गोष्टी सांगविल्या. पण ते कांहींकेल्या ऐकेनात. हें पाहून जानकीबाईलाहि फार आश्चर्य वाटलें. ती ह्मणाली "अण्णासाहेब हे फार सज्जन गृहस्थ आहेत असा त्यांचा नांवलौकिक ऐकिला आहे. आपले नोकर गरीब भाडेकऱ्यांनां कसे छळतात हें त्यांच्या कानीं गेलं तर तेव्हांच या गोष्टीचा बंदोबस्त होईल. तुमच्याजवळ भाडं देण्यास पैसे असून तुह्मी देत नाहीं, असं कुणींतरी तुमच्या दुस्मानानं त्यांनां जाऊन सांगितलं असेल आणि ह्मणून त्यांनीं हे शिपाई धाडिले असतील. तुह्मी स्वतः जाऊन खरी हकीगत अण्णासाहेबांचे कानांवर घालाल तर ते याचा खास बंदोबस्त करतील. एकदा एका गवळ्याकडे त्यांचे असेच भाड्याचे दहापांच रुपये थकले होते. त्याच गवळ्याचे दुधाबद्दल अण्णासाहेबांकडे तीनचार रुपये घेणंहि होतं. ते रुपये वजा घालून बाकीच्या रकमेबद्दल त्याच्यावर फिर्याद करण्याविषयीं अण्णासाहेबांची परवानगी घ्यावयास त्रिंबकराव गेले. तेव्हां अण्णासाहेब रागावून ह्मणाले 'नाहीं. त्याच्या दुधाबद्दलचे पैसे आतांचेआतां चुकते करूं आणि भाड्याबद्दल आणखी एक महिन्याची सवड देऊं. दुधाचे रुपये आपण भाड्यांत वजा घातले तर त्या बिचाऱ्यानं महिनाभर खावं काय

आणि गुराढोरांनां खाऊं काय घालावं ?' इतका कोंवळ्या मनाचा गृहस्थ एका कुलीन स्त्रीच्या घरांत यःकश्चित् भाड्याच्या दहावीस रुपयांसाठीं आपल्या लोकांनां असा धुमाकूळ घालूं देईल, हें मला नाहीं खरं वाटत. तुह्मी एकदा अण्णासाहेबांकडे जाऊन पहातर खऱ्या !"

राधाबाईलाहि ही सूचना पसंत पडली. आणि त्या स्वतांच अण्णासाहेबांकडे जाण्यास निघाल्या. राधाबाईवर दुःखाचा प्रसंग आल्यापासून आतांपर्यंत त्या घराचे बाहेर अशा कधींहि पडल्या नव्हत्या. पण करतात काय! आल्या प्रसंगाला सादर झालें पाहिजे.

अण्णासाहेबांचें घर फार दूर नव्हतें. विचारितविचारित राधाबाई तेथपर्यंत गेल्या. अण्णासाहेब त्या वेळीं बाहेर जाण्याच्या गडबडींत होते. दाराशीं गाडी उभी होती. राधाबाई घरांत न जातां बाहेरच पडवींत उभ्या राहिल्या. इतक्यांत अण्णासाहेब जिना उतरून पडवींत आले व राधाबाईला पाहून "कुणाकडे आलां व काय काम आहे ?" ह्मणून त्यांनीं विचारिलें. राधाबाईनीं आपली स्थिति व झालेली हकीगत जशीची तशी अण्णासाहेबांचे कानीं घातली. दहावीस रुपयांच्या रकमेसाठीं आपल्या माणसांनीं अशा कुलीन स्त्रीला इतका त्रास द्यावा आणि तोहि भाडें आठ दिवसांनीं चुकविण्यास भाडेकरी कबूल असतां ? ही गोष्ट ऐकून अण्णासाहेबांनां फार वाईट वाटलें आणि राधाबाईचा मुलगा गंगाधर व त्रिंबकराव यांच्या भेटीची हकीगत राधाबाईनीं सांगितली तेव्हांतर अण्णासाहेबांची मुद्रा कांहीं विचित्रच झाली. राग, आश्चर्य, दुःख, दया इत्यादि मनोविकारांची मिश्रछाया त्यांच्या चेहेऱ्यावर कांहीं चमत्कारिक रीतीनें विराजूं लागली. सगळी हकीगत ऐकून घेतल्यावर अण्णासाहेबांच्या मनाची विलक्षण चलबिचल झाली. त्यांनीं राधाबाईला ह्मटलें "बाई, झाल्या गोष्टी जरी माझ्या हुकुमानें झाल्या नाहींत, तरी माझ्या माणसांनीं केल्या यावद्दल मी तुमची माफी मागतों. तुमच्यासारख्या कुलीन, सत्वशील माणसांनां यापुढं असा त्रास होणार नाहीं, अशी तजवीज आतां मी करीन. तुह्मी स्वस्थ असा. तुमच्या सामानाला, मुलाबाळांनां, तुमच्या घरादाराला कशाला कुणी हात लावणार नाहीं. आतांचे आतां त्या माणसांनां तुमचे घरांतून उठवितों. तुह्मी बेफिकीर रहा."

असें ह्मणून अण्णासाहेब पुनः परत माडीवर गेले व त्रिंबकरावांच्या नांवाची एक चिठ्ठी लिहून ती एका नोकराचे हातीं देऊन ती आतांचे आतां धावत जाऊन त्यांनां नेऊन दे, ह्मणून त्यांनीं सांगितलें. त्या चिठ्ठींत पुढील मजकूर लिहिला होता:—

"सा. न. वि. वि.—

आपल्या ३१७ नंबरच्या घरांत आलेल्या बिऱ्हाडाकडून तीन महिन्यांचें भाडें वेळच्यावेळीं आलें नाहीं ह्मणून तुह्मीं तगादा लाविला आणि आणखी आठच दिवस दम धरा ह्मणून भाडेकऱ्यांनीं सांगितलें असतां तें न ऐकून त्यांच्या दाराशीं दोन माणसांनां नेऊन बसविलें, असें कळतें.

मला विचारल्याशिवाय तुह्मीं ही गोष्ट आपल्या अखत्यारांत केली, याचा प्रथम खेद वाटतो; आणि पुनः ही गोष्ट माझ्या व्यवहाराच्या नियमाच्या अगदीं विरुद्ध असून ती करण्यासंबंधानें तुह्मीं स्वतः हुकूम सोडिला, हें पाहून तर फारच आश्चर्य वाटतें !

तुह्मीं बसविलेल्या माणसांनां आतांचे आत्तां परत बोलावून घ्या; आणि त्यांचेप्रीत्यर्थ भाडेकऱ्यांपासून घेतलेला खर्च त्यांनां परत द्या. तो खर्च तुह्मी द्या, अगर माझ्या नांवें लिहा, किंवा ज्याची चूक दिसेल त्याच्या माथीं घाला. पण भाडेकऱ्यांवर मात्र लादूं नका. आणि उद्यां सकाळीं सवाआठ वाजतां मला ऑफीसांत भेटून जा.

कळावें लोभ असावा हे विनंति."

अण्णासाहेबांनीं राधाबाईला पुनः आश्वासन देऊन परत लाविलें आणि आपण गाडींत बसून बाहेर हवा खाण्यास गेले. त्रिंबकरावांसारखा विद्वान्, हुषार आणि व्यवहारज्ञ ह्मणविणारा गृहस्थ दहावीस रुपयांसाठीं एका कुलीन स्त्रीस इतकें छळण्यास कसा प्रवृत्त झाला, याचें त्यांनां राहूनराहून आश्चर्य वाटत होतें; आणि असे नोकर पदरीं असल्यावर मालक कितीहि सज्जन असला तरी या नोकरांच्या वर्तनामुळें त्या मालकाच्या नांवाला केवढा बट्टा लागतो, या गोष्टी लक्ष्यांत येऊन ते झाल्या गोष्टीबद्दल फार हळहळत होते. त्रिंबकरावांला चांगली आठवण राहील अशा रीतीनें त्यांची कानउघाडणी करण्याचा त्यांचा विचार होता आणि त्या करितांच दुसरे दिवशीं सकाळीं त्यांनीं त्रिंबकरावांस ऑफीसांत बोलाविलें होतें.

अण्णासाहेबांची शांत, प्रसन्न आणि दयार्द्र अंतःकरणाची साक्ष पटविणारी मुद्रा व त्यांचें अत्यंत मर्यादशील व सभ्य वर्तन पाहूनच ते बोलतील तसें करतील अशी राधाबाईच्या मनाची खात्री पटली व त्यांनीं घरीं परत येतांयेतां ईश्वरानें आपलें गाऱ्हाणें ऐकिलें व अन्न वांचविली ह्मणून कृतज्ञतापूर्वक त्याचें नामस्मरण केलें. 'अखेर गरीबांचा वाली ईश्वर आहे हीच गोष्ट खरी' असे शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडले.

## प्रकरण २४ वें.

## शिवापुरचा स्त्रीसमाज.

शिवापुर हा गांव साधारण मध्यम वस्तीचा असून अलीकडे ह्मणजे एकोणिसाव्या शतकांत पेशवाईच्या अखेरीच्या काळीं त्याला क्षेत्रत्व प्राप्त झालें होतें. शिवाय तेथील हवापाणी उत्तम अशी प्रसिद्धि असल्याकारणानें सुखवस्तु व पेनशनर लोकांची वस्ति तेथें बरीच वाढली होती. पुणें, सातारा, सांगली, कोल्हापूर वगैरे मोठमोठ्या शहरांतून मोठमोठ्या नोकऱ्या व व्यापारधंदे करून पैसे मिळवावे आणि हातपाय थकले ह्मणजे शिवापुरास येऊन 'हरि हरि' ह्मणत स्वस्थ पडावें, असा बहुतेक लोकांचा क्रम होता. शिवाय तेथें अण्णासाहेब शिखरे यांचें एक जबर प्रस्थ होतें. त्यांचीं घरेंदारें, बागबगीचे, शेतवाड्या, दुकानें व सावकारी पेढ्या नुसत्या शिवापुरांतच काय पण देशांतरींसुद्धां होत्या; आणि त्या सर्वांचे हिशेब वगैरे कारभार शिवापुरासच चालत असत. अण्णासाहेबांच्या पदरीं कमींतकमी दोनअडीचशें माणसें व आश्रित मिळून असत. शिपाई, कारकून, कारखानदार, मुनीम, नायब आणि दिवाण अशा चढत्या पायऱ्यांवर नोकरी करित असलेले लोक व त्यांचीं कुटुंबें या सर्वांची शिवापुराला मोठी शोभा होती. शिवाय इंग्रजी शाळा, मराठी शाळा, लायब्ऱ्या, छापखाने, म्युनिसिपालिटी, मामलेदारकचेरी, मुनसफकोर्ट, सरकारी दवाखाना वगैरे शहरांतून दिसणाऱ्या संस्थाहि येथें होत्या. यामुळें शिवापुर हा गांव भरभराटीचा आहे असें स्पष्टपणें दिसत होतें. आपापल्या गांवाचा विशेष अभिमान बाळगणारी मंडळी प्रत्येक ठिकाणीं असतेच. तशी कांहीं मंडळी शिवापुरांतहि होती. जेव्हां कोणी एखादा नवखा गृहस्थ पुण्याहून शिवापुराला येई व पुण्याविषयींच्या गोष्टी सांगून शिवापुराच्या मंडळीला दिपवून टाकण्याचा प्रयत्न करी, तेव्हां या मंडळीला पुण्याची सरशी सहन होत नसे. ते आवेशानें ह्मणत "पुणें एके काळीं मोठें राजधानीचें शहर होतें ह्मणून काय झालें ? त्याची गणना क्षेत्रांत थोडीच कुणी करणार आहे ! पुण्याचें वर्णन कुठें पुराणांत सांपडणार आहे का ? तेंहि घटकाभर सोडून दिलें, तरी पुण्यांत आणि आमच्या शिवापुरांत काय अंतर आहे ? आमच्या इथें काय कमी आहे ? पुण्यास पर्वती, रामेश्वर, तुळशीबाग, लालबाग वगैरे देवस्थानें आहेत तशीं आमच्या इथेंहि भद्रेश्वर, एकलिंगेश्वर, पातालेश्वर, चामुंडादेवी व शंखेश्वर यांसारखीं जाज्वल्य स्थानें आहेत ! तुमच्या पुण्यांत आपणास बगळ्यासारखे स्वच्छ अतएव शुक्लपक्षीय ह्मणविणारे ब्राह्मण व नसत्या कुरापती काढून दुसऱ्यांवर

ग्रामण्यें करणारे 'वेदशास्त्रशून्य' जहागिरदार आहेत. आमच्या इथेंहि तसे आहेत! पुण्यास 'केसरी' वर्तमान पत्र आहे तर आमच्या इथेंहि 'जंबुक' पत्र आहे! ही तुलना आणखी लांबविली असती म्हणजे या अभिमानी मंडळीला असेंहि म्हणतां आलें असतें कीं, पुण्यांत जसा भांग्यामारुतीजवळ भिक्षुकांचा कळप आहे, तसाच शिवापुरांतहि आहे; पुण्यास स्त्रियांसाठीं हायस्कूल व खासगी शिक्षणाचे वर्ग आहेत; शिवापुरांत अशा चांगल्या शिक्षणसंस्था जरी नसल्या तरी चार कुटाळ बायांनां एकत्र जमण्यास आणि एकमेकींच्या घरच्या गोष्टींची चर्चा व दुसऱ्या बायांची टवाळकी करण्यास सोईच्या अशा चवाट्याच्या जागा आहेत. सारांश कर्मठपणाच्या ढोंगांत घ्या, किंवा पाश्चिमात्य सुधारणेंत घ्या, शिवापुर हा गांव पुण्यासारख्या बड्या शहराशींसुद्धां सहज टक्कर देईल, अशी तेथील लोकांची नेहमीं बढाई असे; आणि ही बढाई म्हणजे अगदींच वृथा जल्पना होती असें नाहीं, हें वाचकांनां पुढें कळून येईलच.

राधाबाईच्या घरापासून जवळच वर सांगितलेलें चामुंडादेवीचें मंदिर होतें. इमारतीच्या बांधणीवरून पहातां तें कांहीं प्राचीन काळचें दिसत नव्हतें; पण लोकांनीं त्याला मारूनमुटकून प्राचीन बनविलें असावेंसें वाटतें. शिवपुरी-विषयींची जी पौराणिक कथा मागें सांगितली आहे, त्या कथेशीं या चामुंडादेवीचा संबंध जुळवून कित्येक लोक या चामुंडेसच आदिमाया समजून नवस करित असत. भक्त असल्यावर नवसास पावण्यांत देवांनांहि संतोष वाटतो! याला प्रमाण, ही चामुंडा देवी कित्येक धनिकांच्या नवसाला पावली होती, आणि तिनें कोणाला पुत्रप्राप्ति तर कोणाला अर्थप्राप्ति करून दिल्यामुळें सदर भाविकांनीं तिच्यासाठीं एक भव्य मंदिर बांधून दिलें होतें. रोज पूजाअर्चा, नंदादीप, नैवेद्य, चौघडा व कथापुराण वगैरे चालतील अशीहि व्यवस्था केली होती. या ठिकाणीं रोज संध्याकाळचे वेळीं पुराण सांगण्यांत येई, त्या वेळीं श्रोतृसमाज बहुधा स्त्रियांचा असे. या भाविक स्त्रिया पुराणास येतांना देवीपुढें व पुराणिकबुवांपुढें ठेवण्याचे तांदुळ आणण्यास एखादे वेळेस विसरत, पण वातीचा कापुस, सुनांचीं गाऱ्हाणीं आणि शेजारणीच्या उखाळ्यापाखाळ्या बरोबर नेण्यास कधींहि चुकत नसत हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. रमाबाई, चिमाबाई, ठमाबाई आणि उमाबाई अशा दहापांच बाया एका ठिकाणीं जमल्या म्हणजे त्यांचे परस्परांशीं जे वाग्विलास चालत, ते ऐकण्यासारखे असत. त्यांच्यापुढें पुराणांतल्या कथा व वर्णनें अगदीं फिक्कीं वाटत! म्हणूनच कीं काय, खऱ्या मार्मिक व रसिक बाया आपलें

लक्ष्य पुराणिक बुवांच्या 'जे आहे त्ते' या पालुपदांनीं व हातवाऱ्यांनीं युक्त अशा भाकडकथांतून काढून त्याहून जास्त सरस आणि आवेशयुक्त अशा या स्त्रीसंमर्दाच्या संवादाकडे लावीत. या स्त्रीसमाजापुढें चर्चेसाठीं रोज कांहींना कांहीं नवा विषय येई. निदान जुना विषयतरी कांहीं नवीन रूप धारण करून येई, यामुळें आणि परस्परांची परस्परांविषयीं कांहीं विलक्षणच सहानुभूति असल्यामुळें शिळया गोष्टींलासुद्धां चटकदारपणा येत असे. सासुरवास हा विषय एकदा निघाला कीं त्यावर प्रत्येक बाईनें आपल्या स्वताच्या खास अनुभवांतली ह्मणून एखादीतरी गोष्ट सांगितलीच पाहिजे! मग सांगणारीला सासू असो अगर नसो, आणि असल्यास तिनें आपल्या सुनेस छळलें असो किंवा नसो. कोणीतरी एकीनें प्रथम "सासू आज अशी अशी बोलली" ह्मणून ठमाबाईपाशीं गाऱ्हाणें करावें, ह्मणजे उपक्रम झालाच. मग त्यावर चिमाबाईनीं ह्मणावें "अहो तुमची सासूतर फार गरीब, नुसती बोलूनतरी गप्प बसते; पण माझी सासू पहाल तर जशी काय हिडिंबा! एकदा रागावली ह्मणजे उचलून तोंडांतच टाकते कीं काय असं भय वाटतं."

यावर उमाबाईची कांहींतरी सरशी झालीच पाहिजे! त्यांनीं आपल्या सासूनें मारहाण केल्याची, उपाशीं ठेविल्याची आणि नवऱ्याचे कान फुंकून आपल्या संसाराची धूळधाण केल्याची बनावट गोष्ट सांगून त्या सासूबाईच्या एकवीस पिढ्या उद्धरल्याचें श्रेय घेतलें नाहीं, तर ती कसली उमाबाई!

एखादे दिवशीं सुनांच्या आगळिकीचा प्रश्न निघाला कीं यांतल्याच पोक्त बायांनीं त्याच तोंडांनीं सास्वांच्या सोशिकपणाची आणि दुर्दैवाची कहाणी सांगतांना डोळ्यांनां पाणी आणावें आणि अलीकडच्या सुना ह्मणजे इथूनतिथून उनाड, द्वाड, कैदाशिणी असतात अशी त्यांचेवर पुष्पांजलि वाहून "काहो बाई, आपल्या वेळीं असे द्वाडपणाचे प्रकार आपण कधीं पाहिले होते का?" ह्मणून एकमेकींस विचारून त्यांचेकडून अपेक्षित नकाराचें उत्तर आलें ह्मणजे शांत चित्तानें पुराणिकबुवांकडे मध्येंच एकदा पहावें.

बायकांच्या भाषणाचा दुसरा विषय ह्मटला ह्मणजे शेजारणी होत. अमकी अशी आहे आणि तमकी तशी आहे; अमकीनें अमकीच्या पोराला करणी केल्यामुळें त्याला बाहेर बाधा होऊन तें मूल सहा घंट्यांत तरफडून मेलें किंवा सहा महिने झिजत राहिलें, याप्रमाणें गोष्ट सांगण्यास एकीनें सुरुवात केली पुरे, कीं, दुसऱ्या बायांनीं तशाच प्रकारच्या दुसऱ्या गोष्टी सांगून पहिल्या बाईच्या बोलण्याचें पुष्टीकरण करावयाचें. ह्याप्रमाणें तिकडे पुराणिकबुवांचें पुराण आणि

इकडे बायकांचें गुऱ्हाळ बरोबर चाललेलीं असत. आणि यद्यपि बाया पुराणापेक्षां स्वताच्या गुऱ्हाळांत अधिक रंगलेल्या असत तरी त्यांचा अनेकावधानीपणा असा कांहीं प्रेक्षणीय असे कीं, पुराणांतल्या कथेकडे लक्ष्य नसलें तरी बुवांच्या तोंडून कोणा देवादिकाचें किंवा वशिष्ठविश्वामित्रासारख्या ऋषिवर्याचें नांव निघतांच सगळ्या बायांचे हात नमस्कार करण्यासाठीं वर व्हावयाचेच ! ही कवाईत कधीं चुकावयाची नाहीं. हात कापसाकडे, तोंड उखाळ्यापाखाळ्या काढण्याकडे आणि कान इतर बायांच्या भाषणश्रवणाकडे दिलेले, याप्रमाणें तीन मुख्यमुख्य इंद्रियांची वांटणी करून दिल्यावर पुराणिकबुवांच्या वांट्याला श्रवणेंद्रिय कोठून यावें ?

कांहीं भाविक बाया असत त्या मात्र या बायकांच्या समाजांत सामील न होतां आपलें चित्त पूर्णपणें पुराणाला देत. पण यावरून पुराणाचा सगळा भाग ह्मणजे त्यांनां समजत होता, असें कोणी ह्मणेल तर तीहि चूकच होईल. कारण मूळ संस्कृत श्लोक वाचून त्यावर बुवांचें जें व्याख्यान चाले, त्याचें सगळें धोरण अर्थ सुलभ करण्यापेक्षां स्वताची विद्वत्ता दाखविण्याकडेसच विशेष असे. यामुळें बुवांच्या व्याख्यानांत शब्दव्युत्पत्ति, अलंकार व बाष्कळपणाच्या कोट्या, यांचीच बहुधा रेलचेल असे. ज्या बुवांच्या पुराणांत अशा कोट्या व शब्दचमत्कार अधिक व जें पुराण संस्कृत शब्दांनीं अधिक प्रचुर, अतएव समजण्यास दुर्घट, तें पुराण सर्वांनां प्रिय असे! एखादा वेदांतपर विषय आला ह्मणजे तो समजावून देण्याच्या प्रयत्नांत अगडबंब संस्कृत शब्द घालण्याची आणि अर्थ न समजेल असें करण्याची बुवांची जी धडपड चाले, ती खरोखर अवर्णनीय असे; आणि याच्या उलट जेथें कृष्णलीलेसारखा विषय येई, तेथें कुलीन स्त्रियांनां लज्जेनें खालीं माना घालण्याचा प्रसंग आला तरी पुराणिकबुवा शृंगाररसांत इतके निमग्न होत कीं, अश्लील शब्दौघ तोंडांतून काढतांना आपण देवीच्या मंदिरांत आणि कुलीन स्त्रीसमाजापुढें पुराण सांगत आहों, ही गोष्ट ते पार विसरून जात ! असें देहभान विसरण्याचे प्रसंग त्यांनां वरचेवर येत, हें सांगावयास नकोच; आणि यामुळेंच चहाटळ बायका जिथेंतिथें या बुवांच्या विद्वत्तेची, वक्तृत्वाची आणि भाविकपणाची तारीफ करून बुवांचा श्रोतृसमाज वाढविण्याची खटपट करण्यास स्वयंप्रवृत्त होत. अशा रीतीनें बुवाविषयींच्या या चालत्याबोलत्या जाहिराती चोहोंकडे फडकत फिरल्यावर बुवाची चंगळ उडत असे, हें काय निराळें सांगावयास पाहिजे ?

आपल्या इकडे आबालवृद्धांच्या हितार्थ कथापुराणें वगैरे सांगण्याचा जो प्रघात पडला आहे, त्याचा मूळ उद्देश अत्यंत शुद्ध व स्तुत्य आहे. हा उद्देश सफल

करण्यासाठीं खऱ्या विद्वानांचा एक स्वतंत्र वर्ग ( हरिदास व पुराणिक ) या व्यवसायांत गुंतविण्यांत ही समाजरचना करणाराची योजना मोठी मार्मिकतेची दिसते, यांत शंका नाहीं; परंतु सध्याच्या कथापुराणांच्या द्वारें हा उद्देश कितीसा सिद्धीस जात आहे, याचा कोणीं कधीं विचार केला आहे काय? अलीकडील तरुण मंडळीला कथापुराणांविषयीं विशेष आस्था वाटत नाहीं, याचें कारण धर्मश्रद्धेचा ऱ्हास होय, ही गोष्टतर निर्विवाद आहेच, पण त्याबरोबरच हरिदास व पुराणिक यांची नीतिभ्रष्टता आणि लोकांनां उपदेश करण्याचे कामीं त्यांची अपात्रता हीं कारणेंहि बलवत्तर आहेत, ही गोष्ट कोणासहि नाकबूल करतां यावयाची नाहीं. अलीकडे खरी प्रेमळ, भक्तिरसयुक्त कथा किंवा पुराण म्हणजे एक दुर्मिळ वस्तूच झाली आहे. कथेकरी विद्वान् व पढिक असला तर त्यानें भारतचंपूसारख्या ग्रंथांतले कांहीं शब्दचमत्कार व अर्थचमत्कार करून दाखवून वाहवा मिळवावी, आणि तेवढीहि विद्वत्ता अंगीं नसली तर हास्यरसोत्पादक कोट्या व गोष्टी सांगून, किंवा नकला करून आणि संगीत तमाशाचे चालीवर पेटीच्या सुरांत पदें गाऊन कसेतरी दोन तास श्रोत्यांनां दंग करून सोडावें, म्हणजे हरिदासाचें कर्तव्य संपलें! हीच गोष्ट पुराणिकांविषयीं समजावी. त्याचप्रमाणें श्रोतेहि कथापुराणें श्रवण करण्याचा मूळ उद्देश कधींच विसरले आहेत! ज्याप्रमाणें वेश्येचें गाणें ऐकण्यास किंवा नाच्या पोऱ्याचा तमाशा पहाण्यास जावयाचें, त्याचप्रमाणें कथापुराण ऐकण्यास जावयाचें, ही त्यांची समजूत दिसते. मूळ चांगल्या उद्देशानें आरंभिलेल्या संस्था अपकर्ष पावतपावत कशा विषमपरिणामी होतात, त्यांचें हें एक अत्यंत शोचनीय उदाहरण आहे.

आमच्या समाजांतल्या पुरुषांची कथापुराणांवरची श्रद्धा अशा रीतीनें उडून गेली, पण बायकांची अद्यापि आहे, तिचें कारण त्यांचें अज्ञान हें होय. अर्थ समजो न समजो, आपलें लक्ष्य तिकडे असो नसो, कथापुराणाच्या नुसत्या शब्दाच्या आघातानें आपले कर्ण पवित्र होतील, अशी निःसीम श्रद्धा आज आमच्या स्त्रियांत वसत आहे आणि म्हणूनच हरिदास व पुराणिक यांचा योगक्षेम अशा निकृष्ट स्थितींतहि चालला आहे. स्त्रियांचें वास्तविक लक्ष्य कथापुराणांत किती असतें व असलें तरी त्यांतल्या कितीशा गोष्टी त्यांचे मनावर ठसण्यासारख्या रीतीनें सांगण्यांत येत असतात, याचा मासला वर शिवापुरच्या चामुंडादेवीच्या देवळांतल्या स्त्रीसमाजाच्या वर्णनावरून वाचकांनां कळून चुकलाच आहे. शिवापुर हा एकच गांव अशा तऱ्हेचा होता असें नाहीं. कमीअधिक मानानें हाच प्रकार महाराष्ट्रांतल्या कोणत्याहि गांवांत पहाण्यास मिळेल. असो.

## प्रकरण २५ वें.

# परमेश्वरानेंच लाज राखली.

बिचाऱ्या राधाबाई असल्या अडचणींत एकेक दिवस कशा लोटित होत्या, हें त्यांचें त्यांनांच माहीत ! जी राधाबाई पांचसहा महिन्यापूर्वी आपल्या कुंजुंज्या प्राप्तींत कोंड्याचा मांडा करून आपल्या विद्वान्, सुशील आणि प्रेमळ पतीला आणि जिवलग लेंकरांनां घालित होती, जिला गोविंदरावांच्या सहवासानें खरें गृहसौख्य ह्मणजे कसें असतें याचा प्रत्यक्ष अनुभव घेण्यास सांपडला होता, आणि गृहकृत्यें उरकून आपला राहिलेला वेळ पोथ्यापुस्तकें वाचणें, मुलांनां शिकविणें आणि धार्मिक व परोपकाराच्या गोष्टी करणें इत्यादि सत्कृत्यांत घालवून जी सदा आनंदांत निमग्न असे, तीच राधाबाई आतां एवढ्या अल्पवयांत पतिसुखाला अंतरली, तेव्हां पतिवियोगाचें असह्य दुःख ती कशी सहन करित असेल ! जिला ददात ह्मणून अद्याप ठाऊक नव्हती, तिच्यावर सध्यासारखा अत्यंत दुःखद प्रसंग आला असतां लोकांचे कष्ट करून महत्प्रयासानें मिळविलेली व अश्रूंनीं भिजलेली अर्धीचतकोर भाकर मुलांपुढें ठेवतांना तिच्या पोटांत कशी कालवाकालव होत असेल ! भावी स्थितीचा काळाकुट्ट अंधार नजरेसमोर आला ह्मणजे त्या बिचारीच्या अंतःकरणाची काय स्थिति होत असेल, याची कल्पना दुसऱ्याच्या मानसिक स्थितीशीं तादात्म्य करून घेऊन तिचें शब्दचित्र रेखाटण्यांत कुशलता वागविणाऱ्या कवींला आणि कादंबरीकारांनांसुद्धां अगम्य होती. असा प्रसंग वैऱ्यावरहि न यावा !

लोकांचें शिवणकाम व दुसरीं मिळतील तीं कामें करून राधाबाईनीं महिन्याचे काठीं पांचसात रुपये मिळवावे. वडील मुलगा गंगाधर हा लवकर विद्याभ्यास करून कुटुंबपोषणाचा भार वहाण्यास समर्थ होईल आणि आपल्यावरचें ओझें हलकें करील, या आशेवर राधाबाई आतां दिवस काढित होत्या; आणि हा दिवस लवकर यावा ह्मणून दररोज अंतःकरण कळवळून परमेश्वरास प्रार्थना करित होत्या. त्या दयाघन, मंगलमय, दीनबंधु परमेश्वराच्यानें राधाबाईसारख्या साध्वीची अशी प्रार्थना ऐकल्यावर स्वस्थ कसें वरें वसवेल ? त्यानें 'तथास्तु' ह्मणून तिच्या प्रार्थनेला उत्तर दिलें.

गंगाधर हा बुद्धीनें तरल, उद्योगी, मेहनती, व्यवस्थित आणि आज्ञाधारक असल्यामुळें विद्यार्थिदशेंत उत्कर्ष पावण्यास साधारणतः अवश्य लागणारे बहुतेक

सारे गुण त्याच्या अंगीं होते, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. इतक्या गुणांची अनुकूलता असल्यावर आणि तशांत प्रथम गोविंदरावांच्या हातून त्याच्या शिक्षणाचा पाया मजबूत घातला गेला होता व नंतरची त्याची वाढ राधाबाईसारख्या मातुश्रीच्या देखरेखीखालीं झाली होती ही गोष्ट लक्ष्यांत घेतली ह्मणजे गंगाधराचा वर्गांत नेहमीं पहिला नंबर राही, त्याचेवर गुरुजी सदा सुप्रसन्न असत व त्याला इनामें व स्कालरशिपा देऊन प्रसंगोपात्त सरकारी अधिकाऱ्यांपाशीं व इतर चारचौघां गृहस्थांत गोष्ट निघाली ह्मणजे गंगाधराविषयीं अत्यंत स्तुतिपर उद्गार काढण्यांत भूषण मानीत, यांत नवल नाहीं.

माघाच्या महिन्यांत एके दिवशीं राधाबाई अगदीं सचिंत बसल्या होत्या. अशा रीतीनें किती दिवस निर्वाह लागेल ही चिंता त्यांनां रात्रंदिवस जाळित होती. त्या चिंतेंत अण्णासाहेबांपाशीं मागील भाडें चुकतें करून देण्याविषयींचा आपला करार व त्यावर विश्वास ठेवून त्यांनीं उठविलेलें धरणें, या दोन गोष्टींची भर पडली. त्यांनीं आपल्या मामांला आपली सगळी हकीगत लिहून कळविली होती. ती वाचून मामा धावून येतील, निदान थोडीबहुत रकमतरी पाठवून आलेल्या प्रसंगाला उपयोगीं पडतील, अशी त्यांची खात्री होती. ह्मणून त्या इतके दिवस भाड्याच्या रकमेसंबंधानें बिनघोर राहिल्या होत्या. पण मामांनां पत्र पाठवून पंधरा दिवस झाले, तरी रकमेला ठिकाण नाहीं–इतकेंच नव्हे तर आपल्या पत्राचें नुसतें दोन बोट उत्तरसुद्धां नाहीं, हें पाहून राधाबाईला फारफार दुःख झालें आणि **'कठिण समय येतां कोण कामास येतो!'** ही कवीची उक्ति अगदीं अनुभवसिद्ध आहे, असें त्यांनां वाटूं लागलें. त्यांनां माहेरचें आतां कोणी नव्हतेंच. "सदूबापू असता, तर माझी ही स्थिति पाहून त्याच्या डोळ्यांला टचकन् पाणी आलें असतें—" असे उद्गार राधाबाईच्या तोंडून अकल्पितपणें कितीतरी वेळां निघावे आणि भावाचें स्मरण होऊन त्याच्या वियोगदुःखानें त्यांनीं कितीतरी वेळां शोक करावा. शोकावेगानें अंतःकरण तुडुंब भरलें असतां तें हलकें करण्यास दुःखोद्गारांस मुखावाटे किंवा नेत्रांवाटे वाट देणें, हाच सुलभ उपाय आहे. तो उपाय करून पाहिल्यावर राधाबाईंनां अंमळ बरें वाटे. राधाबाई मोठी धीराची आणि संकटांस न डगणारी होती, ह्मणून मागें सांगितलें आहे; आणि आतां ती सचिंत बसून दुःख करित होती असेंहि आह्मी सांगतों; यांची एकवाक्यता कशी करावयाची, असा प्रश्न आमचे वाचक करतील. पण हा प्रश्न करण्यापूर्वी त्यांनीं आपण स्वतः राधाबाईच्या स्थितींत असतों तर काय केलें

असतें, हें क्षणभर कल्पनेनें पहावें. राधाबाईला आतां कायमचें असें उत्पन्न एक पैचेंसुद्धां नव्हतें. घरांत कमाविणारा कर्ता पुरुष कोणीहि नव्हता. त्यांनीं स्वतः शिवणकाम किंवा दुसरीं मोलाचीं कामें करून चारदोन आणे रोज मिळवावे आणि त्यांतूनच घरखर्च चालवावा. बरोबरीचा प्रेमळ भाऊ नुकताच वारला होता. मामांकडून मदत होईल अशी पक्की खात्री आणि त्या खात्रीवर अण्णासाहेबांसारख्या थोर माणसाशीं करार केलेला; पण आयतेवेळीं मामांकडच्या मदतीविषयींचीहि निराशा झालेली; आणि करार हातून मोडेल व आपली नाचक्की होईल असा सगळा योग जुळून आलेला; अशा प्रसंगीं चांगल्या 'मी मी' ह्मणणाऱ्या पुरुषाचीदेखील कंबर खचली असती, मग राधाबाईसारख्या अबलेची अशी दीन स्थिति व्हावी, यांत मोठेंसें नवल नाहीं !

अशा रीतीनें राधाबाई चिंता व शोक करित बसल्या असतां "आई आई—" असे दीनवाणे उच्चारलेले शब्द त्यांच्या कानीं पडले. राधाबाईंनीं झट्‌दिशीं डोळे पुसून मागें वळून पाहिलें तों कृष्णा त्यांच्या मागें उभा. तो ह्मणाला "आई, गंगू कनी कोरडी दशमी खात नाहींग! ती ह्मणते मला गुळांबा वाढशील तरच खाईन. अगदीं हट्टून बसली आहे. अन् दुसरं असं कीं, तिथंतर सारी एकच दशमी आहे ! ती सगळी गंगूला देऊन मी काय खाऊंग आई ? "

आज खरोखर राधाबाईंची कोण दुर्दशा होती ! गेल्या दोनतीन दिवसांत कांहींच काम न मिळाल्यामुळें त्यांनां मोठी अडचण येऊन पडली होती. घरांत एका भाकरीएवढेंसुद्धां पीठ नव्हतें. नवीन काम मिळेपर्यंत आपणास उपास पडणार, हेंतर राधाबाईला कळून चुकलेंच होतें. पण मुलांची खाण्यावांचून आबाळ होईल ती कशी टाळावी, ह्या त्यांनां मोठा प्रश्न येऊन पडला होता. आजपर्यंत राधाबाईंनीं स्वतः अर्धपोटीं राहून मुलांनां कांहींएक कमी पडूं दिलें नव्हतें. पण आतां मुळीं अजीबात उपास काढूनदेखील मुलांची आबाळ होण्याचा प्रसंग आला होता ! तो त्यांच्यानें कसा पहावेल ? राधाबाई तशाच उठल्या आणि गंगूपाशीं जाऊन तिला ममतेनें कुरवाळून त्यांनीं तिची कशीतरी समजूत घातली. पण आतां कृष्णा आणि गंगाधर या दोघांनांहि भुका लागलेल्या होत्या आणि त्यांनां जेवून शाळेंत जावयास पाहिजे होतें. त्यांनां देण्याला घरांत काय होतें ? शेवटीं त्यांनांहि राधाबाईंनीं समजावून सांगितलें कीं, "तुमची शाळेची वेळ झाली कीं तुह्मी शाळेंत जा, आणि दोन वाजण्याच्या सुटींत घरीं या. तोंपर्यंत कांहींतरी तजवीज लावतें—"

दोन्ही मुलगे अत्यंत शांत, समजूतदार आणि आज्ञाधारक होते. त्यांनीं मुकाट्यानें आपलीं बुकें घेतलीं व शाळेचा रस्ता धरिला.

मुलांची समजूत पटली खरी, पण ती पटविण्यास राधाबाईला किती कठोरपणा धरावा लागला होता! आपल्या प्रियकर लेंकरांना उपाशीं शाळेंत पाठविण्याचा प्रसंग आणि तोहि आपल्या जिवंतपणीं यावा, याहून राधाबाईसारख्या प्रेमळ मातेला दुसरी दुर्दैवाची गोष्ट ती कोणती असणार? हे विचार मनांत उद्भवून त्या स्वतांला अनेक प्रकारें दूषणें लावून घेत होत्या. आतां दोन वाजतां मुलें येतील, त्या वेळेलातरी त्यांचेसाठीं खायला कोठून आणणार? शेजारून उसनेंपासनें आणावयाचें? छेः, ऋण करणें ही गोष्टतर राधाबाईला अगदीं नापसंत होती. बरें तसें न करावें, तर आतां करावेंतरी काय? मुलांनां अन्नअन्न करून मरूं द्यावें? तेंहि अर्थात् करतां येईना. अशा अडचणींतून निसटण्यास कांहींच मार्ग दिसेना. तेव्हां साहजिकच राधाबाईनीं परमेश्वराचा धांवा मांडिला. त्यांनीं गंगूला खायला घालून नुकतेंच निजविलें होतें आणि गंगाधर व कृष्णा दोघेहि शाळेंत गेले होते. अर्थात् राधाबाई घरांत एकट्याच होत्या. त्यांनीं ईश्वराचे ठिकाणीं आपल्या मनाची एकाग्रता करून अत्यंत करुणस्वरानें परमेश्वरास आळविण्यास सुरुवात केली. राधाबाई बाल्यावस्थेपासूनच अत्यंत धर्मनिष्ठ होत्या. परमेश्वराचे आज्ञेवांचून या जगांत पानहि हालत नाहीं व त्याच्या कृपेच्या साह्यानें मनुष्य असंख्य संकटांतूनहि पार पडेल, असें त्यांची आई त्यांनां वारंवार सांगत असे; आणि पुढें गोविंदरावहि कधींकधीं आपल्या पत्नीशीं धर्मचर्चा करीत तेव्हां त्यांच्या तोंडून हीच गोष्ट पुनः अनेक वेळां त्यांनीं ऐकिली होती; यामुळें सध्याच्या संकटकाळीं परमेश्वराची कृपाच तारून नेण्यास समर्थ आहे, असें त्यांच्या मनानें दृढपणें घेतलें होतें; आणि ह्मणून त्या मंगलमय करुणाघन दीनवत्सल प्रभूपाशीं आपलें संकट निवेदन करून त्याच्या कृपेची याचना करण्यासाठीं राधाबाईचें अंतःकरण साहजिकपणें उचंबळून आलें आणि त्या लीन भावानें भगवच्चरणारविंदीं आपली प्रार्थना अर्पण करण्याच्या कार्यास लागल्या.

खऱ्या शुद्ध भावानें, लीनतेनें आणि सद्गदितपणें केलेली भक्तांची प्रार्थना कशी व्यर्थ होईल? ती व्यर्थ झाल्यावर भक्तवत्सल, दीनोद्धारक, दयासागर अशीं भगवंताला विशेषणें लावितात त्यांची सार्थकता कोठें उरली? सकल विश्वाधार, सर्वशक्तिमान् परमेश्वराला राधाबाईसारख्या महासाध्वी व प्रेमळ भक्तावरचें संकट निवारण करण्यास काय उशीर लागणार होता? पण तो तिच्या अंतःकरणाची

परीक्षा पहात होता. त्या परीक्षेंत उतरल्याबरोबर राधाबाईवरचें संकट आपोआप दूर झालें. राधाबाई परमेश्वराचें ध्यान करून तत्स्वरूपीं आपल्या मनाची एकतानता करून बसल्या असतां एकाएकीं त्यांच्या घराचें पुढलें दार बाहेरून कोणीं जोरानें खडखडविलें व "गंगाधर गोविंद याचें पत्र घ्या" ह्मणून ओरडला. त्या आवाजानें राधाबाईंचें चित्त व्यग्र झालें व त्यांनीं उठून हांका मारणाऱ्या टपालवाल्याला दार उघडलें व मोहोरा नीट पाहून व पावतीवर सही करून देऊन आलेलें रजिष्टरपत्र आपल्यापाशीं ठेवून घेतलें.

राधाबाई तें पत्र घेऊन घरांत गेल्या. नुसत्या गेल्या ह्मणण्यापेक्षां धावत गेल्या असें ह्मणणें सत्यास जास्त धरून होईल. आपल्या मामाचें पत्र आणि तेंहि मोहोरबंद आलेलें. तेव्हां यांत खास कांहींतरी रकम असली पाहिजे, असें त्यांनां साहजिकच वाटलें आणि तें पत्र फोडून पहाण्यापूर्वींच त्यांच्या अंतःकरणांतून परमेश्वराच्या अगाध कृपायुक्त लीलेबद्दल कृतज्ञतेचे उद्गार बाहेर पडले. त्यांच्या मुद्रेवर एकदम विलक्षण टवटवी आली. परमेश्वरानें आज आपली अब्रू राखिली, याबद्दलचा हर्ष त्यांच्या पोटांत मावेनासा झाला आणि त्या हर्षाच्या भरांत पत्र फोडतांच एकदम पन्नास रुपयांची एक नोट निघाली तेव्हांतर राधाबाईला काय वाटलें, तें कांहीं लिहितांच येत नाहीं. हे पन्नास रुपये त्यांनां आज लाखाचे ठिकाणीं--किंबहुना त्यापेक्षांहि अधिक किंमतीचे--होते. या रकमेंतून घराचें भाडें चुकतें करून दोनतीन महिने काटकसरीनें रहातां येईल व तोंपर्यंत आपण दुप्पट काम करून बरेचसे पैसे गांठीस टाकूं, अशी उमेद त्यांनां आतां वाटूं लागली.

अण्णासाहेब आपल्या घरादारांची पहाणी करण्याकरितां मधूनमधून कधीं-काळीं येत असत. ते अकस्मात् याच वेळेस पहाणी करण्याकरितां ह्मणून शेजा-रच्या घरांत आले होते. पहाणी करून परत जात असतां त्यांनीं गंगाधराविषयीं सहज जातांजातां चौकशी केली. ती ऐकून राधाबाई बाहेर आल्या आणि ती पन्नास रुपयांची नोट अण्णासाहेबांचे पुढें करून ह्मणाल्या "मीं केलेल्या करारा-वरहि आणखी कांहीं दिवस होऊन गेले, याबद्दल मला अत्यंत दिलगिरी वाटते. ही नोट आतांच माझे हातांत आली, ती आपण घ्यावी. हिच्यांतून आपले भाड्याचे रुपये कापून घेऊन बाकीचे रुपये पाठवून द्यावे व कराराची मुदत टळल्याबद्दल माफी करावी."

राधाबाईचें तें नम्र, विनयद्योतक आणि करारीपणाचें भाषण ऐकून अण्णा-साहेब आश्चर्यानें व कौतुकानें अगदीं मोहित झाले आणि राधाबाईच्या हातांतलें

तें मोहोरबंद पाकीट पाहून त्यांची खात्री झाली कीं, ही बाई खरी कुलशीलाची आणि वचनाची पक्की आहे. अण्णासाहेबांनीं मोठ्या अदबीनें राधाबाईस म्हटलें " रुपयांबद्दल माझा मुळींच तगादा नाहीं. तुम्हांला आणखी कुणाचें देणें असेल तर तें अगोदर देऊन टाका; माझे रुपये कांहीं बुडत नाहींत. तुम्ही देतच असलां तर परभारें त्रिंबकरावांकडे जमा करण्यास पाठवा, म्हणजे ते पावती देतील."

त्रिंबकरावांचें नांव काढतांच गोदूताईंच्या घरीं त्या दिवशीं घडलेल्या प्रकाराचें व त्यानंतर घराच्या भाड्यासाठीं आपणास छळिलें त्याचें स्मरण होऊन राधाबाईंच्या अंगाचा संताप झाला आणि त्या रागाच्या आवेशांत मनावर तितका निग्रह न राहून त्या म्हणाल्या " त्रिंबकरावांकडे आम्हांला जाण्याचा प्रसंग न येईल तितका बरा—"

अण्णासाहेबांनां त्रिंबकरावांच्या निष्ठुरतेविषयींच्या पुष्कळ गोष्टी अलीकडे ऐकूं येऊं लागल्या होत्या; आणि राधाबाईला त्यांनीं अगदीं क्षुद्र कारणावरून कसें छळिलें होतें, तेंहि त्यांनां ठाऊक होतें. म्हणून त्रिंबकरावांच्या वतीनें एक शब्दसुद्धां न बोलतां त्यांनीं मुकाट्यानें ती नोट उचलली आणि खिशांत घालून बाकीचे रुपये व भाडें पोंचल्याबद्दलची पावती आपल्या माणसाचे हातीं पाठवून देतों असें सांगून अण्णासाहेब चालते झाले.

एकदाचें लोकांचें देणें देऊन टाकिलें, एवढ्यानेंच राधाबाईला कितीतरी हलकें वाटलें ! कर्जाचें ओझें इतर ओझ्यासारखें ठराविक नसतें. तर जसजसें तें अधिक वेळ वहावें तसतसें तें वाढत जाऊन यातनेला आणि अपेष्टेला कारण होत असतें. आतां तूर्त तीन महिनेतरी या संकटाची भीति बाळगावयाला नको, असें राधाबाई आपल्या मनाचें समाधान करित उभ्या राहिल्या. इतक्यांत जानकीबाई समोरून हंसतहंसतच येतांना त्यांनां दिसली. ती आल्याबरोबर राधाबाईंनीं मामांकडून पैसे आल्याची व अण्णासाहेबांचें भाडें चुकतें करून दिल्याची गोष्ट तिला सांगितली व अण्णासाहेबांकडून बाकीचे पैसे आले कीं प्रथम मुलांसाठीं कांहीं खाण्यास आणिलें पाहिजे, असें म्हणाल्या. त्यावर जानकीबाईनें आपल्या पदराखालीं झांकून आणलेला डबा राधाबाईंच्या पुढें करून म्हटलें " आज किनई नारायणरावांच्या घरीं त्यांच्या आजोबांचें श्राद्ध झालें. कृष्णा व गंगाधर यांनां जेवायला बोलाव म्हणून त्यांनीं मला म्हटलं होतं. पण मीं पाहिलं कीं, श्राद्धाचं जेवण उशीरां होईल आणि मुलांनांतर शाळेंत जाण्याची घाई.

त्यापेक्षां दोन लाडू त्यांनां घरींच नेऊन द्यावे म्हणजे झालं. कां-मीं म्हटलं तें खरं कीं नाहीं—"

असें म्हणून जानकीबाईनें तो डबा राधाबाईच्या हातांत दिला आणि कनवटीस खोंचलेले तीन रुपये काढून तेहि राधाबाईस देण्यासाठीं पुढें करून म्हणाली "जगूदादा वकिलांचा धाकटा तीन वर्षांचा मुलगा आहे तो! त्याच्यासाठीं खऱ्या जिगाची बारीक वेलीची मखमलीची टोपी करण्यासाठीं हे तीन रुपये त्यांनीं आगाऊ दिले आहेत. हे घ्या आणि शनिवारपर्यंत टोपी तयार करून ठेवा. बरं पण राधाबाई, आतां भाड्याचे रुपये कुठून भरूं म्हणून तुम्हांला सारखी काळजी लागून राहिली होती तीतर दूर झाली ना? चला, तुम्ही संकटांतून पार पडलां हीच मोठी आनंदाची गोष्ट म्हटली पाहिजे."

संकट तर खरेंच. जिला कोणाचाच आधार नाहीं अशा अबलेवर प्रस्तुत-सारखा प्रसंग गुदरणें हे संकट नव्हे तर काय? वाचकहो! तुम्हांला राधाबाईवरल्या या प्रसंगाचें हुबेहुब चित्र स्वतांच्या हृत्पटलावर रेखतां येईल काय? छेः, तें फार कठीण काम आहे. रस्त्यांत भीक मागत फिरणारांची स्थिति एक वेळ बरोबर जाणतां येईल, पण कुलीन घराण्यांतल्या अशा सुशील स्त्रीवर आलेल्या प्रसंगाचें यथार्थ ज्ञान होणें त्यापेक्षां शतपटीनें कठीण आहे. भिकाऱ्यांच्या दैन्याला वाचातरी असते; शिवाय तशा दैन्यावस्थेंत रहाण्याची लहानपणापासून संवयच असल्यामुळें त्या दैन्याची तीव्रताहि त्यांनां विशेष बाधा करित नाहीं; पण राधाबाईसारखी कुलीन, आईबापांनीं लडिवाळपणानें वाढविलेली व पतीनें आदरयुक्त, अकृत्रिम प्रेमानें संभाळलेली सुशील, सद्गुणी, विनयवती सुंदरी आणि तिला ओलीकोरडी भाकर खाण्याचा किंबहुना निखालस उपाशीं रहाण्याचा, लोकांची मोलमजुरी करण्याचा व गोदूताईसारख्या उर्मट आणि दुष्ट बायकांचीं बोलणीं सोसून घेण्याचा प्रसंग यावाना? शिव शिव! अशा कठीण प्रसंगांत सांपडलेल्या तिच्या कोमल तनूला या असह्य यातना, या हालअपेष्टा, हें दुःख सहनतरी कसें करवलें? अशा स्थितींत मुलांनां उपाशीं शाळेंत पाठविण्याचा प्रसंग आला असतां तिला मामांकडचे रुपये व जानकीबाईनें मुलांसाठीं आणलेला खाऊ परमेश्वराच्या घरच्या देणगीसारखा बहुमोल वाटला, यांत नवल कोणतें?

## प्रकरण २६ वें.

# थोरपणा जागेंत नाहीं, तर मनुष्यांत असतो.

मामांकडून आलेले रुपये किती दिवस पुरणार ? त्यांतले बरेचसे घरभाड्यांतच खर्च होऊन बाकी शिलक थोडे राहिले होते. पण ते संपल्यावर शिवणकाम वगैरेवर आपणांस पुरेशी प्राप्ति झाली नाहीं तर पुढें काय करावयाचें ? पुनः मामांजवळ दांत विचकावयाचे ? छेः, राधाबाईच्यानें तें कालत्रयीं घडलें नसतें. एकदा त्यांनीं मामांजवळ याचना केली, हेंच अगोदर त्यांच्या संकोची स्वभावाशीं आणि स्वतंत्र बाण्याशीं विसंगत होतें; पण तो प्रसंगच तसा होता. त्यामुळें राधाबाईचा निरुपाय झाला होता. राधाबाई कधीं न मागणारी असून तिनें रकम मागितली, तेव्हां खरोखर तसेंच कांहींतरी मोठें संकट तिच्यावर आलें असलें पाहिजे, असें मामांला वाटूनच त्यांनीं हो नाहीं कांहींएक न ह्मणतां मुकाट्यानें पन्नास रुपये आपल्या भाचीला पाठवून दिले होते. पण पुनः तशीच अडचण दाखवून खर्चण्यास मागण्याइतका बेशरमपणा राधाबाईच्या अंगांत नव्हता. ओलीकोरडी भाकर खाऊं, पण ती अभिमानानें खाऊं, असें ती नेहमीं ह्मणत असे. पण आतां घरांततर दाणे नाहींत आणि लोकांजवळतर मागावयाचे नाहींत, मग करावयाचें काय ?

काय करावयाचें, तेंच राधाबाईनीं इतके दिवस विचार करकरून ठरविलें होतें. गंगाधरानें आपलें शिक्षण येथेंच पुरें करून नोकरीची सोय पहावी आणि आपल्या भावांबहिणीचें संगोपन करून त्यांच्या विद्याभ्यासाकडे लक्ष्य द्यावें, असें राधाबाईनीं आपल्या मनांत योजून ठेविलें होतें. गंगाधर बुद्धिमान् असून मेहनती होता व आपला अभ्यास वेळचेवेळीं करित गेल्यामुळें केव्हांहि परीक्षा घेतली तरी त्याची आपली तयारी असे. असा मुलगा नेहमीं वर्गांत पहिला नंबर पटकावी, स्कॉलरशिपा मिळवी आणि गुरूची मर्जी संपादी, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. त्याची आतां इंग्रजी पांचवी यत्ता संपून सहावीला नुकती सुरुवात झाली होती. इतक्यांतच संसाराच्या गाड्याला त्याला जुंपण्याचें राधाबाईच्यादेखील जिवावरच आलें होतें; परंतु नाइलाजास्तव तें करण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. राधाबाईनीं एकदा प्रसंग पाहून गंगाधराजवळहि ही गोष्ट काढिली होती. तेव्हां त्या बिचाऱ्याला एकीकडे आड व एकीकडे विहीर असें झालें. एवढ्यांतच शाळा सोडून नोकरीच्या मागें लागलों तर आपल्या मनांत पुष्कळ शिकून शहाणें

व्हावयाचें, तें तसेंच राहून आपला जन्म फुकट जाईल; बरें तसें न करावें तर जिनें आपल्यासाठीं इतके कष्ट सोसले व जी अजूनहि सोशित आहे तिला आपले हातून थोडेंबहुत साह्य करण्याचा व तिचें ओझें किंचित्तरी हलकें करण्याचा प्रसंग आला असतां आपण स्वार्थाच्या नादीं भुलून तो घालविल्याचा पश्चात्ताप पुढें होईल व कृतघ्नपणाहि पदरीं येईल. हा विचार मनांत येतांच त्याचे स्वार्थाचे विचार आपोआप वितळले आणि राधाबाईच्या बेतास रुकार देऊन तो ह्मणाला "पण आई, मला नाहीं अजून हिशेबाठिशेबाची किंवा कारकुनी कामाची माहिती; मग मला एकदम कारकुनाची जागा कोण द्यायला बसलें आहे? चिठ्ठीचपाटी नेआण करण्याचें शिपायाचें काम फारतर मला करतां येईल. पण तें काम पडलें हलकें. आपल्या नांवालौकिकाला तें कसें शोभेल?"

यावर राधाबाई गंगाधराला कुरवाळून ह्मणाल्या "बाळा! तुला आपली सध्याची स्थिति कळते आहेना? अशा स्थितींत महिन्याचे कांठीं पांचचार रुपये मिळाले तरी ते आपल्याला पंचविसांचे ठिकाणीं आहेत. तूं शिपायाचंच काम करावं, असं मी ह्मणत नाहीं. उमेदवार ह्मणून कुणीं तुला ठेविलं व अर्ज्याविर्ज्या लिहिण्याची व हिशेबठिशेब ठेवण्याची माहिती तुला करून दिली, तर पांचचार महिन्यांत तुला कारकुनाचीहि एखादी जागा मिळेल. नाहीं ह्मणून तूं कशावरून ह्मणतोस? समज, नाहीं तुला उमेदवारींत घेतलं—तरी अखेर शिपाई होण्यांत लाज वाटण्यासारखं काय आहे? थोरपणा किंवा हलकेपणा हे शब्द कामाच्या दरजाला मुळींच लागू नाहींत, तें सगळं मनुष्याच्या वर्तनावर अवलंबून आहे. कोणतीहि नोकरी सांगितली आणि ती बजावतांना मनुष्यानं आपली नेकी, सभ्यतेचं वर्तन, वाणीची मधुरता आणि अंतःकरणाचा सरळपणा ठेविला ह्मणजे तोच मनुष्य थोर समजला जातो; आणि याच्या उलट एखादा मनुष्य एका मोठ्या राजाचा प्रधान असला आणि तो आपल्या धन्याशीं निमकहरामपणं वागला, किंवा निष्ठुरतेनं प्रजेचे गळे कापूं लागला, अथवा न्याय उघडपणं अगर लपूनछपून विकूं लागला, किंवा अन्य प्रकारं दुराचार माजवूं लागला, तर त्या माणसाची योग्यता महार-मांगाहूनहि कमी, त्याचं तोंडहि कुणीं पाहूं नये, इतका तो अमंगळ समजला पाहिजे! सारांश काय कीं, काम कांहीं थोर किंवा नीच नसतं, तर मनुष्याचे वर्तनावरून तीं विशेषणं त्या कामाला लावण्यांत येतात. तूं शिपायाचं काम केलंस आणि इमानंइतबारं आणि आपल्या कुलशीलास कलंक न लावण्यासारखा

वागलास, तर मला त्यांतच जेवढी धन्यता वाटेल—तेवढी तूं मोठा दिवाण झालास पण दुर्वर्तनी निघालास तर त्यानं वाटणार नाहीं, हें तूं पक्कं लक्ष्यात ठेव.”

राधाबाईंचा हा उपदेश किती विचाराचा, शहाणपणाचा आणि कळकळीचा होता! आणि अशा उपदेशाचा परिणाम गंगाधरासारख्या सत्वशील मुलाच्या मनावर विशेष झाल्यास त्यांत काय नवल! आधींच निर्मळ आरसा आणि तशांत शुद्ध पौर्णिमेच्या चंद्राचें निर्मळ प्रतिबिंब—मग शोभेला काय कमी आहे! गंगाधराचें अंतःकरण त्या उपदेशामृतामुळें अगदीं गहिंवरून आलें आणि कोणतीहि नोकरी येओ, मी ती पतकरीन आणि आपल्या कुलशीलाला शोभेल अशा रीतीनें ती करीन, असें त्यानें राधाबाईंस आश्वासन दिलें.

नोकऱ्या कांहीं आपोआप घरीं चालत येत नसतात. त्यांचेसाठीं लोकांचे उंबरठे झिजवावे लागतात, ही गोष्ट राधाबाईला पुरतेपणीं ठाऊक होती. ह्मणून कोणाच्यातरी मार्फतीनें गंगाधराच्या नोकरीसाठीं खटपट करावी, असा त्यांनीं विचार केला आणि या कामीं नारायणरावांच्या सल्ल्याचा उपयोग होईल हें जाणून जानकीबाईच्या द्वारें त्यांच्या कानांवर ही गोष्ट घातली. नारायणरावांनींहि गंगाधरासाठीं नोकरीविषयींची खटपट करण्याचें पतकरिलें.

या गोष्टीस बरेच दिवस लोटल्यावर एके दिवशीं राधाबाई कांहीं निकाल कळेल ह्मणून जानकीबाईकडे गेल्या. जानकीबाई त्या वेळीं रागानें अगदीं फणफणत होती आणि तोंडानें तिची सारखी कुरकुर चाललीच होती. जानकीबाईला रागावण्याला कांहीं विशेष कारण झालें होतें असें नाहीं. तिला राग येण्याला अगदीं क्षुल्लक कारणसुद्धां पुरत असे; आणि आज तसेंच कांहीं क्षुद्र कारण उपस्थित झालें होतें. जानकीबाई अगदी साधीभोळी बायको होती. तिच्या स्वभावाला चापूनचोपून लुगडें नेसणें व चट्टीपट्टी करणें अगदीं आवडत नसे; आणि तशांत अगदीं बाल्यावस्थेपासून वैधव्यांत दिवस काढल्यामुळेंतर कोणीं नीटनेटकी वेणीफणी घातली, वेणींत फुलें खोंविलीं, कुंकवाची बारीक टिकली लाविली, घट्ट चोळी घातली किंवा प्रहरानप्रहर आरशांत पहात बसलें तर तिच्या अंगाचा तिळपापड होत असे. सोनीचें वय कांहीं फार नव्हतें; ती अद्याप पोरच होती. आणि पोरपणीं अशा गोष्टीचा नाद लागला तर तेवढ्यावरून ह्मणजे इतकें रागवायाला पाहिजे होतें, असें नाहीं. पण जानकीबाईच्या स्वभावाला, तें कोठचें खपायला! सोनी माजघराच्या कोंपऱ्यांतल्या खोलींत एकटीच आरशापुढें रेखून कुंकवाची बारीक टिकली लावित बसली होती. टिकली नीट न लागली ह्मणजे ती पुसून पुनः

लावी; पुनः आरशांत पाही; पुनः मनाजोगी लागली नाहीं तर ती पुसून दुसरी लावी. याप्रमाणें चाललें असतां सोनीनें आरशांत वेड्यावांकड्या माना करून पहाण्याला आणि जानकीबाई त्या खोलींत कांहीं कामानिमित्त यावयाला एकच गांठ पडली. मग काय विचारतां ! जानकीबाईच्यानें पोरीचा हा चवचालपणा कोठून पहावणार ? तिनें रागानें सोनीच्या पाठींत असा एक धपाटा दिला कीं, त्याचा झणझणीतपणा जानकीबाईच्या हाताला किंवा सोनीच्या पाठीलाच माहीत ! हात याप्रमाणें गुंतल्यावर तोंड कसें स्वस्थ बसेल ? तोंडानेंहि पुष्पवृष्टि सुरू झाली! "कोण बाई आजकालच्या या दांडग्या पोरी! यांनां आतां करावंतरी कसं? मेल्यांनीं आतां ताळतंत्र अगदींच सोडला--कायग ए दांडगे पोरी ! तूं आरशांत एवढी कायग पहात होतीस ? तुझ्या नाकातोंडाला सोनं मोतीं कां लागलं आहे?– वडील माणसांचा थोडातरी मेला धाक धरायचा होता ?–आतांच तूं इतकी उर्मट-पणानं वागायला लागलीस मग पुढं तुझं कसं व्हायचं ? अशा गुणांनीं सासूच्या हातच्या उठतां लाथा आणि बसतां बुक्या खाव्या लागतील, तेव्हां समजेल सुख !"

तोफेच्या या भडिमारापुढें सोनीचा कसला टिकाव लागणार ! ती अगदीं भेदरून गेली आणि आपले बापाचे आड जाऊन लपली. नारायणरावांनीं तिला घाबरण्याचें कारण काय म्हणून विचारल्यावर सोनीनें झालेली सगळी हकीगत त्यांनां सांगितली. नारायणरावांला जानकीबाईचा कडक स्वभाव ठाऊक होताच. म्हणून त्यांनां या गोष्टीचा राग मुळींच आला नाहीं. उलट ते सोनीचें व जानकी-बाईचें असें दोघींचेंहि समाधान व्हावें म्हणून म्हणाले "पुनः असं करणार नाहींस असं कबूल करशील तर तुझ्याबद्दल मी आज जानकीबाईपाशीं रदबदली करीन—"

हे शब्द जानकीबाईनें ऐकिले. आरशांत पहाणें, कुंकवाची लहानशी टिकली लावणें आणि नीटनेटकें रहाणें, यांत म्हणजे कांहीं वाईट आहे, अशी नारायण-रावांची स्वताची मुळींच समजूत नव्हती. त्यांनीं सोनीकडून पुनः असें करणार नाहीं अशी कबूली घेतली होती, ती केवळ जानकीबाईच्या मर्जीखातरच होती. पण एवढ्यानें जानकीबाईची मर्जी संभाळली गेली, असें कोणी समजलें असतें तर ती त्याची निखालस चूक होती. आपण पोरीला नीट शिक्षण लावित असतां नारायणरावांनीं मध्यें पडणें म्हणजे किती शिष्टाचाराविरुद्ध ! आणि असा अपमान आपण सोसून घेत आहों, हा आपला साधुपणा आहे, असें जानकीबाई स्वतांच्या तोंडानें शंभरदा बोलून दाखवित होती. इतकेंच नव्हे तर "नारायणराव आपल्या

मुलीचे फाजील लाड करतात आणि त्यामुळंच ती शेफारून जाऊन कुणाचं ऐकेनाशी झाली आहे—याचा परिणाम कधीं चांगला होणार नाहीं—ही कारटी एखादे दिवशीं आपल्या बापाला चार लोकांत खालीं पहाण्यास लावण्यासारखं वर्तन करील, आणि मग माझ्या बोलण्याची आठवण येईल, तोंपर्यंत नाहीं—" अशाप्रकारचें भविष्य ती मधूनमधून वर्तवित होती. इतक्यांत राधाबाई सहजगत्या तेथें आल्या. त्यांनां पाहून जानकीबाईनें आपली जीभ जरा आवरून धरली.

राधाबाई गंगाधराच्या नोकरीबद्दल विचारण्यासाठीं बहुधा आल्या असतील असा तर्क करून नारायणरावांनीं त्यासंबंधांत मुद्दाम बोलणें काढून ह्मटलें "मी काल अण्णासाहेबांकडे मुद्दाम गेलों होतों आणि गंगाधराविषयीं गोष्टहि काढून ठेविली आहे. पण ते ह्मणाले कीं, सध्या आमच्या कचेरींत बेताचे कारकून असून दोनतीन उमेदवारहि आहेत. तेव्हां आणखी नवीन ठेवण्याचें कांहीं कारण नाहीं. पण एखादा हुषार, चपळ, प्रामाणिक व पडेल तें काम इमानानें करणारा छोकरा असेल तर हवा आहे. त्याला शिपायाचे दरजापासून मी वाढवीन आणि तसा हुषार दिसला तर कामकाजाची माहिती झाल्यावर मुख्य मुनीमसुद्धां करीन. पण आरंभीं अगदीं हलकेंसलकें काम करण्यास त्यानें लाजतां कामा नये—"

गंगाधराचा सुस्वभाव राधाबाईला ठाऊक होताच आणि शिपायाची नोकरी कां होईना, पण ती इमानानें करण्यांत जो थोरपणा आहे, तो दिवाणाचें काम निमकहरामपणें करण्यांत नाहीं, असा आपण नुक्ताच केलेला उपदेश त्याच्या मनावर उत्तम बिंबलेला आहे, हेंहि नुक्तेंच त्यांच्या निदर्शनास आलें होतें; तेव्हां अण्णासाहेबांजवळ रहाण्यास गंगाधर कबूल होईल, ही राधाबाईची खात्री होतीच. परंतु त्या जागेचा पगार सगळा सहा रुपये, हें कळतांच त्यांनां अंमळ वाईट वाटलें आणि एवढ्या थोड्या प्राप्तीसाठीं गंगाधराचा विद्याभ्यास खुंटवून धरणें कितपत योग्य होईल, हा त्यांनां मोठा विचार येऊन पडला. नारायणरावांच्या लक्ष्यांत ही गोष्ट येतांच त्यांनीं राधाबाईची समजूत घालण्याच्या उद्देशानें ह्मटलें "आज पगार थोडा आहे आणि हलकेंसलकेंहि काम करावें लागेल, ही गोष्ट खरी, पण याचा परिणाम फार गोड होणार आहे, तिकडे लक्ष्य द्या. अण्णासाहेबांसारखा मालक मिळणें थोड्यांच्याच भाग्यांत असेल. त्यांचा लोभ गंगाधरानें एकदा संपादन केला, ह्मणजे त्याच्या साऱ्या जन्माची विपत्ति दूर झाली असें समजा. कोणत्याहि मोठ्या कार्यांचा आरंभ पाहिला तरी तो अगदीं क्षुद्रच असतो. पुढें

नांवारूपास आलेले आणि भाग्यवान् झालेले पुरुष लहानपणीं अशीं हलकीं सलकींच कामें करित होते, अशीं पुष्कळ उदाहरणें सांगतां येतील. ”

यावर राधाबाईच्या तोंडून “अण्णासाहेबांनींहि प्रथम अशी लहानशीच नोकरी धरली होती काय ?” असा प्रश्न सहजगत्या निघून गेला. कदाचित् अण्णासाहेब स्वतः जर अशा रीतीनें अगदीं खालच्या पायरीपासून चढतचढत इतके वर आले असतील तर ते गंगाधरालाहि तसेच वर चढवितील, असें मनांत येऊन तर वरील प्रश्न त्यांचे तोंडून निघाला नसेल ना ?

नारायणराव ह्मणाले “नाहीं. अण्णासाहेब अशा खालच्या पायरीपासून वर चढलेले नाहींत. ते मुळचेच गर्भश्रीमंत होते. अण्णासाहेबांचे वडील चांगले प्रसिद्ध सावकारांपैकीं एक होते. त्यांनीं अण्णासाहेबांकडून शाळेंत मराठी व इंग्रजी अभ्यास करविला व घरीं शास्त्री ठेवून संस्कृत भाषेंतलीं काव्यें, व्याकरण वगैरेहि ह्मणविलीं. तसेंच जमाखर्चाची पद्धति व व्यापारी तऱ्हेच्या हिशेबाच्या रीति वगैरेंची सर्व माहिती करून दिली. आतां आमचेसारखे कारकून वगैरे शेंकडो नोकर त्यांचे पदरीं आहेत खरे, पण प्रत्येकाच्या कामावर देखरेख त्यांची असते, आणि कोण कसा आहे, कुणाच्या अंगीं गुणदोष काय आहेत, इकडे त्यांचें बारिक लक्ष्य असतें. चांगला हुपार माणूस त्यांच्या नोकरींत फार दिवस खालच्या पायरीवर रहावयाचाच नाहीं. एकदा तुमच्या गंगाधराची हुपारी त्यांच्या नजरेस पडूं द्या, कीं मग अण्णासाहेब त्याला कसे हातीं धरतात तें पहाल !”

नारायणरावांनीं इतकी खात्री दिल्यावर राधाबाईच्यानें आणखी शंका काढवेनात. त्यांनीं दुसरे दिवशीं दहा वाजतां नारायणरावांबरोबर गंगाधराला अण्णासाहेबांकडे पाठविण्याचें कबूल केलें आणि जातांजातां रुसून बसलेल्या सोनीच्या पाठीवरून हात फिरवून आणि तिला विनाकारण रागें भरल्याबद्दल जानकीबाईस विनोदानें दोन उपरोधिक शब्द बोलून घराचा रस्ता धरला.

## प्रकरण २७ वें.

# गंगाधराची नोकरी.

गंगाधर आतां अण्णासाहेबांच्या पदरीं नोकरीस राहिला. अण्णासाहेबांनीं त्याला स्वताच्याचजवळ ठेवून घेतलें होतें. त्यांच्या आफिसांतलीं पुस्तकें व कागदपत्रें झाडूनपुसून साफ ठेवावयाचीं, ते सांगतील ते चिठ्ठीनिरोप जिकडचे तिकडे पोंचवावयाचे, ते सांगतील त्या आंकड्यांच्या बेरजा वगैरे करावयाच्या, किरकोळ पत्रें लिहावयाचीं, याप्रमाणें हलक्या दर्जाच्या कारकुनाचें काम गंगाधराकडे देण्यांत आलें होतें. आजपर्यंत विद्यार्जनांत ज्याचें आयुष्य शांतपणें गेलें आहे, ज्याला व्यवहाराशीं प्रसंगच आला नाहीं, ज्याला ताबेदारी कशी ती आजपर्यंत मुळींच ठाऊक नाहीं, त्याला एकदम त्या व्यवसायांतून काढून नोकरीसारख्या अगदीं भिन्न स्थितींत आणून सोडल्यावर प्रथम त्याच्या मनाची चुकल्याचुकल्यासारखी स्थिति होणें साहजिकच आहे. अण्णासाहेब आपल्या नोकरांच्या कामांवर सक्त देखरेख ठेवीत, तथापि त्यांचें अंतःकरण फार सदय असे व ते गुणांची उत्तम पारख करणारे असल्यामुळें आपल्याला त्यांच्याजवळ नोकरी करण्यास मिळावें, ही ज्याची त्याची महत्त्वाकांक्षा असे; पण असा योग अगदीं फारच थोड्यांनां प्राप्त होई. हुषार, प्रामाणिक आणि इमानी नोकर असला ह्मणजे अण्णासाहेब त्याच्या गुणाचें चीज केल्यावांचून आणि त्याला बढती दिल्यावांचून कधींहि रहावयाचे नाहींत, ही प्रत्येक नोकरास खात्री वाटत असे. त्यामुळें त्यांच्याजवळ नोकरीस रहाण्याकरितां प्रत्येकाची धडपड चाले. पण गंगाधर वर सांगितल्याप्रमाणें भिन्न परिस्थितींत—अगदीं भिन्न वातावरणांत—एकदम येऊन पडल्यामुळें अण्णासाहेबांजवळची इतरांनीं वांछित अशी जागा त्याला मिळाली तरी त्याला ती बरी वाटली नाहीं. साफसुफी करणें व चिठ्ठ्यानिरोप पोहोंचविणें, हें हलकेंसलकें काम करण्याचा आपल्यासारख्या इंग्रजी शाळेंत पहिला नंबर पटकावणाऱ्या विद्यार्थ्यावर प्रसंग यावा, ही गोष्ट त्याच्या अंतःकरणाला शल्यासारखी बोंचत होती. थोरपण कामावर नाहीं तर तें माणसावर अवलंबून असतें, ही गोष्ट राधाबाईनीं त्याच्या मनावर पुष्कळ बिंबविली होती, ह्मणून आपल्या स्वताच्या इच्छेच्याविरुद्ध तो नोकरी करित होता. पण मधूनमधून पुनः एखादे वेळेस त्याचें मन साशंक होई आणि त्याचा आनंद मावळून जाऊन त्याच्या मुद्रेवर उदासपणाचें चिन्ह प्रतिबिंबित होई.

गंगाधर नोकरीवर रुजू झाला त्याच दिवशीं संध्याकाळीं तो सुट्टी झाल्यावर घरीं परत आला, तेव्हां त्याची मुद्रा अत्यंत उदास दिसली. त्याला घरीं जाण्याला उत्साह वाटेना, यामुळें त्याचीं पावलें जड झालीं होतीं. तो घरीं जाऊन कपडे वगैरे काढून उदासपणें खिडकींत बसला. राधाबाई मोठ्या उत्सुकतेनें गंगाधराला नोकरीची हकीगत विचारूं लागल्या, पण त्यानें टाळाटाळीचीं उत्तरें दिलीं. राधाबाईला गंगाधराचें हें वर्तन पाहून फार आश्चर्य वाटलें व दुःखहि झालें. तथापि त्यांनीं स्वताच्या मनाचें असें समाधान केलें कीं, संवय नसल्यामुळें त्याला चमत्कारिक वाटत असेल, किंवा तो थकलाभागला असेल. आपलें डोकें दुखत आहे असें सांगून गंगाधर उठला आणि बिछान्यावर पडून स्फुंदस्फुंदून रडूं लागला. तेव्हां राधाबाई त्याच्याजवळ गेल्या आणि त्याला पोटाशीं धरून रडण्याचें कारण विचारूं लागल्या. गंगाधराचे पोटांतले विचार आतां उमळून यावयास लागले. तो ह्मणाला "आई, नको मला ती नोकरी ! मीं इतकीं वर्षें शाळेंत घालविलीं आणि इंग्रजी, मराठी, संस्कृत वगैरे भाषा व त्याचप्रमाणें इतिहास, भूगोल, भूमिति वगैरे विषय शिकलों, तें असली महारकी करण्यासाठींच काय ? इतकें शिकून आज माझ्या विद्येचें चीज काय होतें आहे तें पहा ! आफिसाची झाडलोट करणें आणि इकडची चिठ्ठी तिकडे नेऊन देणें, या कामांतच माझा जन्म जायचा का !"

गंगाधराचा स्वभाव इतका त्रासिक पूर्वीं नव्हता. पण एका दिवसाच्या नोकरीच्या अनुभवानें तो तसा बनला होता. तसेंच तो पूर्वीं अगदीं मितभाषी असे, पण आज त्याला त्रासून चरफडत बोलण्याच्या लहरींवर लहरी येत होत्या. राधाबाईच्या लक्षांत ही गोष्ट येऊन चुकली होती व त्याच्या स्वभावांत एकाएकीं झालेल्या फेरबदलावरून त्याला विलक्षण वाईट वाटत असलें पाहिजे, हेंहि राधाबाईला कळून चुकलें होतें. तथापि त्याचें समाधान करण्याच्या उद्देशानें त्या ह्मणाल्या "बाळा ! असं त्रासून कसा बरं निभाव लागेल ? ताबेदारी ह्मटली ह्मणजे ती कसलीहि असो, मालकाच्या मर्जीप्रमाणं केली पाहिजे. तुला हा नवीनच अनुभव आहे आणि तशांतून तूं आतां थकूनभागून आला आहेस, ह्मणून तुला फारच त्याचं एवढं वाटतं आहे. दोन घांस खाऊन पाणी पी अन् मग सावकाश बोलत बैस."

गंगाधर ह्मणाला "आई, ज्यांना 'ओचें नांव ठो' येत नाहीं अशीं कुणब्याचीं पोरेंसुद्धां दहादहा रुपये महिना मिळवितात, आणि मी एवढा शिकून शेवटीं त्यांच्याच जोडीला येऊन—"

यावर राधाबाई ह्मणाल्या "बाळा ! अडचणीच्या वेळीं आपल्यासारख्याला महिन्याचे कांठीं सहा रुपयांची मदत कांहीं थोडी नाहीं. ही जागाहि आज न मिळती तर आपली दशा काय होती ? रुणब्याच्या पोरांची अन् तुझी बरोबरी तूं करतोस, पण तूंच पहा कीं, त्या पोरांनां शिपायाची–फारतर हवालदार किंवा जमादार होण्यापलीकडे कांहीं मोठी जागा मिळण्याची उमेद आहे का ? तुला वाढायला हवी तेवढी जागा आहे !"

गंगाधराला हे दोन्ही मुद्दे जोरदार वाटले. त्याच्यानें यावर उत्तर देववेना. राधाबाईनीं आतां सांगितलेली महत्त्वाची गोष्ट पूर्वीं त्याच्या लक्ष्यांत आली नव्हती, ह्मणून तो मनांतल्या मनांत शरमला.

राधाबाई पुढें ह्मणाल्या "बाळा, मी तुला एक गोष्ट सांगतें, ती लक्ष्यांत ठेवशील तर तूं आजच्यासारखा पुनः कष्टी होणार नाहींस. बाबारे ! आलेलीं संकटं भोगलीं पाहिजेत व त्यांतून होईल तितका धीरानं टिकाव धरला पाहिजे. या झटापटींत सत्याचा व सद्गुणांचा नेहमीं जय होणार, अशी मनांत पक्की श्रद्धा ठेविली पाहिजे. श्रद्धा आणि आशा हीं एक नाहींत. श्रद्धा निराळी आणि आशा निराळी. आपण नुसती आशा बाळगून राहिलों तर एखादे वेळेस आपले हातपाय लटपटण्याचा संभव आहे. पण श्रद्धेचं तसं नाहीं. धीर, उद्योग, सोशिकपणा आणि श्रद्धा यांनीं काय हवें तें जिंकतां येईल. ह्मणून धीर कधींहि सोडूं नये. बाळा ! मीं जर आज धीर सोडला, तर काय अवस्था होईल ? निराशेशिवाय आपलेपाशीं काय आहे ? निराशेनं काळीज तुटून माझा अंत व्हायला काय मोठा काळ लागणार आहे ? पण परमेश्वर सत्याचा वाली आहे, ही माझी दृढ श्रद्धा आहे. परमेश्वर आपणावर तऱ्हेतऱ्हेचीं संकटं आणून आपली श्रद्धा कसोटीस लावून पहात आहे आणि त्याच्या कसोटीस उतरल्यावर तो आपणांस योग्य असं बक्षीस दिल्यावांचून रहाणार नाहीं, ही माझी श्रद्धा बिलकूल ढळायची नाहीं."

हें ऐकल्यापासून गंगाधरास वाटणारे कष्ट हलके होत चालले. राधाबाई पुनः ह्मणाल्या "सगळे दिवस सारखे नसतात. आपले हेहि दिवस परमेश्वराच्या कृपेनं निघून जातील आणि त्याच्याच कृपेनं आपण सुखाचे दिवस पाहूं. ते सुखाचे दिवस पहात असतां मागच्या गोष्टींचं जेव्हां आपणांस स्मरण होईल, तेव्हां परमेश्वराच्या कसोटीस उतरल्याबद्दल आपणांस केवढा आनंद होईल ! केवढा अभिमान आणि किती धन्यता वाटेल ! परमेश्वराचे चरणीं आपण लीन झालों व त्याला आपलं दुःख निवेदन करून त्यांतून पार पडण्यास लागणारं धैर्य त्याचे-

पाशीं मागितलं, आणि त्याची करुणा भाकिली तर आपलं दुःख अंमळ हलकं होईल. पुढं काय वाढून ठेविलं आहे तें कुणाला सांगतां येईल ? पण सध्याच्या स्थितीवरून पाहूं लागलों तर अजून आपल्या वाटेवर पुष्कळ अंधार आहे, असं दिसतं. तुला त्या अखेरच्या दिवशीं जातांजातां सांगितलेलं स्वप्न आठवतं ना ? त्या स्वप्नांत एक फार लखलखीत उजेड दिसला आणि त्या उजेडाच्या योगानं कांट्याकुट्यांतून आपली वाट काढित चालले होते ह्मणून सांगितलं तें तूं इतक्यांत विसरलास काय ?"

गंगाधराचे डोळे भरून आले. तो आवेशानें ह्मणाला "नाहीं, मी तें विसरलों नाहीं !"

"झालं तर मग. तुझ्या लक्ष्यांत हें यायला पाहिजे कीं, आतां त्याच प्रकाशानं मला आपली वाट दिसत आहे. आणि ती ही कीं, कशींहि संकटं आलीं तरी तुह्मां मुलांनां घेऊन रहायचं आणि परमेश्वर जी काय ओलीकोरडी भाकर देईल ती घालून तुह्मांला शिकवायचं, एवढंच आतां माझ्या आयुष्यांतलं काम उरलं आहे. आणि या कामीं तुझं मनापासून साह्य पाहिजे आहे. ह्मणून ह्मणतें, या हलक्या-सलक्या नोकरीचा कंटाळा न करतां मानापमानाचं गांठोडं खुंटीला ठेवून आणि पुढच्या आशेवर व सध्याच्या दीन स्थितीवर नजर देऊन धैर्यानं दिवस काढ; आपल्या आईला हातभार लावणं हें आपलं कर्तव्य समज आणि कर्तव्य-कर्माचरणांत कितीहि झीज सोसावी लागली व मानखंडना झाली तरी ती व्यर्थ जाणार नाहीं, त्याचं फळ पुढं मिळेलच मिळेल अशी खात्री ठेव."

राधाबाईच्या या उपदेशाचा प्रकाश गंगाधराच्या अंतःकरणांत आतां लख्ख पडला. तो ह्मणाला " आई, तूं ह्मणतेस तसाच मी आतांपासून वागेन."

राधाबाईनीं त्याला कुरवाळून ह्मटलें " परमेश्वर तुझ्यासारख्या सुशील मुलाचं कल्याण करील."

गंगाधर रोज आपल्या नोकरीवर जात असे, पण यानंतर तो पुनः असा कष्टी कधींहि दिसला नाहीं. होतांहोतां त्याच्या नोकरीचा महिना पुरा झाला आणि पहिल्या तारखेला पगारवांटणी झाली तेव्हां तो बारा रुपये घेऊन आला आणि ते आईपुढें ठेऊन ह्मणाला " आई, आज पगार हातीं आला. मला बारा रुपये मिळाले. आणि माझ्याचसारखीं चिठ्ठीचपाटी नेणारीं दुसरीं कुणब्याचीं पोरें आहेत त्यांना पांचपांचच रुपये मिळाले."

राधाबाईनीं विचारिलें " पगार कुणीं अण्णासाहेबांनींच वांटला ? ते तुला देण्याचे वेळीं कांहीं ह्मणाले काय ? "

" नाहीं आई, पगार वांटण्याचें काम साहेब स्वतः करित नाहींत. "

" साहेब कोण ? "

" अण्णासाहेबांनां आह्मी नोकरलोक नुसते ' साहेब ' असें ह्मणत असतों. ते स्वतः पगार वांटित नाहींत. नारायणराव नाहींतर विठोबादादा खजीनदार या दोघांपैकीं कुणाकडेतरी तें काम दिलें असतें. आज नारायणरावांनीं बाकीच्या सगळ्यांनां पगार वांटला आणि माझ्या पगाराबद्दल सहा रुपयांची चळत हातांत घेऊन साहेबांचा हुकूम घ्यायला ह्मणून गेले आणि भीतभीत ह्मणाले कीं 'गंगाधर हा इतर मुलांसारखा नाहीं. इंग्रजी शिकलेला आहे आणि हुषार असून प्रामाणिकहि आहे. तेव्हां इतर मुलांहून कांहीं जास्ती पगार त्याला देणें योग्य आहे. आपला हुकूम होईल त्याप्रमाणें पत्रकांत आंकडा घालतां येईल." यावर अण्णासाहेबांनीं किती पगार ठरवावा ह्मणून त्यांनांच विचारलें. तेव्हां त्यांनीं भीतभीत आठपासून दहांपर्यंत द्यावा असें सुचविलें. अण्णासाहेबांनीं क्षणमात्र खुर्चीला पाठ टेंकली आणि डोळे मिटून विचार केल्यासारखें करून ह्मटलें ' नाहीं. त्याला बारांवरच एकदम लागू करा. ' ' बरें ' ह्मणून नारायणराव अण्णासाहेबांच्या खोलींतून बाहेर पडले आणि हंसतहंसत मला ह्मणाले 'गंगाधर, तुझी चैन झाली. अजमासापेक्षां चारपांच रुपये जास्तच तुला देण्याविषयींचा हुकूम झाला आहे. खरें ह्मटलें तर हे रुपये तूं कांहीं हक्कानें मिळविलेले नाहींस; आमच्या शिफारशी-मुळें आपले ते मिळाले आहेत इतकेंच.' "

राधाबाईला ते रुपये हातांत घेतांना जी धन्यता वाटली व त्यांनीं परमेश्वराचे जे आभार मानिले त्याचें वर्णन कोठवर करावें !

## प्रकरण २८ वें.

# शाळेंतलीं मुलें.

मार्च महिन्याची शेवटची तारीख. संध्याकाळीं पांच वाजण्याची वेळ होती. अण्णासाहेबांच्या आफिसांतले लोक आपापलीं कामें आटोपून व दप्तरें बांधून निघण्याच्या तयारींत होते. अण्णासाहेब बरोबर पांचांच्या ठोक्याला आफिसांतून जात आणि ते गेल्याबरोबर सगळ्या नोकरांनां सुटी मिळे. पण आज कांहीं महत्त्वाचें पत्र संध्याकाळच्याच डांकेनें जावयास पाहिजे होतें, तें लिहिण्याच्या नादांत पांचांचे ठोके पडलेले अण्णासाहेबांनीं ऐकिले नाहींत, त्यामुळें सगळी नोकर मंडळीहि आपापल्या जागीं थबकून राहिली होती. अण्णासाहेबांनीं पत्र पुरें केलें व आपल्या हातानें पाकीट बंद करून व पत्ता लिहून "गंगाधर!" ह्मणून हांक मारली. गंगाधर तेव्हां चौकांत एका गृहस्थाशीं बोलत उभा होता. त्याला ती हांक ऐकूं गेली नाहीं; ह्मणून नारायणरावांनीं गंगाधराला जलदीनें बोलावून अण्णासाहेबांकडे आंत पाठविलें. तो येतांच " दाजीबा तिकडे असला तर त्याला पाठवून दे, " असें अण्णासाहेब ह्मणाले.

दाजीबा हें एका वृद्ध आणि विश्वासू शिपायाचें नांव होतें. हा दाजीबा अण्णासाहेबांचा पिढीजाद नोकर असून त्यांच्याच घरीं लहानाचा मोठा झालेला होता. त्यामुळें अत्यंत विश्वासाचें काम करावयाचें झालें तर अण्णासाहेब तें दाजीबाकडे सोंपवित असत. आज तो खजिन्यांतून रुपये आणण्यासाठीं ह्मणून गेला होता. गंगाधरानें दाजीबा खजिन्यांत गेल्याचें सांगितल्यावर अण्णासाहेब अंमळ विचारांत पडले; पण पुनः लवकरच स्मरण झाल्यासारखें करून आणि गंगाधराच्या चेहेऱ्याकडे क्षणभर टक लावून ह्मणाले "बरें, कांहीं हरकत नाहीं. विठू, गोविंदा, नाहींतर चपळ्या यांपैकीं कुणी असलें तर त्याला पाठवून दे."

हीं सगळीं शिपायांचीं नांवें होतीं हें सांगावयास नकोच. शेवटचा 'चपळ्या' हा एक लहान मुलगा होता, पण भारी चपळ असे. त्याच्या चपळतेवरून अण्णासाहेबांच्या कारखान्यांतल्या लोकांनीं त्याचें नांव चपळ्या असें ठेविलें होतें. गंगाधर त्यांनां बोलवावयास जाण्यास निघाला, इतक्यांत अण्णासाहेबांस काय वाटलें असेल तें असो, त्यांचा बेत फिरल्यासारखा दिसला आणि त्यांनीं गंगाधरालाच पुनः हांक मारून ह्मटलें "तुला पोष्ट हपीस कुठें आहे तें ठाऊक आहेना?"

गंगाधरानें विनयानें उत्तर दिलें " होय, आहे ठाऊक. आमच्या पलीकडल्या आळींतल्या शेवटच्याच घरांत आहे. "

"बरें तर, हें पत्र घे, आणि आतांचे आतां पोष्टांत जाऊन टाक. विसरूं नकोस हो."

गंगाधरानें तें पत्र घेऊन मोठ्या तजविजीनें आपल्या जाकीटाच्या खिशांत ठेविलें. गंगाधराच्या स्वाधीन पत्र केल्याबरोबर अण्णासाहेब डोक्यावर पगडी ठेवून बाहेर पडले आणि नंतर कचेरींतले कारकूनहि त्यांच्या मागोमाग उपरणें झाडून उठून चालते झाले.

रोज नारायणराव व गंगाधर बरोबर घरीं येत असत. नित्यक्रमाप्रमाणें नारायणराव गंगाधराला "घरीं चलतोसना?" म्हणून म्हणाले. तेव्हां त्यानें सांगितलें कीं "साहेबांनीं पोष्टांत टाकण्यासाठीं म्हणून जरूरीचें एक पत्र दिलें आहे, आणि शिवाय त्याच बाजूला एकाचे घरीं आईचा कांहीं निरोपहि पोंचवायचा आहे. तेव्हां मी अगोदर तिकडे जाऊन मग घरीं येईन."

त्या दिवशीं असा कांहीं योगायोग घडला—आणि या जगांत योगायोग म्हणजे कांहीं विचित्र प्रकारचे घडत असतात—कीं राधाबाईनीं गंगाधराच्या हातीं एका बाईला कांहीं निरोप पाठविला होता. शिवाय बाजारांतून सुईदोऱ्याचें पाकीट आणि कांचेची चिमणी आणण्यास सांगितलें होतें आणि बोहोऱ्यांचीं दुकानें पोष्टाच्या त्या बाजूलाच होतीं. वाटेवरच कृष्णाची शाळा होती. त्या शाळेची सुट्टी नुकतीच होऊन मुलें भराभर बाहेर पडत होतीं. कृष्णा त्या शाळेंत नुकताच जाऊं लागला होता. त्या मुलांच्या घोळक्यांत कृष्णा कोठें दिसतो का म्हणून गंगाधर पहात उभा राहिला.

इतक्यांत एका मुलाची गंगाधराकडे दृष्टि गेली. हा मुलगा आमच्या वाचकांशीं अद्याप परिचित झालेला नाहीं. तेव्हां तो कोण हें आम्हांलाच सांगितलें पाहिजे. त्रिंबकराव आणि गोदूताई यांचा लाडका मुलगा तो हाच. याचें नांव त्रिविक्रम होतें. हें बाळ मोठें विक्रमशाली होतें, हें पुढें दिसून येईलच. आईबापांनीं लडिवाळपणानें याचें नांव श्रीमंती थाटावर दाजीसाहेब असें ठेविलें होतें. हा वयानें आणि अंगानेंहि गंगाधरापेक्षां थोडासा सरसच होता.

श्रीमंतांच्या मुलांची खुशामत करणारे विद्यार्थी शाळेंतूनसुद्धां असतात. अशा मुलांना त्या श्रीमंत मुलानें कांहीं दिलेंघेतलें नाहीं तरी नुसतें त्याच्याबरोबर जाण्यायेण्यानेंच आपल्याला महत्त्व येईल, असें वाटत असतें. दाजीसाहेबाच्या बरोबर अशीं दहापांच मुलें सदोदित असत. वर सांगितल्याप्रमाणें मुलांच्या सुट्टीच्या वेळेस गंगाधर रस्त्यांत उभा राहून व उंच मान करून आपला भाऊ

कृष्णा कोठें दिसेल ह्मणून पहात होता. तिकडून दाजीसाहेब व त्याचे उपग्रह येत होते, त्यांच्या दृष्टीस तो पडला. दाजीनें "हा कोणरे उंटासारखी लांब मान करून आपल्याकडे पहात आहे ?" ह्मणून आपल्या सोबत्यांस विचारलें व त्या सोबत्यांनीं तो गंगाधर असें त्यास सांगितलें. दाजीनें गंगाधर व कृष्णा यांचें नांव आपल्या घरीं आईबापांनीं तिरस्कारानें उच्चारलेलें पुष्कळ वेळां ऐकिलें होतें. तेव्हां आपणहि त्याच्याविषयीं तिरस्कारानें बोललों नाहीं तर कुळाला बट्टा लागेल, अशा समजुतीनें तो ह्मणाला "हाच का तो भिकारडा पोरगा ? मीं याचें नांव पुष्कळ वेळां ऐकिलें आहे. ही ब्याद आपल्या शाळेंतून एकदाची गेली हें बरें झालें. पण एक ब्याद गेली तर तिचे जागीं दुसरी आली आहे—"

सोबत्यांनीं विचारिलें "ती कोणती ?"

दाजी तिरस्कारानें ह्मणाला "अरे त्या भिकारड्याचाच भाऊ तो कृष्णा !" नंतर गंगाधराकडे पाहून दाजी पुढें ह्मणाला "तो पहा कसा कावळ्यासारखा आपल्याकडे पहात आहे. पाहिली तर चार रुपड्यांची त्याची नोकरी—पण दिमाख पहा केवढा आहे !"

या वेळेस अशी कांहीं गंमत झाली कीं, दाजीच्या पाठीशींच कृष्णा त्याचे मागोमाग येत होता. दाजी व त्याचे सोबती बोलण्याचे नादांत असल्यामुळें त्यांचें लक्ष्य आपल्यामागून कोण येत आहे इकडे मुळींच नव्हतें. शिवाय कृष्णा त्यांच्यापेक्षां वयानें व उंचीनेंहि बराच लहान असल्यानें त्यांनीं ओझरतें पाहिलें असतें तरी तो दिसला असता किंवा नाहीं, याची शंकाच आहे. असो. दाजीचा व त्याच्या सोबत्यांचा सगळा संवाद कृष्णानें ऐकिला होता व तो ऐकून संतापानें तो लाल झाला होता. तरी पण आपली शक्ति व त्यांचें सामर्थ्य हीं तोलून पाहिल्यावर त्यांचेपुढें आपलें कांहीं चालणार नाहीं, असें पाहून प्रथम कांहीं वेळ चूप रहाणेंच त्याला योग्य दिसलें. पण पुढें जेव्हां दाजीची जीभ फारच वळवळ करावयाला लागली तेव्हां त्याच्यानें उगें राहवेना. त्यानें पुढें सरसावून दाजीचा एकदम हात धरला आणि ह्मटलें " भिकारडा भिकारडा कोणाला ह्मणतोसरे ? तूं काय असा बाजीरावाचा नातू आहेस तो आहे माहीत !"

दाजीसाहेबांचा अशा रीतीनें भर रस्त्यांत हात धरणें आणि त्यांना 'अरे तुरे' करणें हा केवढा त्यांचा अपमान ! केवढा मोठा अपराध ! हा त्यांच्यानें कसा सहन करवेल ? त्यांनीं लगेच त्याचा हात झिडकारून देऊन रागानें ह्मटलें

"तो तुझा भाऊ उभा आहे त्याला म्हटलें. तूं माझें काय करतोस तें पाहूं दे! एकदा नाहीं—दोनदा नाहीं—हजारदा म्हणेन तूं भिकारडा आहेस म्हणून! तुझ्या नाकावर पुनः म्हणतों घे—भिकाऱ्याचें पोर आणि दिमाखखोर!"

"आम्ही भिकारी असलों तरी तुझ्या बापाचे काय दोन चव्वल खातों आहों?" कृष्णानें रागाच्या आवेशांत म्हटलें.

आतां मात्र दाजीचा राग फारच अनावर झाला. त्यानें आपलें दप्तर आतां सोबत्यांचे जवळ देऊन कृष्णाचे पाय फरफर ओढून त्याला रस्त्यांत जमिनीवर पाडलें आणि त्याच्या छातीवर बसून "आतां पुनः बापबीप काढशील? बोल—" ही तंबी देतांदेतां त्यानें कृष्णाला पांचचार आपड्याधापड्याहि दिल्या.

ही मारामारी पहाण्यास अर्थातच दुसरींहि पुष्कळ मुलें जमलीं. तेव्हां गंगाधराचें तिकडे लक्ष्य जाऊन त्यालाहि पहाण्याची जिज्ञासा उत्पन्न झाली. तो गर्दीतून पुढें सरसावला आणि आपल्या भावाची ती अवस्था पाहून त्याच्या मदतीस धावला. त्यानें दाजीचा हात धरून त्याला एकीकडे केलें आणि म्हटलें "तूं एवढा मोठा घोडा झालास, तरी त्या लहान पोराच्या वाटेस जातोस याची तुला शरम वाटली पाहिजे. भांडायचें झालें तरी तें बरोबरीच्याशीं भांडावें, एवढें तुला कळूं नये काय?"

शाळेंतल्या भांडखोर मुलांनां एका गोष्टीची मोठी चीड असते. ती गोष्ट कोणती, तर दोघे भांडून एकमेकांच्या उरावर बसून आपल्या वैराग्नीचें शमन करित असतां मध्येंच तिसऱ्यानें येऊन शहाणपणा शिकविणें ही होय. वास्तविक गंगाधर म्हणाला तें अगदीं वाजवी होतें. लहान मुलानें मोठ्याची खोडी केली तरी एक वेळ मोठ्यानें गम खाल्ली पाहिजे. पण तेंहि न करतां मोठ्यानेंच अगोदर आगळीक करून लहानाला त्रास द्यावयाचा—त्याला मारावयाचें, शिव्या द्यावयाच्या, जमिनीवर पाडून त्याच्या छातीवर बसावयाचें, लोकांनां तमाशा दाखवावयाचा आणि कोणी बऱ्याची गोष्ट सांगून तंटा मिटवूं लागला म्हणजे तूं मध्यें तोंड कां घातलेंस असें म्हणून त्याच्यावरच उलट चिडावयाचें, हा नुसता पोरकटपणा नव्हे तर खोडसाळपणाहि आहे. गंगाधरानें त्या दोघांच्या भांडणांत पडून आणि मोठ्याच्या मुलाला शहाणपणा शिकवण्याच्या भानगडींत पडून शाळेंतल्या बऱ्याच मुलांनां चीड आणण्यासारखें कृत्य केलें होतें. आणि याबद्दलचें बक्षीस त्याला मिळाल्यावांचून राहिलें असतें असें नाहीं; पण इतक्यांत त्याच्या सुदैवानें "मास्तर आले रे मास्तर आले, आतां मुकाट्यानें पळा—" असा

एकदम गोंगाट होऊन जमा झालेलीं मुलें भराभर पळूं लागलीं आणि त्यामुळें हें प्रकरण दबलें.

या वेळीं हेडमास्तरसाहेब खरोखरच येत होते. ते दूर होते हें जरी खरें आहे, तरी समुद्रांतला दीपस्तंभ ज्याप्रमाणें तारवावरच्या खलाशांनां पुढील भय अगोदर सूचित करून तें टाळण्याविषयीं जपा ह्मणून सांगत असतो, त्याप्रमाणें सर साहेबांची तालवृक्षोपमेय उंची त्यांच्या विद्यार्थ्यांनां दुरूनच त्यांच्या आगमनाची सूचना करून ' पैस पैस ' ह्मणून जणूं काय सांगत होती ! एवढी आगाऊ सूचना मिळाल्यावर फारच निरुपद्रवी आणि गरीब, अथवा पक्के उर्मट आणि धीट अशा विद्यार्थ्यांखेरीज मास्तरांच्या दृष्टीसमोर कोण टिकणार आहे ! अर्धवट होते ते सगळे पळाले. दाजीच्या सोबत्यांपैकीं आतां एकहि दिसेना. तो मात्र अंगरख्याची माती वगैरे झटकून साळसूदपणानें माग क्रमूं लागला होता.

पलीकडे थोड्याशा अंतरावर एक मुलगा घोड्यावर बसून चालला होता. तो दिसण्यांत नाजूक, मोहक आणि बांधेसूद होता. त्याचे डोळे मोठे असून काळे होते. तो प्रकृतीनें अशक्त होता तरी त्याच्या मुद्रेवर चांगली टवटवी असून डोळ्यांत पाणी कांहीं विशेष होतें. तो वयानें गंगाधराहून एखाद्या वर्षानें लहान होता, पण दिसण्यांत बराच लहान दिसे. कृष्णा आणि दाजी यांची मारामारी चाललेली तो घोड्यावरून पहात होता. पण मुलांच्या गर्दींत शिरणें त्याला बरें वाटलें नाहीं. हेडमास्तरांच्या येण्यानें मुलांची दाणादाण झाली व दाजी एकटा जाऊं लागला, तेव्हां त्या मुलानें दाजीला हांक मारली. त्यावरोबर त्यानें उलटून पाहिलें आणि ह्मटलें "कोण नाना? तूं घोड्यावर असून इतका मागें कसा राहिलास ?"

नानानें त्याच्या प्रश्नाला उत्तर न देतां ह्मटलें "दाजी, तूं अगदीं भागूबाईपणा दाखविलास. तो कृष्णा काय एवढासा पोरगा, आणि त्याच्याशीं तूं कुरापत काढून भांडायला न् मारामारी करायला लागलास, हा कांहीं तुझा मर्दपणा नाहीं. लोक याला भागूबाईपणाच ह्मणतील."

"ओहोहो ! हे आले मोठे आह्मांला धर्मशास्त्र पढवायला. कोण मला भागूबाई ह्मणत आहे पाहूंदे ! तूं घोड्यावर आहेस ह्मणून हे तुझे शब्द मीं ऐकून घेतले. नाहींतर तुला दाखविला असता या भागूबाईचा प्रताप ! आह्मी भागूबाई अन् तूं मोठा पहिलवान ! पाहिला तर एक हात मोडलेलाच आहे !" दाजीनें आपल्या नेहमींच्या सवईप्रमाणें कुरापतीस प्रारंभ केला.

दाजीचें हें अद्वातद्वा भाषण आणि त्यांतहि विशेषतः आपल्या मोडलेल्या हातासंबंधाचा भाग ऐकूनतर नानाला कसेंसेंच झालें. पण तें तेवढ्या वेळेपुरतेंच होतें. दाजीचा द्वाडपणा नानाला पुरतेपणीं ठाऊक होता. यामुळें त्याचें बोलणें फारसें मनावर न घेतां तो ह्मणाला " तूं भागूबाई नाहीं, मोठा बलभीम झालास ह्मणून आपली शक्ति लहान आणि त्यांतहि निरपराधी पोराला का दाखवायची? आपणच अगोदर खोडी करायची आणि दुसरा उलटून बोलला ह्मणजे त्याच्या अंगावर तुटून पडायचें, याला कुणी शहाणपणा नाहीं ह्मणत !"

" तुला काय ठाऊक आहेत त्या भिकारड्या पोरांचीं लक्षणें ? " दाजीनें तिरस्कारानें विचारलें.

" ते भिकारी असोत कीं कसेहि असोत. ते गरीब आहेत हा कांहीं त्यांचा दोष नाहीं. आणि असले ते गरीब ह्मणून काय झालें? त्यांच्या वाटेला उगीचच्या उगीच जाणें हा केवढा नीचपणा आहे ! तो गरीब पडला ह्मणूनच त्यानें मुकाट्यानें सोशिलें. माझ्यासारखा असता तर दाखविला असता हात. "

" अबब ! तुमच्या अंगांत बलभीम संचरला आहे. तेव्हां तुमच्यापुढें कुणाचा टिकाव लागणार आहे? आतां आह्मांला पळच काढला पाहिजे !"

असें ह्मणून हंसतहंसत दाजी जलदीजलदी पावलें उचलूं लागला व थोड्याच वेळांत दिसेनासा झाला. मग नानानें गंगाधराला जाऊन गांठलें. गंगाधराला त्या गर्दींत थोडीशी दुखापत झाली होती. त्यामुळें तो हळूहळू चालला होता. त्याला पाहून नानानें ह्मटलें " तुला लागलेंबिगलें तर नाहीं ? "

गंगाधरानें उत्तर केलें " कांहीं विशेषसें नाहीं. पण तो द्वाड कारटा पुनः एखादे वेळेस तावडींत सांपडेल तर त्याची चांगली खोड जिरवीन. तो कोण होता त्याचें नांव तुह्मांला ठाऊक आहे काय ? "

" वः ! त्या उनाड पोराचें नांव ठाऊक नाहीं असा इथें एकतरी मुलगा असेल कीं नाहीं कोण जाणे ! आत्तांपर्यंत मी त्याच्याशींच बोलत होतों. लहान पोरांच्या वाटेस जाण्यांत त्याला काय पुरुषार्थ वाटला हें मीं आतांच त्याला विचारलें. अशा खोडसाळ मुलांपासून दोन हात दूरच रहावें हें बरें." असें ह्मणून नानाहि आपल्या घरीं गेला.

गंगाधर झाल्या गोष्टीबद्दलचाच विचार करितकरित आश्चर्य मानित घरीं परतला. अण्णासाहेबांच्या पत्राची आठवण त्याला मुळींच राहिली नाहीं.

## प्रकरण २९ वें.
# आतां पुढें काय करावें!

कृष्णानें घरीं गेल्यावर रस्त्यांत घडलेली इत्थंभूत हकीगत मुलांच्या नेहमींच्या रीतीप्रमाणें बरेंचसें तिखटमीठ लावून आईला सांगितली. इतक्यांत गंगाधरहि घरीं आला आणि त्यानें कोट काढून खुंटीला लाविला. जाकिट अंगांत तसेंच राहूं दिलें. कित्येकांनां जाकिटाच्या दोन्ही खिशांत हात घालून हिंडण्याफिरण्याची संवय असते. तशी गंगाधरालाहि होती. त्याप्रमाणें त्यानें खिशांत हात घातल्या-बरोबर खिशांतलें अण्णासाहेबांचें पत्र त्याच्या हाताला लागलें आणि आपणाकडे पोष्टांत टाकण्यासाठीं तें दिलें होतें या गोष्टीचें त्याला स्मरण झालें. लागलीच त्यानें अंगांत कोट घातला---कोट घातला ह्मणण्यापेक्षां कोटाच्या बाह्यांत हात तेवढे घातले---आणि तडक पोष्ट आफिसाकडे पळत सुटला.

मुलांचे पाय आणि छाती हीं मजबूत असतात. गंगाधर घरून निघाला तो दम न छाटतां सारखा पळत पोष्टांत गेला. पेटींत पत्र टाकीपर्यंत दम घेण्याससुद्धां त्याला सवड झाली नाहीं. पळण्यानें तो इतका बेदम झाला होता कीं, आतां त्याला भिंतीवर हात व डोकें टेंकून स्वस्थ उभें रहावें लागलें. याप्रमाणें किंचित् उभा राहिल्यावर त्या पोष्टांतला एक कारकून सहज बाहेर आला. त्याला "मुंबईची डाक बंद झाली काय ?" ह्मणून गंगाधरानें विचारलें.

त्यावर "केव्हांच !" असें उत्तर मिळालें.

तें ऐकतांच गंगाधराच्या मनाला काय वाटलें असेल, त्याची कल्पनाच केली पाहिजे. त्याचें तोंड एकदम उतरलें. तो अत्यंत खिन्न होऊन परतला. सगळ्या रात्रींत तो कोणाशीं एक अक्षरसुद्धां बोलला नाहीं. रात्रभर अंथरुणावर सारखा तळमळत पडून राहिला. आपल्या विस्मरणाचे कायकाय परिणाम होतील, याचा विचार त्याला चैन पडूं देईना. अण्णासाहेबांचें पत्र 'जरुरी' होतें. न जाणों त्यांत कांहीं तरी महत्त्वाचा मजकूर होता आणि असें जरुरीपत्र वेळेवर पोष्टांत न टाकणें ही कामांत फार मोठी हयगय झाली या सबबीवर अण्णासाहेब रागावून आपल्याला वजा करतील काय ? त्यांनीं तसें केलें तरी त्यांत त्यांचा काय दोष आहे ? असें तो आपणाशीं ह्मणूं लागला. मी वजा झालों तर आज बारा रुपये दरमहा मिळूं लागला आहे तो नाहींसा होईल व वजा होणें ह्मणजे केवढी बेअब्रू पदरीं येईल! हा विचार त्याच्या डोक्यांत सारखा घोळूं लागला. झालेली गोष्ट आईला कळवावी किंवा नाहीं ? कळविल्यास ती काय ह्मणेल ? आपल्यावर किती दूषणें ठेवील ?

आणि न कळविल्यास ती पुढेंमागें तिला कळल्यावर—ती कळेल यांत शंका नाहींच—तिच्यापासून ती छपविल्याबद्दलचा दुसरा दोष आपल्याला लागेल, यापेक्षां ती आतांच कळविणें बरें—अशी बरीच भवतिनभवति त्यानें स्वताच्या मनाशीं केल्यावर आई उठल्याबरोबर प्रथम ती तिला कळवावयाची, असा त्यानें मनाचा निश्चय केला आणि उजाडतांच त्याप्रमाणें केलें. तो ह्मणाला "आई, आतां पुढें काय करावें ?"

" काय करावंसं तुझं मन तुला सांगतं ?" राधाबाईनीं गंगाधरास प्रश्न केला.

" मला वाटतें, झालेली चूक जर अण्णासाहेबांपाशीं आतांच जाऊन कबूल केली तर बरी—"

" मला वाटतं, अन् ' जर तर ' हे शब्द नकोत ! तसंच केलं पाहिजे. " राधाबाई गंभीर मुद्रेनें ह्मणाल्या.

" सगळ्या रात्रभर हाच विचार माझ्या डोक्यांत घोळत आहे. पण आतां हें मी अण्णासाहेबांना कोणत्या तोंडानें जाऊन कळवूं ? "

" बाबारे ! आपली चूक कबूल करण्याचं सर्वांच्याच जिवावर येत असतं; पण त्याशिवाय गति नाहीं, असं ह्मणून मन घट्ट केलं पाहिजे. आतांच पाहिजे तर नको जाऊं; पण हपीसांत गेल्यावर पहिली गोष्ट ही कर ह्मणजे झालं. नुसतं 'कर' ह्मणून मी ह्मणत नाहीं, तर करणं हा तुझा धर्म आहे—अवश्य कर्तव्य आहे. "

आपलें कर्तव्य कोणतें तें पाहून करण्याबद्दलचा उपदेश राधाबाई आपल्या मुलांना नेहमींच करित असत. यामुळें तोच उपदेश आतां गंगाधराचे मनावर बिंबविण्यास कांहीं प्रयास पडले नाहींत. जेवण झाल्यावर गंगाधर ऑफिसांत रोजच्या वेळेस गेला व नित्यक्रमाप्रमाणें त्यानें अण्णासाहेबांचें टेबल झाडून व त्यांचीं पुस्तकें व कागद वगैरे व्यवस्थित रीतीनें मांडून ठेविलें. इतक्यांत अण्णासाहेबहि आले. ते एकटेच आहेत असें पाहून थोड्या वेळानें गंगाधर त्यांचेपाशीं गेला आणि खालीं मान घालून अतिशय खिन्न मुद्रेनें ह्मणाला " माझ्या हातून आज एक मोठी चूक झाली आहे, तिची माफी असावी. "

अण्णासाहेबांनीं विचारिलें " कसली चूक ? "

" त्या पत्राच्या संबंधांत. "

" कोणतें पत्र ! काल पोष्टांत टाकण्यासाठीं तुझेजवळ दिलें होतें तें कीं काय?"

" होय. तें विस्मरणामुळें वेळेवर टाकलें गेलें नाहीं. "

" टाकलें गेलें नाहीं ? हा कोण हलगर्जीपणा ! कुठें आहे तें ? "

" तें रात्रीं टाकलें; पण मुंबईची डाक अगोदरच बंद झाली होती. "

" गंगाधर ! तुला एवढें बजाविलें असून तूं शेवटीं विसरलास, हें कसें झालें? तूं अगोदर घरीं गेला असशील आणि भावांबहिणींशीं खेळण्यांत गुंतला असशील !"

" नाहीं. मी गेलों तो इथून थेट पोष्टाकडेच—पण—"

" पण काय ? रस्ता चुकलास ?"

" नाहीं, रस्ताहि नाहीं चुकलों—पण—"

" पुनः पण आहेच. पण काय ? "

" मधेंच शाळेंतल्या एका मुलानें माझ्या धाकट्या भावाशीं कुरापत काढून त्याला मारलें ह्मणून मला मध्यें पडावें लागलें आणि त्या गडबडींत पत्राचें भान राहिलें नाहीं. "

अण्णासाहेबांनीं हीच हकीगत घरीं नानाच्या तोंडून ऐकली होती. त्यामुळें अण्णासाहेबांची तिच्या खरेपणाबद्दल खात्री झाली. ते कांहींएक न बोलतां मुकाट्यानें बसले. गंगाधरहि जागच्याजागीं उभा राहिला. त्याला पाहून अण्णासाहेब ह्मणतात " मग तूं आतां इथें उभा कां राहिलास ? "

" चुकीची माफी व्हावी. "

" आतां माफी केली आणि पुनः असाच कामांत हलगर्जीपणा केलास तर आतांच्या माफीचा काय उपयोग ? "

" नाहीं, पुनः नाहीं अशी चूक माझे हातून व्हायची. "

यावर अण्णासाहेब उगाच बसले. त्यावरून आपणास माफी मिळाली नाहीं अशी गंगाधराची समजूत होऊन तो तसाच उभा राहिला. अण्णासाहेब खालीं पाहून कांहीं कागद वाचूं लागले. तरी गंगाधर उभा आहेच हें अण्णासाहेबांनीं पाहिल्यावर त्याला विचारलें "तूं उभा कां ?"

"मी पुनः असें करणार नाहीं. मला चुकीची माफी व्हावी."

यावर अण्णासाहेब हंसून ह्मणाले "बरें आहे. पण एकच वेळ क्षमा होत असते, हें लक्ष्यांत ठेव. आणि ही एक वेळतरी मीं क्षमा कां केली हें तुझ्या लक्ष्यांत आलेंच असेल. तूं आपली चुक छपविण्याचा यत्न न करतां ती एकदम कबूल केलीस ह्मणून. आपल्या हातून जी काय चूक किंवा अपराध घडला असेल, तो कबूल करावा यासारखा दुसरा प्रशस्त मार्ग नाहीं, हें लक्ष्यांत ठेव. जा आतां तूं आपल्या कामाला लाग."

गंगाधराची खिन्नता आतां नाहींशी झाली व तो हलक्या पावलांनीं व प्रफुल्लित मुद्रेनें अण्णासाहेबांच्या खोलींतून बाहेर पडला. तो गेल्यावर अण्णासाहेब मनांत ह्मणाले "हा मुलगा गरीब आणि प्रामाणिक दिसतो. यानें आतां माझेपाशीं चूक कबूल केली नसती तर ती त्याचे हातून घडली ही गोष्ट मला कदाचित् पुढें कधीं कळलीहि नसती. दुसरीं मुलें कांहीं अशी चूक कबूल करतेना. यावरून या मुलाला घरचें वळण चांगलें दिसतें."

त्या दिवशीं गंगाधराला अण्णासाहेबांचे घरीं जाण्याचाहि प्रसंग आला. अण्णासाहेब बारा वाजेपर्यंत कचेरींत बसत व बारा वाजतां घरीं जात ते पुनः तीन वाजतां येत. त्या दिवशीं ते रोजच्याप्रमाणें बारा वाजतां घरीं गेले, इतक्यांत पाठीमागें एक गृहस्थ कांहीं जरूरीच्या कामासाठीं ह्मणून आला. त्याचें काम नारायणरावांनीं चांगलें समजून घेतलें व अण्णासाहेबांनां चिठ्ठी लिहिली व ती चिठ्ठी महत्त्वाची असल्यामुळें शिपायाच्या हातीं न देतां गंगाधराच्या हातीं अण्णासाहेबांच्या घरीं पाठविली.

ती घेऊन गंगाधर तडाक्यानें निघाला. आतां तो तिला विसरेल ही भीतीच नव्हती. अण्णासाहेब त्या वेळीं मधल्या दिवाणखान्यांत उगीच इकडूनतिकडे टेहेळत होते. पलीकडे एका खुर्चीवर नाना आपला संस्कृत धडा तयार करित होता. सुट्टीचा दिवस असल्याकारणानें तो घरींच होता. फावेल तेव्हां नानाच्या शिक्षणावर स्वतां देखरेख करण्याचा व त्याला अडेल त्या ठिकाणीं धडा समजावून सांगण्याचा अण्णासाहेबांचा परिपाठ असे. या परिपाठाप्रमाणें अण्णासाहेब या वेळीं संस्कृत पुस्तकांतला धडा त्याचेकडून तयार करवून घेत होते. अशा वेळेस गंगाधरानें आणलेलें पत्र त्यांच्या स्वाधीन केलें. अण्णासाहेबांनीं त्याला बसावयाला एक खुर्ची दिली आणि आपण तें पत्र घेऊन आंत गेले.

नाना त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागला. कालच्या मुलांच्या मारामारींतला हाच मुलगा, हें त्यानें ओळखलें. परंतु नानाला अगोदर दुसऱ्याशीं आणि त्यांतून अपरिचित माणसाशीं बोलण्याचा कंटाळा; तशांतून तो आजारीपणामुळें चिरडखोर बनला होता आणि आतांतर तो अभ्यासांत गुंतला होता. तथापि आतां त्याला काय वाटलें कोण जाणे. त्यानें हळूहळू बोलण्यास सुरवात केली. तो कंटाळून स्वताशींच ह्मणाला "पांचच मिनिटांचा अवकाश होता. तेवढ्यांत माझा धडा संपून मी मोकळाहि झालों असतों. पण तेवढ्यांत विघ्न आलें. आतां अण्णा कामासाठीं बाहेर जातील ह्मणजे झालें! मग मला धडा कोण समजावून देईल?"

हे शब्द ऐकून आणि नानाची त्रासिक मुद्रा पाहून गंगाधराला वाटलें कीं, आपण त्याला थोडीशी मदत करावी. ह्मणून तो ह्मणाला "मी करूं का थोडीशी मदत?"

नानाला हें ऐकून आश्चर्य वाटलें. "कोण! तूं मदत करशील? तुला संस्कृत येतें?"

गंगाधरानें उत्तर दिलें "थोडेंसें येतें. माझें दुसरें पुस्तक झालें आहे."

नानाच्या टेबलावर त्याची भाषांतराची वही उघडीच पडलेली होती. तिकडे गंगाधराची सहज दृष्टि गेली. त्यानें लागलीच एका शब्दावर बोट ठेवून हें रूप चुकलें आहे ह्मणून सांगितलें. तो ह्मणाला " 'बाध' हा धातू आत्मनेपदी असल्यामुळें त्याचें 'बाधति' असें रूप व्हावयाचें नाहीं; 'बाधते' असें होईल."

हें ऐकूनतर नानाला त्याच्या संस्कृतभाषेच्या ज्ञानाविषयीं बरीच खात्री पटून तो गंगाधराजवळून राहिलेलीं वाक्यें समजून घेण्यास तयार झाला. तथापि अण्णासाहेबांनीं 'बाधति' असें रूप सांगितलें आणि हा 'बाधते' असें सांगतो. यांतलें खरें कोणतें, ही शंका त्याला आली. ह्मणून तो गंगाधराला ह्मणाला "अण्णांनीं तर मला 'बाधति' असेंच रूप सांगितलें आहे. त्यांनीं अलीकडे दुसऱ्या कामांमुळें संस्कृतवाचन वगैरे सोडलें आहे ह्मणून काय झालें? ते पूर्वीं चांगलें संस्कृत जाणणारे होते."

यावर गंगाधर ह्मणाला "त्यांची ती नजरचूक असेल. पण 'बाधते' हेंच रूप बरोबर आहे, याबद्दल मला तिळमात्र शंका नाहीं."

नाना ह्मणाला "पण अण्णांच्या सांगण्यांतली चूक काढायला तुला काय तुझा अधिकार आहे? चल, हें सोडून देऊन आपण पुढचीं वाक्यें करूं."

यापुढें गंगाधराच्यानें बोलवेना. अण्णासाहेब चुकले आहेत याविषयीं त्याला शंका नव्हती. पण तसें बोलल्यानें नानाला राग येऊन तो चिडला, हेंहि त्यानें पाहिलें होतें. तेव्हां आपल्याला सांगावयाचें होतें तें आपण सांगितलें, यावर चूक दुरुस्त करणें न करणें हें शिकणाराचे स्वाधीन आहे, असें मनांत ह्मणून तो पुढचीं वाक्यें सांगूं लागला. शेवटलेंच वाक्य चाललें होतें, इतक्यांत अण्णासाहेब आले. त्यांनीं पत्राचा जवाब लिहून आणिला होता तो गंगाधराचे हातांत देऊन नारायणरावांकडे घेऊन जाण्यास सांगितलें.

गंगाधर निघून गेल्यावर नाना आपल्या बापाला ह्मणाला "अण्णा, या मुलाला संस्कृत चांगलें येतें बरें का. तुह्मी आंत होतां तेव्हां त्यानें मला पुढचीं वाक्यें सांगितलीं; नाहीं, माझ्याकडून करवून घेऊन मी चुकलों त्या ठिकाणीं सांगितलें."

अण्णासाहेबांनीं ती वही हातांत घेऊन लिहिलेलीं वाक्यें पाहिलीं तेव्हां तीं बिनचूक आढळलीं. त्यांनीं त्याबद्दल संतोष प्रदर्शित केला आणि ह्मटलें "गंगाधराचा संस्कृत विषय चांगला आहेसा दिसतो."

नाना मध्येंच ह्मणाला "पण—"

"पण काय ?"

"मी ह्मणणार होतों कीं, तो हुषार असेल, पण त्यानें इथें जो थोडासा उद्धटपणा दाखविला तो मला नाहीं आवडला."

"त्यानें काय असें केलें ?"

"तो आपला तुमच्या शिकविण्यांतल्या चुका काढायला लागला. 'बाधति' हें रूप ह्मणे चुकलें आहे; 'बाधते' असें पाहिजे. मोठ्या माणसांच्या अशा चुका काढणें याला उद्धटपणा नाहीं तर काय ह्मणायचें ?"

अण्णासाहेबांना विचाराअंतीं आपली चूक कळून आली; आणि खात्री करून घेण्याकरितां त्यांनीं टेबलावरील संस्कृत-इंग्रजी कोश पाहिला तेव्हांतर गंगाधराचेंच ह्मणणें खरें असल्याविषयीं त्यांना शंकाच राहिली नाहीं. ते ह्मणाले "गंगाधर ह्मणाला तेंच बरोबर आहे. 'बाधति' नव्हे तर 'बाधते' असेंच रूप पाहिजे. त्यानें चूक दाखविली यांत त्यानें उद्धटपणा केला असें मुळींच होत नाहीं. सरळपणानें आणि नम्रपणानें मोठ्या माणसांच्या चुका दाखविणें याला उद्धटपणा कुणी ह्मणणार नाहीं. वडील माणसांनींहि खरोखर चूक आहे असें आढळून आल्यावर ती कबूल करणें हेंच योग्य आहे."

नाना ह्मणाला "पण अण्णा, तुमच्या कचेरींत हलकींसलकीं कामें करणारेसुद्धां असे हुषार मुलगे असतात ?"

त्यावर अण्णासाहेब ह्मणाले "सगळेच असतात असें नाहीं. कित्येकांनांतर मराठी दोन शब्दसुद्धां नीट बोलतां किंवा लिहितां येत नाहींत. हा वास्तविक पुष्कळ शिकून बी. ए., एम्. ए., व्हायचा, पण घरच्या गरिबीमुळें त्याला लवकर नोकरी धरावी लागली आहे."

"पण हलकींसलकीं कामें करणारांनीं मोठ्यांच्या पुढेंतरी आपल्या शहाणपणाचा टेंभा मिरवू नये. शहाणे झाले ह्मणून काय झालें ? ते गरीब आहेत ना पण ? त्यांना मोठाल्या हुद्याच्या जागा थोड्याच मिळायच्या आहेत ?"

"हें तुला कुणीं सांगितलें ?"

"त्रिंबकरावांचा दाजी ह्मणत होता कीं, गंगाधरानें शिपायांत नोकरी धरली आहे. तेव्हां आतां तो जन्मभर शिपाईच रहाणार. आमच्यासारख्यांनीं त्याच्याशीं आतां बरोबरीच्या नात्यानें वागण्यानें लोक आह्मांला हलकट समजतील."

अण्णासाहेब ह्मणाले "असें जर असेल तर त्या दाजीची संगति तूं जितकी लवकर सोडशील तितकी बरी ! तो फार वांईट मुलगा दिसतो. मोठेपणाच्या कांहीं विचित्र कल्पना त्याच्या डोक्यांत कुणीं भरवून दिलेल्या आहेत. गंगाधर जितक्या लवकर चढेल तितक्या लवकर त्याच्या बरोबरीला दाजीला येऊंदे, ह्मणजे मिळविली !"

नाना आश्चर्यानें बापाच्या मुद्रेकडे पहात राहिला. अण्णासाहेबांनां दाजीविषयीं एवढा राग कां यावा आणि गंगाधरावर त्यांचा एवढा लोभ कां बसावा याचें कारण त्याला कळेना. आणि अण्णासाहेबांनीं उच्चारलेल्या शेवटच्या वाक्यानंतर त्याला पुरेंच घोटाळ्यांत पाडलें.

## प्रकरण ३० वें.

# खुळखुळाबाई.

अण्णासाहेब महिनापंधरादिवसांनीं घरींची तपासणी करण्यासाठीं एखादे वेळ निघत, हें मागें सांगितलेंच आहे. एकदा पहांटेस हवा खाऊन परत येतांयेतां अण्णासाहेबांची फेरी राधाबाईच्या घरावरून झाली. गंगाधराच्या अंगचे पुष्कळ सद्गुण अलीकडे त्यांच्या नजरेस आले होते आणि त्यामुळें त्याचेवर त्यांचा लोभहि जडूं लागला होता. तेव्हां दारावरून जातांजातां त्यांनीं गंगाधराची सहज चौकशी केली. गंगाधर नुकताच स्नानसंध्या उरकून कांहीं कामानिमित्त बाहेर गेला होता. गंगाधर घरीं नाहीं असें राधाबाईनीं कृष्णाकडून सांगविलें. तरी अण्णासाहेब दाराशीं उभेच राहिले. त्यांच्या मनांत राधाबाईशीं त्याचेविषयीं बोलावयाचें आलें होतें कीं काय कोण जाणे! पण राधाबाईच्या मात्र मनाला त्या दिवशींच्या पत्राच्या हकीगतीपासून फार चुटपुट लागली होती. ह्मणून आपल्या मुलाविषयीं त्यांच्या मनांत जर कांहीं किंतु राहिला असेल तर तो काढून टाकण्यास ही संधि बरी आहे असें पाहून राधाबाई दाराचे आंतूनच ह्मणतात "गंगाधर अलीकडे आपले पदरीं लागला आहे. त्याला शिकवायसवरायला घरीं कुणी नाहीं, आणि त्याचं वय लहान व पोरबुद्धि पडली. तेव्हां त्याला संभाळून घ्यावं एवढं मागणं आहे. तसा कांहीं तो वाईट आचरणाचा किंवा वाईट संगतीला लागलेला नाहीं; पण नोकरी करण्याचा हा प्रसंग पहिलाच, आणि तोहि अगदीं पोरपणांत आलेला; तेव्हां त्याचे हातून हरहमेष चुका व्हायच्याच. ह्मणून आपली माझ्या मनाला भीति वाटते."

यावर अण्णासाहेब अमळ हंसून शांततेनें ह्मणाले "छे छे, तुह्मी समजतां त्यापेक्षां गंगाधर फार शहाणा आहे. माझी त्याचे वर्तनावर बारीक नजर आहे. तो सत्यवक्ता, सरळ, गरीब आणि मोकळ्या मनाचा आहे असें नारायणराव नेहमीं ह्मणत असतात; आणि माझाहि अनुभव तसाच आहे."

"लहानपणापासूनच त्याचा स्वभाव तसा आहे. पहिल्यापहिल्यानें त्याला हलकंसलकं काम करण्याची लाज वाटे, पण आतां त्याला कळून चुकलं आहे कीं, लहानपण अथवा मोठेपण कामावर नाहीं तर तें काम करण्यावरच अवलंबून असतं."

अण्णासाहेब ह्मणाले "आमच्या इथलें काम त्याला पहिल्यानें आवडत नसे असें तुमचें ह्मणणें?"

"हो. पहिल्या दिवशींच तो अगदीं कंटाळला. आपण इतके शिकून शेवटीं आपल्या कपाळीं हें हलकं काम आलं, ह्मणून त्याला फार वाईट वाटलं. कुठंतरी वकिलाच्या हाताखालीं कारकुनीचं काम मिळालं असतं, अगर शाळेंत मास्तरकी मिळाली असती तर बरं झालं असतं; म्हणजे शिकलेली विद्या कायम राहून अधिक शिकण्यास आपल्याला फुरसतहि रगड मिळाली असती, असं तो ह्मणे. पण त्याला घरची स्थिति कळली, तेव्हां निमूटपणं तो आहे या नोकरींतच समाधान मानून राहूं लागला."

"त्याच्या मनांतून अद्याप पुढें शिकायचें आहे काय ?"

"फार आहे. आपला धाकटा भाऊसुद्धां दोन दिवसांनीं आपल्यापुढं जाईल आणि परीक्षांवरपरीक्षा देत जाईल, आपल्या दैवींमात्र आतां परीक्षा देणं नाहीं, या गोष्टीचं अजून त्याला वाईट वाटत आहे."

"यावरून मुलगा मोठा बुद्धिवान् आणि समजूतदार दिसतो. हा मुलगा खचित भाग्य काढणार !"

राधाबाई ह्मणाल्या "तुमचा भाग्योदय व्हायचा असला तर तो विद्येच्या आणि चांगल्या आचरणाच्याच जोरावर होणार, हें मी माझ्या मुलांनां वारंवार सांगत असतें; आणि याच दोन गोष्टींकडे सदासर्वदा माझं लक्ष्य असतं. मुलांच्या नशिबीं या वयांतच पहा किती संकटं आलीं आहेत तीं ! ज्या वेळेस त्यांनीं मनसोक्त खेळून बेगुमान रहायचं, त्याच वयांत त्यांच्यामागं संसाराची व विद्येची काळजी लागली. तुह्मी पुस्तकं वाचून अभ्यास करून शहाणे व्हा. ह्मणून दुसऱ्या मुलांनां सांगावं लागतं. माझ्या मुलांनां तें सांगण्याची गरजच पडत नाहीं. आपलं नेमलेलं काम आपण मुकाट्यानं केलंच पाहिजे, नाहींतर आपल्याला कुणीहि चांगलं ह्मणणार नाहीं, हें त्यांनां चांगलं समजतं आहे. आपल्या आईला मदत करायला आतां आपलेवांचून दुसरं कोण आहे, हें पाहूनच गंगाधरानं नोकरी धरली आहे. आपला विद्याभ्यास खुंटला या गोष्टीबद्दल त्याला कितीतरी वाईट वाटलं, पण केवळ माझ्या स्थितीकडे लक्ष्य देऊन तो नोकरी करायला कबूल झाला. त्याच्या सुदैवानं आपल्यासारखे मालक मिळाले आहेत ह्मणून कोणत्याहि प्रकारची काळजी वाटत नाहीं. अज्ञानामुळं त्याच्या हातून होणाऱ्या चुका पोटांत घालण्याविषयीं माझी विनंति आहे."

यावर अण्णासाहेब ह्मणाले "बाई, तुह्मी मुलांविषयीं अगदीं काळजी करूं नका. त्यांच्यासारखीं मुलें हजारांत एकदोनच सांपडतील. अशांचा भाग्योदय झाल्या-

शिवाय रहाणार नाहीं. स्वतः विचार करण्याची शक्ति व दुसऱ्यावर आपलें ओझें न टाकतां स्वतः कमाविण्याची हिंमत, या दोन गुणांची अनुकूलता असल्यावर मनुष्य काय पाहिजे तें होऊं शकतो." असें ह्मणून अण्णासाहेबांनीं राधाबाईचा निरोप घेतला.

अण्णासाहेब गेल्यावर गंगू हळूच ह्मणते "आई, आज माझा वाढदिवस आहे, नाहींग ?"

तिच्या या प्रश्नानें राधाबाईला आदले वर्षाची आठवण झाली. मागच्या वर्षी याच दिवशीं पुढें येणाऱ्या संकटांचें स्वप्न पडूं लागलें होतें. त्या दिवसाला आणि आजच्या दिवसाला केवढा फेर! हा फेर लक्ष्यांत घेऊन राधाबाई विचारांत निमग्न झाल्या होत्या, त्यामुळें खुळखुळाबाईनीं त्यांनां हांक मारिली ती त्यांनां ऐकूं गेली नाहीं. इतक्यांत नारायणरावहि आले. त्यांच्याशीं बोलण्याच्या नादांत खुळखुळाबाईच्या हांका राधाबाईनीं मुळींच ऐकिल्या नाहींत.

नारायणराव राधाबाईला ह्मणाले "अण्णासाहेबांनीं तुह्मांला असा निरोप सांगायला मला पाठविलें आहे कीं, गंगाधराला ऑफिसांत पुष्कळ काम पडतें, यामुळें त्याचा पुढें विद्याभ्यास होत नाहीं. यासाठीं त्यानें दहा वाजल्यापासून एक वाजेपर्यंतच ऑफिसांत रहावें. एकाच्या पुढें त्यानें घरीं राहून अभ्यास करावा. पगार जो आहे तेवढाच मिळेल. त्यांत कांहीं कमी केलें जाणार नाहीं."

एवढा निरोप सांगून नारायणराव चालते झाले. राधाबाई नारायणरावांशीं बोलत आहेत हें पाहून खुळखुळाबाईहि परत गेल्या.

आतां दिवसेंदिवस राधाबाईला चांगले दिवस येऊं लागले. हल्लीं उन्हाळ्याचे मोठे दिवस असल्यानें त्यांच्या हातून दिवसास कामहि जास्त होई. इकडे गंगाधराला नोकरी लागली होती त्यामुळें खाण्यापिण्याची ददात मिटली आणि आतां नोकरीमुळें होणारें विद्याभ्यासाचें नुकसान भरून यावें अशी तजवीजहि अण्णासाहेबांच्या कृपेनें झाली. याप्रमाणें राधाबाईला सर्वतोपरी अनुकूल स्थिति प्राप्त झालेली होती परंतु या जगांत सुखदुःख समान असावें, असा ईश्वरी नियमच दिसतो. या नियमाप्रमाणें राधाबाईच्या या सुखावर पाणी ओतण्यासारखें एक दुःख लवकरच उत्पन्न होऊं पहात होतें.

... खुळखुळाबाई एकदा येऊन गेल्या ह्मणून सांगितलेंच आहे. त्यांच्याविषयीं थोडीशी माहिती येथें देणें इष्ट आहे. या खुळखुळाबाई राधाबाईच्या शेजारीं रहात होत्या. यांचा स्वभाव वाचकांनां लवकरच कळून येईल ह्मणून त्याची मीमांसा येथें करित बसत नाहीं. पण त्यांचा गंगूवर अतिशय लोभ असल्याकारणानें त्या गंगूला

नेहमीं आपले घरीं घेऊन जात, तिला खायलाप्यायला घालीत, खेळवीत आणि संध्याकाळीं बाहेर देवदर्शनाला नेत. गंगूवांचून त्यांनां घटकाभरहि करमत नसे.

एके दिवशीं तिसरे प्रहरीं खुळखुळाबाईची स्वारी राधाबाईकडे आली. स्वारी आली कीं कधीं मुकाट्यानें यावयाची नाहीं, हें ठरलेलेंच. खुळखुळाबाई आल्या तेव्हां राधाबाई कांहीं शिवणकाम करित बसल्या होत्या. येण्याबरोबर अगोदर सलामीच्या कांहीं तोफा उडाल्या "काय बाईतरी चमत्कार? चारचारदा यावं तरी बाईसाहेबांनां भेटायला फुरसतच मिळत नाहीं !"

राधाबाईनीं वर मान करून पाहिलें तों खुळखुळाबाई ! अर्थात् या बोलण्याचा त्यांनां रागहि आला नाहीं. त्यांनीं हळूच ह्मटलें "तुह्मी आलां असाल, पण माझ्या नजरेस पडलां नाहीं तर कळावं कसं ?"

"देवतरी कसा वेडा पहा ! कांहीं लोकांनां तो डोळे देतो ते पहाण्याकरितां नव्हे तर खाण्याकरितां, असें आतां ह्मटलं पाहिजे. मी आलेली तुमच्या डोळयांला दिसलें नसेन कदाचित्, पण ही गंगू आज किती दिवस अशी झिजत चालली आहे, तिची कधीं विचारपूसतरी करायची होती ! का तीहि तुमच्या डोळयांला दिसली नाहीं ?"

राधावाईनीं विचारिलें "काय झालंय तिला ?"

खुळखुळाबाई वेडावून ह्मणतात "काय झालंय तिला! देवा देवा ! कुत्रींमांजरंसुद्धां आपल्या पिलांनां अधिक जपतात, अन् हीं माणसं बरं का माणसं ! कुत्र्याइतकींतरी पोरांनां जपताहेत का ? राधाबाई ! तुमच्या डोळयांला झालं आहेतरी काय ? त्या ओकीणबाईहि तसंच ह्मणतात, तुह्मी तसंच ह्मणतां, माझ्याच मेल्या एकटीच्या डोळयांला पोर झिजत चाललेली कशी दिसते ! ती आतां पूर्वींच्यासारखी खेळत नाहीं; ठेवल्याजागीं बसून रहाते; तोंडतरी किती सुकलं आहे अन् डोळे खोल गेले आहेत अन् गाल बसले आहेत; महिन्या पंधरा दिवसांपूर्वीं गालांची कशी गुरळी दिसत होती; आतां दिसते आहे का तशी तुमच्या डोळयांला ?"

राधाबाई गमतीखातर ह्मणतात "अहो, आतां गरमीमुळं मुलं सुकतात बरं अशीं!"

खुळखुळाबाईला हें उत्तर मुळींच समाधानकारक वाटलं नाहीं. त्या मध्येंच ह्मणाल्या "हव्या त्या गोष्टीचं कारण विचारा, कित्येकांच्याजवळ तें नेहमीं तयार असतं. सोन्याची टोपी कां फाटली तर उन्हाळयामुळं; चंद्रीचं कुंकू कां तिरपं लागलं तर उन्हामुळं; ठकीच्या गळयांतली सरी कां हरवली तर उन्हामुळंच !

मुलगी झिजूनझिजून मरणाच्या पंथाला लागली तरी तुह्मांला उन्हापलीकडे कांहींएक कारण दिसत नाहीं. उन्हाळ्यांत लोकांचीं मुलं अशींच नेहमीं झिजून मरतात, नाहीं का ?"

मरणाचें नांव ऐकतांच राधाबाईच्या मनाला, एकदम थोडासा धक्का बसला.

खुळखुळाबाई पुढें विचारतात "गंगीला रात्रीं कधीं घाम येतो का ?"

"अहो येत असेल, आतांशी गरमी थोडी का पडते ! रात्रींसुद्धां 'हुश्श हुश्श' केल्यावांचून आणि हातांत सारखा पंखा टेवल्यावांचून झोंप येत नाहीं. मग रात्रीं घाम आल्याचं काय नवल ?"

"तुह्मी कांहींहि ह्मणा," खुळखुळाबाई ह्मणाल्या "मी आतां पुण्यास जाईन तेव्हां गंगूला बरोबर नेऊन लागवणकर वैद्यांला दाखवीन—तुह्मी माझ्याकडे असं पाहूं नका ! वैद्याची फी कांहीं तुमच्यावर नाहीं टाकायची. मी आपल्या पदरून देईन, मगतर झालंना ? पोरीला आज दोन दिवस खोकलाहि येत आहे, तोतरी तुह्मांला दिसला का ? का तोहि नाहीं दिसला ? कित्येकांच्या डोळ्यांला कांहीं कांहीं गोष्टी मुळींच दिसत नाहींत. पण त्याच दुसऱ्यांच्या डोळ्यांला दिसतात !"

राधाबाईला खुळखुळाबाईचा स्वभाव पक्का ठाऊक होता. यामुळें त्यांनां त्यांच्या बोलण्यावर किती विश्वास ठेवावा, तें चांगलें माहीत होतें व त्यांच्या बोलण्याचा राग किती मानावा तेंहि कळत होतें. म्हणून राग न मानतां उलट त्यांनां अधिक चिडविण्याकरितां त्या ह्मणाल्या "तुह्मी गंगूला आठचार दिवस पुण्याला घेऊन जाल अन् पाठीमागें तिच्या वांट्याचं घरचं काम राहील तें कुणीं करावं ?"

हें ऐकून खुळखुळाबाई अधिकच चिडल्या आणि ह्मणाल्या "एकून तुमचीं मुलं ह्मणजे तुमच्या घरीं गुलामासारखीं राबलीं पाहिजेत ! काय बाई चमत्कार आहे पहा ! मुलीचा जातो आहे जीव अन् या आईसाहेब ह्मणताहेत कीं तिच्या वांट्याचं काम कोण करील ? अहो आईसाहेब ! तुह्मांला काळजी नका पडूं देऊं कामाची बरं ! माझ्या सोनुकलीवरची मी काम करूं लागेन तुह्मांला—मग झालं ना ? मी—[illegible] आज गंगूला माझे घरीं घेऊन जाणार ! येऊनजाऊन तुमची कामाचीच-हरकत कीं नाहीं ? तेंहि द्या मला घरीं करायला."

असें ह्मणून उत्तराची वाट न पहातां खुळखुळाबाई गंगूला घेऊन गेल्या.

प्रकरण ३१ वें.

## गृहशिक्षणाचा आणखी एक मासला.

आतां आपण राधाबाई व त्यांचीं मुलें यांनां सोडून दुसऱ्याच एका घरांत काय प्रकार चालला आहे तो पाहूं. हें घर आमच्या वाचकांच्या परिचयांतलेंच आहे. मागें एकदा राधाबाई गोदूताईला भेटण्याकरितां ह्मणून या घरांत आल्या होत्या. ही पहा येथें मुलांची एकच गर्दी झालेली आहे. लाडानें मुलें कशीं बिघडतात तें पहावयाचें असेल तर येथें पहाण्यास सांपडेल. तो पहा वामन आपल्या नोकराला शिव्या देऊन त्याच्या अंगावर थुंकतो आहे आणि ती पहा त्याची आई गोदूताई आपल्या मुलाला अशा वेळीं दाबावयाचें तें टाकून उलटी खिदखिद दांत काढित आपल्या मुलाचें कौतुक पहात उभी आहे. पलीकडे दाजी आणि त्याचा धाकटा भाऊ शिदू एका यःकश्चित् चित्रावरून भांडण काढून वर्दळीवर आले आहेत आणि एकमेकांनां गालगुच्चे, धम्मकलाडू आणि चापटपोळ्या यांच्या सारख्या मेजवान्या देत आहेत ! यांनां लहानपणापासून आईबापांकडून कोणत्या प्रकारचें शिक्षण मिळत आलें आहे, याचा अंदाज या भांडणावरून थोडाबहुत आपल्याला करतां येईल. गोदूताईचा वडील मुलगा बाब्या—चुकलों, यांनां बाबासाहेब ह्मटलें पाहिजे अशी गोदूताईची व त्रिंबकरावांची सगळ्यांनां ताकीद आहे—याची कशीकाय स्थिति आहे ती ऐकण्याची वाचकांनां उत्कंठा झाली असेल. ठीक आहे. ही जिज्ञासा तृप्त करून घेण्यास आपल्याला लांब जावयाला नको. पलीकडल्याच दालनांत तो व त्रिंबकराव दादासाहेब कांहीं बोलत आहेत तेथें उभें राहून आपण त्या दोघांचा संवादच ऐकूं ह्मणजे झालें.

ते पहा दादासाहेब नुकतेंच भोजनवगैरे उरकून विडा चघळित शतपावली करण्यासाठीं इकडूनतिकडे दालनांत खेपा घालित आहेत आणि बाबासाहेब कपाळाला आंठ्या घालून दारापाशीं उभा राहून ओंठांतल्याओंठांत कांहीं बोलत आहे.

बाबासाहेब ह्मणतो " मी इतके दिवस टाळाटाळी आणि तोंडचुकवेपणा केला. पण अशानें किती दिवस निभाव लागणार ? शेवटीं त्या गृहस्थानें फिर्याद ठोकून माझ्यावर समन्स काढलें आहे. तें टाळण्याकरितां आज आठ दिवस मी घरींसुद्धां आलों नाहीं. बाहेरच्या बाहेर कुठेंतरी बसावेंउठावें, कुठेंतरी जेवावें आणि कुठेंतरी रात्र काढावी, असें केलें. पण शेवटीं गुलामानें माझा पत्ता काढला आणि मजवर समन्स लागू केलें. आतां त्याचे पैसे देऊन टाकल्यावांचून गत्यंतर नाहीं. "

दादासाहेबांनीं हें ऐकून आश्चर्यानें डोळे फाडले आणि ते ह्मणतात "अरे हें ह्मणतोसतरी काय ? कसले पैसे, कुणाजवळून, कुणीं आणि कशाकरितां काढले ? अन् ही छपवाछपव अन् समन्स अन् आणखी काय ह्मणतोस--याचा मला कांहीं उमज पडत नाहीं. हें आहेतरी काय खेंगटें ? "

" आतां मीं सांगितलें यापेक्षां आणखी जास्त फोड करून सांगण्याचें कारण नाहीं. मी आपल्या स्वताच्या खर्चाकरितां ह्मणून थोडीशी रक्कम कर्जाऊ काढिली होती. तिच्यापायीं हा आजचा प्रसंग आलेला आहे. " .

"आत्तां नुकतें दिवाळीला तुझ्या मागच्या सगळ्या देण्याघेण्याचा हिशेब मीं चुकता करून दिला अन् इतक्यांत पुनः तूं देणें करून ठेवलेंसच का ! याला काय ह्मणावें ? अन् आतांची रक्कमतरी अशी केवढी आहे ?"

" फार नाहीं कांहीं. सगळे दोनशेंच रुपये—"

" फुकट मिळाल्यावर फार नाहींत ही गोष्ट खरी. पण मी विचारतों कीं, तूं कमावित नाहींस, आयता घरीं बसून खातोस अन् उलट वर कर्जहि करून ठेवतोस, याला काय ह्मणावें ? बाबा, तुझ्या मनांत आहेतरी काय कळूं दे मला एकदाचें. माझ्या डोक्यावर पागोटेंतरी राहूं द्यायचें आहे कीं नाहीं तुझ्या मनांत ? अरे, आपल्या घरांतल्या दररोजच्या दांडग्या खर्चाकडे पहा आणि एवढा खर्च चालविण्यासाठीं मला किती खपावें लागतें व किती खटपटी अन् लटपटी कराव्या लागतात तें मनांत आण. हा खर्च चालविण्याचे कामीं खरें ह्मटलें ह्मणजे आतां तूं मला मदत करायची. तें एकीकडे राहिलें आणि उलट तूंच ख्यालीखुशालीखालीं पैसा उडवून माझ्या बोडक्यावर कर्जाचें ओझें लादतोस ! हें ओझें इतके दिवस मीं सहन केलें. इतःपर तें सोसण्यास माझे अंगीं शक्ति उरली नाहीं. आतां आपलें ज्याचा कारभार त्यानें संभाळावा हें चांगलें. "

हें भाषण ऐकून बाबा दांतओठ चावित उभा राहिला. कांहीं वेळ असा उभा राहिल्यावर तो ह्मणतो " तसें करतां आलें असतें तर पैसे द्या ह्मणून मीं गोष्टच काढली नसती. पण आतां समन्सहि लागलें, सगळें कांहीं झालें, तेव्हां पैसे भरल्याशिवाय गतीच उरली नाहीं, ह्मणून काढावी लागली गोष्ट. पैसे मागण्याची ही अखेरचीच पाळी समजा. आतां कानांला चांगला खडा लावून घेईन. जें आपल्याला मिळेल त्यांतून दोन पैसे वांचवावयाचे हा आतां पुढें माझा क्रम राहील. मग असें करण्याला कुणी बरें ह्मणो किंवा नांवें ठेवो. "

बाबासाहेबाचें हें भाषण प्रथमच ज्यानें ऐकिलें असतें त्यालातरी त्याचा करारीपणा आणि निस्पृहपणाचा बाणा पाहून गंमत वाटली असती; परंतु दादासाहेबांच्या पुढें वर्षांतून पांचचार वेळांतरी अशा रीतीनें या गुणांचें प्रदर्शन होत असल्यामुळें त्यांच्या मनावर या तेजस्वी भाषणाचा यत्किंचित्‌देखील परिणाम झाला नाहीं. बाबासाहेबाच्या भाषणाची छाप बसली नाहीं ही गोष्ट जरी खरी आहे, तरी अन्यरीतीनें त्याला पाहिजे होतें तें प्राप्त झालें. दादासाहेबांनीं चिरंजिवांची मर्यादा, विनय, पांडित्य व अंगांतली धमक पाहून आणि त्यांची मागणी नाकबूल केली असतां काय परिणाम होतील ते ध्यानीं आणून "उद्यां रुपये देतों, पण पुनः अशा रीतीनें पैसे मिळणार नाहींत, हें पक्कें समज; पुनः असा प्रसंग आला तर तुझें तूं पहा !" असें शेवटीं ह्मटलें आणि पाठ फिरविली. त्याबरोबर बाबासाहेबाची पाठ फिरून तोंडहि बाहेर रस्त्याकडे झालें, हें सांगावयास नकोच.

बाबासाहेब त्रिंबकरावांच्या दिवाणखान्यांतून बाहेर पडतो न पडतो तोंच शिदू घाईघाईनें आपल्या बापाकडे जातांना त्याला दिसला. बाबासाहेबानें त्याला वाटेंतच थांबविलें. तेथें त्या दोघां भावांचा जो संवाद झाला त्यावरून त्रिंबकरावांच्या मुलांना कशा प्रकारचें शिक्षण मिळालें होतें याविषयीं थोडेंसें अधिक कळेल, ह्मणून तो संवाद जशाचा तसा येथें देतों.

बाबा ह्मणतो "कायरे शिदू, एवढा लगबगीनें दादासाहेबांकडे कशाला चालला आहेस ? ते आतां नाहीं भेटायचे. फीर माघारा!"

"आहे कांहीं काम. तूं रे कोण जाऊं नको ह्मणणार ?"

"जाऊं नको असें कोण लेक ह्मणतोय ? जाईनास बापडा ! पण आज कांहीं तुझें काम व्हायचें नाहीं. ते आतां रागांत आहेत. पण कायरे ! काम काय तेंतर सांगशील ? तें सांगशील तर तें कसें युक्तीनें काढून घ्यावें तें मी तुला शिकवीन !"

"काम कांहीं मोठेंसें नाहीं. रामचंद्ररावांच्या दुकानीं माझ्याजोगी एक नवी बायसिकल आलेली आहे. ती घ्यायची आहे. किंमत फार नाहीं. सगळे शंभरच—"

बाबासाहेब आश्चर्यानें ह्मणतो "शंभर रुपये ?"

"शंभर रुपये काय फार झाले बायसिकलीला ? आडगिऱ्हाइकी आहे ह्मणून या किंमतींत मिळते आहे. नाहींतर दोनशें रुपये पडते—दोनशें ! आहेस कुठें ? शंभर रुपयांत बायसिकल मिळायला लागल्यावर लोक घरेंदारें विकायला लागून बायसिकल घ्यायला लागतील कीं नाहीं तें पहा ! याच बायसिकलीवर किती-

जणांच्यातरी उड्या आहेत ! आनंदराव वांकडे शंभर रुपये घेऊन उद्यां येणार आहेत ह्मणून तोच दुकानदार ह्मणत होता. आपल्याला त्या वांकड्यांच्या अगोदर जाऊन ती घेतली पाहिजे. "

" पण तुला एवढी शंभर रुपयांची बायसिकल घेऊन करायचें आहे काय ?"

" त्याच्याशीं तुलारे काय करायचें आहे ? "

" मला कांहीं नाहीं करायचें. तूं हवातसा नाच. पण आजचा दिवस कृपा करून दादासाहेबांनां रुपयांसाठीं तगादा लावूं नकोस ह्मणजे झालें. मला दोनशें रुपये पाहिजेत ह्मणून मीं आतांच गोष्ट काढली होती; आणि त्यामुळें तर दादासाहेबांची तब्येत गरम झाली आहे. "

" पण तुला अखेर मिळालेना रुपये ?"

" कुठें मिळाले आहेत ? उद्यां देणार आहेत. "

" मग मला त्यांतून शंभर रुपये देईनास ?"

" छे रे ! त्यांतून मी तुला काय देणार ? ते रुपये आले कीं जसेचे तसे जातील सारे सावकाराकडे ! तेवढ्या दोनशें रुपयांनींतरी कुठें सगळें कर्ज फिटतें आहे ह्मणा ! पण असो. आतां वर्ष सहा महिने तर सावकाराचा तगादा रहाणार नाहीं ! तेवढेंच भाग्य समजावें ! "

" पण आज ती बायसिकल आपण घेतली नाहीं तर ती हातची जाणार यांत शंका नाहीं. आनंदराव उद्यां ती खास घेणार. "

" तुला आतां एक युक्ति सांगतों ती कर. या स्वारीजवळ हव्यातेवढ्या युक्त्या भरल्या आहेत. तूं आज जाऊन बायसिकल घेऊन ये आणि रुपये उद्यां देतों ह्मणून सांग, ह्मणजे झालें."

" पण उद्यांतरी दादासाहेब रुपये देतील ह्मणून कशावरून ? "

" अहारे वेड्या ! उद्यां देतों ह्मणून ह्मटलें कीं दिलेच पाहिजेत, असें समजायला तुह्मीआह्मी हरिश्चंद्रराजे थोडेच लागलों आहोंत ! अरे 'उद्यां देतों, परवां देतों' ह्मणून थापावारी दिवस काढावे; झालें. त्या दिवशीं दादासाहेबांनीं खुद्द स्वताची नाहीं का गोष्ट सांगितली, कीं, त्यांनीं अशा थापावारी दोन वर्षेपर्यंत एका दुकानदाराला झुलविलें ह्मणून ! आपण त्यांचे चिरंजीव ! मग दोन महिने सुद्धां दुकानदाराला झुलवितां आलें नाहीं तर दादासाहेबांचें नांव काय राखिलें?"

" छेरे, तो रामचंद्रराव कसला वस्ताद आहे ! पक्का काफर आहे काफर !! तो रोख किंमत घेतल्यावांचून मालाला हात नाहीं लावूं देणार !"

" तर मग पहायला ह्मणून नोकराच्या हातीं घरीं मागीव आणि नंतर परत पाठवूं नकोस. विचारलेंच तर ठेविली ह्मणून सांग. पैसे मागितले तर उद्यांचा वायदा कर. फारच गमजा करायला लागला तर कधीं, कुणीं आणली ह्मणून साफ नाकबूल होऊन जा ह्मणजे झालें ! "

शिदूला ही युक्ति पटलीशी दिसली. तो तेथून मुकाट्यानें चालता झाला.

इकडे दाजीसाहेब स्वस्थ बसला होता असें नाहीं. तोहि एका महत्त्वाच्या उद्योगांत गुंतला होता. त्रिंबकरावांच्या शेजारीं एका कंत्राटदाराचा बंगला असे. या बंगल्याभोंवतीं लहानशी पण टुमदार बाग होती आणि त्या बागेंत उन्हाच्या वेळीं बसण्यासाठीं ह्मणून लहानलहान वेलींच्या जाळ्या व मंडप केले होते. या मंडपांत बसून कधींकधीं त्या कंत्राटदाराचीं मुलें पत्ते गंजिफा खेळत किंवा हारमोनियमची पेटी वाजवित आपली करमणूक करून घेत. हें दुसऱ्याचें सुख दाजीसाहेबाच्यानें पहावेना. त्यानें त्या मंडळीला त्रास देण्यासाठीं दुरून दगड मारावे आणि कोणी पाहील ह्मणून कुंपणाच्या आड लपावें, असें पुष्कळ वेळां झालें होतें. आज बाबासाहेब व शिदू यांचें बोलणें चाललें असतां दाजीसाहेबाची स्वारी याच उद्योगांत गुंतली होती. तो व त्याचा एक सोबती अशा दोघांनीं दगड मारण्यास सुरुवात केली. त्या दोघांनीं पांचचार दगड मारले. त्यांतला एक बंगल्याच्या खिडकीला लागून त्याचें तावदान फुटलें. त्याबरोबर दगड कोणी-कडून आला ह्मणून पहाण्यासाठीं मंडळी धावली व पहातात तों दाजीसाहेब व त्याचा एक सोबती दबा धरून बसले आहेत ! मंडळीची चाहूल ऐकतांच दाजीसाहेबानें तर पोबारा केलाच, पण त्याच्या सोबत्याच्या पायांत तितकें बळ नसल्यामुळें तो त्यांचे हातीं लागला. इकडे दाजीसाहेब जो निसटला तो एकदम आपल्या घरांतल्या शौचकूपांत जाऊन लपला व तेथेंहि कोणी आल्याचा भास झाल्यावरून निघून लपतलपत माजघरांत आला. उन्हांतून एकदम घरांत आल्यामुळें माजघरांत त्याला प्रथम कांहीं दिसेना. तेथें गोदूताई दुपारची वामकुक्षी करित पडल्या होत्या, त्यांच्या अंगावर त्याचा पाय पडला. त्या तशाच संतापानें उठल्या आणि त्याला धरावयाला लागल्या, तसा तो निसटला आणि माडीवर आपलीं भावंडें खेळत होतीं त्यांच्यांत जाऊन मिसळला. उन्हांतून धावत आल्यामुळें त्याचें तोंड गोरेंमोरें झालें होतें आणि भीतीनें त्याची मुद्रा कावरीबावरी झाली होती. हें त्या मुलांच्या तेव्हांच लक्ष्यांत आलें. त्यांनीं एवढें भिण्याचें कारण काय ह्मणून विचारलें तेव्हां दाजीसाहेबानेंहि आपल्या पराक्रमाचें

वर्णन तिखटमीठ लावून चांगलें चरचरीत केलें. तें ऐकून ती बालगोपाळ मंडळी आनंदानें डोलूं लागली. इतक्यांत खालीं " दाजी–दाजी—" ह्मणून त्रिंवकरावांनीं हांका मारल्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. तेव्हां दाजीसाहेबाचें धाबें दणाणलें. आपल्या पराक्रमाचा इतिहास आपल्या वडिलांच्या कानांपर्यंत जाऊन त्याबद्दलचें इनाम देण्याकरितांच दादासाहेब हांका मारित असले पाहिजेत, असें त्याच्या मनाला वाटलें आणि ह्मणून प्रथम पांचचार हांकांनां त्यानें ओच दिली नाहीं. पण पुढें जेव्हां दादासाहेबांचें पाऊल जिन्यांत वाजायला लागलें तसें आतां ओ दिल्यावांचून इलाज नाहीं असें समजून दाजीसाहेबानीं ओ दिली. दाजीचा तर्क अगदीं खरा होता. कंत्राटदार दाजीच्या सोबत्याचा हात पकडून त्याला घेऊन दादासाहेबांकडे आले व त्यांनीं झालेली हकीगत त्यांनां सांगून त्या मुलाकडून ती खरी आहे अशाबद्दल खात्रीहि करून दिली. दादासाहेबांनीं " दाजी, हे काय ह्मणाले तें ऐकलेंसना? बोल खरें काय आहे तें?" ह्मणून खडसून विचारलें.

दाजीच्या मनांत या वेळीं परस्परविरोधी अशा अनेक मनोवृत्तींचें तुमुल युद्ध चाललें होतें. केलेला अपराध एकदम कबूल करावा किंवा साफ नाकबूल जावें हें त्याला ठरवितां येईना. नाकबूल जावें तर आपला सोबती अडकला आहे. अर्थात् तो आपलेविरुद्ध साक्ष देईलच. देईना दिलीतर! सगळा अपराध त्याच्या एकट्यावरच ढकलून आपण साफ निसटावें, असें दाजीच्या मनानें शेवटीं निश्चित केलें. हा निश्चय होण्याला थोडासा अवकाश लागला. तेवढ्यांत ते कंत्राटदार ह्मणाले "दादासाहेब, मुलगा गप बसला आहे यावरूनच आपण काय तर्क काढावयाचा तो काढा ह्मणजे झालें. आतांचीं मुलें अशक्त असून दुर्जन. आपले लहानपणीं आपण असें कधीं दुसऱ्याचें नुकसान केलेलें तुह्मांला आठवतें का? आतांच्या यांच्या कृतीवरून पुढें हे काय दैव काढणार आहेत, तें दिसतेंच आहे—"

आपल्यावर तावदान फोडल्याचा आळ घेतलातर घेतला आणि त्या दुःखावर या शब्दांच्या आणखी डागण्या कशा सहन कराव्या, असा विचार करून दाजीसाहेब रागानें लाल होऊन पण भीतीनें कांपतकांपत त्या कंत्राटदाराकडे वांकडें तोंड करून उद्धटपणानें ह्मणतो "आपल्यासारखे लोकांचे गळे कापणारेतर नाहीं होणार?"

दाजीवर अपराधाची शाबिती होऊं पहात आहे असें पाहून आतां प्रकरण वाढवि[illegible] नाहीं असें त्रिंबकराव समजले आणि त्यांनीं कंत्राटदाराचें नुकसान [illegible]रून देण्याचें व पुनः आपलीं मुलें त्रास देणार नाहींत अशी तजवीज करण्याचें कबूल करून त्यांनां वाटेला लाविलें व मग दाजीला आपल्या खोलींत बोलावून नेऊन त्याला यथेच्छ वाक्ताडन केल्यावर ह्मटलें "दाजी, ही तुला खोड

लागली आहे ती फार वाईट आहे. हीच अखेर तुझा घात करील. ही एवढी खोटें बोलण्याची व खोडसाळपणानें दुसऱ्याचें नुकसान करण्याची खोड टाकशील तर अण्णासाहेबांनां तूं आवडूं लागशील—"

" अण्णासाहेबांशीं मला काय करायचें आहे ? त्यांच्या जिवावर मी जन्माला थोडाच आलों आहें ! पाहिजे आहे कुणाला त्यांचा तो भिकार धंदा ! गरीबांनां छळायचें, आणखी त्यांच्याजवळून व्याज ह्मणूं नका, घरभाडें ह्मणूं नका, अशा अनेक युक्त्यांनीं पैसे काढून आपण तेवढें गब्बर व्हायचें ! इतका पैसा मिळवून पुनः केवढा चिक्कूपणा ! कधीं नाचतमाशे, नाटकें, मेजवान्या, सहली यांचें नांव नाहीं ! आग लावा अशा पैशाला ! "

" अरे, तूं काय वहकतो आहेस ? कांहीं विचार कर. तूं मोठा सरदार आहेस तें सगळ्या जगाला ठाऊक आहे. सरदारी कांहीं वाटेवर नाहीं पडली. तूं अण्णासाहेबांनां गरीबांनां छळणारे ह्मण, कीं चिक्कू ह्मण, लोकतर त्यांनां मान देत आहेत ! अरे, आज त्यांचा धंदा काय जोरानें चालला आहे, संपत्तीचा नुसता पूर वहात आहे. तुझ्यासारखे हजारों नोकर आज त्यांचे घरीं राबत आहेत आणि त्यांच्या कृपेनें उदयाला येत आहेत. उद्यां तूंच त्यांच्या इथें नोकरीला राहिलास तर तुला केवढा लाभ, केवढा भाग्योदय होण्याचा संभव आहे ! समज त्यांचा तूं वारस झालास, तर मग आणखी काय पाहिजे ! "

" मी, अन् त्यांचा वारस कसा होणार ? "

" काय कठिण आहे ? त्यांचा मुलगा नाना तो मेला काय अन् जिवंत काय सारखाच ! तो क्षयी आहे आणि क्षयी माणूस केव्हां मरेल याचा कांहीं नेम नसतो. अण्णासाहेबांनां तेवढाच मुलगा आहे. ते दुसऱ्याचा मुलगा दत्तक घेतील, हें मनांतसुद्धां आणायला नको. तेव्हां अण्णासाहेब आपली सगळी जिनगी मुलीच्या नांवेंच करून देतील. आणि तूं जर नीट वागलासवरलास तर तुला ते सहज जांवई करून घेतील. ह्मणून आतांपासून तूं त्यांचा लोभ संपादन करून घ्यावा, यासाठीं तुला त्यांच्या कचेरींत, किंवा पेढीवर लावून द्यावें असें माझ्या मनांत येतें. एवढ्याकरितां मुद्दाम तुला एकीकडे बोलाविलें. आतां या सगळ्या गोष्टींचा विचार करून चांगल्या रीतीनें वाग, ह्मणजे झालें."

दादासाहेबांचें हें भाषण ऐकून दाजीच्या तोंडाला पाणी सुटलें, पण इतक्या दिवसांच्या जडलेल्या खोडी जाव्या कशा ? मनाचा दृढनिश्चय झाला असता तर त्याहि गेल्या असत्या. पण तो दृढनिश्चय कोठें आहे ?

## प्रकरण ३२ वें.

# मृत्यूची छाया.

या स्थितींत आणखी कांहीं महिने लोटले. या अवकाशांत कादंबरीकारानें मुद्दाम टिपून ठेवण्यासारखें विशेष कांहीं घडलें नाहीं ह्मणून आपण थोडीशी उडी मारून वसंतऋतूपाशीं एकदम जाऊन पोहोंचूं.

खुळखुळाबाईच्या दृष्टीला गंगू क्षीण झालेली दिसत होती, आणि लवकर औषधोपचार केले नाहींत तर कांहीं भलताच परिणाम होईल असें ह्मणून त्या सर्वांना घाबरवून सोडित होत्या. ईश्वरकृपेनें त्यांची शंका दूर झाली. औषधानें गंगूला गुण आला व ती पुनः पूर्ववत् हुषार, तेजस्वी आणि आनंदी दिसूं लागली. पण ही उमललेली कळी लवकरच तुटून गळून पडावयाची आहे, हें त्या वेळीं फार थोड्यांना कळलें होतें. औषधाचा गुण फारच क्षणिक होता. गंगू पुनः झिजूं लागली. खोकल्यानेंहि उलट खाल्ली. इतकेंच नाहीं, तर जोरानें उचल केली. पडूनपडून गंगूचें अंग दुखून येई. पण असळ उठून बसलें कीं, खोकला जोर करी; यामुळें अंथरुणावरचे अंथरुणावर तिची तळमळ चालली होती, ती खुळखुळाबाईच्या लक्ष्यांत आली.

झालें. खुळखुळाबाई लागलीच उठल्या. पोरीच्या सुखदुःखाविषयीं निष्काळजीपणा दाखविल्याविषयीं राधाबाईला मनांतल्यामनांत हवेंतितक्या रागें भरल्या, आदळआपट केली, तोंडानें पुटपुटल्या आणि मनांत काय आलें कोण जाणे, दडदड जिना उतरून एकदम चालत्या झाल्या. राधाबाई दाराशींच भेटल्या, त्यांना खुळखुळाबाई ह्मणाल्या "पोरगी अंथरुणांत माशासारखी तळमळते तिच्याकडे पहाण्यास कुणाला फुरसत होते आहे? आमच्या काकूबाई संधिवातानें पाय आंखडून पडल्याच आहेत. त्यांच्याकडे वैद्यबुवा येतील तेव्हां गंगूची प्रकृति दाखविली पाहिजे. काकूबाईला संधिवातच आहे खचित. एवढंसं दुखणं, पण आज आठनूआठ दिवस पाय आंखडून पडल्या आहेत! कोणबाई हें दुखणं!"

राधाबाईनीं हें ऐकिलें. पण त्याच्या पूर्वार्धाकडे—अर्थात् राधाबाईवर निष्काळजीपणाचा जो आरोप केला होता त्यांत सत्याचा लेशहि नसल्यामुळें व कोणतीहि गोष्ट एकदां डोक्यांत शिरली ह्मणजे मग तो झालेला ग्रह ब्रह्मदेवाच्यानेंसुद्धां पालटवणार नाहीं हा खुळखुळाबाईचा स्वभाव राधाबाईला पुरतेपणीं ठाऊक असल्यामुळें, खताच्यासंबंधाच्या बोलण्याकडे—त्यांनीं मुद्दामच दुर्लक्ष्य केलें आणि

काकूबाईच्या संधिवातासंबंधानें ह्मणाल्या "संधिवाताला गरम पाण्याचा शेक हा एक चांगला उपाय आहे ह्मणून ह्मणतात."

"गरम पाण्याचा शेक ? अहाहा ! काय इलाज पण इलाज शोधून काढला आहे ! आतां त्यांनां एका पातेल्यांत बसिवतें आणि पाणी घालून तें पातेलें चुलीवर ठेवतें, ह्मणजे लागेल चांगला शेक ! अलीकडच्या लोकांच्या डोक्यांतून काय काय बाई अचाट गोष्टी निघतील त्या थोड्या आहेत ! पूर्वींच्या लोकांनां काय डोकीं होतीं थोडींच ! आतांच्याच लोकांनो कायती सगळी अक्कल मिळालेली आहे. पूर्वींचीं माणसं आपलीं माझ्यासारखीं साधींभोळीं—"

या छोट्याशा संवादानें एवढेंच झालें कीं, खुळखुळाबाई ज्या उद्देशानें दडदड जिना उतरून बाहेर जाण्यास निघाल्या होत्या, तो उद्देश बोलण्याच्या नादांत त्या विसरल्या. त्यांच्या इंजिनांतली वाफ आतां थंड होऊन तें आतां बहुतेक बंद पडण्याच्या बेतांत आलें होतें. इतक्यांत काकूबाईनां पहाण्याकरितां वैद्यबुवा येणार होते, ते आल्याची खबर कळल्यावरून खुळखुळाबाई तिकडे गेल्या आणि थोड्या वेळानें वैद्यबुवांनां घेऊन आल्या.

वैद्यबुवांनीं गंगूची नाडी पाहिली आणि नंतर कांहीं वेळपर्यंत डोळे मिटून विचार केल्यावर कफयुक्त पित्तज्वर आहे आणि तो हाडीं असल्यामुळें शक्ति क्षीण करित आहे, ह्मणून सांगितलें. आपल्या ह्मणण्याच्या पुष्ट्यर्थ त्यांनीं शंख-चूडामणिकृत चिकित्सामंजरी या प्राचीन ग्रंथांतून भराभर संस्कृत श्लोक ह्मणून दाखविले व एक काढा लिहून दिला आणि त्याचेबरोबर घेण्यासाठीं सुवर्णमालिनी वसंताच्या पुड्या दिल्या. नंतर पथ्य वगैरे सांगून तें पथ्य बरोबर पाळल्यास तीन आठवड्यांत मुलीची कांति तेजस्वी होईल, असें ग्रंथांतरींचे आधार दाखवून आश्वासनहि दिलें. नंतर वैद्यबुवा उठले आणि खुळखुळाबाईशीं कुजबुजत दारा-बाहेर पडले. तें कुजबुजणें बहुतकरून पैशाबद्दलचेंच असेल असें वाटतें. खुळखुळा-बाईनां मोठ्या आवाजाची ईश्वरदत्त देणगी असल्यामुळें त्यांचें कुजबुजणें ह्मणजे सहज चार लोकांनां कळत असे. त्या ह्मणाल्या "वैद्यबुवा, त्याविषयीं बेफिकीर असा. ते माझ्याकडे लागले ! तुह्मीं मुलीला बरी करा, ह्मणजे पुढचं माझ्याकडे लागलं—"

तीन आठवड्यांचे जागीं पांच आठवडे वैद्यबुवांचें औषध सुरू होतें. पण विकार कमी होण्याचें नांव नाहीं. उलट क्षीणता वाढतच जाऊन गंगूची मुद्रा अगदीं पिकुटल्यासारखी निस्तेज दिसूं लागली. अंथरुणावर उठून बसण्याइतकी-सुद्धां शक्ति तिचे अंगीं उरली नव्हती. राधाबाई वरून शांतता दाखवीत, पण आंतून

वणवा पेटावा त्याप्रमाणें त्यांच्या अंतःकरणांत दुःखाग्नि पेटत होता. पित्याच्या सुखकर छत्राखालीं मातृप्रेमांत वाढलेल्या ज्या राधाबाईला सुदैवानें अप्रतिम पतिसुख व अपत्यसुख एके काळीं मिळालें होतें, त्याच राधाबाईवर आतां पतिशोक, नंतर आपत्ति आणि त्यामागून अपत्यवियोगाचा प्रसंग असे एकामागून एक दुःखाचे दिवस आले. पण ते सर्व तिनें धीरानें, शांतपणानें व निमूटपणें सहन केले. आतां दुर्दैव आपला अंततरी किती पहाणार, ह्मणून त्या ह्मणूं लागल्या. तथापि आपण धीर सोडला तर आपले दोन मुलगे अज्ञान आहेत, त्यांनीं काय करावें, हा विचार मनांत येऊन राधाबाई वरून शांतता दाखवीत. दुखणाईत पडलेल्या गंगूकडे राधाबाई कधींकधीं तासचेतास टक लावून पहात रहात आणि अशा गोड, सुखभावी आणि लाडक्या मुलीचा लवकरच आपल्यास वियोग होणार, हें मनांत येतांच तोंड फिरवून कोणाच्या नजरेस न येईल अशा रीतीनें पदरानें डोळे पुशीत. खुळखुळाबाईंनांहि गंगूचा अंत जवळ आला आहे ही गोष्ट कळून चुकली होती; पण धीर हा गुण त्यांनां परमेश्वरानें दिला नसल्यामुळें त्या गंगूच्या देखत रडूं लागत. गंगूनें खुळखुळाबाईला रडतांना दोनचार वेळां पाहिलें होतें. पण त्या रडण्याचें कारण काय तें तिला कळेना. तेव्हां बालस्वभावास अनुसरून तिनें एक दिवस "मावशी, कांग रडतेस?" म्हणून विचारलें. मावशीतरी या प्रश्नाला काय उत्तर देणार होती? तिनें टाळाटाळी करून पाहिली. पण ती जमेना. तेव्हां म्हणाली "मी नुकतीच कांदे सोलित होतें त्यामुळं आलं असेल पाणी—"

पण ही बतावणी करतांना "तूं खरं सांगायला का एवढी भितेस? आतां एक तूं सत्य दावून ठेवलंस, ह्मणून तुझ्या दावून ठेवण्यानं तें कधींच बाहेर येणार नाहीं, असं का तूं समजतेस?" अशी तिची मनोदेवता तिला विचारी. पण अशा गोष्टींत मनोदेवतेच्या शिकवणीपेक्षां धोरणाचें महत्त्व व्यावहारिक माणसांच्या मनावर जास्त ठसतें, हा नियम आहे. आणि खुळखुळाबाई या नियमाला अपवाद होत्या, असें नाहीं.

गंगूच्या समाचाराला शेजारणीपाजारणी येऊं लागल्या. जानकीबाईहि एकदोन वेळां येऊन गेल्या होत्या. आज त्या आल्या त्यांत गंगूचा समाचार कळावा हातर उद्देश होताच. पण त्याबरोबर दुसरेंहि एक काम गंगाधराकडून करून घ्यावयाचें होतें. नारायणरावांची सोनी अण्णासाहेबांच्या घरीं खेळण्यासाठीं ह्मणून गेली होती, तिला बोलवावयाचें होतें आणि नारायणरावांच्या नोकरांपैकीं कोणी हजर नव्हतें.

तेव्हां गंगाधराला तें काम सांगितलें. गंगाधर येईपावेतों जानकीबाई गंगूच्या बिछान्यापाशीं बसल्या.

गंगाधर अण्णासाहेबांचे घरीं गेला. नानाचें वर्तन या खेपेला त्याच्याशीं अगदीं निराळ्या प्रकारचें घडलें. नानाच्या आईला गंगू आजारी पडल्याची खबर सोनीकडून कळली होती. त्यांनीं गंगाधराला गंगूच्या तब्यतीचा समाचार विचारला. नानाच्या आईशीं व धाकट्या बहिणीशीं बोलण्याचा गंगाधराला हा पहिलाच प्रसंग होता. तरी त्यानें धिटाईनें पण नम्रपणानें जें उत्तर द्यावयाचें तें दिलें. तो त्याचा सरळ स्वभाव व शांत आणि नम्रपणाचें वर्तन पाहून अण्णासाहेबांच्या पत्नीला फार संतोष झाला. नानाहि आज त्यांच्याशीं अधिक मोकळ्या मनानें बोलत होता. त्यानें गंगाधरापाशीं "तूं आतां कुठें आणि कुणापाशीं शिकतोस, व कोणतीं पुस्तकें वाचतोस ?" वगैरे पुष्कळ चौकशी केली. याप्रमाणें गंगाधरास प्रश्न विचारण्यांत व त्यांचीं उत्तरें ऐकण्यांत त्यांचा अर्धातास चांगल्याप्रकारें गेला.

गंगूच्या तब्यतीविषयीं अण्णासाहेबांच्या पत्नी लक्ष्मीबाई यांनीं विचारपूस केल्याचें वर लिहिलेंच आहे. सोनीला दुसऱ्यांच्यामध्यें तोंड घालून बोलण्याची खोड असे. त्यामुळें गंगाधराला विचारिलें असतां सोनी मध्येंच ह्मणाली "ती आतां कांहीं फार दिवस वांचेलसं दिसत नाहीं—"

"हें तुला कुणीं ग सांगितलं ?" लक्ष्मीबाईनीं विचारिलें.

सोनी ह्मणाली "सांगायला कशाला हवं ? जानकीबाई शेजारच्या ठकूताईला ह्मणत होत्या, तें मीं सहज ऐकलं—"

यावर लक्ष्मीबाई विनोदानें हंसत हंसत ह्मणतात "सोने ! तुझे कानतरी बरेच लांब आहेत ग !"

लक्ष्मीबाईच्या या बोलण्याचें सोनीला कौतुक वाटलें. सोनी गंगाधराला विचारूं लागली "लक्ष्मीकाकू ह्मणाल्या माझे कान लांब आहेत, खरंच कारे गंगाधर ! माझे कान इतके लांब आहेत ?"

गंगाधर हा विनोद ऐकून हंसला. पण तें हंसणें खरें—मनापासून आलेलें दिसत नव्हतें. आपली बहीण गंगू आतां फार दिवस वांचत नाहीं, ही निराशा अद्यापि त्याचे मनांत प्रादुर्भूत झाली नव्हती. जानकीबाईचें बोलणें सोनीनें लक्ष्मीकाकूंला सांगितलें, तेव्हां ती निराशा त्याचे हृदयांत एकाएकीं उत्पन्न झाली आणि तिच्यामुळें त्याच्या मुद्रेवरची टवटवी एकदम मावळली. तो अगदीं उदास झाला आणि आतां आपल्या बहिणीच्या बिछान्यापाशींच नेहमीं बसून रहावें,

तेथून हलूंच नये, असें त्यास वाटूं लागलें. ह्मणून तो सोनीला घेऊन तडकाफडकीं निघाला. निघतांना त्याला इतकी घाई झाली कीं, त्यानें लक्ष्मीकाकूला "सोनीला घेऊन जातों बरें का ?" एवढं सांगितलें, पण त्यांच्या "हो" किंवा "नाहीं" ह्मणण्याचीसुद्धां वाट पाहिली नाहीं. सोनीला तिच्या घरीं पोंचवून देऊन गंगाधर घरीं आला तो थेट गंगूच्या बिछान्याकडे गेला. पण इतक्यांत त्याच्या डोक्यांत कांहीं विचार आल्यामुळें तो माजघराच्या दाराशींच थांबला. आपण सोनीच्या तोंडून जानकीबाईंचे ह्मणून जे शब्द ऐकिले, त्यांत सत्य किती आहे, हें आईस विचारून पहावें, ह्मणून तो बाहेर राधाबाईपाशीं गेला आणि घाबऱ्याघाबऱ्या व सचिंत मुद्रेनें ह्मणाला "आई, गंगूची तब्यत खरेंच का ग इतकी बिघडली आहे ? अन् ती या दुखण्यांतून उठणार नाहीं असें तुला वाटतें ?"

राधाबाई डोळ्यांत पाणी आणून सद्गदित कंठानें ह्मणाल्या "बाळा, परमेश्वराची मर्जी काय आहे, कुणाला ठाऊक ! पण आपलं हित कशांत आहे तें आपल्या-पेक्षां त्याला जास्त कळतं. तेव्हां त्याच्यावरच सगळा भार टाकून रहावं हें बरं. आपण माणसं पडलों दुर्बळ, आपल्याच्यानं काय होणार आहे ? जें कांहीं घडतं तें त्याच्या सत्तेनं घडतं. ह्मणून कोणत्याहि गोष्टीचा शोक न करितां परमेश्वराचं चिंतन करित रहावं."

## प्रकरण ३३ वें.

# प्रसंग ठेपला.

अशा दुखण्यांत आणखी कांहीं दिवस लोटले. एके दिवशीं खुळखुळाबाई गंगूसाठीं थोडींशीं अंजिरें घेऊन आल्या आणि तिच्या बिछान्यापाशीं बसून तिच्या अंगावर हात फिरवित "आतां तुला कसं वाटतं ?" ह्मणून विचारूं लागल्या.

गंगू ह्मणाली "खरोखर सांगूं ? मला कनी आतां जगूं नये असं वाटतं."

खुळखुळाबाई ह्मणतात "दुखण्याचा कंटाळा आला आहे असं ह्मणावं, का असं कांहींतरी अभद्र बोलावं ? दुखण्याचा कंटाळा येणं वाजवीच आहे. तूं खेळकर मुलगी, आनंदानं उड्या मारायच्या, पोरींबरोबर धिंगाणा घालायचा, अन् तुला या दुखण्यानं इतकं बेजार केलं आहे कीं तें जागचं हालंसुद्धां देत नाहीं. तेव्हां अशा गोष्टीचा कंटाळा कसा नाहीं येणार ?"

"तसं नाहीं हो काकू ! मला कनी खरोखरीच वाटतं कीं, मी आतां मरेन. या दुखण्यांतून मी कसची उठतें ?"

खुळखुळाबाई रागानें ह्मणतात "कोणत्या गधडीनं तुझ्या डोक्यांत हें खूळ भरवून दिलं आहे ?"

"पण मी ह्मणतें तें खरं आहे ना ?"

"खरं ! तुला हें सांगितलं कुणीं तें मला अगोदर कळूंदे, ह्मणजे सांगतें पहा कसं काय तें !"

"कुणीं सांगितलं नाहीं. आई न् आमचा दादा संध्याकाळीं माजघरांत एकदा कांहीं बोलत होतीं, तें मीं ऐकलं होतं—"

खुळखुळाबाईच्यानें आतां राग आवरवेना. त्या ह्मणाल्या "पोरांच्यादेखत अन् अशा गोष्टी करायच्या, या शहाणपणाला ह्मणावंतरी काय ! आजारी पोरीच्या देखत अशा गोष्टी बोलून तिला भिवडवणारी आई आह्मीं बाई आमच्या जल्मांत नव्हती कधीं पाहिली !"

"आई कांहीं मला भिवडावित नाहीं. उलट ती आह्मांला नेहमीं सांगते कीं, मरणाला तें काय भ्यायचं आहे ?"

"पुरे पुरे तो तुझ्या आईचा वेदांत ! ह्मणे मरणाला काय भ्यायचं आहे ! मरणाला नाहीं भ्यायचं तर काय जगण्याला भीत असतात ? आपलं नुसतं कुठं बोट कापलं किंवा थोडंसं कुसळ बोचलं तर कोण वेदना होतात ! मग मरणानंतरच्या वेदना काय पुसायच्या आहेत !"

"नाहीं बरं काकू, मेल्यानंतर वेदना ग कुणाला होणार? आपण मेलों ह्मणजे आपण हें शरीर टाकून देतों आणि आपला प्राण हवेंत जातो. मग त्या शरीराला कशाच्या वेदना आल्या आहेत?"

गंगू जें काय बोलली त्यांतलें एक अक्षरसुद्धां खुळखुळाबाईला समजलें नाहीं. "एवढ्याशा पोरीला हें एवढें ब्रह्मज्ञान कुणीं सांगितलं? ही पोरगी शुद्धीवरतरी आहे कीं नाहीं, का वायूचा झटकाबिटका झाला आहे?" वगैरे कितीतरी शंका खुळखुळाबाईला गंगूचें तें बोलणें ऐकून आल्या.

मृत्यूसंबंधाचें एक गाणें गंगूनें कोठेंसें वाचिलें होतें त्याची तिला आतां आठवण झाली, आणि ती तें गुणगुणत ह्मणूं लागली. तें गाणें तिला सबंध येत होतें आणि ती तें घोळूनघोळून ह्मणत होती. अगोदरच लहान मुलीचा आवाज मधुर असतो; त्यांतून गंगू लाडकी, तेव्हां तिचें गाणें खुळखुळाबाईला फार आवडलें, हें सांगावयास नकोच! तें गाणें येणेंप्रमाणें—

वसंतांत तो गुलाब फुलतो
झोके झोके नभांत घेतो
वायूसह, तव समय काय तो
मृत्यो! आहे रे?

किंवा जेव्हां खिन्न होउनी
अधोवदन तो पाहे अवनी
पादीं जातां तो चिरडोनी
समय तुझा तो का?

नियमित काळीं पर्णें सुकती,
पुष्पें तैशीं तीं कोमजती,
व्योमीं तारे अस्ता जाती
ठरलेल्या काळीं.

मृत्यो! तव परि समय न ठरला,
कवणाचें नच बंधन तुजला;
गमेल तुज त्या तूं समयाला
येशी मृत्यो रे!

तें गाणें ऐकून खुळखुळाबाई आश्चर्यानें डोळे फाडून आणि तोंड वासून गंगूकडे पहात उभ्या राहिल्या. त्यांची ती आश्चर्यचकित मुद्रा पाहून गंगू ह्मणाली "आह्मांला आई तर अशा गोष्टी नेहमीं समजून सांगत असते. ती ह्मणते कीं, मुलांनां आईबाप जसं पाहिजे तशा प्रकारं शिकवितच नाहींत. मरणं ह्मणजे कांहीं भयंकर गोष्ट नाहीं, तर उलट त्यांत आनंद मानण्यासारखं आहे. मेलं ह्मणजे बद्ध झालेला आपला आत्मा मुक्त होतो, ही गोष्ट मुलांनां काय पण मोठ्या माणसांनांसुद्धां कळत नाहीं आणि यामुळंच ज्याला त्याला मरणाचं भय वाटतं, असं आमची आई नेहमीं ह्मणते."

खुळखुळाबाई ह्मणाल्या "मरण्यांत आनंद मानण्यासारखं आहे! कोण ही विचित्र कल्पना! काय वेडतर नाहीं लागलं, गंगू, तुझ्या आईला?"

"मला काय माहीत? आईनं सांगितलं तसं मी तुह्मांला सांगतें. ती स्वतः पोथ्यापुराणं वाचते व हरिदासांच्या कथा ऐकते. तिच्या तोंडून रामायण न् महाभारतांतल्या पुष्कळ कथा आह्मीं ऐकल्या आहेत. आई ह्मणते कीं, मोठमोठे ऋषीदिखील आत्म्याविषयीं असंच ह्मणत असत आणि सांगत असत कीं या देहांत जीव आहे तोंपर्यंत जर चांगलीं कृत्यं कराल व पुण्य जोडाल तरच तें तुमच्या कामाला येईल. अन् मग जेव्हां आत्मा हें शरीर सोडून जाईल तेव्हां या जन्मींच्या चांगल्यावाईट कृत्यांप्रमाणं चांगला वाईट जन्म त्या आत्म्याला मिळेल, आत्मा कधीं मरत नाहीं, त्याचा कधीं नाश होत नाहीं. आपण जसं एक लुगडं फाटलं कीं दुसरं घेतों, तसा आपला आत्मा एक शरीर नाहींसं झालं कीं दुसऱ्या शरीरांत शिरतो."

गंगू जें बोलत होती त्याचा अर्थ तिचा तिला कितपत समजत होता, हें कांहीं सांगतां येत नाहीं. परंतु तिची आई रोज संध्याकाळीं रिकामपणच्या वेळीं मुलांनां कथापुराणांतल्या गोष्टी सांगतांना वरच्यासारखा वेदांत सांगत असे. तो रोज तिच्या कानांवरून जाई, यामुळें ते शब्द तिच्या कानांत बसले होते. एवढ्याशा पोरीला कितीतरी पुराणांतल्या कथा येताहेत व काय वेदांताच्या गोष्टी सांगते आहे हें पाहून खुळखुळाबाईतर अगदीं कुंठितच झाल्या व पांचचार मिनिटें स्तब्ध बसल्यावर तोंडावाटे शब्द फुटूं लागले तेव्हां ह्मणाल्या "गंगे गंगे! तुला इतकं हें सुचतंतरी कसं बाई बोलायला कोण जाणे! आह्मीं शेंकडो कथा न् पुराणं आजवर ऐकिलीं असतील, पण त्यांतलं एक अक्षर कांहीं मला सांगतां यायचं नाहीं. पण इकडे पहा, मघांपासून कशी बृहस्पतीसारखी बटबट चालली आहे हिची!"

इतक्यांत राधाबाई घरांत आल्या. त्यांच्या मागोमाग त्यांनां भेटण्याकरितां आलेल्या दोघी बायाहि आल्या. पैकीं एक अण्णासाहेबांची पत्नी लक्ष्मीकाकू होत्या आणि दुसऱ्या त्यांच्याबरोबर कोणी आल्या होत्या. लक्ष्मीकाकूंबरोबर त्यांची मुलगी कुसुम हीहि आली होती. ती प्रकृतीनें फुलासारखी नाजूक असून तिचें बोलणें, हंसणें, फार काय पण रडणेंसुद्धां फार मृदु असे, त्यामुळें तिचें 'कुसुम' हें नांव फारच अन्वर्थ दिसत होतें !

कुसुम गंगूच्या समाचाराला आली आहे असें ऐकतांच सोनीहि धावत आली. कारण त्या दोघीजणी सोबतिणी होत्या. मोठ्या लोकांच्या मुलांमुलींबरोबर आपण खेळावें, त्यांच्यासारखे पुष्कळसे दागिने आपणास घालण्यास मिळावे व लोकांनीं आपल्याला श्रीमंत ह्मणावें, ही तिची फार इच्छा होती. लक्ष्मीबाईनीं गंगूकरितां थोडींशीं डाळिंबें व काळीं द्राक्षें आणिलीं होतीं. तीं गंगूला देऊन "लवकर बरी होऊन आमच्या कुसुमबरोबर खेळायला ये बरं का !" ह्मणून सांगितलें आणि राधाबाईचा निरोप घेऊन त्या घरीं गेल्या.

आणखी आठ दिवस लोटले. दुपारीं जेवणखाण वगैरे कामें उरकल्यावर 'पांडवप्रताप', 'संतलीलामृत,' 'भक्तविजय' वगैरे पोथ्या वाचण्याचा व वाचलेली कथा मुलांनां सांगण्याचा राधाबाईचा नेम असे. त्याप्रमाणें त्या दिवशीं संतलीलामृताची पोथी उघडून त्यांतून चोखामेळ्याची हकीगत राधाबाईनीं वाचिली व तो हीन वर्णाचा असतांहि परमेश्वरावर निःसीम भक्ति ठेविल्यामुळें ईश्वरी कृपा होऊन कसा तरून गेला, ही कथा, त्या, मुलांनां सांगत होत्या. गंगूला ती कथा ऐकतांऐकतांच थोडीशी गुंगी आली, ह्मणून तिची मान नीट सांवरून उशीवर ठेवण्यासाठीं राधाबाईनीं गंगूच्या अंगाला हात लाविला. त्याबरोबर गंगू दचकून उठली आणि ह्मणाली "आई, आई ! तें पहा काय दिसतें ! तो पहा उजेड ! ते पहा बाबा मला बोलावित आहेत—"

राधाबाईला तो उजेड दिसेना. तो अदृश्य होता. पण त्याच वेळेस गंगूच्या चेहेऱ्यावर कांहीं अप्रतिम टवटवी येऊन तिची मुद्रा उत्तेजित—प्रकाशमान—दिसत होती. तिच्या तोंडावर स्मित दिसत होतें तें फार मनोवेधक होतें. पण ही टवटवी, हा प्रकाश, हें स्मित क्षणभंगुर होतें. तो क्षण निघून जातांच तिचे हातपाय थंड पडले; डोळे थिजले; गंगू त्या प्रकाशाच्या मागोमाग गेली. कदाचित् ती ह्मणत होती त्याप्रमाणें तिचे बाबा बोलावित होते तिकडे गेली असेल !

हा प्रकार चालला आहे, इतक्यांत खुळखुळाबाईहि तेथें आल्या. गंगूची ती अवस्था पहातांच त्यांची काय स्थिति झाली, ती शब्दांनीं वर्णन करून सांगतां येत नाहीं ! घटका दोन घटकेपूर्वी जी गंगू चांगली शुद्धीवर असून बोलत होती, तीच आतां अगदीं निचेष्टित पडली–निर्जीव–गतप्राण झाली, हें पहातांच बिचाऱ्या जागचेजागीं आश्चर्यचकित होऊन स्तब्ध उभ्या राहिल्या. राग, शोक, भय इत्यादि मनोविकारांचें त्यांच्या हृदयांत असें तुंबळ युद्ध माजलें कीं, तें युद्ध बाहेर आविर्भूत होऊन राधाबाई व तिचीं लेकरें यांच्या अंगावर त्याचा प्रभाव उमटतो कीं काय, अशीहि क्षणोक्षणीं भीति वाटूं लागली. " गंगूच्या अशा शेवटच्या भेटीचे वेळीं कुणींच कसं मला बोलावण्यास आलं नाहीं ? मीं आजपर्यंत तिचं असं कोणतं वाईट चिंतलं होतं कीं, तिची व माझी शेवटची भेटसुद्धां तुह्मीं होऊं दिली नाहीं ? " असें तोंडानें वारंवार ह्मणत व राधाबाईवर संतापत आणि वारंवार ओक्साबोक्शीं रडत खुळखुळाबाईनीं सगळें घर डोक्यावर घेतलें. तो आक्रोश ऐकून शेजारणीपाजारणीसुद्धां धावून आल्या. राधाबाईनीं व त्यांनीं मिळून खुळखुळाबाईची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. "असा प्रसंग आतांच येईल हें कुणाला ठाऊक होतें; तो अकस्मात् आला, त्यामुळं कुणाला बोलावण्यास फुरसतच मिळाली नाहीं; नाहींतर तुह्मांला का बोलावल्या-वांचून कुणी रहातें ? " याप्रमाणें पुष्कळ सांगून पाहिलें; परंतु त्यांचा आपला रागें भरण्याचा, रागाचा आवेश दर्शविणारे हातवारे करण्याचा व मोठमोठ्यानें घसा कोरडा करून रडण्याचा सपाटा धूम चाललाच होता. इतका कीं, मुली-बद्दलचें दुःख बाजूलाच राहून त्या शोकक्षोभरूपी वादळांतून आपला कसा बचाव होईल, हीच राधाबाईला चिंता येऊन पडली. गंगू आज कित्येक दिवस किंबहुना कित्येक महिने अंथरुणाला खिळली आहे, औषधोपचार केले तरी दुखण्याचें पाऊल मागें नाहीं, हें राधाबाईच्या लक्ष्यांत येऊन केव्हांना केव्हांतरी–आणि तोहि लवकरच महिन्याभराचे आंतच–आजच्यासारखा प्रसंग यावयाचा, हें त्यांना कळून चुकलें होतें; आणि या गोष्टीचें स्मरण झालें ह्मणजे त्या एकीकडे जाऊन अश्रुमोचन करित आपल्या मनाच्या दुःखाचा भार हलका करित असत. गंगूचा अंत आतां होईल किंवा मग होईल, ही गोष्ट निश्चित होती. यामुळें तो प्रसंग सहन करण्याइतकी राधाबाईच्या मनाची तयारीहि झाली होती. पण अशा प्रसंगीं खुळखुळाबाईनीं मांडलेला शोकाचा अद्भुत प्रकार मात्र त्यांच्या कल्पनेच्या बाहेर होता. तथापि राधाबाईनीं या वेळीं आपल्या मनाचा शांतपणा ढळूं दिला नाहीं.

रीतीप्रमाणें गंगूच्या देहाचें उत्सर्जन झालें.

## प्रकरण ३४ वें.

# सनातनविवाहप्रचारोद्धारक मंडळी.

'क्वचिद्वीणावाद्यं क्वचिदपि च हा हेति रुदितम्' असा प्रकार तर जगांत हमेशा चाललाच आहे. मग शिवापुरांत तो दिसला तर त्यांत काय नवल! राधाबाईची गंगू वारली त्याच दिवशीं शिवापुरांत एक लग्नसमारंभ उरकण्यांत आला.

वधूवरांचा जोड सम असो अथवा विषम असो, आणि खर्चाचे पायीं वधूपक्षाचें दिवाळें वाजो किंवा वरपक्षाच्या खाका वर होओत, वऱ्हाडी मंडळीनें त्या प्रश्नांचा विचारच करावयाचा नाहीं! फक्त समारंभ थाटानें उडविण्याचें त्यांचें काम!! ही समजूत आजकालची नाहीं, ती सनातन आहे, असें ह्मणून तिचा अभिमान बाळगणारी आणि या समजुतीप्रमाणें कोठें लग्नाचा मांडव उभारण्याची तयारी दिसल्याबरोबर त्या घरीं जाऊन साह्य करूं लागणारी 'सनातनविवाहप्रचारोद्धारक मंडळी' शिवापुरांतहि होतीच! या मंडळीच्या खटपटीनेंच हा लग्नसमारंभ घडून आला होता. कोणी कितीहि वयातीत असो, त्याचें एक कुटुंब निवर्तून संसार उघडा पडला अशी बातमी लागतांच या मंडळीचे एजंट त्या ठिकाणीं जाऊन त्यांनीं त्या वयातीत माणसाचे पुनः दोन हातांचे चार हात करण्याचें आणि त्याच्या संसाराचा गाडा पुनः मार्गाला लावण्याचें श्रेय घेतलेंच ह्मणून समजावें. या मंडळीचा एक एजंट आज कित्येक दिवस बापूसाहेबांच्या कच्छपीं लागला होता आणि त्यांनां पुनर्विवाह (बापूसाहेबांचा स्वताचा) करण्याबद्दल वारंवार इतकी गळ घालित होता कीं, त्याचा नाद एकदाचा मिटावा एवढ्यासाठीं केवळ बापूसाहेबांनीं पुनः नवरदेव होण्याचें कबूल केलें होतें! नाहींतर वास्तविक त्यांनां आतां पुनः प्रपंचांत पडण्याची बिलकूल इच्छा नव्हती; आणि तसें करण्याचें कारणहि नव्हतें. देवाच्या दयेनें त्यांनां दोन मोठे कर्तेसवरते मुलगे व तीन नातू होते. तेव्हां पोरासोरांसाठीं लग्न केलें पाहिजे, ही सबब सांगण्यास जागा नव्हती. अंगांत यौवन फार संचारत होतें असें ह्मणावें, तर हीहि कल्पना वृथा होती. कारण त्यांचें वय आतां साठी उलटून बरेंच दूर गेलें होतें. मुंडावळ घालून मिरविण्याची हौस पुरली नव्हती असें ह्मणावें, तर आजपर्यंत ती बांधून मिरविण्याचे प्रसंग आयुष्याच्या निरनिराळ्या क्रमांत त्यांनां कितीकदां आले, हे त्यांनां स्वताला किंवा त्यांच्या चिरंजीवांनांहि नक्की सांगतां आलें असतें किंवा नाहीं, याची शंकाच आहे! श्राद्धपक्षाचे दिवशीं बापूसाहेबांनां आपल्या मृतकुटुंबांच्या नांवांची एक याद घेऊन बसावें लागे,

अशी वास्तविक स्थिति होती. यामुळें कोणत्याहि सबबीवर आतां पुनः लग्न करण्याचें बापूसाहेब कधीं मनांत आणणार नाहींत, अशी सर्वांची खात्री होऊन चुकली होती.

परंतु योगायोग कांहीं विलक्षण असतात. त्यांच्यापुढें कोणाचें काय चालणार! आपल्या वडील चिरंजीवाचा पहिला मुलगा विश्वनाथ याचें आपल्या डोळ्यांदेखत लग्न उरकून घ्यावें, ह्मणून बापूसाहेबांचा आज कित्येक दिवस विचार चालला होता आणि त्यासाठीं एकदोन देखण्या आणि कुलशीलाच्या मुलींचीं टिपणेंहि येऊन पडलीं होतीं. त्या टिपणांशीं विसूचें टिपण जुळवून पहाण्याचें काम चाललें होतें. नाशीककर जोशीबुवा बोटें घालून राशिस्थानें मोजित होते आणि बापूसाहेबांनांहि ज्योतिषाचा थोडासा नाद असल्यामुळें ते मुलीच्या टिपणांतल्या दुसऱ्या कांहीं गोष्टी बारकाईनें पहात होते. इतक्यांत 'सनातनविवाहप्रचारोद्धारक मंडळी'चे चिटणीस बाळूअण्णा वकील, हे अकस्मात् येऊन उभे राहिले. त्यांचा बापूसाहेबांच्या मागें पुनः लग्न करण्याविषयींचा लकडा आज कित्येक दिवसांपासून होताच. त्याला आजचा प्रसंग फारच अनुकूळ आहे, असें पाहून बाळूअण्णांनीं जोशीबुवांनां डोळ्यानें इषारा केला आणि युक्तीयुक्तीनें लग्नाच्या विषयावर बोलण्याचा उपक्रम केला. त्याच मुलीचें नातवाशीं लग्न झालें काय व आजोबाशीं झालें काय, जोशीबुवांनां सारखेंच! तेव्हां तेतरी 'सनातनविवाहप्रचारोद्धारक मंडळी'च्या आड येऊन ह्मातान्याच्या जुळत्या संसाराला मोडा घालण्याचें पाप पदरीं कसे बांधतील? त्यांनींहि होस हो लावून बाळूअण्णांच्या मसलतीला आपलें पूर्ण साह्य दिलें. बापूसाहेबांनीं उगाच लोकलज्जेस्तव कांहींचेंबाही आक्षेप काढून लग्न करण्यास आपण अत्यंत नाखुष आहों असें दाखवावें आणि बाळूअण्णा व जोशीबुवा यांनीं आपल्या वक्तृत्वाच्या ओघासरशीं त्या आक्षेपाला सहज उडवून द्यावें. असें होतांहोतां शेवटीं बापूसाहेबांनीं ह्मटलें "तुमच्यापुढें आपला निरुपाय झाला बुवा! वास्तविक पहातां मला कांहीं ही गोष्ट संमत नाहीं. पण ह्मणतात ना 'पांचामुखीं परमेश्वर!' तेव्हां तुमचें ह्मणणें ऐकिलेंच पाहिजे. केवळ एवढ्याचसाठीं ही गोष्ट मला कबूल करावी लागते आहे. नाहींतर आतां माझा संसार झाला, नातवंडें झालीं, सगळी कांहीं हौस फिटली, आतां काय राहिलें आहे? नातसून एकदा पाहिली ह्मणजे सुखानें राम ह्मणण्यास होतों. पण नारायणा, तुझी मर्जी! कोणत्याहि कामांत आपलाच हेका धरून बसूं नये. चारचौघे सांगतील तसें करावें, हें शिक्षण आह्मांला बाळपणापासून

मिळालें आहे. आणि आमच्या वडिलांचा हा बाळबोध कित्ता पोरांसोरांदेखत आपणच खतः मोडला तर पुढें तेहि तसेंच करतील. यासाठीं तुमच्या ह्मणण्या-प्रमाणें मला वागलें पाहिजे." याप्रमाणें बोलून स्वताच्या लग्नाला बापूसाहेबांनीं आपली संमति दिली. तेव्हां अर्थातच त्या मुलींचीं टिपणें नातवाच्या टिपणाशीं जुळवून पहाण्याचें सोडून जोशीबुवा आजोबांच्या टिपणाशीं जुळवून पाहूं लागले. बापूसाहेबांसारखे वयोवृद्ध गृहस्थ नवरदेव होण्यास उद्युक्त झाले कीं नवग्रहांनांसुद्धां अशा (अ) मंगलकार्याचे विरुद्ध जाण्याची बुद्धि होत नाहीं. मग 'सनातन विवाहप्रचार' मोडण्याची त्यांनां भीति वाटते कीं काय कोण जाणें! अस्तु.

बापूसाहेबांच्या टिपणाशीं वडील मुलीचें टिपण अगदीं उत्तम जुळतें, असें जोशीबुवांनीं आपलें मत दिलें. लगेच बाळूअण्णांनीं त्या मुलीच्या बापाकडे जाऊन त्यास फायद्याची समज देऊन त्याचेकडून त्याच दिवशीं सुमुहूर्तावर बापूसाहेबांच्या कपाळीं गंधाक्षता लावून हातीं नारळ देवविला.

ठरल्याप्रमाणें सुमुहूर्तावर 'शुभमंगलसावधान' होऊन बापूसाहेब चतुर्भुज झाले. थेरडा नवरदेव आणि लहान कोवळी नवरी मुलगी, यांची घोड्यावर वरात निघाली, तेव्हां शिवापुरच्या आबालवृद्धांनां मोठें कौतुक वाटलें! थट्टेखोर आणि स्पष्टवक्ते लोकांच्या चर्चेला हा एक आयताच विषय मिळाला. कोणी ह्मणाले "बाल्यावस्था आणि वार्धक्य या दोन्ही टोंकांचा संयोग किती प्रेक्षणीय दिसतो, त्याचा प्रत्यक्ष देखावा पाहून आपले डोळे आज थंड झाले!" कोणीं ह्मणूं लागले "नवरदेवाच्या डोळ्यांत काजळ घातलें त्यापेक्षां तें त्यांच्या परीटघडीसारख्या शुभ्र मिशांनां लाविलें असतें तर ह्मातान्याची अब्रूतरी राहिली असती!" कोणी ह्मणूं लागले "रुखवतावर काळ्याभोर कलपाची एक भली जंगी शिशी जांवई-बुवांसाठीं पाठवून देण्याची सूचना नवऱ्या मुलीच्या आईला कुणींतरी करावयाला पाहिजे होती!" याप्रमाणें कोणी कांहीं कोणी कांहीं, असें या अपूर्व लग्नसमारंभा-संबंधानें बोलत होते.

ही चर्चा पुरुष मंडळींतच तेवढी होत होती, असें नाहीं. शिवापूरच्या स्त्रीसमाजांतहि पुराणाच्या वेळीं चर्चेचा हाच विषय होऊन बसला होता. कोणी या बाबतींत नवऱ्यामुलीच्या बापाला दोष देत आणि कोणी त्याची बाजू उचलून धरीत. पण बापूसाहेब या बाबतींत दोषाला मुख्य अधिकारी आहेत, असें समजणाऱ्या स्त्रियांची संख्या फारच अल्प होती. नवऱ्या मुलीविषयीं मात्र प्रत्येकीला सहानुभूति वाटे आणि "झालं तें झालं, पण पोरीला सौभाग्यतरी

कांहीं दिवस लाभो—" असेच उद्गार बहुतेक स्त्रियांच्या तोंडून निघाल्यावांचून रहात नसत. एखादे वेळीं घरीं करमलें नाहीं ह्मणजे राधाबाई या स्त्रीसमाजांत घटकाभर जाऊन बसत त्या वेळीं या विवाहासंबंधानें लोकमत कसें आहे तें त्यांनां कळून येई. द्रव्याच्या लोभानें प्रत्यक्ष आपल्या पोरीचा गळा कापणाऱ्या कसाई बापाविषयीं आणि त्या कामीं त्याला उद्युक्त करणाऱ्या बापूसाहेबांविषयीं समाजानें वास्तविक ह्मटलें असतां पूर्णपणें तिटकारा दाखवावयाला पाहिजे होता. पण तें न करतां उलट, त्यांची बाजू उचलून धरण्याचा लोक प्रयत्न करीत आणि पुढेंमागें जर कांहीं अशुभ घडलें तर त्याचा दोष त्या मुलीच्या दैवावर ढकलण्या-कडेच सर्व लोकांचा कल दिसे, तेव्हां राधाबाईला खरोखर आश्चर्य वाटे व लोकांचा हा निर्घृणपणा पाहून त्यांनां फार राग येई. आपण डोळे चांगले उघडे ठेवून द्रव्याच्या लोभानें मुलीच्या अकल्याणाची गोष्ट करावी आणि तिचा ठरीव परिणाम कालांतरानें घडून आला ह्मणजे "मुलीच्या दैवांतच तसें होतें, त्याला कोण काय करणार!" असा कांगावा करावा, या गोष्टीची राधाबाईनां मनस्वी चीड येई; आणि प्रसंगोपात्त ही चीड भाषणद्वारा व्यक्त करण्यासहि त्या भीत नसत. 'सनातनविवाहप्रचारोद्धारक मंडळी'चे चिटणीस आणि त्यांची खुषामत करून निर्वाह करणारे नाशिककर जोशीबुवा, यांच्या कृष्णकृत्यांबद्दल गांवांत उघडउघड चर्चा चाले आणि ती कर्णोपकर्णीं होऊन या स्त्रीसमाजांत येऊन पोहोंचे, पण त्यांच्याबद्दल कोणी तिरस्कार दाखवीना, हें पाहून आपल्या समाजाच्या निकृष्ट स्थितीबद्दल राधाबाईला अत्यंत वाईट वाटे आणि त्यांच्या तोंडून नकळत खेदोद्गार बाहेर पडत. परंतु राधाबाईचीं एकंदर समाजाहून हीं अशीं विपरीत मतें पाहून या स्त्रीसमाजांतली मंडळी आपआपसांत खिदखिदी हंसत, त्यांनां 'नव्या मताच्या सुधारकी बाई' ह्मणून नांवें ठेवीत आणि बोलण्याचा प्रसंग आला ह्मणजे बोलूनहि दाखवीत कीं "यांनां कशाला बाई आपलीं जुनीं वेडीं मतं आवडणार आहेत ? यांनां नवीं मतं शहाणपणाचीं वाटतात ! यांच्या लेखीं जुनीं माणसं तेव्हढीं सगळीं वेडीं, बेअकली अन् मूर्ख ! अन् नव्यानव्या तऱ्हा आणि चोचले करणारे तेवढे शहाणे ! आपण आपल्या वेड्या आहोंत त्याच बऱ्या! यांच्या सुधारणा अन् पुनर्विवाह वगैरे वगैरे शहाणपणाच्या गोष्टी आपल्याला नकोत—"

नवें तेवढें सगळें शहाणपणाचें आणि जुनें तेवढें सगळें वाईट व मूर्खपणाचें आहे असें राधाबाईनां वाटत असे, या बायकांच्या समजुतीला खरोखर पहातां कांहीं आधार नव्हता. राधाबाईला जुन्या आचारविचारांतल्या कित्येक गोष्टी जशा

अगदीं बिलकूल नापसंत होत्या, तशाच नव्यांतल्याहि कित्येक गोष्टींच्या त्या अगदीं विरुद्ध होत्या. जुने लोक मुलाची विद्या किंवा त्याचा स्वभाव वगैरे न पहातां नुसतें घरदार व उत्पन्न वगैरे पाहून खुशाल मुली देतात, ही गोष्ट त्यांनां जशी पसंत नव्हती, तशीच नवे लोक मुलाच्या किती परीक्षा झाल्या आहेत एवढेंच फक्त पहातात, पण त्याची शरीरसंपत्ति कशी आहे, मुलीला वागविण्याला घरीं कोणी वडील माणूस आहे कीं नाहीं, मुलाच्या अंगीं व्यवहारज्ञान कितपत आहे, त्याचा स्वभाव कसा काय आहे वगैरे गोष्टींकडे ढुंकूनहि न पहातां मुली लोटतात, हें त्यांनां आवडत नव्हतें. पूर्वींचे लोक नीट नेटकें स्वच्छ रहाणें, मुलांनां विद्या शिकविणें व त्यांच्या शारीरिक, मानसिक आणि नैतिक उन्नतीसाठीं योग्य तजविजी करणें याकामीं मनस्वी चिक्कूपणा करतील, पण लग्नासारख्या कार्यांत वाटेल तसा सढळ हातानें पैसा खर्चून कर्जबाजारी होऊन बसतील हें राधाबाईला जितकें मूर्खपणाचें वाटत होतें, तितकेंच नवे लोक झकपक व छानछोकीचा पोषाख व इंग्रजांच्या वळणावर आपल्या समाजांत हळूहळू घुसलेल्या कित्येक निरर्थक खर्चाच्या बाबी यांच्यापायीं सगळी मिळकत खर्चून टाकून अडल्या वेळीं उपयोगीं पडण्यासाठीं कांहीं शिल्लक टाकित नाहींत, याहि गोष्टीचा त्यांनां राग येत असे. आपली रोजची रहाणी अशी असावी कीं, तिच्या योगानें शरीर व मन यांनां सुख होऊन निरर्थक खर्चतर होऊं नये, असें त्यांचें मत होतें आणि याप्रमाणेंच त्यांची कृतीहि होती. मुलांचे कपडे अगदीं साधे, पण स्वच्छ ठेवण्याकडे जसें त्यांचें लक्ष्य असे त्याप्रमाणेंच मुलांचें वर्तन निष्कलंक आणि अंतःकरणाची वृत्ति उदार रहावी, याविषयीं त्या फार जपत असत. जुन्या माणसांसारखा अंतःकरणांत श्रद्धेचा लेशहि नसतां अंधपरंपरेनें धर्म म्हणून भलभलतीं कृत्यें करण्याकडे त्यांची प्रवृत्ति कधींच नव्हती. तसेंच मनाला जें पवित्र वाटेल तें लोकापवादाची मुळींच भीति न बाळगतां खुशाल करण्याइतकें धैर्य त्यांच्या अंगीं नेहमीं बाणलेलें असे. तथापि कित्येक नव्या मंडळीप्रमाणें जुन्या लोकांनां उठतांबसतां शिव्या मोजून त्यांच्याशीं विरोध वाढवावा, असें वर्तन त्या कधींच ठेवित नसत, तर उलट ज्यांनीं नवीं मतें समजून न घेतां त्यांविषयीं भलभलते ग्रह मनांत करून ठेविले असतील त्यांच्यांशीं सौम्यपणानें वागून युक्तीयुक्तीनें त्यांचे ते ग्रह पालटण्याच्या दिशेनें त्या नेहमीं प्रयत्न करीत. शिवापुरचा स्त्रीसमाज कशा प्रकारचा होता, हें वर सांगितलेंच आहे. त्या समाजाच्या व राधाबाईंच्या मतांत उत्तरध्रुव व दक्षिणध्रुव यांच्या

मधल्या इतकें अंतर होतें; तथापि राधाबाई फावल्यावेळीं अशा समाजांत मुद्दाम येऊन बसत व दुसऱ्या बाया नव्या मतावर जी टीका करीत ती शांतपणानें ऐकून घेऊन मग तितक्याच शांतपणानें त्या टीकेला उत्तर देत. राधाबाई असें न करत्या तर नव्या मताचीं माणसें उर्मट, उच्छृंखल आणि अविचारी असतात असा जो कित्येकांचा त्यांचेवर सरसकट निष्कारण आरोप आहे, त्याची समर्पकता त्यांनीं आपल्या स्वताच्याच उदाहरणानें सिद्ध केली, असें झालें असतें. राधाबाईचें वर्तन या आरोपाचें खंडन करण्यास पूर्णपणें समर्थ होतें आणि अशाच प्रकारचें वर्तन आपल्या मुलांचें व्हावें ह्मणून त्या सर्वदा ह्मटत असत. हें पाहून पुष्कळ विद्वान् व विचारी माणसांनां आपलीं मुलें राधाबाईच्या शिक्षणाखालीं ठेवावीं असें वाटूं लागलें होतें. राधाबाईचें घर ह्मणजे गृहशिक्षणाचा उत्कृष्ट आदर्श, अशी हळूहळू सर्वत्र ख्याति होत चालली होती. असो.

## प्रकरण ३५ वें.

# टेबलावर रुपया कोठून आला ?

दहा वाजतां आफिसांत आल्याबरोबर अण्णासाहेबांची नजर त्यांच्या टेबलावर ठेवलेल्या रुपयाकडे गेली आणि "हा रुपया इथें कसा आला ?" ह्मणून त्यांनीं नारायणरावांला विचारलें. अण्णासाहेबांचा हा प्रश्न ऐकून नारायणराव घोटाळ्यांत पडले. त्यांनीं बाहेर गंगाधर बसला होता त्याला त्या रुपयाबद्दल विचारलें तेव्हां "मीं तो तिथें ठेविला—" असें त्यानें सांगितलें. अण्णासाहेबांनीं त्याला आंत बोलाविलें तेव्हां तो ह्मणाला "आज टेबलावरचे कागद नीट व्यवस्थित रीतीनें मांडून ठेवित असतां एका कागदांतून हा रुपया खालीं पडलेला मीं पाहिला, तो मीं इथें ठेविला."

हिशेबाच्या कामांत आपले हातून कधींहि चूक व्हावयाची नाहीं, अशी अण्णासाहेबांची स्वताची खात्री होती. ह्मणून ते पुनः ह्मणाले "माझी शिल्लकतर काल संध्याकाळीं बरोबर जुळली. मग हा रुपया कुठून आला? तुझ्याच खिशांतून तर नाहींना गळून पडला ? नीट आठवण करून पहा."

"आपल्या खिशांत अन् रुपया ? तो कुठून येणार ?" गंगाधर आपल्या मनाशींच ह्मणाला आणि थोडासा खिन्न झालेला दिसला.

अण्णासाहेबांची बारीक नजर त्याचेवर होती. निदान तसा संशयतरी त्याला खास आला; आणि आपल्याकडे ते आज इतके बारकाईनें कां बरें पहात आहेत, असें मनांत येऊन तो किंचित् घाबरलाहि ! गंगाधराच्या घाबरण्याचें कारण काय बरें होतें ?

गंगू वारल्यापासून राधाबाईच्या चित्तास फार अस्वस्थता होती. तिच्या औषधपाण्याचे कामीं कमीअधिक खर्च होऊन शेवटीं सार्थक झालें नाहीं, उलट जवळ होतें नव्हतें तें सगळें खर्च होऊन गेल्यामुळें हात ओढींत आला, यामुळें ती चित्ताची अस्वस्थता द्विगुणित झाली होती. शारीरिक श्रम, मानसिक अस्वस्थता आणि भावी स्थितीविषयींची चिंता, यांमुळें राधाबाईला भारी थकवा आला होता आणि रात्रीच्या रात्री झोंपेवांचून काढल्यामुळें डोकें दुखूं लागलें होतें. अशा वेळीं शरीराला अंमळ हुषारी येईल असें कांहींतरी औषध घेतलें पाहिजे होतें. पण तें घेण्यास जवळ पैसे कुठें आहेत ? आज 'जो रुपया आपल्या खिशांतून तर गळून पडला नाहींना, ह्मणून अण्णासाहेबांनीं विचारलें तो रुपया खरोखर आपल्या मालकीचा असता तर आपण तो खर्चून आईसाठीं कांहीं औषध

आणिलें असतें आणि आईला हुषारी आलेली पाहून आपण कितीतरी सुखी झालों असतों!' हा विचार गंगाधराच्या मनांत येऊन त्या रुपयाकडे त्याची आतुर दृष्टि जाण्याला आणि अण्णासाहेबांनीं त्याच्याकडे बारीक नजरेनें पहाण्याला एकच गांठ पडली. आणि हेंच गंगाधराच्या घाबरण्याचें कारण होतें.

गंगाधराची घाबरी मुद्रा पाहून अण्णासाहेबांनीं विचारिलें "तू असा कां घाबरला आहेस?"

अण्णासाहेबांनां वाटलें कीं, त्या रुपयाचा गंगाधराच्या घाबरण्याशीं कांहींतरी संबंध असावा आणि तो संबंध काय आहे हें जाणण्याविषयीं त्यांची उत्कंठा प्रदीप्त झाली.

गंगाधरानें मन स्वस्थ करून उत्तर दिलें "कांहीं नाहीं. इतक्यांत माझ्या मनांत कांहीं चमत्कारिक विचारांची गर्दी झाल्यामुळें मी गोंधळून गेलों होतों—"

"कसले विचार? मला कळूं दे—"

"कांहीं नाहीं, आपले उगीच कांहीं वेडे विचार माझ्या डोक्यांत आले. ते कांहीं सांगण्यासारखे महत्त्वाचे नाहींत."

असें सांगून गंगाधरानें टाळाटाळी करून पाहिली. पण अण्णासाहेब त्या टाळाटाळीला जुमानीनात. "कसेहि असले तरी ते मला कळलेच पाहिजेत." असा त्यांनीं हट्ट धरला.

तेव्हां गंगाधराचें काय चालतें! आपल्या वरिष्ठाची आणि त्यांतून अण्णासाहेबांसारख्या हितचिंतकाची आज्ञा शिरसावंद्य मानिली पाहिजे, असें त्याच्या आईचें त्याला शिकवणें होतें; आणि कोणतीहि गोष्ट अर्धवट करावयाची नाहीं, करावयाची ती पुरी, मनापासून आणि इमानेंइतबारें करावयाची, हा त्याचा अंगस्वभावच झालेला होता. तेव्हां त्यानें खरीखरी आणि सायंत हकीगत सांगण्यास प्रारंभ केला, याचें कोणास आश्चर्य वाटावयास नको. तो ह्मणाला "आज सकाळीं मला हा रुपया दिसला, त्याबरोबर मला अशी इच्छा झाली कीं, हा रुपया आपल्या मालकीचा असता तर किती बरें होतें! दुसऱ्याचा रुपया आपण घ्यावा, ही इच्छा नव्हती; पण दुसऱ्याची मालकी त्याच्यावर आहे, त्याच जागीं माझी असती—न्यायानें तो माझा असता—तर बरें होतें, असें मला वाटलें."

"दुसऱ्याची वस्तु त्याला नकळत घेण्याची तुला कधीं इच्छा होते काय? पुष्कळ मुलांनां पैसा दोन पैसे अशा रीतीनें घेण्यांत आपण कांहीं गैर करित आहों, असें वाटत नाहीं. तुला स्वताला असा कधीं अनुभव आला आहे काय?"

हा चमत्कारिक प्रश्न ऐकून गंगाधराला कसेंसेंच वाटलें. अण्णासाहेबांनीं आणि आपल्यास असा प्रश्न विचारावा, यांत आपली मोटी मानहानि झाली, असें त्याला वाटलें. ह्मणून त्यानें एकदा वर मान करून अण्णासाहेबांकडे पाहिलें आणि हंसून उत्तर दिलें "कद्धीं नाहीं! आमच्या आईचें वळण अशांतलें नाहीं. अन्यायानें मिळविलेल्या पैशाला कधीं बरकत येत नाहीं—उलट तो नाशाला कारण होतो, असें आमची आई आह्मांला नेहमीं सांगत असते—"

"बरें, हा रुपया तुझ्या मालकीचा असता, तर तूं त्याचें काय घेतलें असतें? मिठाई घेऊन खाल्ली असती का आणखी कांहीं शोभेची वस्तु घेतली असती?"

"छे छेः! यासाठीं तो रुपया मला हवा होता असें नाहीं. माझ्या स्वताच्या सुखासाठीं मी त्याची इच्छा करित नव्हतों—"

"मग कुणासाठीं?"

या प्रश्नाचें उत्तर द्यावें तर आपली दीनवाणी स्थिति तिऱ्हाइतापुढें उघडी करावी लागणार आणि तेंतर गंगाधराच्या मानी स्वभावाला आवडत नव्हतें. ह्मणून तो अंमळ थबकला. इतक्यांत अण्णासाहेबांनीं दुसरा एक प्रश्न केला. "अलीकडे तुझ्या आईवर बरींच संकटें येऊन गेलीं ह्मणून ऐकलें, तें खरें का?"

"होय खरें आहे. पण जोंपर्यंत धीरानें तीं सोसवतील तोंपर्यंत डगमगायाचें नाहीं, असा आमच्या आईचा बाणा आहे. आणि आई नेहमीं ह्मणत असते कीं, 'जें माणूस संकटांतून धीरानें मार्ग काढित असतें, त्याला परमेश्वर साह्य करतोच करतो!' ती बायको माणूस होऊन जर तिच्या अंगीं एवढें धैर्य आहे, तर आह्मां पुरुषांनीं संकटाला भिणें अगदीं योग्य नाहीं!"

"तुला आणि तुझ्या भावाला भाग्योदयाचा काळ येईल अशी उमेद तुला वाटते कीं नाहीं?"

"अलबत! आमच्या आईसारखी शहाणी, धीराची आणि ममताळू आई आह्मांस शिकविण्यास असल्यावर आमचा भाग्योदय हा झालाच पाहिजे, अशी खात्री कशी नाहीं वाटणार? संकटें ही भाग्योदयाची पहिली पायरीच आहे, असें आमची आई आह्मांला नेहमीं सांगत असते. अगोदर जितकीं जास्त दुःखें येतील तितकी पुढील सुखाची गोडी वाढत जाते, असें ह्मणतात!"

—"तुला कोण व्हावेंसें वाटतें?"

"माझें शिक्षण फारसें झालें नाहीं, ह्मणून मी मोठा प्रोफेसर किंवा शास्त्रज्ञ किंवा ग्रंथकार अथवा मुत्सद्दी होण्याची आशा बाळगणें व्यर्थ आहे. पण दीर्घ

उद्योग, स्वावलंबन आणि प्रामाणिकपणा यांच्या जोरावर मनुष्याला जें पद मिळवितां येण्यासारखें असेल, तें मी मिळवीन, अशी मला उमेद आहे. कोणत्याहि स्थितींत असलें तरी मनुष्यानें कर्तव्याविषयीं तत्पर रहावें, असें आमची आई आह्मांला नेहमीं सांगत असते."

" तुझी बहीण पुष्कळ दिवस अंथरुणावर खितपत पडून मेली, ह्मणून ऐकलें. तुमच्या गरिबीमुळें तिला औषधपाणी वेळेवर मिळालें नसेल आणि फार हाल झाले असतील—" .

गंगाधर मोठ्या आवेशानें मध्येंच ह्मणाला " नाहीं! तिला परमेश्वरानें कांहीं कमी पडूं दिलें नाहीं. जी लागेल ती वस्तु पुरविण्याची बुद्धि त्यानेंच आमच्या शेजारच्या खुळखुळाबाईला दिली. ईश्वरावर दृढनिष्ठा असली ह्मणजे तो कोणत्याना कोणत्या रूपानें भक्ताच्या गरजा पुरवित असतो, याचें प्रमाण ह्मणून खुळखुळाबाईचें उदाहरण आई नेहमीं देत असते. "

गंगाधराच्या तोंडचे हे शब्द ऐकून अण्णासाहेब मनांत ह्मणाले " याची आई किती धार्मिक आणि सत्त्वशील बाई असली पाहिजे ! मुलांनां इतकें काळजीपूर्वक शिक्षण आणि वर्तनाचा असा उत्तम कित्ता फारच थोडीं आईबापें देत असतील. अशी कर्तव्यदक्ष आई लाखांत एखादीतरी सांपडेल कीं नाहीं, शंकाच आहे ! अशा आईच्या शिक्षणांत वाढलेला मुलगा हुषार, सरळ, प्रामाणिक आणि दिलदार निघेल, यांत काय नवल आहे ! एवढ्या वयांत आणि इतकें शहाणपण अंगीं असलेला मुलगा आपल्या कांहीं पहाण्यांत नाहीं."

अण्णासाहेबांनीं नंतर गंगाधराला आपल्या कामाला जावयास सांगितलें आणि आपण स्वस्थपणें खुर्चीला टेंकून विचारांत निमग्न झाले. इतक्यांत कांहीं आठवण होऊन त्यांनीं हिशोबाच्या वह्या काढल्या व त्यावरून आदले दिवसाची शिल्लक मोजून पाहिली. तींत एक रुपया कमी आलेला आढळून आला. ह्मणून पुनः मोजून पाहून शिल्लक कमी असल्याविषयींची खात्री करून घेतली आणि मग टेबलावरची घंटी वाजवून गंगाधराला पुनः आंत बोलावून ह्मटलें "मीं कालची शिल्लक पुनः मोजून पाहिल्यावर तींत एक रुपयाची चूक आढळून आली. यावरून मघांशीं सांपडलेला रुपया त्या शिलकींतलाच असला पाहिजे, हें उघड आहे. तथापि तुला खरी हकीगत विचारली असतां तूं ती मोकळ्या मनानें सांगितली, यासाठीं तुला मीं तो मोठ्या खुषीनें इनाम ह्मणून देतों—तो घे—" असें ह्मणून

अण्णासाहेबांनीं हात पुढें करून गंगाधराच्या हातांत तो दिला. तो हातीं घेऊन पहातांच गंगाधराला आश्चर्य वाटलें आणि तो ह्मणाला "हेतर दोन रुपये आहेत!"

"होय, एका रुपयांत तुला पाहिजे तें कदाचित् मिळणार नाहीं, ह्मणून आणखी एक रुपया मीं खुषीनें दिला आहे."

या उपकाराबद्दल अण्णासाहेबांचे आभार कोणत्या शब्दांनीं मानावे, तें गंगाधराला कळेना. अशा प्रसंगीं अंतःकरणाची वृत्ति शब्दांपेक्षां कृतज्ञतादर्शक मुद्रेनेंच अधिक व्यक्त होत असते. निदान या वेळींतरी गंगाधराच्या शब्दांनीं जें काम झालें नसतें तें त्याच्या मुद्रेनें केलें.

अण्णासाहेबांनीं गंगाधराची अथपासूनची सगळी हकीगत मनांत आणिली, आणि गंगाधर इतका चांगला निघाला याचें सगळें कारण त्याच्या आईचें शिक्षण, ही गोष्ट मनांत येऊन त्यांना कांहीं विलक्षण प्रकारचें कौतुक वाटलें. त्यांनीं त्याला हळूहळू चांगली बढती देऊन मुख्य मुनीम करण्याचें मनांत आणिलें. शिवाय अशा मुलाशीं आपल्या मुलानें संगति धरावी, ह्मणून ते गंगाधराला आपल्या घरीं वारंवार बोलावूं लागले.

गंगाधराचें प्रस्थ हळूहळू वाढत चाललें व अण्णासाहेब त्याच्यावर खुष झाले, हें पाहून त्रिंबकरावांना मोठें वैषम्य वाटलें व पुढेंमागें त्याच्यामुळें आपलें स्वतःचें अण्णासाहेबांजवळचें वजन कमी होईल कीं काय, हीहि त्यांना भीति वाटूं लागली. गंगाधराचें प्रस्थ कमी करण्यास त्यांना एकच उपाय दिसला आणि तो त्यांनीं तत्काळ करूनहि पाहिला. आपल्या मुलाला गंगाधराप्रमाणेंच अण्णासाहेबांच्या आफिसांत उमेदवार ह्मणून चिकटवून द्यावा, ह्मणजे तो गंगाधराची सहजच बरोबरी करील, आणि अशा रीतीनें अण्णासाहेबांशीं त्याचा निकट संबंध जुळून आला ह्मणजे हळूहळू गंगाधराविषयीं त्यांचें मन कलुषित करण्यास सोपें जाईल. अशा बुद्धीनें त्रिंबकरावांनीं आपल्या मुलाला अण्णासाहेबांपाशीं ठेविला. पण दाजीसारख्या गर्विष्ठ मुलाला ती नोकरी कोठून आवडणार! "भिकारडी शिपायाची नोकरी—त्या भिकारड्या पोरानेंच करावी! उपपण अशा रीतीनें आपल्या कुळाला बट्टा लावून घेण्यापेक्षां वेहेत्तर आहे—उपाशीं राहूं!" अशा प्रकारचे उद्गार त्यानें नोकरीच्या पहिल्याच दिवशीं काढले. गंगाधरालाहि पहिले दिवशीं अशाच प्रकारचा वैताग उत्पन्न झाला होता, हें वाचकांच्या लक्षांत असेलच. पण गंगाधराला चार समजुतीच्या गोष्टी नीट समजावून सांगून, उद्योगाचा महिमा व खरें थोरपण माणसावर अवलंबून आहे, जागेवर

नाहीं, असें शिकविणारी राधाबाईसारखी आई मिळाली होती. तशी त्या मुलाला कोठें होती ! " त्या भिकारड्या गंगाधराला अण्णासाहेबांनीं एखाद्या सामान्य शिपायाप्रमाणं वागवायचं तें सोडून त्याला उलट बढती दिली, आणि आमच्या-सारख्या थोर, संभावित आणि श्रीमंत घराण्यांतल्या मुलाला त्याच्या योग्यते-प्रमाणं अदबीनं व मानमान्यतेनं वागवायचं—तें उलट आमच्या मुलाला एखाद्या तीन रुपड्यांच्या शिपायाप्रमाणं हलकींसलकीं कामं करायला अण्णासाहेब सांगतात ! असे सबघोडे बाराटक्के केल्यावर माणसाला राग कसा नाहीं येणार ? " अशी गोदूताईनीं सारखी पिरपिर चालविली होती व त्या आपल्या मुलाची समजूत घालण्याचें सोडून उलट त्याला बहकावित होत्या! अण्णासाहेब आपल्या मुलाला कांहीं विशेष मानित नाहींत, हें पाहून त्रिंबकरावांलासुद्धां वाईट वाटलें होतें; परंतु त्यांनीं तें मनांत ठेविलें, बोलून दाखविलें नाहीं, इतकेंच.

## प्रकरण ३६ वें.

# मुलांचीं पत्रें.

दिवसेंदिवस राधाबाईचें घरचें काम वाढलें आणि त्यामुळें त्यांनां बाहेरचीं कामें घेण्यास फुरसत कमी मिळूं लागली. राधाबाई स्वतः लिहिण्यावाचण्यास शिकल्या होत्या, ही गोष्ट खरी आहे; तरी तीनचार यत्तांच्या पलीकडे मुलांनां शिकविण्याचें त्यांचें सामर्थ्य नव्हतें. याच्या पलीकडल्या विद्यार्थ्यांनां त्या एकच विषय शिकवूं शकल्या असत्या, आणि तो विषय ह्मणजे मराठी शुद्धलेखन हा होय! अलीकडे इंग्रजी व मराठी शाळांतून या विषयाकडे यावें तितकें लक्ष्य दिलें जात नाहीं; यामुळें मुलगा म्याट्रिक झाला तरी मराठी शुद्धलेखनांत त्याच्या हातून हास्यास्पद अशा ढोबळ चुका वारंवार होतात. शिवापुरची इंग्रजी शाळाहि या गोष्टीला अपवाद नव्हती. जो विषय शाळेंत चांगला शिकवला जात नसे, तो स्वताला शिकवितां आला तर राधाबाई मुलांनां घरीं स्वतः शिकवीत, निदान मुलांकडून आपलेसमोर तो करून घेत. यामुळें मुलांचा त्या विषयाचा अभ्यास पद्धतशीर होत आहे किंवा नाहीं, एवढेंतरी त्यांनां समजत असे. अभ्यासाच्या पद्धतींतच कोठें चुकत असलें, तर तेवढी चूक त्यांनां सुधारून देतां येई. मुलांकडून रोज वेळचेवेळीं नेमानें धडे वाचून घेण्यांत आणि त्यांतून पांचचार ओळी लिहिण्यास सांगण्यांत, त्यांचेकडून कधींहि आळस होत नसे. तसेंच अभ्यासासाठीं मुलांनां कधीं उगीच रागें भरणें किंवा घाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणें मुलांनां उठल्याबसल्या पुस्तकांशीं जखडून टाकणें, हें त्यांनां मुळींच पसंत नव्हतें. त्यांच्या मुलांचा नित्यक्रम पुढीलप्रमाणें असे:—

पहांटेस पांच वाजतां उठावें; प्रातर्विधि उरकून देवाचें नामस्मरण करावें; नंतर खरडे किंवा कॉपी लिहावी; स्नानसंध्या करावी व नंतर शाळेंतलें भाषांतर वगैरे लिहिण्याचें घरीं दिलेलें काम करून आणि पाठ करावयाचे धडे पाठ करून शाळेंत लागणारीं पुस्तकें वगैरे आपल्या पाकिटांत घालून ठेवावीं; हीं सगळीं कामें सकाळीं दहा वाजेपर्यंत उरकत. पुढें जेवण झाल्यावर शाळेंत जावें; तेथून पांच वाजतां परत आल्यावर उघड्या मैदानांत आट्यापाट्या, चेंडुफळी वगैरे खेळ खेळावे; येतांना बाजारांतून सामान आणावयास सांगितलें असेल तें सामान घेऊन सात वाजतां परत यावें; त्यानंतर जेवणखाण करून अर्धा तासपर्यंत आईशीं इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून आठ सव्वाआठ वाजतां अभ्यासाला लागावें; प्रथम, त्या दिवशीं झालेल्या धड्याची घाईघाईनें पंधरा मिनिटांत उजळणी

करावी व बाकीच्या तास दीड तासांत नवीन धडा पाहून ठेवून व शुद्धलेखन लिहून दहा साडेदहा वाजतां देवाचें स्मरण करून निजावें; हा क्रम नित्याचा असे. सुट्टीच्या दिवशीं शाळेंतला अभ्यास करावयाचा नसे, पण त्याऐवजीं राधाबाई मुलांकडून पांडवप्रताप, भक्तिविजय, संतलीलामृत वगैरे वाचून घेत व बाकीचा वेळ मुलांनां आपल्या मित्रांच्या भेटी घेण्यास व विश्रांति घेण्यास दिलेला असे.

मुलांनीं कांहीं चूक वगैरे केली तर त्याबद्दल त्यांनां शारीरिक शिक्षा करणें हा निष्ठुरतेचा प्रकार राधाबाईंनां संमत नव्हता. अशा वेळीं त्या गोड शब्दांनीं मुलांच्या लक्ष्यांत त्यांची चूक आणून देत आणि ती चूक त्यांच्या हातून वारंवार घडत गेली तर अखेर काय परिणाम होईल, लोक त्यांला काय समजतील, त्यांची किती कमी किंमत करतील तें समजावून पुनः आपण ती चूक करणार नाहीं, ह्मणून त्यांच्याकडून कबूल करून घेत. राधाबाईचीं मुलें स्वभावतांच गरीब आणि समजदार होतीं, ह्मणून ही युक्ति त्यांच्या कामीं पडे; पण तींच मुलें उनाड, हट्टी आणि खट्याळ असतीं, तर या त्यांच्या युक्तीनें मुलें कितीशीं ताळ्यावर येतीं, हें सांगणें नको!

राधाबाईच्या शिक्षणाचा रोख आणखी एका गोष्टीकडे विशेष होता. अडचणी त्रास, संकटें वगैरे अनेक विकट प्रसंग या आयुष्यांत नेहमीं येतात. अशांनां भिऊन वागूं ह्मटलें तर ' भित्याच्या पाठीं ब्रह्मराक्षस! ' ह्मणून तीं अधिकच लागतात. यासाठीं त्यांनां भिऊं नये, त्यांनां तोंड द्यावें, त्यांच्याशीं धैर्यानें झुंजावें आणि त्यांचा जोर कमी करावा, असें त्या आपल्या मुलांस सांगत. सांगत एवढेंच नाहीं, तर प्रत्यक्ष त्याप्रमाणें वागवून दाखवीत! राधाबाईवर त्यांच्या आतांपर्यंतच्या आयुष्यांत असे प्रसंग तर पुष्कळच आले होते आणि त्या तितक्याहि प्रसंगांतून धैर्यानें निभावल्या होत्या. मुलांवरहि लहानपणापासून अशा प्रकारचे प्रसंग आलेले, आणि त्यांतून अशा प्रकारची शिक्षण देणारी विचारी आई लाभल्यावर तीं गरीब, सालस आणि समंजस निघालीं, यांत नवल नाहीं! अभ्यास करा आणि शहाणे व्हा, असें सांगण्याची त्यांनां गरजच उरत नसे. तीं आपोआपच पुस्तकें घेऊन बसत आणि आपले धडे मन लावून करीत व किल्ली दिली ह्मणजे घड्याळांतलीं चक्रें जशीं आपोआप नियमितपणें चालतात, तशीं तीं राधाबाईच्या शिक्षणाखालीं यंत्राप्रमाणें सुरळीतपणें चालत असत.

राधाबाईच्या श्रमाचें अखेर चीज झालें. त्यांचीं दोन्ही मुलें हुषार आणि सद्वर्तनी निघालीं. तरी तीं इतकीं विनयशील आणि नम्र स्वभावाचीं असत कीं, इतर मुलांशीं त्यांची तुलना करून पाहिल्याशिवाय त्यांचे गुण चटकन् दिसत नसत. आपल्या गुणांची टिमकी स्वतः वाजविण्याचें तर त्यांनां ठाऊकच नव्हतें. राधाबाईचीं मुलें कसें नीटनेटकें आणि शुद्ध लिहीत तें पहाण्यासाठीं खालीं दिलेलें पत्र वाचा. हें कृष्णाच्या हातचें दिसतें:—

" प्रिय मित्र गंपूनाना यांस—

प्रेमपूर्वक सा. न. वि. वि.

परवां सुटीचे दिवशीं तुम्हीं मला वनभोजनाला बोलाविलें, त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें. माझ्या सोबत्यांच्या सहवासांत सबंध एक दिवस घालविण्याचा आनंदाचा प्रसंग तुम्हीं आयता आणून दिला असतां मीं नाहीं म्हणावें, हें मला बरें दिसत नाहीं. पण काय करूं ? माझा नाइलाज आहे ! कांहीं घरगुती अडचणीमुळें मला त्या दिवशीं येण्यास सांपडावयाचें नाहीं हें कळविण्यास मला फार खेद वाटतो. तुम्हांला तो दिवस मोठा आनंदाचा जाओ आणि तुम्हांला खूप मौजा करावयास सांपडोत, असें मी इच्छितों.

आपला नम्र,

कृष्णा."

ही चिठ्ठी गंपूनाना मेहेंदळे यांला लिहिलेली होती. गंपूनानांनीं ती वाचून त्यांच्या नेहमींच्या संवयीप्रमाणें वेडेंवांकडें तोंड केलें आणि मग लागलीच विलंब न करतां तिचें उत्तर लिहिण्यास स्वारी बसली. तें उत्तर येणेंप्रमाणें—

" प्रीयमीत्र कृष्णायास—

हि तुझिसबब आम्हीं ऐकत नाहि ! तु काय हवे तेकर, पण जेवाला तुला आलेच पाहीजे. तुझि आइ पाठवित नसलि तर तीला झुकांडि देउन का येत नाहिस. तु न येशील तर आपला पुढचा वरीक वीचार पहा. बस !

गंपू नाना."

गंपूनानांनीं ही चिठ्ठी लिहिण्याला आणि त्यांचे वडील सदाशिवराव हे त्यांच्या खोलींत यावयाला एकच गांठ पडली. शाई वाळण्यासाठीं म्हणून त्यांनीं ती चिठ्ठी उघडीच ठेविली होती. ती साहजिकच सदाशिवरावांच्या पहाण्यांत आली. समोरच कृष्णाचीहि चिठ्ठी पडली होती, तीहि त्यांनीं पाहिली. तेव्हां दोघांच्या

लिहिण्यांतला फरक त्यांच्या लक्ष्यांत चटकन् भरला. त्यांनीं गंपूनानांस विचारलें "गंपू हें काय लिहिलें आहेसरे ?"

गंपूनानांनीं उत्तर दिलें "परवां वनभोजनासाठीं कृष्णाला बोलाविलें होतें, पण कांहींतरी सबब सांगून तो येण्याचें टाळतो आहेसें दिसतें, ह्मणून त्याला ही दुसरी चिठ्ठी लिहिली आहे."

सदाशिवरावांनीं इतक्यांत ती चिठ्ठी हातांत घेऊन वाचून पाहिली आणि ह्मटलें "व:! काय चिठ्ठी पण चिठ्ठी लिहिली आहे! अक्षर किती वळणदार, मजकूर किती सुरेख, अन् शुद्धलेखनतरी किती बहारीचें !"

गंपूनाना बापाची ही उपरोधिक टीका ऐकून यत्किंचितुद्धां न शरमतां ह्मणाले "अं:, त्यांत काय आहे ! कुणीकडूनतरी आपल्या मनांतला मतलब दुसऱ्या माणसाला कळण्याशीं कारण. त्याला ऱ्हस्वदीर्घांची ती काय एवढी जरूरी आहे ? आणखी शुद्धलेखन हें मराठी शाळेंतल्या मुलांसाठीं असतें. आमच्यासारख्या इंग्रजी शाळेंतल्या मुलांनां त्याचें एवढें महत्त्व नाहीं, ह्मणूनच मास्तर तो विषय पुढें शिकवित नाहींत !"

सदाशिवराव ह्मणतात "तूं मोठा दीडशहाणा झाला आहेस ! तुझ्याएवढे आह्मी होतों, तेव्हां वडिलांकडे वर मान करून पहाण्याची आमची ताकत नव्हती. अन् आतां तूं पहा, भीडमर्यादा सगळी गुंडाळून कसा चुरुचुरु बोलत आहेस—"

असें ह्मणून सदाशिवराव टेबलावरचा दुसरा एक कागद उचलून वाचूं लागले. ती कृष्णाकडून आलेली चिठ्ठी होती. ती नीटनेटकी लिहिलेली व मजकूर साधाच पण सभ्यतेनें व शुद्ध लिहिलेला, अशी होती. ती वाचून सदाशिवराव फार खुष झाले, आणि खालीं कृष्णाची सही पाहिल्यावर तर त्यांनां फारच कौतुक वाटलें. कारण, त्यांनीं गंगाधर व कृष्णा यांच्या सद्वर्तनाविषयीं व सुशिक्षणाविषयीं कर्णोपकर्णी पुष्कळ लौकिक ऐकिला होता. सदाशिवरावांनीं ती कृष्णाची चिठ्ठी गंपूनानांचे पुढें करून ह्मटलें "हा कृष्णा तुझ्या बरोबरचाच ना ? ही त्याची चिठ्ठी पहा अन् ती तुझ्या हातची पहा, कुणी ह्मणेल का ती तुझ्याच वर्गातल्या मुलानें लिहिली आहे ह्मणून ?"

गंपूनाना ह्मणतात "काय मोठें नवल झालें त्यांत ? कृष्णा व त्याचा भाऊ हे दोघे ह्मणजे पुस्तकांतले नुसते किडे आहेत ! जेव्हां पहावें तेव्हां लिहित किंवा वाचित असलेले आढळावयाचे. त्यांनां बाहेरचें काय ठाऊक आहे ? अन् दुसरें त्यांना घरीं शिकण्याची सोय आहे—"

" घरीं मास्तर ठेविला आहे वाटतें ? "

"नाहीं. त्यांची आईच त्यांनां शिकविते. ती रोज त्यांच्याकडून अभ्यास करवून घेते व त्यांनां शुद्धलेखन सांगते. रिकामें ह्मणून बसूंच देत नाहीं. मग हुषार झाल्याचें काय मोठें नवल आहे ? पण ही त्यांची हुषारी सगळी अभ्यासापुरतीच आहे—व्यवहारांतलें त्यांनां कांहीं कळत नाहीं ! मागें एकदा कृष्णानें आदले दिवशीं रात्रीं घरीं सोडविलेलीं उदाहरणें दुसरे दिवशीं मास्तरांनीं परीक्षेंत घातलीं. कृष्णाला तीं सगळीं बिनचूक करतां येत होतीं. त्याला सहज स्कॉलर्शिप मिळाली. त्याच्या शेजारचा मुलगा मला उदाहरणें दाखीव ह्मणून त्याला ह्मणत होता. त्यानें दाखविलीं असतीं तरी त्याची स्कॉलर्शिप मिळावयाची ती मिळतीच. पण कृष्णा असा गर्विष्ठ कीं, त्यानें मुळीं कापी होऊं दिली नाहीं. या दुष्ट स्वभावाला काय ह्मणावें ? "

"हा दुष्ट स्वभाव नव्हे. तर उलट प्रामाणिकपणा आहे—" याप्रमाणें सदाशिवराव गंपूनानांशीं बोलत आहेत इतक्यांत त्यांनां कोणी गृहस्थ भेटावयाला आल्यामुळें ते दिवाणखान्यांत निघून गेले.

प्रकरण ३७ वें.

## अरे हा कोण !

जानकीबाई व सोनी यांना सोडून आपण बरेच दूर आलों आहों. तेव्हां आतां एकदा त्यांच्या भेटीला जाऊंया. राधाबाईला आपण आतां चांगल्या स्थितींत आणून सोडिलें आहे. गंगाधराला आतां पस्तीस रुपये पगार मिळून शिवाय घरगुती अभ्यासालाहि पुष्कळ वेळ मिळत आहे. तो यंदा म्याट्रिक्युलेशनच्या परीक्षेची तयारी करित आहे. कृष्णाचाहि नंबर वर्गांत पहिला राहून प्रत्येक परीक्षेंत त्याला स्कॉलरशिप मिळावयाची, हें शाळेंतल्या मुलांनीं निश्चित केलें आहे. राधाबाई आपल्या मुलांना देत असलेलें शिक्षण सदाशिवरावांनीं इतकें पसंत केलें कीं, तेहि आपलीं दोन मुलें राधाबाईच्या हाताखालीं शिकण्यासाठीं पाठवूं लागले आहेत. सदाशिवरावांना स्वताला अगोदर फुरसत नसे; आणि असली तरी मुलांच्या शिक्षणावर देखरेख ठेवण्याचें त्यांना जमत नसे. यामुळें बिघडूं लागलेलीं त्यांचीं मुलें राधाबाईच्या हाताखालीं दोन महिन्यांतच पुष्कळ सुधारलेलीं दिसल्यावरून इतर पैसेवाल्या गृहस्थांनींहि आपल्या मुलांची अशी उत्तम सोय लावून द्या, ह्मणून सदाशिवरावांमार्फत राधाबाईकडे बोलणें लाविलें आहे. या सातआठ मुलांच्या देखरेखीपासून राधाबाईला बरीच प्राप्ति होण्याचा संभव असल्यामुळें त्यांनीं स्वयंपाकाला व इतर कामासाठीं बाई ठेवून आपला सगळा वेळ मुलांच्या शिक्षणाकडे घालविण्याचा विचार केला आहे. शेजारच्या खुळखुळा-बाईवर मोठाच प्रसंग गुदरून त्या आतां अगदीं अनाथ झाल्या आहेत. त्यांचा नवरा कोठें परगांवीं जात असतां चोरांनीं त्याला गांठून मारिलें व होतेंनव्हतें तें सगळें लुबाडून नेलें. त्यांना मूलबाळ किंवा गणगोत कोणी नसल्यामुळें त्यांची स्थिति डोळ्यानें पहावत नाहीं, अशी झाली आहे. त्या बोलण्यांत कितीहि कडक असल्या, तरी अंतःकरणाच्या सरळ व प्रेमळ आहेत, ही गोष्ट राधाबाईला ठाऊक असल्यामुळें त्यांच्या पोटाला देऊन त्यांना आपल्या मदतीला घ्यावें, असा राधाबाईनीं विचार केला आहे.

इकडे सोनी आतां बरीच मोठी झाली आहे. पण तिच्या पूर्वीच्या स्वभावांत कांहीं फरक झालेला दिसत नाहीं. ती लहाणपणीं हट्टी होती तशीच अजून आहे. कांहीं फरक झाला असलाच तर तो हा कीं, पूर्वी ती नुसती हट्टी होती, आतां हट्टी असून कुरेंबाजहि झाली आहे. तिला शिकण्याची हौस तितक्यापुरतीच आहे. पण बिझिक व सोंगट्या या खेळांचा नाद बराच लागला आहे.

नारायणराव जवळच रहात होते ह्मणून मागें सांगितलें आहे. हें नारायणरावांचें घर बंगल्यावजा असून त्याच्या सभोंवतीं खुली जागा पुष्कळ होती. यामुळें उन्हाळयांत चांदण्या रात्रीचे वेळीं हिंडण्याफिरण्याला अथवा खुर्च्या टाकून बोलत बसावयाला ती फार सोईची जागा होती. पण हे दिवस ऐन थंडीचे होते. अशा दिवसांत रात्रीचा कोण मुद्दाम तेथें हवा खात फिरत राहील ? पण चमत्कार असा झाला कीं, अशा दिवसांतहि, थंडीचा कडाका पडला असतां, रात्रीं चांदण्यांत कोणी एकजण नखशिखांत व्याघ्रचर्म पांघरून घेऊन नारायणरावांच्या बंगल्याजवळ फिरत असलेला नारायणरावांनीं पाहिला. तो बंगल्यापाशीं येई, कांहीं चमत्कारिक संशयास्पद रीतीनें खिडकीकडे हळूच पाही, पुनः दूर जाई, मधेंच पुनः थांबे, मागें वळून पाही व झाडांच्या सावलींत अदृश्य होई. पुनः दुसऱ्या बाजूनें निघे, पुनः हळूहळू पावलें टाकित बंगल्याकडे येई, आणि बंगल्याकडे पाहून मागल्याप्रमाणें परत जाई. तो बंगल्यांतून कोणाच्यातरी येण्याची वाट पहात होता, हें खास. कारण, त्यानें चाहूल घ्यावी आणि कोणी येत नाहीं असें दिसलें ह्मणजे त्रासानें पाय आपटून व तोंडानें पुटपुटत पुढें निघून जावें, याप्रमाणें चाललें होतें.

ह्या विलक्षण प्रकार पाहून नारायणराव मनांत ह्मणाले "हा काय चमत्कार आहे ! मी याला आज तिसऱ्यानदा पहात आहें. हा डगला घातलेला माणूस माझ्या बंगल्याच्या हद्दींत येऊन कानोसा घेत होता, यांतला मतलब काय असेल? हा कोण असेल ! दिसण्यांततर गंगाधरासारखा दिसतो. पण गंगाधर ह्मणावा तर त्याला असें चोरून येण्याचें कारण नाहीं व तशा प्रकारें येणारा इसम तो आहे असेंहि कुणाला ह्मणतां येणार नाहीं. मग हा कोण असेल ?"

अशा विचारांत नारायणराव गर्क आहेत इतक्यांत तो माणूसहि अदृश्य झाला. एक तांगेवाला तांगा घेऊन नारायणरावांच्या बंगल्याच्या कंपौंडांत शिरतांना त्यानें पाहिला, हेंच त्याच्या अदृश्य होण्याचें कारण असावें ? नारायणरावांचे पाहुणे आज रात्रीच्या मेलनें मुंबईकडे जाणार होते, त्यांनां स्टेशनावर पोहोंचविण्यासाठीं तांगेवाला तांगा घेऊन आला होता.

तांगा आलेला पहातांच नारायणरावांनां आपले तर्क बाजूला ठेवून आपल्या पाहुण्यांची निघण्ऱ्याची तयारी करावी लागली. नारायणराव पाहुण्यांनां तांग्यांत बसवून पोंचविण्यासाठीं तांग्याच्या मागोमाग बंगल्याच्या कंपौंडाचे बाहेर दहावीस पावलें राधाबाईच्या घरापर्यंत आले व तेथून नमस्कार करून आणि खुशालीचें पत्र

वरचेवर पाटविण्याविषयीं तीनतीनदा बजावून सांगून परतले. इतक्यांत गंगाधराला त्यांनीं घरांत शिरतांना पाहिलें. उभयतांची दृष्टादृष्ट होऊन "आज मनस्वी थंडी पडली आहे बुवा, घराच्या बाहेर पडवत नाहीं !" एवढेंच संभाषण झालें.

या वेळचा गंगाधराचा पोषाख विचित्रच होता. त्याच्या बापाच्या वेळचा एक पायघोळ ओव्हरकोट होता. तो गंगाधराला मोठा होई म्हणून त्यानें तो डोक्यावरून घेतला होता. हा ओव्हरकोट मूळचा काळ्या रंगाचा असून त्यावर पिवळ्या रंगाचे पट्टे होते, त्यामुळें दुरून वाघाच्या कातड्याचा केलेला असावा, असें दिसत होतें. शिवाय गंगाधरानें कानाला हवा लागूं नये म्हणून एक लोकरीची टोपी घातलेली होती. त्या टोपींतून त्याचें नाक व डोळे एवढेच कायते भाग उघडे राहिलेले होते. या टोपीलाहि गमतीखातर वर दोन मोठाले गोंडे लाविले होते. हे गोंडे ताठ उभे राहिले म्हणजे कुत्र्यानें उभारलेल्या कानांसारखे दिसत. सारांश, गंगाधराचा या वेळचा पोषाख विचित्र होता. या रात्रीच्या पोषाखांत गंगाधराला ओळखणें दुसऱ्यांना मोठें मुष्कील झालें असतें; परंतु नारायणरावांनीं मात्र त्याला ओळखलें.

दुसरे दिवशीं महिन्याची अखेरची तारीख असल्यामुळें आफिसांत कामाची विशेष गर्दी होती. त्रिंबकरावांचा दाजी नुकताच अण्णासाहेबांच्या हाताशीं उमेदवार म्हणून लागला होता. अण्णासाहेबांनीं आदले दिवशीं कांहीं तक्ते त्याच्यापाशीं देऊन त्यांतील आंकड्यांच्या बेरजा बिनचूक करून ठेवण्यास सांगितलें होतें. दाजीला आफिसांत दुसऱ्या कांहीं कामाला हात न लावण्यास एवढी सबब पुरे झाली. त्यानें ते तक्ते नांवाला पुढें ठेवून खुशाल तक्याशीं टेंकून झोंप घेण्यास सुरुवात केली, आणि तीन वाजतां अण्णासाहेबांची आफिसांत येण्याची वेळ झाली तसा जागा होऊन घाईघाईनें कशातरी बेरजा करून मोकळा झाला. अगोदरच दाजी बेरजा करण्यांत हुषार, आणि तशांतून त्या घाईघाईनें केलेल्या ! मग काय पुसावें ! ! अखेरच्या तारखेला आफिसांत आल्यावरोबर "बेरजा तयार आहेतना ?" म्हणून नारायणरावांनीं विचारलें. तेव्हां "अलबत् !" असें दाजीनें मोठ्या ऐटीनें उत्तर दिलें. दाजीसाहेबांची हुषारी नारायणरावांला ठाऊक होतीच ! तेव्हां इतक्या घाईनें केलेल्या बेरजा तपासून घेतल्याशिवाय दाजीसाहेबांच्या भरंवशावर स्वस्थ बसणें त्यांना बरें वाटलें नाहीं. त्यांनीं ते तक्ते दाजीजवळून घेऊन गंगाधराजवळ दिले आणि त्याला त्या बेरजा तपासून पहाण्यास सांगितलें. वास्तविक पहातां बेरजा तपासून पहाण्याचें काम त्याचें नव्हतें; परंतु

कोणीं वरिष्ठानें कांहीं काम सांगितलें तर तें मुकाट्यानें करावयाचें, त्यांत चुकारपणा करावयाचा नाहीं, असा गंगाधराचा स्वभाव होता. तो मुकाट्यानें ते तक्ते घेऊन जाऊं लागला. तेव्हां नारायणराव सहज त्याला ह्मणाले "हो, बरी आठवण झाली. कायरे गंगाधर! तूं काल रात्रीं इतक्या थंडीच्या कडाक्यांत आमच्या बंगल्यासभोंवतीं घिरट्या घालित होतास, त्या कशासाठीं?"

गंगाधराला तो प्रश्न ऐकून फारच चमत्कार वाटला. तो आश्चर्यचकित मुद्रेनें नारायणरावांकडे एकदम वळून ह्मणाला "ह्मणजे? तुह्मी हें काय व कुणाला ह्मणतां, तें मला कळत नाहीं! मी, अन् तुमच्या बंगल्यापाशीं घिरट्या घालित होतों? कुणीं सांगितलें हें तुह्मांला?"

"सांगितलें नाहीं, मीं स्वतः पाहिलें! रात्रीं आठ वाजण्याच्या सुमारास तो तुझा ओव्हरकोट व टोपी घालून आमच्या बंगल्यापाशीं तूं घिरट्या घालित होतास. ही गोष्ट तूं नाकबूल करतोस, याचेंच मला आश्चर्य वाटत आहे! जेथें चक्षुर्वैसत्यम् आहे, तेथें तुझ्या नाकबूल जाण्यावर कुणाचा भरंवसा बसेल!"

नारायणरावांच्या या शब्दांनींतर गंगाधराला त्वेष चढला. जी गोष्ट आपण कधीं केली नाहीं तिचा आरोप आपणावर यावा, हें अगोदर संतापाला कारण पुरे आहे; आणि तशांत खरी गोष्ट इमानानें आपण सांगत असतां ती पर्यायानें खोटी ठरवूं पहाणें, ही गोष्ट निवळ चीड आणणारी आहे, असें आतां त्याच्या मनानें घेतलें.

दाजीसाहेबांची स्वारी तक्ते देऊन मोकळी झाली, ती फेरफटका करण्यासाटीं व विडीचे झुरके ओढून मनाचें समाधान करण्यासाठीं बाहेर पडली. इकडे अण्णासाहेबांनां त्यांची गरज लागली. पण दाजीसाहेब ठिकाणावर कोठें आहेत? त्यांनां शोधण्यासाठीं माणसें धाडलीं. तेव्हां अर्धापाऊण तासानें स्वारी विडीचे शेवटले झुरके घेतघेत ऐटीनें आफिसांत येऊन दाखल झाली.

नारायणराव ह्मणाले "दाजीसाहेब, तुह्मांला आफिसांत काम करण्याचा हा पहिलाच प्रसंग आहे. अशा वेळीं तुह्मीं ह्मटलें ह्मणजे खूब चांगलें काम करून वरिष्ठांची मर्जी संभाळायला पाहिजे. तुमचें तसें कांहींच दिसत नाहीं! तुह्मीं बेरजा केल्या त्या इतक्या हलगर्जीपणानें कीं, त्या पुनः सगळ्या आह्मांला करून घ्याव्या लागल्या. मघाशीं तुह्मांला अण्णासाहेब बोलावित होते, पण तुह्मीं कुणीकडे गुंगारा दिला होता कुणास ठाऊक! तुह्मी नवीन आहां, अशा वेळीं असें स्वच्छंदीपणाचें वर्तन आफिसांत केलेलें चांगलें नाहीं. हें मी तुमचा वरिष्ठ

या नात्यानें सांगत नाहीं, तुमचा मित्र व हितचिंतक या नात्यानें सांगत आहें. पुनः तुमच्या हातून अशा प्रकारचें वर्तन घडणार नाहीं, अशी मी उमेद बाळगतों."

दाजीसाहेबांसारख्या मानी माणसाला हे शब्द कोठून सहन होणार! तो उद्धटपणानें ह्मणाला "बरें बरें माहीत आहे आफिसचा रूल! इथें रात्रंदिवस मान मोडून काम करायला कांहीं हमालाचा पोर नाहीं लागलों! कुठें दहापांच मिनिटें 'फ्रेश एअर' घ्यायला गेलों, तर त्याबद्दल एवढें बोलणें? मीच एकटा असा जातों असें नाहीं. खुद्द साहेबसुद्धां दोनदोन तास घरीं जाऊन बसतात. त्यांची कुठें अशी घटका अर्ध घटका विश्रांति घेण्यास मनाई आहे?"

नारायणराव शांतपणें ह्मणाले "साहेबांची आणि तुमची बरोबरीच का? अहो, थोडातरी विचार करून बोलत जा."

यावर दाजीसाहेब कपाळाला आंठ्या घालून कांहीं उत्तर देणार होते, पण इतक्यांत अण्णासाहेबांकडे कोणी गृहस्थ आल्यामुळें त्याला भेटण्यासाठीं अण्णासाहेबच खुद्द बाहेर आले. त्यामुळें तो वाद तितकाच मिटला. अण्णासाहेब त्या गृहस्थाला घेऊन आंत गेल्यावर दाजीसाहेबांची धुसफुस फिरून सुरू झाली; परंतु आतां ती मुकीच होती. सुदैवानें तिला वाचा फुटली नाहीं. या अवकाशांत दाजीसाहेबांनीं काम असें कांहींएक केलें नाहीं; तथापि त्यांचे हात व तोंड रिकामें होतें, असें मात्र समजूं नये! इकडचें बुक तिकडे करण्यांत आणि टेबलावर निरर्थक कागदांच्या चिंध्या करण्यांत हात सारखे गुंतलेले होते व तोंड निरुद्योगी राहिल्यास हातांला त्यांचा हेवा वाटेल ह्मणून कीं काय तेंहि पुटपुटण्यांत गुंतलेलें होतें!

भेटण्यासाठीं आलेला गृहस्थ गेल्यावर अण्णासाहेबांनीं गंगाधराला आपल्या स्वताच्या खोलींत बोलावून नेलें आणि ह्मटलें "गंगाधर, तुला गुजराती समजतें काय? समजत असलें तर एक काम आहे."

गंगाधरानें घरीं बसल्याबसल्या गुजराती भाषेचा अभ्यास केला होता. त्याला त्या भाषेंत लिहिलेलें किंवा बोललेलें समजत असे. पण स्वतः मात्र बोलतां येत नव्हतें. अण्णासाहेबांच्या प्रश्नांस त्यानें "कामापुरतें थोडें समजतें" असें उत्तर दिल्यावरून ते पुढें ह्मणाले "तुला सुरतेला जाऊन दोनतीन महिने रहावें लागेल. तेथें शेट दुल्लभदास त्रिकमदास ह्मणून सावकार आहेत, त्यांच्याशीं पाती ठेवून त्यांक उघडण्याचा माझा विचार आहे. तेथें तुला त्या शेटजींच्या हाताखालीं

काम करावें लागेल. ते फार सज्जन आहेत. तुला माझ्याहूनहि अधिक ममतेनें वागवितील. शिवाय, तुला तेथें रहाण्याबद्दल रोज आठ आणेप्रमाणें भत्ता मिळेल. तूं तूर्त तेथें दोनतीन महिने राहून पहा. नीट जम जमल्यास कायमचा रहा. नाहींतर आपला परत ये. तुझ्या जागीं मग आणखी कुणाला पाठवीन."

गंगाधर ह्मणाला "मी आपल्या मर्जीबाहेर नाहीं. आपली कृपेची सावली असली ह्मणजे झालें. मग मी आपण सांगाल तेथें जाईन."

अण्णासाहेब हा जबाब ऐकून खुष झाले, हें सांगावयास नकोच. ते ह्मणाले "यासाठीं तुझ्यासारखा लायक व विश्वासू मला दिसत नाहीं. तेथील कामहि— ( दाराआड दाजी उभा होता त्याला पाहून ) कोण तो ? दाजी ! तुझें तेथें काय काम आहे ?"

यावर दाजी काय सांगणार ? तुह्मां दोघांचें संभाषण चोरून ऐकणें हें माझें काम, असें का तो ह्मणणार ? का असें सांगणार कीं, असें भिंतीआड उभें राहून आंतलें बोलणें ऐकण्याची मला कधींपासूनचीच खोड आहे, आतांच तुह्मांला त्यांत कांहीं नवल वाटायला नको ! सांगणार तरी काय ? दाजी न शरमतां खिदिखिदि दांत विचकित पळून गेला.

## प्रकरण ३८ वें.

# पांचशें रुपयांची नोट.

आज पगारवांटणीचा दिवस. आजहि पगार वांटण्याचें काम नारायणरावां-कडेसच आलें होतें. ते एका थैलींत रुपये व दुसरींत चवल्यापावल्या व खुर्दा घेऊन पत्रकाशीं मेळ घालून पहात बसले होते. त्यांनीं चवल्यापावल्या व खुर्दा मोजण्यासाटीं आपल्या हाताशीं दाजीला घेतलें होतें.

इतक्यांत शेजारच्या एका दुकानदारानें अण्णासाहेबांकडे पांचशें रुपयांची एक नोट पाठवून तिचेऐवजीं पन्नास रुपयांचें नाणें, वीसवीस रुपयांच्या पंधरा नोटा व दीडशें रुपये रोख, याप्रमाणें मागितले होते. नारायणराव ती नोट हातीं घेऊन अण्णासाहेबांकडे गेले आणि सोबतच्या चिठ्ठीसुद्धां त्यांनीं ती त्यांचे हातीं दिली. अण्णासाहेबांनीं त्या चिठ्ठीप्रमाणें नोटा व रोख रुपये काढून दिले व नाणें मोजून देण्यास नारायणरावांनां सांगितलें. कोणी अण्णासाहेबांपाशीं बोलत असलें ह्मणजे तें चोरून ऐकण्याची खोड दाजीला मुळापासून होतीच. तेव्हां नारायण-रावांला अण्णासाहेब काय सांगतात तें ऐकण्यासाटीं दाजी आपले कान उभारून खिडकीपाशीं हळूच उभा राहिला, यांत आश्चर्य नाहीं ! अण्णासाहेबांनीं नोटा व रुपये काढून दिले व समोरच्या जाळीदार टेबलाच्या एका खणांत ती नोट ठेवली हें त्यानें पाहिलें व नारायणराव बाहेर पडण्याच्या आधींच तेथून निसटून तो आपल्या पूर्वींच्या जागीं जाऊन बसला.

नारायणराव पन्नास रुपयांचें नाणें मोजून देण्यांत गुंतले. अण्णासाहेबांकडे तितक्यांतच बाहेर कोणी भेटण्यास आल्यामुळें तेहि आफिसांतून बाहेर येऊन त्या गृहस्थाशीं बोलूं लागले. तो भेटण्यास आलेला गृहस्थ बोज्यावर होता. त्याच्याशीं बाहेर बोलण्यांत अण्णासाहेब चांगले दहा मिनिटें गुंतले होते. गंगाधर मागच्या दप्तरांतला हिशेबाचा एक कागद शोधण्यासाठीं तिसऱ्या मजल्यावर रेकर्डाच्या खोलींत गेला होता. अण्णासाहेबांच्या खोलींत जाण्यास दाजीला ही उत्तम संधि सांपडली. तो केव्हांच नारायणरावांची नजर चुकवून अण्णासाहेबांच्या खोलींत गेला व त्यांच्या टेबलाचे खण हळूच उघडून पाहूं लागला, पण त्यांत कागदपत्राशिवाय दुसरें कांहींच दिसेना. नोटा व रोख रुपये हेटर तिजोरींत होते व तिजोरी मोहोरबंद होती. हात मारावयाला अगदींच कांहीं मिळेना, तेव्हां शेवटीं त्यानें घटकाभरापूर्वीं जाळीदार टेबलाच्या खणांत ठेवतांना पाहिलेली

नोट हळूच काढून आपल्या कोटाच्या आंतल्या खिशांत ठेवून दिली व कोटाच्या गुंड्या वगैरे घालून स्वारी चोरट्या पावलांनीं पुनः आपले जागीं येऊन बसली. एवढ्या मोठ्या रकमेवर डल्ला मारण्याचा दाजीसाहेबांनां हा पहिलाच प्रसंग होता. त्यामुळें नोट उचलतांना हात कांपूं लागला. पण दाजीसाहेबांचे हात जितके पापभीरू होते, तितकें मन नव्हतें. तें हाताला म्हणालें "बाबारे ! या जगांत धाडस हेंतर मुख्य पाहिजे. ज्याला धाडस नाहीं, त्याला मिळकत नाहीं !"

दाजीसाहेबांनां काम करण्याची केवढी हौस होती, त्याचीं प्रत्यंतरें मागें आलींच आहेत. पण आतां नाण्याच्या चळती नीट मोजून लावण्यांत त्यांनीं जी चपळता दाखविली ती पाहून एखाद्याला नवल वाटलें असतें. मागील चुकार-तट्टपणाबद्दलच्या 'सर्वदोषपरिहारार्थं प्रायश्चित्तमहं करिष्ये' असा संकल्प सोडून ते या कामाला लागले कीं काय कोण जाणे ! जें काम करण्यास त्यांनां एक तास पुरला नसता, तें त्यांनीं आतां दहा मिनिटांत करून "आणखी एखादी थैली मोजायची आहे काय ?" म्हणून नारायणरावांला विचारिलें.

नारायणरावांनीं मागें उलटून पाहिलें आणि "नाहीं, तेवढीच मोजायची राहिली होती" असें म्हटलें. दहापांच मिनिटांपूर्वी झालेला प्रकार त्यांनां कळता तर ही थैली मोजण्यास देण्याइतकातरी विश्वास त्यांनीं दाजीवर टाकिला असता कीं नाहीं, याची शंकाच आहे !

सगळ्यांचा पगार वांटला गेला. गंगाधर रेकार्डरूममध्यें गुंतला असल्यामुळें त्याचा तेवढा पगार राहिला होता. इतक्यांत तोहि हातांत कांहीं जुने हिशेबाचे कागद घेऊन माडीवरून खालीं उतरला. नारायणराव त्याचीच वाट पहात होते. त्यांनीं पत्रकावर त्याची सही करून घेऊन पगार त्याच्या स्वाधीन केला. इतक्यांत अण्णासाहेबांनीं गंगाधराला बोलाविलें आणि जातांजातां एवढें पत्र पोष्टांत टाक म्हणून सांगितलें. मागच्या पत्राप्रमाणें हेंहि लौकर पोष्टांत पडेल किंवा नाहीं याची शंका घ्यावयाला नको होती. गंगाधर आपलें उपरणें घेऊन निघाला, त्याचेबरोबर दाजीसाहेबांचीहि स्वारी आफिसाचे बाहेर पडली.

अण्णासाहेबहि ऑफिस बंद करण्याच्या तजविजींत होते. त्यांनीं महत्त्वाचे कागद वगैरे एका पेटींत घालून बंद केले, किल्ल्या खिशांत टाकिल्या आणि घरीं जाण्यास निघणार, इतक्यांत त्या पांचशें रुपयांच्या नोटीची त्यांनां आठवण झाली. त्यांनीं जाळीदार कपाटाच्या खणांत हात घातला. पण नोट कोठें आहे ? ती नुकतीच वाट चालूं लागली होती.

"नोट गेली!" ह्मणून अण्णासाहेबांनीं नारायणरावांला बोलावून सांगितलें. त्या दोघांनीं मिळून सगळें कपाट व टेबलावरचे कागद शोधून पाहिले. तिजोरी उघडून पाहिली, खिसे चांचपले, पण तिचा पत्ता लागेना. "चुकून रद्दी कागद समजून फाडली गेली तर नाहींना?" अशी शंका येऊन टेबलाखालची चिंध्यांची वेताची टोपली काळजीपूर्वक तपासून पाहिली. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. अण्णासाहेबांनां कांहीं सुचेनासें झालें. ते ह्मणाले "मी बाहेर गेलों तेव्हां ती होती हें खास. त्या वेळीं गंगाधरच कायतो एकटा माझ्या खोलींत होता. त्याच्यावांचून दुसरें कुणीहि आंत आलें नाहीं, किंवा बाहेर गेलें नाहीं." "इकडे दाजी बाहेर नाण्याच्या थैलीपाशीं बसला होता, तो तिथून हालला नाहीं," अशी नारायणरावांनींहि वालंबाल खात्री दिली. तेव्हां गंगाधराच्या घरीं जाऊन तो आल्याबरोबर त्याला अण्णासाहेबांच्या घरीं पाठवून द्या, असा निरोप त्याच्या आईस सांगण्यासाठीं शिपायास पाठवून अण्णासाहेब व नारायणराव दोघेहि आफिस बंद करून निघाले.

अण्णासाहेबांच्या आफिसांतून नोट चोरीस गेल्याची वार्ता हळूहळू चोहोंकडे पसरली. ती पसरविण्यांत दाजीसाहेबांची मदत विशेष झाली, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. आपला संशय कोणाला येऊं नये, ह्मणून तो मुद्दामच ती गोष्ट प्रत्येकाला सांगत फिरे. एके दिवशीं संध्याकाळीं त्रिंबकरावांचे घरीं जेवण्याचे वेळीं त्याविषयींची गोष्ट निघाली, तेव्हां दाजीसाहेबांला त्याविषयींची बारीक-बारीक माहिती सांगण्याचा आणि गंगाधराचें नांव काढून हळूच डोळे मिचकावित हंसण्याचा जो आवेश आला होता, तो कांहीं पुसूं नये! तो विषय दाजीसाहेबांनींच आग्रह होऊन उकरून काढला होता, हें सांगावयाला नकोच. तो ह्मणाला "आजकाल आमच्या आफिसांत काय मोठी मौज चालली आहे!"

त्रिंबकरावांनीं सहज कौतुकानें विचारलें "कसलीरे मौज?"

दाजीसाहेब ह्मणाला "एक पांचशें रुपयांची नोट हरवली आहे. पाहिलें तर पांचशेंच रुपये—पण त्यासाठीं कोण गडबड! याला बोलाव, त्याला बोलाव, अमक्याला विचार, तमक्याला धमकी दे, फलाण्याशीं कानगोष्ट कर—जसें कांहीं दहापांच हजारांचें नुकसान झालें आहे!"

त्रिंबकरावांनीं विचारिलें "पण ती नोट अशी गेली कशी?"

"तेवढें माहित असतें तर एवढा खटाटोप पाहिजे होता कशाला? अण्णा-

साहेबांनीं ३१ व्या तारखेला पगारवांटणीच्या वेळेस ती आपल्या जाळीदार कपाटांत घालून ठेविली होती. दोन घटकांनीं पहातात तों नोट नाहीं!"

"कुणीं घेतली तर मग?"

"कुणीं घेतली हें कळतें तर जागचेजागीं त्याच्या मुसक्या नसत्या बांधिल्या?"

"केवढ्याची नोट होती?"

"पांचशांचीच! तशी रक्कम पाहिली तर कांहीं मोटी नाहीं ह्मणा; आणि अण्णासाहेबांनींहि स्वतः बोलून दाखविलें कीं रक्कम गेल्याचें एवढें दुःख नाहीं, पण चोर सांपडला पाहिजे."

त्रिंबकराव ह्मणाले "रक्कम मोठी नाहीं तर काय थोडी आहे! पांचशें रुपये काय वाटेवर पडले आहेत?"

"पैशांची किंमत मी थोडी समजतों असें नाहीं. (हंसून) आमच्या हातांत हातखर्चासाठीं असे कुठें पैसे फार येतात, त्यांची किंमत कमी समजायला! पांचशें रुपये ह्मणजे काय अण्णासाहेबांच्या घरचा केर आहे, असें माझें ह्मणणें—"

दाजीसाहेबांनीं मधेंच हंसतहंसत वडिलांना टोमणा दिला तो त्यांच्या लक्ष्यांत आला. त्यावर ते ह्मणाले "हातखर्चासाठीं पूर्वीसारखे पैसे मिळत नाहींत, हा माझा दोष वाटतें? पूर्वीच्या तुमच्या उधळपट्टीमुळेंच मी इतका डबघईला आलों—"

यावर थोडीशी बोलाचाली होऊन आपसांतला बरेपणा थोडासा मावळला. आपण डबघईला आलों आहों ही गोष्ट मनुष्य तशी स्थिति खरोखर असल्याशिवाय आपल्या घरच्या माणसांपाशींतरी सहसा कबूल करावयाचा नाहीं. निदान त्रिंबकरावांसारखा ऐटींत रहाणारा गृहस्थतरी ही गोष्ट आपल्या मुलांजवळ सांगावयाचा नाहीं. पण आतांशा असे उद्गार त्रिंबकरावांच्या तोंडून वारंवार निघत होते.

मध्यें कांहीं वेळ दुसरी कांहीं चर्चा होऊन मंडळी परत पहिल्या विषयाकडे वळली. त्रिंबकरावांनीं विचारलें "बरें, पण ती नोट गेली कशी?"

"त्या दिवशीं शेजारच्या एका सावकारानें ती अण्णासाहेबांना आणून दिली व कांहीं लहान नोटा व रोख रुपये नेले. पुढें कांहीं वेळानें साहेबांकडे घोड्यावर बसून कोणी गृहस्थ आले. त्यांना भेटण्यासाठीं ह्मणून साहेब बाहेर आले. ते बाहेरच पुष्कळ वेळ बोलत उभे राहिले होते. परत आले व पत्रें वगैरे लिहून आफिस बंद करण्याच्या वेळीं पहातात, तों नोट नाहीं—"

त्रिंबकरावांनीं मध्येंच विचारिलें "त्यांच्या खोलींत त्या वेळीं आणखी कोण होतें ?"

"गंगाधरावांचून दुसरें कुणी नव्हतें. तो तेवढाच काय तो सकाळपासून तिथें होता."

"तर मग गंगाधराचेंच हें काम असावें, असेंच ह्मणणें ओघाला येतें!"

दाजीसाहेबांनीं आपल्या भिवयांची कमान वर उंच करून त्रिंबकरावांकडे पाहिलें आणि ह्मटलें "त्याचें नांव कुणीं घ्यावें ? अण्णासाहेबांचीतर अशी समजूत झालेली दिसते कीं, गंगाधराच्या हातून एखादी गोष्ट घडली ह्मणजे ती वाईट असली तरी चांगली होते. ' नेपालेश्वरभाललग्नचिखला कस्तूरिका मानिती ' तसेंच हें !"

" अण्णासाहेब त्याला इतके मानतात ?"

" साहेबच काय, आफिसांतले एकूनएक नोकरचाकर, सगळ्यांवर त्यानें मोहनी घातली आहे."

"दाजी, तूं सांगतोस हें खरें असेल, तर ती नोट गंगाधरानेंच खास घेतली असली पाहिजे. पण कायरे, तूं ह्मणतोस अण्णासाहेबांनीं त्या जाळीदार कपाटाच्या खणांतच ती ठेविली, याविषयींचं त्यांनां पक्कें स्मरणतरी आहे ? चुकून भलत्याच ठिकाणींतर नाहींना ठेविली गेली ?"

" हो, पक्कें स्मरण आहे. शिवाय आफिसांतला कागदन् कागद झाडून सगळा पाहिला. दुसरीकडे कुठें ठेविली असती तर ती सांपडलीच असती. नोटीचें नांव निघालें कीं, गंगाधर कसा अगदीं कावराबावरा होऊन हें दप्तर सोड, ते कागद काढ, पेटी झाड, कपाटाचे मागें पडली कीं काय तें पहा, असें सारखा करित असतो. जसें कांहीं अशी बतावणी केल्यानें आपला संशय कुणी घेणार नाहीं, असें त्याला वाटतें."

"या गोष्टीची पोलिसाला वर्दी दिली असेलच !"

"तें कांहीं ठाऊक नाहीं. पण आफिसांतल्या प्रत्येक माणसाला निरनिराळें बोलावून त्यांच्या खोलींत जातांना कुणाला पाहिलें काय, ह्मणून विचारिलें. मलाहि तसेंच विचारिलें. आह्मीं पाहिलेंच नाहीं, तर कुणाचें नांव घेणार ?

" तूं त्या वेळीं कुठें होतास ?"

हा प्रश्न मुद्दाम विचारला, असा वाचकांचा समज झाला असेल, पण खरोखरी तसा प्रकार नव्हता. त्रिंबकरावांला दुसऱ्या हव्या त्या माणसाविषयीं संशय

आला असता, पण आपल्या मुलाच्या हातून असलें कृत्य होईल, ही कल्पनाहि त्यांच्या डोक्यांत आली नसती. हा शेवटचा प्रश्न एवढ्याच हेतूनें विचारला होता कीं, दाजी अण्णासाहेबांच्या खोलीच्या वाटेवरच बसला होता यामुळें त्या खोलींत कोणी शिरलेलें किंवा तींतून बाहेर आलेलें त्यानें पाहिलें असेल, आणि त्या माणसाचें नांव कळलें ह्मणजे गुन्ह्याचा तपास लावण्याचें श्रेय दाजीकडे आयतेंच येईल.

दाजीनें उत्तर केलें "मी आपल्या कामांत इतका चूर होतों कीं, वर मान करायलासुद्धां मला फुरसत मिळाली नाहीं. (हंसून) चोरानें तिकडे नोटीवर हात मारलान् नि इकडे चवल्यापावल्यान् पैसे मोजतांमोजतां माझे हात काळे मात्र झाले!"

"ती नोट मोडण्याचा प्रयत्नतरी झाल्याची खबर अण्णासाहेबांना लागली आहे किंवा नाहीं?"

"अण्णासाहेब कुठें बोलले नाहींत. पण नोट काय हवी तेव्हां हजार कोसां-वरून मोडतां येते. जो ती चोरील त्याला ती मोडतां का नाहीं यायची?"

प्रकरण ३९ वें.

# त्रिंबकरावांची नसती उठाठेव.

त्रिंबकरावांनीं जे प्रश्न विचारले, ते जिज्ञासेमुळेंतर खरेच; पण अगदीं निःस्वार्थ बुद्धीनें विचारले, असें मात्र नाहीं! या गुन्ह्याचा तपास लावण्यांत आपण झटलों असतां आपल्यास वकिलीचें काम आयतें मिळेल, हा त्यांत त्यांचा स्वार्थ होताच. त्रिंबकरावांनां ह्मणजे वकिलीचें काम थोडेंथोडकें मिळे, असें नाहीं. साधारणतः तीनशें रुपयेपर्यंत त्यांची दरमहा प्राप्ति होती. शिवाय अण्णासाहेबांकडच्या घरव्यवस्थेबद्दलचें व भाडें वसूलीबद्दलचें वेतन निराळें मिळे. शिवापुरच्या मानानें पहातां हें उत्पन्न कांहीं लहान ह्मणतां येणार नाहीं. पण त्रिंबकरावांच्या घरचा खर्च दांडगा, यामुळें या महिन्याच्या प्राप्तीची त्या महिन्याशीं मोठ्या मुष्किलीनें गांठ पडे; कधींकधींतर कर्ज काढण्याचीहि पाळी येई. बरें, त्रिंबकरावांची स्वताची रहाणी मोठी भपकेदार होती, असेंहि नाहीं. पण गोदूताई आणि त्यांचीं लाडकीं लेंकरें यांच्या चोंचल्यांखालीं कुबेरसुद्धां भिकेस लागता! गोदूताईनां घरांतलें काम कसें तें ठाऊकच नव्हतें. राजाच्या पट्टराणीसारख्या त्या सदा आपल्याच तोऱ्यांत रहात असत. पाटावरून ताटावर आणि ताटावरून पाटावर, हें त्यांचें सबंद दिवसाचें काम! अगोदर आठ साडेआठ वाजतां मुश्कीलीनें बाईसाहेब निजून उठावयाच्या; त्यानंतर हळूहळू प्रातर्विधि, चहापान, वेणीफणी वगैरे कामें जांभया देतदेत व्हावयाचीं; तदनंतर नोकराचाकरांवर रागावण्याजाजावण्यांत आणि नटण्यामुरडण्यांत वेळ जावयाचा; त्याच्यापुढें स्नान! बाईसाहेबांच्या न्हाण्याला दहावीस घागरी ऊन पाणी लागलें नाहीं व तास अर्धा तास मोडला नाहीं, तर तें स्नान कशाचें! स्नान केल्यानंतर हळूच चापूनचोपून लुगडें नेसावयाचें व तुळशीला पाणी घालून तिच्याभोंवतीं एकवीस प्रदक्षिणा घालावयाच्या. तुळशीला एकवीस प्रदक्षिणा घालण्याचें पुण्य पुराणांतरीं वर्णिलें आहे, तें असें कीं, 'पृथ्वीला एक प्रदक्षिणा घालून प्राप्त होणाऱ्या पुण्याची तें बरोबरी करतें.' पुराणांतली ही पुण्याविषयींची फलश्रुति पुष्कळ श्रद्धाहीन अर्वाचीन गृहस्थांनां मान्य नसेल; नसो बिचारी! देवाप्रीत्यर्थ देहाला कष्टविणें यांत पुण्य आहे, एवढीजरी गोष्ट त्यांनां मान्य असली, तर तुळशीला एकवीस प्रदक्षिणा घालण्यानें गोदूताईनां रोज पृथ्वीप्रदक्षिणेचें पुण्य लागत होतें, हें सहज सिद्ध करून देतां येईल. कारण, इतरांनां पृथ्वीप्रदक्षिणा जेवढी कंटाळवाणी

आणि कष्टदायक वाटे, तेवढ्याच तुळशीवृंदावनाभोंवतालच्या एकवीस प्रदक्षिणा गोदूताईला कष्टमय वाटत. एकवीस प्रदक्षिणा घालतांघालतांच त्यांच्या पायांचा कांटा ढिला होई, मांड्या भरून येत, छाती धडधडूं लागे, श्वासोच्छ्वास जोरानें चाले, डोळ्यांपुढें अंधेरी येई आणि स्वर्गाचें द्वार दिसूं लागे! तेव्हां प्रदक्षिणा आटपल्यावरोबर गोदूताईंना अर्ध घटका अंग टाकून पडावें लागे. इतकें होत आहे तों बारा वाजण्याची वेळ येई. मग यजमानिणीसारख्या—सारख्या कशाला त्या प्रत्यक्ष यजमानीणच होत्या—त्या पाटावर येत आणि दोन घांस अळेंबळें खाऊन हातावर पाणी पडलें कीं माडीवर जाऊन बसत. मग तांबूलविहार घेऊन दुपारची वामकुक्षी होई. इतकें झालें म्हणजे मग लहान मुलांशीं घटकाभर करमणूक करित किंवा शिवणकाम वगैरे कांहीं घेऊन बसत. अशा तऱ्हेनें गोदूताईंचा सगळा दिवस उद्योगांत जात असे! रिकामपणाच्या अभावामुळें मुलांच्या शिक्षणाकडे पहाण्यास, घरांतलीं कामें नोकरांचाकरांकडून दक्षतेनें करवून घेण्यास, किंवा घरचा हिशेबठिशेब ठेवण्यास बिचाऱ्यांला सवडच होत नसे!

अशा आईचीं मुलें निराळ्या प्रकारचीं कशीं निपजतील! गोदूताईंचा वडील मुलगा कसा काय होता त्याचें वर्णन मागें एका प्रकरणांत आलेंच आहे. दाजीसाहेब व त्याचा धाकटा भाऊ यांचेहि पराक्रम 'मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात' या म्हणीप्रमाणें आतांपासूनच दिसूं लागले होते. 'आज मला अमकें पाहिजे' असा मुलानें हट्ट घेतला आणि थोडीशी आदळआपट केली, किंवा तास दोन तास उपाशीं राहिला, म्हणजे गोदूताईंचे पंचप्राण व्याकुळ व्हावयाचे आणि त्यांनीं कांहींतरी युक्ति करून त्रिंबकरावांजवळून पैसे मागून घेऊन त्याचा हट्ट पुरवावयाचा. पुढेंपुढें त्रिंबकराव असे वारंवार पैसे देण्यास कंटाळूं लागले, तेव्हां गोदूताईंनीं आपला एखादा दागिना हरवला असें सांगून तो शेजारणीपाशीं किंवा सोनारापाशीं गहाण ठेवावा आणि त्याचे रुपये आणून त्यावर मुलांचे लाड पुरवावे. मुलांनीं आईबापांचे असे लचके तोडल्यावर, एवढी प्राप्ति असतांहि त्रिंबकरावांची स्थिति, फार जुन्या अशा वाड्यांतल्या वरून जाड दिसणाऱ्या पण आंतून किड्यांनीं पोखरलेल्या तुळवंटाप्रमाणें झाली, यांत नवल काय!

त्रिंबकराव जेवून उठले ते अण्णासाहेबांकडे गेले. बराच वेळ इकडच्यातिकडच्या गोष्टी झाल्यावर ओघाओघानें नोट गेल्याबद्दलची गोष्ट निघाली. तेव्हां अण्णासाहेबांनीं सगळी हकीगत सांगितली. ती ऐकून घेतल्यावर त्रिंबकराव शांतपणानें म्हणाले "तुम्ही वाटेल त्याला विचारा. ह्या बाबतींत एकच तर्क जुळतो-

गंगाधराच्या अंगीं ती चोरी खास लागते, असें प्रत्येकजण ह्मणेल. नाहींतर नोट जावी कशी ? जवळपास गंगाधरावांचून दुसरें कुणीच नव्हतें. त्यानें घेतली नाहीं, तर मग ती गेली कशी ? तिला पाय फुटले असें का तुमचें ह्मणणें ?"

अण्णासाहेब ह्मणाले " छेः, भलतेंच ! माझ्या कारखान्यांत एकंदर तीन माणसें माझ्या अत्यंत विश्वासाचीं आहेत. एकतर मीं स्वतः ! ( हंसून ) मीं नोट चोरली नाहीं, हेंतर उघडच आहे. दुसरे आमचे मुनीम नारायणराव. त्यांच्याविषयींहि शंका घ्यायला नको; आणि तिसरा गंगाधर ! तो माझे इथें नोकरीस राहिल्यापासून त्याच्या वर्तनावर माझी सारखी नजर आहे. तो हाडाचाच गरीब, मोठा प्रामाणिक, सत्यवचनी आणि सन्मान्य आहे. वयानें लहान असला ह्मणून काय झालें ? त्याचे गुण मोठ्यांनांहि खालीं पहावयास लावणारे आहेत."

अण्णासाहेबांचें गंगाधराविषयींचें इतकें चांगलें मत ऐकिल्यावर त्रिंबकरावांला त्याच्या उलट बोलतां येईना. ते गुटमळत ह्मणाले " होय, तो तसा आहे खरा. माझेंहि मत त्याच्याविषयीं चांगलें आहे. पण ह्मटलें, या गोष्टीची खबर आपण पोलिसांत दिली असेंलच—"

"पोलिसाला वर्दी देण्यापूर्वी आपली स्वताची पुरी खात्री करून घ्यावी हें बरें. ह्मणून मी थांबलों आहें. न जाणों, मींच विसरभोळेपणानें रद्दी कागद समजून ती फाडिली नसेल कशावरून ? पोलिसाला वर्दी पोहोंचण्याचा अवकाश, कीं, ते लागलीच भराभर येतील आणि आमच्या कारखान्यांतल्या लोकांना एकीकडे नेऊन समज द्यावयाला लागतील. माझ्या नोकरींत राहिल्याबद्दल माझ्या निरपराधी नोकरांनां असें प्रायश्चित्त मी कधीं मिळूं देणार नाहीं. त्यापेक्षां आणखी दोन दिवस वाट पाहीन. नोट चोरीलाच गेली असली तर इथल्या इथें कोणत्याना कोणत्यातरी दुकानीं ती मोडावयाला येईलच. मग आयताच चोर उघडकीला येईल."

अण्णासाहेबांचा असा निश्चय पाहिल्यावर त्रिंबकरावांनां, त्यांच्याकडून आपला हेतु सिद्धीस जाईल असें वाटलें नाहीं. ह्मणून "आतां रात्र बरीच झाली आहे, लौकर घरीं गेलें पाहिजे." असें निमित्त करून ते उठले. पण सरळ घरीं न जातां वाटेंत फौजदारसाहेबांच्या बिऱ्हाडीं गेले.

कित्येकांनां दुसऱ्याच्यासंबंधींची नसती उठाठेव करित बसण्याची खोड असते ! त्रिंबकरावांलाहि तशीच खोड होती. अण्णासाहेबांची नोट हरवली, ते स्वतः

पोलिसाला ही खबर देण्यास इच्छित नाहींत, पण त्रिंबकरावांला पहा या गोष्टीची केवढी उठाठेव! त्यांनीं एवढ्या रात्रीं फौजदारसाहेबांच्या घरीं जाऊन आणि त्यांनां निजलेले उठवून नोट चोरीस गेल्याची गोष्ट खाजगी रीतीनें कळविली, एवढेंच नव्हे, तर या चोरीचा "गुप्त रीतीनें तपास करून मला जरूर कळवा," ह्मणून त्यांनां पुन:पुन: बजावून मग स्वारी घरीं गेली.

ती नोट गांवांतल्यागांवांत कोठेंतरी एखाद्या दुकानीं विकली गेली असेल, हा अण्णासाहेबांचा तर्क अगदीं बरोबर होता. शिवापुरांत बायसिकलीचें एक दुकान होतें. हा दुकानदार प्रामाणिक ह्मणून मोठासा नांवाजलेला नव्हता. त्याला मुंबई, कलकत्ता वगैरे शहरीं पैसे पाठविण्याचे प्रसंग वरचेवर येत. तेव्हां अनायासें ही आलेली पांचशें रुपयांची नोट त्यानें घेऊन ती मुकाट्यानें आपल्या पेटींत घालून ठेविली होती. आठचार दिवसांत जर कांहीं बोभाटा झाला नाहीं, तर कबूल केलेल्या अर्ध्या किंमतीबद्दल एक बायसिकल द्यावयाची, नाहीं तर नाहीं, असा त्याचा करार होता. त्याप्रमाणें दोनतीन दिवसतर बरे गेले; परंतु चौथ्या दिवशीं कांहीं थोडासा सुगावा लागल्यावरून पोलिसचे एकदोन जवान, संध्याकाळीं सहज त्याच्या दुकानीं येऊन बसले व तेथें कोणाचें येणेंजाणें आहे वगैरे टेहेळून पाहूं लागले. रात्रीं फौजदारसाहेबहि आले आणि दुसऱ्या कांहीं विषयावर बोलण्यास प्रारंभ करून मध्येंच एकदम "ती परवांची पांचशें रुपयांची नोट तुह्मीं दाखविण्याचें कबूल केलें होतें, ती आतां दाखवा पाहूं—" असें ह्मणाले. त्यासरसा तो दुकानदार चपापला आणि "तुह्मांला त्याविषयीं कुणीं खबर दिली? मीं चोरीची समजून घेतली नाहीं, चांगले पांचशें रुपये मोजून घेतलेली आहे—" वगैरे गोष्टी गयावया करून सांगूं लागला. फौजदारसाहेबांनीं ती कोणापासून —कधीं—कोणत्या वेळेस व—कोठें घेतली, ज्याच्यापासून ती घेतली त्याचें नांव काय—तो रहातो कोठें, त्याचा पोषाख त्या वेळीं कसा होता, वगैरे सगळी हकीगत विचारून घेतली होती, आणि त्या वर्णनावरून तो चोर कोण असावा याविषयीं त्यांची खात्री झाली असावी, असेंहि त्यांच्या चर्येवरून दिसत होतें. इतकी चौकशी केल्यावर ती नोट आपल्या ताब्यांत घेऊन फौजदार-साहेब मुकाट्यानें निघून गेले. त्यांनीं त्रिंबकरावांची एकांतांत गांठ घेऊन त्यांनां सांगितलें कीं "नोट येथें एका दुकानीं विकली गेली आहे. ती विकणारा चोरी झाली त्याच रात्रीं अंगांत एक विचित्र प्रकारचा—वाघाच्या अंगावरच्या सारख्या पट्ट्यांचा—कोट व तोंड झांकलें जाईल अशी लोंकरी कानटोपी घालून त्या दुकानीं

गेला होता व त्यानें ती नोट देऊन एक बायसिकल घेण्याचें ठरविलें होतें." इत्यादि मजकूर कळवून आणि उद्यां अधिक तपास लागेल असें अभिवचन देऊन ते चालते झाले.

त्रिंबकरावांनांहि वाटलें कीं "अण्णासाहेब पोलिसाला वर्दी देण्याला भीत होते, पण आतां त्यांनां चोरीचा पत्ता लागल्याचें कळेल तेव्हां ते माझ्या हुषारीची तारीफच करित रहातील." अशा मनोराज्यांत ते गर्क झाले होते; इतक्यांत दाजीसाहेबांची स्वारी घरांत आली.

दाजीनें फौजदारसाहेबांनां आपल्या घरांतून बाहेर पडतांना पाहिल्यापासून त्याची छाती धडधडूं लागली होती. तशांत तो घरांत येतांच त्रिंबकरावांनीं त्याला प्रश्न केला "दाजी, वाघाच्या अंगावरच्यासारख्या पट्यांचा विचित्र कोट पांघरलेला तुझ्या वयाचा मुलगा तूं कधीं पाहिला आहेस?"

हा प्रश्न ऐकण्याबरोबर दाजीसाहेबांच्या अंगाला दरदरून घाम सुटला, हें सांगावयाला नकोच! तथापि आपली अशी घाबरगुंडी वळलेली आपल्या बापाच्या लक्ष्यांत येऊं नये ह्मणून मुद्दाम उसनें अवसान आणून दाजी ह्मणाला "हो, गंगाधरच तो! कां, फौजदारसाहेब त्याच कांहीं कामासाठीं आले होते वाटतें?"

"छे:! ते आपले दुसऱ्या कांहीं कामासाठीं आले होते."

हें ऐकून दाजीच्या जिवांत जीव आला आणि तो आपल्या खोलींत जाऊन सुखानें निजला; सुखानें कसचा! त्रिंबकरावांच्या त्या उत्तरानें जरी त्याचें तत्काळ समाधान झालें, तरी फौजदारसाहेबांचें आपल्या घरीं इतक्या रात्रीं येणें, हें कांहीं शुभ चिन्ह नव्हे, असें त्याच्या मनानें घेतल्यापासून त्याला पूर्वीसारखी गाढ झोंप पुनः आली नाहीं.

## प्रकरण ४० वें.

# पोलिसतपास.

एके दिवशीं संध्याकाळीं अण्णासाहेबांच्या घरीं फौजदारसाहेब, नारायणराव व त्रिंबकराव वगैरे मंडळी जमून ते चोरीस गेलेल्या नोटीसंबंधानें बोलत होते. फौजदारसाहेबांनीं ती नोट एका मुलानें बायसिकलवाल्याचे दुकानीं कशी मोडिली, वगैरे हकीगत सांगितली व त्या वेळच्या त्याच्या पोषाखाचेंहि वर्णन ऐकून नारायणरावांची चित्तवृत्ति तटस्थ झाली. तशाच प्रकारचा पोषाख गंगाधराचा होता, हें त्यांनां ठाऊक होतें; आणि त्रिंबकरावांनीं मध्यें बोलतांबोलतां गंगाधराच्या नांवाचा दोनतीन वेळां उल्लेख केलेलाहि त्यांनीं ऐकिला होता. त्यामुळें गंगाधराचा या कृत्याशीं खरोखर कांहीं संबंध असेल काय, ह्या विचारानें त्यांची मुद्रा चिंतातुर दिसत होती.

त्रिंबकराव अण्णासाहेबांकडे वळून हंसत ह्मणाले "हें पहा, भरंवशाच्या म्हशीला टोणगा ह्मणतात तो असा! अहो, साहजिकच आहे, मुलांच्या वर्तनावर बापाइतकी आईची नजर कधींतरी रहाणार आहे का? मुलगा बाहेरच्या बाहेर काय कारभार करतो, तें आईला कसें कळणार?"

हें ऐकून नारायणरावांच्यानें स्वस्थ बसवेना. ते ह्मणाले "तें कांहींहि असो, पण हें कृत्य गंगाधरानेंच केलें, याला पुरावा असल्याशिवाय उगाच त्या गरीब पोराचें नांव बद्दू करणें, आपल्याला बुवा नाहीं प्रशस्त वाटत."

"पुरावा—पुरावा, तो आणखी कसा पाहिजे? सगळा पुरावा संगीन आहे. फौजदारसाहेबांनां विचारा—" त्रिंबकराव ह्मणाले.

सगळेजण फौजदारसाहेबांच्या तोंडाकडे पाहूं लागले. ते कांहींतरी अपूर्व गोष्टी पुढें आणून सर्वांनां चकित करून सोडतील, अशी जमलेल्या मंडळीची अपेक्षा होती. ह्मणून सर्वजण फौजदारसाहेबांच्या तोंडांतून उद्गार निघण्याची वाट मोठ्या उत्कंठेनें पहात होते.

"माझ्याजवळ आहे याच्याहूनहि कमी पुराव्यावर गुन्हा शाबीत होऊन आरोपीला फांशीची शिक्षा झालेल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत!" एवढेंच वाक्य गंभीरपणानें बोलून फौजदारसाहेब स्तब्ध राहिले.

तेव्हां त्रिंबकराव नारायणरावांनां ह्मणाले "कोटाच्या रंगारूपावरून मीं गंगाधरा-

विषयीं जो तर्क बांधिला, त्यांत कुठें चुकत आहे तेवढें मला दाखवा, ह्मणजे सांगाल तें ऐकेन !"

यावर नारायणराव ह्मणाले "चुकतें तें इथेंच. तुह्मी असें समजतां कीं, गंगाधराच्या कोटासारखा हुबेहुब कोट दुसऱ्या कुणापाशीं नाहीं ! कां,असेंच कीं नाहीं तुमचें ह्मणणें ?"

त्रिंबकराव ह्मणाले "हो, असेंच."

"तरमग हा तुमचा समज निखालस चुकीचा आहे. त्याच्यासारखा हुबेहुब कोट इथें आणखी एकापाशीं आहे."

हें ऐकून त्रिंबकरावांनां कांहीं अजब चमत्कार वाटला. ते डोळे फाडून नारायणरावांकडे जिज्ञासेनें पाहूं लागले. नारायणराव त्या माणसाचें नांव सांगतील असें वाटलें, पण नारायणरावांलाच स्वताला तें माहीत नव्हतें, मग ते सांगणार कोठून ? ते ह्मणाले "मी एके दिवशीं रात्रीं माझ्या कंपौंडांत तशाच प्रकारचा कोट व टोपी घातलेला एक माणूस बंगल्याभोंवतीं टेहळतांना पाहिला होता. मला पहिल्यानें वाटलें कीं, तो गंगाधर असेल. ह्मणून दुसरे दिवशीं मीं त्याला विचारिलें पण त्याला त्याविषयीं कांहींच ठाऊक नव्हतेंसें दिसलें. थोड्या दिवसांनीं रात्रीचाच पण अंमळ उशीरां, पुनः तोच मनुष्य तशाच पोषाखानें त्याच जागीं दिसला. तेव्हां पाऊल न वाजवितां त्याचे मागून हळूच जाऊन त्याचा हात धरावा असा विचार करून मी मुकाट्यानें त्याचेमागें लपतछपत जाऊं लागलों. त्याच्या व माझ्यामध्यें आतां अगदीं थोडें—सरासरी सातआठ हातांचें—अंतर राहिलें असेल, इतक्या अंतरावरून मनुष्य सहज ओळखतां आला असता, पण त्यानें लोकरी टोपीनें तोंड झांकल्यामुळें त्याचा चेहरा मला दिसेना. तो माझ्या बंगल्याच्या वरच्या खिडकीकडे टक लावून पहात शांतपणें उभा होता. मी अगदीं जपून जात होतों, तरी अखेर माझी चाहूल त्याला ऐकूं गेलीच. त्यानें झट्दिशीं आपल्या कोटाचा घेर सांवरून धरिला आणि जलदजलद लांब फलांगा टाकून चालता झाला. कंपौंडाच्या बाहेर पडल्यावर तो रस्त्याला लागला. पण गंगाधराचें घर ज्या बाजूला आहे त्या बाजूला न जातां अगदीं उलट दिशेला गेला. त्यावरून हा कदाचित् गंगाधर नसावा, अशी शंका माझ्या मनांत येऊं लागली. तथापि खात्री करून घेण्यासाठीं मी तसाच त्याच्या घरीं गेलों. तों गंगाधर आपल्या भावाला शिकवित बसलेला मीं पाहिला."

"तर मग तो गंगाधर नसेल—" त्रिंबकराव मध्येंच ह्मणाले.

"तो गंगाधर नव्हता, याविषयीं आणखी काय प्रमाण पाहिजे? त्यानें आपला कोट दुसऱ्या कुणाला दिला आहे कीं काय ह्मणून पहाण्यासाठीं मीं त्याला "तुझा कोट मला पहायचा आहे, आण पाहूं—" असें ह्मटलें. त्याबरोबर तो उठला आणि खुंटीवरचा कोट त्यानें माझ्या हातांत दिला. लोंकरीची टोपीहि तिथें पलीकडल्या खुंटीवर होती. तेव्हां माझी शंका फिटली. ( त्रिंबकरावांकडे वळून ) आतांतर तुमची खात्री झाली ना, गंगाधराच्या कोटासारखा आणखी एक कोट गांवांत आहे ह्मणून? तुह्मीतर या गोष्टीचा विचार न करतां एकदम त्या गरीब पोरावर तोहोमत घेत होतां!"

अण्णासाहेब इतका वेळ अगदीं चूप बसले होते. ते आतां ह्मणाले "तुह्मी त्याच्या अगदीं जवळ गेलां तेव्हां तो गंगाधरासारखा अगदीं हुबेहुब दिसत होता?"

नारायणरावांनीं उत्तर दिलें "मुद्रेंत सारखेपणा होता कीं नाहीं तें सांगवत नाहीं. कारण, त्यानें तोंड झांकून घेतलें होतें. पण कोटांत, टोपींत आणि उंचींत मात्र फार साम्य होतें."

हें ऐकून अण्णासाहेब किंचित् हंसले, आणि त्यांनीं मंडळीला अमळ बसावयास सांगून गंगाधराला त्याच्या घरीं बोलावणें पाठविलें. थोड्या वेळानें गंगाधर तेथें येऊन दाखल झाला. त्यानें फौजदारसाहेबांस तेथें पाहिलें. पण आपला त्यांच्याशीं कांहीं संबंध आहे, ही गोष्ट त्याच्या स्वप्नींहि आली नाहीं. मागें दोनतीन दिवसांपूर्वी फौजदारसाहेबांनां आपल्या घरांतून बाहेर पडतांना पाहून दाजीसाहेबांची उडालेली गाळण व आतांची गंगाधराची शांत चित्तवृत्ति, यांच्यांत केवढें अंतर होतें! आपण गुन्हा केला आहे असें वारंवार टोंचून सांगणारें भयभीत मन, आणि आपण निरपराधी आहों तोंपर्यंत आपणांस कशाचें भय आहे असें सांगणारें निर्धास्त मन, यांच्यामध्यें जमीनअस्मानाचें अंतर रहाणारच!

गंगाधर तोच कोट व टोपी घालून आला होता. त्याला अण्णासाहेबांनीं फौजदारसाहेबांसमक्ष फार ममताळूपणानें विचारलें "गंगाधर, तुझ्यासारखी कोट व टोपी गांवांत आणखी कुणाची आहे? तुला ठाऊक आहे?"

गंगाधर तत्काळ ह्मणाला "असेल, पण मला माहीत नाहीं." तो नारायणरावांकडे पाहून किंचित् हंसतहंसत ह्मणाला "आणखी तशी कोटटोपी दुसऱ्या कुणाजवळतरी असावी हें खास!"

अण्णासाहेब ह्मणाले "तुला हें विचारण्याचें कारण तुझ्यासारखी कोट टोपी घालणाऱ्या कुणीं माणसानें परवांची नोट बायसिकलवाल्याचे दुकानीं नेऊन मोडिली, असा तपास लागला आहे."

अखेर नोट चोरणाराचा तपास लागला, एवढी खबर ऐकूनच गंगाधराला थोडासा आनंद झालेला दिसला. तो पुनः ह्मणाला "माझ्या कोटटोपीसारखी कोटटोपी आणखी गांवांत कुणापाशीं असेल, नसेल कशावरून? पण मीं कांहीं अद्यापपर्यंत कुणाजवळ पाहिली नाहीं."

फौजदारसाहेब जरा रागीट मुद्रेनें गंगाधराच्या तोंडाकडे पहात होते. गंगाधरहि न डगमगतां त्यांच्या तोंडाकडे धिटाईनें पहात होता. 'कर नाहीं त्याला डर कशाला पाहिजे!' तो ह्मणाला "हाच तो कोट व ती टोपी आहे कीं काय तें पाहून घ्या." असें ह्मणून गंगाधरानें त्या वस्तु काढून फौजदार-साहेबांचे अंगावर टाकिल्या. त्यांनीं त्या हातांत घेऊन पाहिल्यावर ह्मटलें "वा! हा जुन्या चालीचा पोषाखतर राणीच्या बागेंतल्या पदार्थसंग्रहालयांत अगर एखाद्या प्रदर्शनांत ठेवण्यालायक आहे बुवा!"

गंगाधर थट्टेनें ह्मणाला "एवढा हिंवाळा जाऊंद्या, मग पाहिजेतर प्रदर्शनांत ठेवण्यासाठीं मी तो तुह्मांला देईन!" गंगाधराच्या या समयोचित विनोदानें मंडळीला कौतुक वाटलें, हें सांगावयास नकोच.

गंगाधराचा धीटपणा व त्याच्या चेहेऱ्यावरील टवटवी पाहून हा अपराधी नसावा, अशी तेथें जमलेल्या प्रत्येकाची खात्री झाली. तथापि त्रिंबकराव आपले वकिली डावपेंच लढविण्यास पहात होते. ते ह्मणाले "घटकाभर आपण असें धरून चालूं कीं, या कोटटोपीसारख्या पन्नास कोटटोप्या गांवांत आहेत, कबूल! पण, अशी कोटटोपी ज्यांचेजवळ आहे, त्या सर्वांनांतर अण्णा-साहेबांच्या आफिसांत जाऊन त्यांच्या टेबलाजवळ जाण्याचें काम पडत नाहीं ना? त्यांच्या टेबलापर्यंत ज्याचा प्रवेश असेल, त्याच्याच हातून ही चोरी घडण्याचा संभव आहे, हें उघड आहे. तेव्हां याच्या कोटटोपीसारख्या पन्नास कोटटोप्या गांवांत लोकांपाशीं असल्या ह्मणून याच्यावरचा संशय दूर होतो असें नाहीं."

गंगाधराच्या मनाला टोंचण्याच्या बुद्धीनें त्रिंबकरावांनीं हें ह्मटलें होतें, असें नाहीं. तथापि आपल्यावर या मंडळीचा संशय आहे ही गोष्ट गंगाधराला अद्याप कळली नव्हती, हें त्रिंबकराव या क्षणीं विसरले होते. त्रिंबकरावांच्या बोलण्याला आणखी कोणाचा रुकार मिळतो कीं काय, हें जाणण्यासाठीं गंगाधर सर्वांच्या तोंडाकडे टकमकां पाहूं लागला. कोणी बोलत नाहीं असें पाहून तो ह्मणाला

"माझ्याबद्दल ज्या कुणाला संशय असेल त्यानें स्पष्ट बोलावें, असलें मुळमुळीत भाषण नको." हें बोलतांना त्याच्या चेहेऱ्यावर लाली आली होती व त्याच्या त्या मुद्रेवर त्रिंबकरावांविषयीं अत्यंत तिरस्कार स्पष्ट दिसत होता.

फौजदारसाहेबांनीं गंगाधराच्या पाठीवर हलकेच हात ठेवून त्याला कानांत ह्मटलें "रागावूं नकोस, तूं आपला खुशाल जा. तुझ्याविषयीं आमच्या मनांत कांहींएक संशय नाहीं. खरा अपराधी निराळाच आहे आणि तो मला एकट्यालाच माहीत आहे."

फौजदारसाहेबांनीं जावयास सांगितल्यावर गंगाधर मुकाट्यानें चालता झाला. त्रिंबकराव व फौजदार साहेबहि जाण्यास निघाले. त्यांना पोंहोंचविण्यासाठीं अण्णासाहेब व नारायणराव दरवाजापर्यंत आले. कांहीं वेळ ती मंडळी तेथें ओट्यावर उभी राहून बोलत होती. इतक्यांत कृष्णा सहज रस्त्यानें जातांना दिसला. फौजदारसाहेबांनीं त्याला हांक मारिली आणि मोठ्या ऐटीनें आणि अधिकाराच्या तोऱ्यानें "कायरे, गेल्या शनिवारीं रात्रीं तुझा भाऊ गंगाधर घरीं केव्हां आला? तूं जर त्या वेळीं घरीं असलास तर तुला हें ठाऊक असायाला पाहिजे."

कृष्णानेंहि धिटाईनें फौजदारसाहेबांच्या तोंडाकडे पाहून उत्तर केलें "मला ठाऊक असायला पाहिजे, आणि तें मला ठाऊक आहेहि! पण आपल्याला ही माहिती कशाला पाहिजे?"

कृष्णाचें हें उत्तर त्याच्या वयाच्या मानानें अंमळ जास्त धिटाईचें झालें. हें पाहून अण्णासाहेब त्याला ह्मणाले "अरे, पाहिजे आहे कांहीं कामासाठीं. तूं आपला तुला काय माहीत असेल तेवढें सांग ह्मणजे झालें."

कृष्णा उगाच बसला. त्यानें मुकाट्यानें सांगितलें "आठ वाजतां."

फौजदारसाहेबांनीं पुनः विचारिलें "त्यावर पुनः तो बाहेर निघाला होता?"

"त्यानंतर पुनः बाहेर! लहान मुलांनीं ती बाहेर जाण्याची वेळ नव्हे. आमची आई अशा भलत्याच वेळीं आह्मांला बाहेर जाऊं देत नाहीं. आह्मी सगळे दुसरे दिवशीं सुट्टी होती ह्मणून अंमळ बोलत बसलों आणि मग रोजच्यासारखे देवाचें नांव घेऊन निजलों."

कृष्णाच्या या बोलण्यानें फौजदारसाहेबांचें समाधान झालें व त्यांनीं कृष्णास जाण्यास सांगितलें. नंतर बाकीची मंडळीहि आपापल्या घरीं गेली.

## प्रकरण ४१ वें.

# त्रिंबकरावांच्या घरीं.

पुनः दुसरे दिवशीं रात्रीं त्रिंबकरावांच्या घरीं जेवणाचे वेळीं तोच विषय निघाला. आजकाल त्रिंबकरावांच्या डोक्यांत त्याच विषयाबद्दलचे विचार एकसारखे घोळत होते आणि खरा चोर कोण आहे तो पाहून काढण्याची एखादी युक्ति ते शोधित होते.

त्रिंबकराव जेवतांना सहज ह्मणाले "गंगाधराविषयीं कोणाला काय वाटत असेल तें असो, पण ही नोटतरी त्याच्यावांचून खास गेली नाहीं, असें माझ्या मनाला पक्कें वाटतें. तो एकटाच अण्णासाहेबांच्या खोलींत नेहमीं जाणारायेणारा, ज्या वेळीं अण्णासाहेब बाहेर होते त्या वेळीं बाकीची सगळी मंडळी बाहेर आपापल्या कामांत गुंतलेली होती, आणि एकटा तो त्या खोलींत होता; शिवाय ज्यानें ती बायसिकलवाल्याचे दुकानीं मोडली, त्याच्या पोषाखाचें व उंचीचें वर्णन त्याच्याशीं सगळें तंतोतंत जुळतें. एवढा पुरावा जुळल्यावर आणखी काय पाहिजे? प्रत्यक्ष तोंड पाहिलें नसलें ह्मणून काय झालें? जो चोरीचा माल विकील तो उजळ तोंड करून थोडाच विकायला येईल!"

त्रिंबकरावांचे हे शब्द गोदूताईच्या कानीं पडतांच जलसेकाभावानें सुकून चाललेल्या लतेवर वर्षाबिंदु पडल्यावरोबर ती जशी ताजीतवानी होते, त्याप्रमाणें गोदूताईला झालें. त्या ह्मणाल्या "एवढ्या सगळ्या गोष्टी पुराव्याला असतांना त्यानंच चोरी केली असं उघडपणं ह्मणण्याला बाई लोकांनां एवढा संकोच कां वाटतो? तो कोण असा मोठा तिस्मारखां लागला आहे!"

यावर त्रिंबकराव ह्मणाले "संकोच कां वाटतो! मला नवल वाटतें तें तेंच!! अण्णासाहेबांनां तर गंगाधराच्या विरुद्ध एक शब्द बोललेला खपत नाहीं. ते ह्मणतात कीं 'माझी वस्तु मीच स्वतः चोरीन ही गोष्ट जितकी अशक्य आहे, तितकीच ती गंगाधरानें चोरिली असें ह्मणणें अशक्य आहे.' आंधळा विश्वास ह्मणतात तो असा! अण्णासाहेबांचें एक असो, पण फौजदारसाहेबसुद्धां हा चोरीचा आरोप दुसऱ्या कुणावरतरी घालूं पहात असावेत असें दिसतें."

गंगाधरावर अण्णासाहेबांची एवढी मर्जी बसलेली ऐकून गोदूताईनां फारच वैषम्य वाटलें. त्यांनीं कपाळाला आंठ्या घालून विचारलें "दुसऱ्या कुणावर ते आळ घेणार आहेत?"

त्रिंबकराव ह्मणतात " त्याबद्दल ते अवाक्षरसुद्धां बोलत नाहींत; पण मोघम ह्मणतात 'आपल्याला माहित आहे कुणाचें हें कृत्य आहे तें; पण आपण आपली मौज पहातों आहों, प्रसंग येईल तेव्हां बोलूं. गंगाधरासारखी दुसरी कोट टोपी आपण पाहिलेली आहे. आणि त्या माणसाला आपण केव्हांतरी अचानक मुद्देमालासुद्धां पकडूं—आणि तेंहि आजउद्यां हतक्यांत!"

हें ऐकून दाजीसाहेबांची घाबरगुंडी उडाली. त्याची मुद्रा कावरीबावरी होऊन तो चंचल मुद्रेनें इकडेतिकडे पाहूं लागला.

यावर गोदूताई ह्मणाल्या " पण गांवांत त्या कोटासारखा कोट दुसऱ्या कुणाचा आहे, याची एवढी उठाठेव मेल्या शिपुर्ड्यांनां सांगितली आहे कुणीं? एवढे पुरुषांसारखे पुरुष असून त्या एवढ्याशा कारट्याला पकडायला भितात, मग चोरटे व दरोडेखोरांसारखे कुणी आले, तर त्यांनां हे शेंदाडशिपाई काय धरणार आहेत!"

त्रिंबकराव ह्मणतात " मीतरी तेंच ह्मणतों! मीं नुक्तीच फौजदार-साहेबांनां चिठ्ठी पाठविली आहे. तींत लिहिलें आहे कीं, अण्णासाहेब गंगाधरा-वर संशय घेण्यास कांकूं करित आहेत, पण त्यांचें ऐकूं नका. असें केल्यानें गुन्ह्याचा तपास कसा लागेल? तुह्मी आपल्या अन्य रीतीनें गंगाधराचा संशय घेऊन त्याच्यावर पाळत ठेवा. चोराचा चोरी करतांना हातच धरला पाहिजे, असें नाहीं. अमक्यानेंच चोरी केली, एवढें कायदेशीर अनुमान काढण्यापुरता पुरावा असला, तरी बस आहे, असें पुराव्याच्या आक्टांत सहज स्पष्ट ह्मटलेंच आहे. या खटल्यांत गंगाधराच्या विरुद्ध जितका बळकट पुरावा पाहिजे तितका जुळला आहे. आणखी काय पाहिजे?"

गोदूबाईच्या हातचा तिखटमिठाचा मसाला आणि त्यावर त्रिंबकरावाची कायद्याची फोडणी बसल्यावर तो पदार्थ पंक्तीच्या सर्व मंडळीनें मिटक्या मार मारून खाल्ला, यांत काय नवल आहे! त्रिंबकरावांच्या घरांत नोकरांच्या, पोरासो-रांच्या तोंडींसुद्धां याशिवाय दुसरा विषय नव्हता! कोणीं विचारावें "गंगाधराच्या हातांतच बिड्या पडतील, कीं पायांतहि?" कोणीं विचारावें "त्याला किती महिन्यांची शिक्षा होईल?" गोदूताईनींतर विचारिलें कीं " कोर्टांत चौकशी पहाण्यासाठीं बायकांनां येण्याची परवानगी आहे कीं नाहीं?" यापेक्षां गोदूताईनां आणखी उल्हास तो कोणता असणार!

दाजीच्या मात्र मनाला बिलकुल स्वस्थता नव्हती. त्याला आतां एक घास-देखील गिळेना. पंक्तींतून उठण्याची परवानगी मिळाली असती, तर मोठ्या आनंदानें उठून तो पुढच्या कार्याला लागला असता; परंतु सर्वांच्या अगोदर उठतां येईना आणि इकडेतर गप्पागोष्टी करतांकरतां जेवण रोजच्याहून बरेंच अधिक लांबलें होतें. अखेर शेवटचा भात घेऊन मंडळी एकदाची उठली. दाजी सर्वांच्या अगोदर आंचवला आणि हातावर पाणी पडतांच आपल्या खोलींत जाऊन त्यानें पेटींतून एक गांठोडें बाहेर काढिलें व तें उपरण्याखालीं झांकून घेऊन तो परसांत गेला. तेथें गिलक्या दोडक्यांचे व दुसरे कित्येक वेल माजून मोठी जाळी झाली होती, त्या जाळींत त्यानें तें गांठोडें लपवून ठेविलें आणि कांहीं जिन्नस आणण्याचा राहिला होता तो आणण्यासाठीं ह्मणून तो पुनः परत घरांत गेला. जेवण्याचे वेळीं फौजदारसाहेबांचे शब्द ऐकून दाजीसाहेबांची स्वारी घाबरली होती, हें वर सांगितलेंच आहे. त्याला आतां पक्कें वाटलें कीं, फौजदारसाहेब बोलल्याप्रमाणें करावयाला चुकावयाचे नाहींत. त्यांनां कदाचित् बायसिकलवाल्यानें आपलें नांव सांगितलें असेल व त्यावरून आपल्यापाशीं तसा कोट असेल अशी शंका घेऊन एखादे दिवशीं आपणांस पकडावें ह्मणून ते आपल्यावर पाळत ठेवित असतील; आणि यासाठींच ते अलीकडे मधूनमधून रात्रींबेरात्रीं आपले घरीं येऊं लागले असतील. असे विचार मनांत आले ह्मणजे दाजीसाहेबांची गाळण उडे. पण पुनः तो मनांत ह्मणे कीं "याला एक उत्तम तोड आहे. ती साधली, तर फौजदारसाहेबांच्या हातावर तुरी देण्यास मोठेंसें कठीण जाणार नाहीं. हा आपल्याजवळचा कोट व टोपी हीं एवढीं नाहींशीं केलीं कीं मग फौजदारसाहेब कशाच्या आधारावर माझा संशय घेतील? नुसत्या बायसिकलवाल्याच्या सांगण्यावरून? छेः, तें त्यांनां करतां यावयाचें नाहीं. हा कोट टोपीचा मुद्दापत्ता नाहींसा केल्यावर हा गबरू काय त्यांनां दाद द्यायला बसला आहे!"

हा शेवटचा बचावाचा उपाय त्याच्या मतानें अगदीं सोळा आणे उत्कृष्ट ठरून लगेच तो अमलांत आणण्याचा त्याचा संकल्प झाला आणि तेवढ्याचसाठीं तें गांठोडें परसांतल्या वेलींच्या जाळींत लपवून टेवून कुदळ, पावडें आणण्या-साठीं तो घरांत गेला होता. परसांतल्या एका कोंपऱ्यांत लहानसा खड्डा खणून त्यांत तें गांठोडें पुरून ठेवावें व वरून माती लोटून द्यावी, असा त्याचा विचार होता. कुदळ, फावडें ह्या वस्तु घरच्या गड्याच्या स्वाधीन असतात. त्याप्रमाणें

त्रिंबकरावांच्या घरीं सोनबा ह्मणून एक विश्वासू गडी होता, त्याच्या कोठडींत त्या ठेवलेल्या होत्या. त्या आणण्यासाठीं दाजी तेथें गेला आणि घाईघाईनें त्या दोन्ही जिनसा उचलून घेऊन तो जाऊं लागला. सोनबा चिलीम फुंकित बसला होता, त्यानें तें पाहिलें आणि "तुह्मांला या जिनसा रात्रींच्या वेळीं कशाला पाहिजेत? तुह्मी उगीच एखादी जिन्नस पायांवर पाडून घ्याल आणि माझ्यावर तोहोमत आणाल!" ह्मणून सांगून पाहिलें, पण दाजी ऐकेना. तेव्हां "तुह्मांला कुठें खणायाचें तें मला सांगा, मी ती जागा खणून देतों," ह्मणून ह्मटलें; पण दाजीनें तेंहि नाकबूल केलें आणि सोनबाचें पुढील बोलणें ऐकण्यास न थांबतां त्वरेनें त्या दोन्ही जिनसा घेऊन स्वारी धूम पळत परसांत गेली. सोनबानें दुरून त्याला परसांत जातांना पाहिलें. दाजीसाहेबांनां रात्रीचे वेळीं कुदळ फावड्याचें काम काय लागलें ह्मणून सोनबा मनाशीं आश्चर्य करित बसला होता. दाजीसाहेब काय करतात हें एकदा पाहूंतर खरें, ह्मणून तो उठला व हळूच पाऊल न वाजवितां एका झाडाचे आड उभा राहून मुकाट्यानें पाहूं लागला. दाजीनें घाईघाईनें एक खड्डा खणून त्यांत तो कोट व टोपी ठेवून वर माती लोटून दिली व खणलेली जमीन पूर्वींप्रमाणें सपाट केल्यावर कुदळ, फावडें सोनबाच्या खोलींत आणून ठेवून कोणाशीं न बोलतां माडीवर आपल्या खोलींत जाऊन दार आंतून बंद करून घेतलें.

## प्रकरण ४२ वें.

# ही आग कशीतरी विझविली पाहिजे!

त्रिंबकरावांनीं फौजदारसाहेबांनां चिठ्ठी लिहून त्यांत गंगाधराचा पिच्छा सोडूं नका, ह्मणून आग्रहानें सांगितलें होतें, हें वर आलेंच आहे. ती चिठ्ठी वाचून फौजदारसाहेब हंसले आणि ह्मणाले "काय ह्मणावें या खुळ्यांनां! चोर प्रत्यक्ष आपल्या घरांत असून बाहेरच्या माणसाचा पिच्छा पुरवा, ह्मणून धूम आग्रह! काय मौज आहे! पण आतां यांचा भ्रम लवकर दूर करावा हें बरें. नाहींतर ही मंडळी त्या बिचाऱ्या निरपराधी पोराला त्रास देऊन भलतेंचेंसलतें न करोत, ह्मणजे झालें!" असें ह्मणून फौजदारसाहेब त्रिंबकरावांच्या घरीं आले. आल्या-बरोबर त्रिंबकरावांनीं विचारिलें "कां फौजदारसाहेब, माझी चिठ्ठी पोंचलीना?"

फौजदारसाहेबांनीं उत्तर दिलें "हो, पोंचली. ह्मणूनतर मी आतां रात्रीचा आलों."

"माझी सल्ला तुमच्या गळीं उतरली वाटतें! आतां तुह्मी त्याचा चांगला पिच्छा पुरविणार ना?"

"नाहीं. मला तुमच्याशीं कांहीं बोलायचें आहे, तें बोलल्याशिवाय तरी निदान मी ती गोष्ट करणार नाहीं."

हें बोलणें चाललें होतें तेव्हां मुलें जवळ होतीं. ह्मणून फौजदारसाहेब या बाबतींत कांहीं अधिक सांगण्यास कांकूं करित होते. मुलांनीं तेथून जावें ह्मणून त्यांनीं ह्मटलें "कायरे मुलांनों, तुमचे मास्तर अभ्यास नाहीं केला तर शिक्षा देत नाहींत वाटतें?"

"देतातत्तर!" असें मुलांनीं निक्षून सांगितल्यावर फौजदारसाहेब ह्मणाले "मग तुह्मी अभ्यास न करतां मोठ्या माणसांत गोष्टी ऐकत असे बसतां? तुह्मांला मास्तराचा धाक नाहीं का? दम धरा, उद्यां हेडमास्तरसाहेबांनां भेटून तुह्मी घरीं बिलकुल अभ्यास करित नाहीं, ह्मणून सांगतों."

खास हेडमास्तरांचाच धाक घातल्यावर मग कोणता मुलगा बसून राहील!

हेडमास्तरांचा शाळेंतल्या मुलांवर मनस्वी दरारा असे. त्यांचें नांव घेतांच मुलें चळचळ कांपत, याचें कारण ते फार शीघ्रकोपी आणि मारकू असत. त्यांचे शिक्षेचे प्रकारहि फार गमतीचे आणि क्रूरपणाचे होते. यामुळें हेडमास्तरांपर्यंत आपली कागाळी जाणार, हें ऐकतांच सगळीं मुलें पळून गेलीं. फौजदारसाहेबांना हेंच पाहिजे होतें. मुलें उठून गेल्यावर फौजदारसाहेब अंमळ पुढें सरकले.

त्यांचा बोलण्याचा रोंख एकदम पालटला. ते ह्मणाले "तुह्मी गंगाधराचा पिच्छा पुरविण्यास सांगतां, पण तसें करतां येत नाहीं. तुह्मीं किंवा मीं ती नोट घेतली, हें जितकें खरें असण्याचा संभव आहे, तितकाच संभव गंगाधरानें ती घेतली असण्याचा आहे. दादासाहेब! निदान तुह्मींतरी या चोरीच्या चौकशींत विशेषसें अंग ठेवूं नये, असें तुह्मांला माझें मित्रत्वाचें सांगणें आहे."

त्रिंबकराव ह्मणाले "कां बरें? माझातर निश्चय आहे कीं, काय होईल तें होओ, या चोरीचा पुरा तपास करून चोर पाताळांत लपला असला तरी हुडकून काढावयाचा."

फौजदारसाहेब हलक्या आवाजानें ह्मणतात "हें पहा, शिरस्त्यानें ज्या गुन्ह्याची वर्दी माझ्याकडे आली नाहीं, त्यामध्यें मीं लक्ष्य घातलेंच पाहिजे, अशी माझ्यावर कोणत्याहि तऱ्हेची जबरदस्ती नाहीं, हें तुह्मी जाणतांच आहां. गांव आहे तेथें लबाड, लुच्चे, भामटे, चोर नाना तऱ्हेचे गुन्हेगार गुन्हे करित रहातातच. आतां आपण बोलत आहोंना? यावेळींसुद्धां कुणी कुणाशीं मारामारी करित असेल, अगर खिसा कातरित असेल. जोंपर्यंत कायद्याच्या शिरस्त्याप्रमाणें या गुन्ह्यांची वर्दी मला मिळत नाहीं, तोंपर्यंत माझें काय अडलें आहे? होईनात खुशाल गुन्हे! तसेंच या चोरीच्या बाबतींत समजा. जोंपर्यंत अण्णासाहेब अगर तो बायसिकलवाला दुकानदार याबद्दलची फिर्याद माझेकडे आणित नाहींत, तोंपर्यंत अमक्याअमक्याला अटकेंत ठेवणें, किंवा तमक्याच्या घराचा झाडा वगैरे घेणें, हीं कामें मला करतां येत नाहींत; आणि नुसत्या माझ्या स्वताच्या संशयावरून, कोणी फिर्यादी नसतां, तिसऱ्याला त्रास देणें, माझ्यानें होणार नाहीं. सरकारी नात्यानें मला तसें करणें भागच पडलें, तर ती गोष्ट निराळी!"

"त्रास कुणाला द्यावयाचा? गंगाधरालाचना?" त्रिंबकरावांनीं विचारिलें.

"नाहीं. तुह्मी अगदीं चुकतां आणि भलत्याचाच संशय घेतां?"

"तर मग तुह्मी कुणावर संशय घेतां, तेंतरी स्पष्ट ऐकूंद्या." त्रिंबकराव अधीरतेनें ह्मणाले.

फौजदारसाहेब गंभीर स्वरानें ह्मणाले "प्रसंग आला तर नुसतें नांव घेऊन नाहीं थांबणार—अमका हा, म्हणून दाखवीन! हें काम मला आत्तांच्याआतां-देखील करतां येईल, नाहीं असें नाहीं! पण मी ह्मणतों, आपलें काय एवढें अडलें आहे? शिरस्त्याप्रमाणें तें काम आपलेकडे आलेंच तर करतां येईल.

बस, यापेक्षां मला जास्त बोलतां येत नाहीं; आणि दादासाहेब! तुम्हांला माझी विनंति आहे कीं, ह्या बाबतींत आपण मला जास्त विचारूं नये. यांत काय तें समजा."

फौजदारसाहेबांच्या वृत्तींत एकदम झालेला हा फेरफार आणि त्यांची विलक्षण मुद्रा पाहून व विशेषतः "तुम्ही मला या बाबतींत जास्त विचारूं नये!" अशा तऱ्हेचे तोंडून निघालेले शब्द ऐकून त्रिंबकराव गोंधळून गेले. हे शब्द कोणाला उद्देशून असतील आणि काय धोरणानें उच्चारले असतील, हें त्यांच्या लक्ष्यांत येईना. तसेंच जे फौजदारसाहेब आतांपर्यंत आपल्यासारखेच गंगाधराविषयीं संशय घेत होते, तेच इतक्या थोड्या वेळांत त्याच्यावर आपला संशय नाहीं, खरा चोर आपल्याला आत्तांच्याआतां दाखवितां येईल, अशा अर्थाचे खात्रीबंद शब्द काढतात, आणि पुनः चोर सांपडला असूनहि या बाबतींत आपली हात घालण्याची इच्छा नाहीं असें ह्मणतात, हें काय गौडबंगाल आहे, तें त्यांनां कळेना. ते मुकाट्यानें आपल्या मनाशीं विचार करित तक्याला टेंकून पडले. फौजदारसाहेबांनांहि यापुढें तेथें बसणें आवडेना. ते जाण्यासाठीं उठले. त्रिंबकरावांनीं "पानसुपारीतरी खाऊन जा!" ह्मणून आग्रह केला. ह्मणून फौजदारसाहेबांनीं डब्यांतून पान घेतलें. त्रिंबकराव सुपारी कातरित होते; त्यांचें सारें लक्ष्य खालीं आडकित्त्याकडे होतें. फौजदारसाहेबांचे हात पानाच्या शिरा काढण्यांत गुंतलेले होते, पण नजर त्रिंबकरावांच्या चेहेऱ्याकडे होती. आपण आतां जें सुचविलें त्याचा आशय त्रिंबकरावांच्या लक्ष्यांत चांगलासा आला नाहीं, असें त्यांनीं तेव्हांच ताडलें आणि आतां स्पष्टच सांगण्याची पाळी आली आहे असें पाहून ह्मटलें "दादासाहेब! आपल्या लक्ष्यांत माझा भावार्थ अद्यापि नीट आला नाहीं, असें दिसतें. अहो, गंगाधराच्या कोटासारखा दुसरा कोट गांवांत आहे, असें जें मीं आतांपर्यंत हजार वेळां ह्मटलें, तें अगदीं खरें आहे; आणि तो दुसरा कोट बाहेर कुठें नाहीं, तर आपल्याच घरांत आहे. तुमच्या दाजीनें तो मुद्दाम मुंबईहून करवून मागविला, आणि शोध केल्यास आज त्याच्या कपड्यांत सांपडेल. दाजीनेंच तो कोट अंगांत घालून आणि तोंडावरून टोपी ओढून ती नोट बायसिकलवाल्याचे दुकानीं नेऊन मोडली, आणि पांचचार दिवसांत बोभाटा न झाल्यास तिच्याबद्दल अडीचशें रुपयांची बायसिकल घेण्याचें ठरविलें. त्यानेंच ती अण्णासाहेबांच्या कपाटांतून चोरली, यांत शंका नाहीं. शिरस्त्याप्रमाणें कोणीं फिर्याद केल्याशिवाय आणि या बाबतींत अधिक तपास करण्याचें मला भाग पडल्याशिवाय, मी या भानगडींत पडूं इच्छित नाहीं, असें मीं मघां ह्मटलें,

तें एवढ्याचसाठीं. आतां त्या बायसिकलवाल्यावर चोरीचा माल विकत घेतल्याबद्दल मला फिर्याद करतां येईल; पण मग त्यानें तुमच्या दाजीचें नांव सांगितलें, ह्मणजे पंचाईत येऊन पडावयाची. यासाठीं ही गोष्ट आतां आंतले आंत दाबून टाकणें, हेंच इष्ट आहे."

त्रिंवकरावांनां मागें अनेक वेळां फौजदारी खटल्यांत पोलिसाच्या वर्तनाचा आणि कृष्णकृत्यांचा पुरा अनुभव आला होता. खरा गुन्हेगार न सांपडला, ह्मणजे भलत्यालाच गुन्हेगार ह्मणून उभा करणें, त्याला खरपूस 'समज' देऊन त्याचेकडून माजिस्ट्रेटासमोर गुन्हा कबूल करविणें, त्यानेंच गुन्हा केला अशी शाबिती होण्यासाठीं लागणारा पुरावा गोळा करणें किंवा बनावट रचणें, मुख्य सुपरिंटेंडेंटासारख्या अधिकाऱ्यांकडून म्याजिस्ट्रेटांनां खासगी रीतीनें खटल्याची माहिती करून देवविणें व आपणांस पाहिजे तेव्हां, पाहिजे तितके वेळां पुरावा गोळा करण्यासाठीं मुदती मागून घेणें, आरोपीच्या नातलगांनां, त्याच्या इष्टमित्रांनां व साह्यकर्त्यांनां भलभलत्या अडचणींत घालून आरोपीच्या बचावाच्या मार्गांत विघ्नें आणणें, वगैरे गोष्टींचे अनुभव त्रिंवकरावांनां अनेक प्रसंगीं आले होते. तसेंच गुन्हे न घडतील असा बंदोबस्त टेवण्यापेक्षां ते घडल्यानंतर गुन्हेगारांचा तपास करण्यांत पोलिस आपल्या अंगचा सगळा उत्साह, सगळी शक्ति, सगळें चातुर्य व सगळी युक्ति कशीं लढवितात, हेंहि त्यांनां पुरें ठाऊक होतें. असें असतां गंगाधराविषयीं संशय घेण्यास जागा असूनहि फौजदारसाहेब स्वस्थ कसे बसले, याचें त्यांनां आश्चर्य वाटत होतें. तो कितीहि निरुपद्रवी असला, तरी दुसऱ्यांनीं सुचविल्यावरहि पोलिसांनीं त्याच्या वाटेस जाऊं नये, इतके पैसे त्याच्याजवळ खास नव्हते! किंवा तसा त्याचा भारी वशिलाहि पण नव्हता. मग फौजदारसाहेब एवढे मूग गिळून कां बसतात, हें त्रिंबकरावांनां आतांपर्यंत पडलेलें मोठें गूढ एकदम उकललें. या गुन्ह्याचा अधिक तपास केला असतां तें प्रकरण आपल्या दाजीवर शेकेल, हें पाहून मित्रभावानें फौजदारसाहेबांनीं कृपा केली, हें कळतांच त्रिंबकरावांच्या मनाची स्थिति द्विधा झाली. आपल्या शिक्षणाखालीं वाढलेल्या आपल्या प्रत्यक्ष मुलाच्या हातून हें असें कुलाला कलंक लावणारें निंद्य कृत्य झालें असेल काय? या प्रश्नाला "हो, झालें नसेल कशावरून? आपलीं मुलें किती गुणांचीं आहेत हें आपणांस ठाऊक आहेच!" असें उत्तर देण्याचे मार्गांत स्वाभिमान आड येई; परंतु मागें दाजीनें कंत्राटदाराच्या बंगल्यावर दगड फेंकले होते त्या व त्याच्या इतर द्वाडपणाच्या गोष्टींचें

स्मरण होऊन अशा द्वाड मुलाचे हातून चोरी घडणें हें कांहीं मोटेंसें असंभवनीय नाहीं, असें स्वानुभव त्यांस सांगत होता. सारांश, स्वाभिमान व स्वानुभव यांच्यामध्यें या वेळीं तुंबळ युद्ध लागून त्याचें दर्शक असें संदिग्धतेचें चिन्ह त्रिंवकरावांच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होतें. तसेंच पोलिसाच्या कृष्ण कृत्यांवरून त्यांनां 'कानफाटे' असें पडलेलें नांव व त्यांच्या आफिसराचें या बाबतींत आपल्याशीं घडलेलें सभ्यतेचें—किंबहुना ममताळूपणाचें—वर्तन, या दोन गोष्टींतील विरोध दृष्टीसमोर येऊन यांपैकीं पहिली गोष्ट खरी, कीं दुसरी, अशी निर्णया-विषयींची अनिश्चितता त्यांच्या नजरेंत व्यक्त होत होती. फौजदारसाहेबांनीं आपल्या मुलावर विनाकारण आळ घेतला ह्मणून रागावून त्यांची निर्भर्त्सना करून त्यांनां घालवून द्यावें, किंवा ते ह्मणतात तें कदाचित् खरें असें मानून आपल्याविषयीं त्यांनीं जो अकृत्रिम स्नेहभाव दाखविला त्याबद्दल त्यांचे आभार मानावे, हें त्यांनां कळेना. ह्मणून ते कांहींच बोलले नाहींत. फौजदारसाहेब निरोप घेऊन घराचे बाहेर पडले.

आतां रात्र बरीच झाली होती. अकरा वाजण्याचा सुमार असेल. मुलांनां गाढ झोंपा लागल्या होत्या. गोदूताईसुद्धां पेंगावयास लागल्या होत्या. अर्धे जग या वेळीं निद्रासुखाचा अनुभव घेत होतें. एकच दुर्दैवी प्राणी आपल्या कृत्यानें या सुखाला आंचवला होता; आणि त्याच्यामुळें आतां त्रिंवकरावांनांहि तळमळ लागली होती.

फौजदारसाहेब बाहेर पडल्यावरोवर गोदूताई पाण्याचा गडवा घेऊन आंत आल्या. त्रिंबकरावांची खिन्न मुद्रा पाहून त्यांच्या पोटांत एकदम कसेंसेंच झालें. "काय होत आहे? कपाळ का दुखतं आहे?" ह्मणून त्यांनीं विचारिलें. पण "नाहीं!" यापेक्षां अधिक अक्षर त्रिंबकरावांच्या तोंडून निघालें नाहीं.

फौजदारसाहेबांच्या भेटींत कांहीं कमीअधिक कळलें असेल असा तर्क करून गोदूताईनीं पुनः ह्मटलें "फौजदारसाहेब त्या भिकारड्या गंग्यावर तोहोमत घेत नसतील-तर न घेओत. त्यासाठीं आपण जिवाला एवढं वाईट वाटून कशाला घ्यावं?"

ज्या विषयाची चर्चा त्रिंबकरावांचा माथेशूळ उठविण्यास कारण झाली होती, तोच विषय आपल्या बायकोनें काढलेला पाहून त्रिंबकराव चिडले आणि ह्मणाले "गप्प बैस. माझें डोकें भणाणूं नकोस. त्या गंग्यानें असें काय केलें आहे त्याच्यावर तोहोमत घ्यायला? करणारा तर निराळाच आहे! आतां ही आग कशीतरी विझविली पाहिजे मला."

## प्रकरण ४३ वें.

# कुसुम.

अण्णासाहेबांचा मुलगा नाना एके दिवशीं सहज रस्त्यानें चालला असतां त्याची व गंगाधराची वाटेंत गांठ पडली. गंगाधरालाहि त्याच दिशेकडे जावयाचें होतें. तेव्हां अर्थातच उभयतां बोलतबोलत बरोबर चालले. नानानें हंसतहंसत विचारिलें " कां गंगाधरपंत, तुमचा तो वाघ्या कोट कुठें आहे ? नीट जपून टेविला आहेना ? नाहींतर पहा बरें, प्यारिसच्या प्रदर्शनांत पाठविण्यासाठीं लोक तो उडवितील !"

गंगाधरानेंहि तसेंच हंसतहंसत ह्मटलें "ह्मणूनच मी आतांशीं घालित नाहीं. नाहींतर एखादी लोकांची उगीच दृष्ट लागायची !"

" हो, बरी गांठ पडली. तूं आज संध्याकाळीं आमच्या घरीं फराळाला आलें पाहिजे. कां 'हो' लवकर निघत नाहीं तोंडांतून ? कांहीं कामबिम आहे वाटतें?"

गंगाधर ह्मणाला "कामबिम कसलें ? नेहमींचें आपलें अभ्यासाचें काम."

नाना ह्मणतो " रात्रंदिवस अभ्यास करकरून तुला काय वेडा व्हायचें आहे? एकसारखा अभ्यास करून तूं काय साक्रेटीस होणार आहेस कीं नेपोलियन होणार आहेस ? तुला व्हायचें आहेतरी काय ? "

"छेः छेः, साक्रेटीस किंवा नेपोलियन होण्याला अभ्यास कशाला पाहिजे आणि एवढें मोठें माझें भाग्यतरी कुठें आहे ? पण जगांत नीट रीतीनें राहून स्वताच्या व लोकांच्या उपयोगीं पडण्याची शक्ति अंगीं येण्यापुरता अभ्यास हा केलाच पाहिजे. "

यावर नाना ह्मणाला "अभ्यासाशिवाय कांहीं अडचण नाहींना तुला यायला?"

" नाहीं. "

" तरमग तुला आलेंच पाहिजे. आमच्या घरची एकूणएक मंडळी तुला किती चाहतात, तें तुला ठाऊक नाहीं ! याविषयीं नुक्ती घडलेली एक गोष्ट तुला सांगतों. अलीकडे काय कारण असेल तें असो, पण दाजी आणि त्याचा धाकटा भाऊ यांनीं आमचेकडे येणेंजाणें पूर्वीपेक्षां पुष्कळ अधिक ठेविलें आहे. एके दिवशीं काय झालें, माझी धाकटी बहीण कुसुम ही आमचेमधेंच खेळत होती आणि खेळतांखेळतां कशावरून कोण जाणे, पण तुझ्या कृष्णाचा वर्गांत पहिला नंबर नेहमीं असतो अशी कांहीं गोष्ट निघाली. तेव्हां दाजी काय ह्मणतो ' त्यांत

काय मोठें नवल झालें ? त्याला रात्रंदिवस आईन् गंगाधर पढवित असतात.' त्यावर मीं तुझें संस्कृत चांगलें आहे ह्मणून तारीफ केली. तसा तो काय ह्मणतो ' आहे ठाऊक ! ज्याला दुपारची भ्रांत येऊन पडली होती, तो आतांशीं मोठा पंडित ह्मणून नाक लावायला लागला आहे ! ' हें त्याचें बोलणें ऐकून मलातर संताप आलाच; पण आमचीं कुसुम दहाअकरा वर्षांची पोर ना ! तिला तुमचें संस्कृतबिंस्कृत काय कळतें–पण तिलासुद्धां त्याचें तें बोलणें खपलें नाहीं. ती तुझा कैवार घेऊन भांडायला उठली आणि ह्मणाली 'आपल्याला करायचं नाहीं अन् दुसऱ्याचं पहावत नाहीं ! तुला शिकूं नकोस म्हणून कुणीं ह्मटलं आहे का ? मग कां नाहीं तूं त्याच्यासारखा होत ? तो शिकून जितका विसरला असेल त्याच्या चौथा हिस्सा तूं आणि तुझे भाऊ मिळून कधीं पढलां नसाल ! आतां त्याच्या गरिबीविषयीं ह्मणशील, तर गरीब किंवा श्रीमंत आईबाप मिळणं, हें कांहीं कुणाच्या हातचं नसतं; पण चांगला अभ्यास करणं, हुषार होणं, चांगलं ह्मणवून घेणं, हें ज्याच्यात्याच्या स्वाधीनचं आहे. तूं एवढ्या मोठ्याचा मुलगा असून तुला लोक चांगले ह्मणत नाहींत आणि त्यालाच कां ह्मणतात ?' दाजीला गंगाधराच्या स्तुतिपर शब्द आणि तेहि अशा रीतीनें त्याच्यासमक्ष कुसुमनें काढलेले कसे खपावेत ! तो तिचें बोलणें संपण्यापूर्वींच ह्मणाला ' अहाहा ! आहे ठाऊक त्याचा चांगुलपणा. पण तुला पोरीला तो सांगून काय करायचें आहे? तुला तो चांगला वाटत असला तर घे त्याला नवरा करून !' कुसुम यावर कांहीं बोलली नाहीं. ''

हे शेवटचे शब्द दाजीनें तिला निरुत्तर करण्याकरितांच उच्चारले होते, हें सांगावयास नकोच. कुसुमनें त्यावर कांहीं उत्तर दिलें नाहीं हें खरें. पण त्याचें कारण ते शब्द तिच्या मनाला लागले असें नाहीं. कारण, त्यानें जरी ते शब्द तिरस्कारानें उच्चारले होते, तरी, तो तिरस्कार त्याच्या मुद्रेंतच राहिला. ते शब्द बिचारे निरुपद्रवीच होते; किंबहुना ते तिच्या मनाला थोडेसे सुखदायी झाले, असेंसुद्धां ह्मणण्यास हरकत नाहीं. दाजी आणि गंगाधर या दोघांत तुला कोण आवडतो, असें आपणांस कोणीं विचारलें, तर आपण गंगाधरालाच पसंत करूं, असें दोघांची तुलना मनोजवानें केल्यावरून एकदम तिचें मत बनलें होतें. यामुळें दाजीनें तिच्या मनाला लागावें ह्मणून उच्चारलेले शब्द उलट तिला आतां सुखदायी वाटले व पुढेंहि ते सुखपरिणामी झाले, यांत नवल नाहीं ! हे तिचे विचार,

ही तिच्या मनाची स्थिति, कांहीं अंशीं लज्जेमुळें व कांहीं अंशीं तिच्या सौजन्यामुळें तिला शब्दांनीं व्यक्त करतां येईना, एवढेंच कायतें.

नानानें—कुसुमच्या प्रत्यक्ष भावानें—आपल्या बहिणीविषयींची ही गोष्ट सांगितली, ती खोटी, असें गंगाधराच्यानें कसें ह्मणवेल? तो कांहींच बोलला नाहीं. इतक्यांत गंगाधराचें घर जवळ आलें, तेव्हां राधाबाईजवळ गंगाधराचें रात्रीचें फराळाचें आमंत्रण देऊन नाना निघून गेला. जातांना संध्याकाळीं "जरूर जरूर ये, कोणतीहि सबब चालायची नाहीं—" असें तो तीनतीनदा बजावून गेला.

त्या दिवशीं कुसुमचा वाढदिवस होता, ह्मणून तिच्या बरोबरच्या मैत्रिणींनां आणि मुलांनां दुपारींच जेवण्यास बोलवावयाचें होतें; परंतु दुपारीं मुलांनां शाळेंत जाण्याची घाई असते ह्मणून संध्याकाळीं निचिंतीनें फराळास बोलाविलें होतें.

संध्याकाळीं गंगाधर आपला नवा कोट घालून अण्णासाहेबांचे घरीं जाण्यास निघाला. वाटेंतच सोनीहि तिकडेसच जातांना त्याला दिसली. लहानपणापासूनच तिचा बांधा चांगला गोंडस असून नीटनेटकें रहाण्याची आणि झकपक पोषाख करण्याची तिला फार हौस होती. शिवाय, तिचें चालणें टेपराईचें असे, यामुळें ती फारच मोहक दिसे. तिला आतां बारावें संपून तेरावें वर्ष नुकतेंच लागलें होतें. या वयाच्या मुली अविवाहित क्वचितच् सांपडतात. पण नारायणराव फार गरीब आणि साधुवृत्तीचा मनुष्य असल्यामुळें मुलीबरोबर हुंडा देण्यास त्याच्याजवळ पैसे नव्हते. घरांत उलट पैसा देणारीं, कांहीं बिजवरांचीं, तिजवरांचीं स्थळें तिला सांगून आलीं होतीं, पण पैशाच्या लालचीनें मुलीला एखाद्या जिवंत प्रेताच्या गळ्यांत बांधणाऱ्या कसायांपैकीं नारायणराव हे नव्हते. सोनीचा स्वभाव अंमळ भोळा पण हट्टी होता; आणि पोरस्वभावानुरूप दागदागिनें घालण्याची व झकपक रहाण्याची तिला फार हौस असे, एवढेंच. यापलीकडे तिच्या अंगीं दोष ठेवण्याला यत्किंचित्‌हि जागा नव्हती. रूप पाहिलें तर शंभरांत काय, पण हजारांत टळक दिसणारी ती होती. तिचा आवाज मधुर होता. तशीच ती साधारण लिहिण्यावाचण्यासहि शिकली होती. पण जगाची प्रवृत्ति अशी उलटी आहे कीं, तिच्या बापाच्या एका दारिद्र्यदोषामुळें तिच्या स्वरूपाची, गुणांची आणि शिक्षणाची किंमत करण्याची कोणाला बुद्धि झाली नाहीं! एखादी ह्मैस किंवा गाय घेणें झाली तरी तिची किंमत तिच्या अंगच्या गुणांवरून आपण करितों,

तिच्या स्वरूपावरून आणि चालण्यावरून करितों, तिच्या दाव्यावरून करित नाहीं; पण सून करावयाची झाली ह्मणजे मात्र आपण तिच्या कुळाशिळाकडे, तिच्या स्वरूपाकडे, तिच्या अंगच्या सौजन्यादि गुणांकडे, तिच्या चालचलणुकीकडे, तिच्या शिक्षणाकडे, कशाकडे पहात नाहीं, तिच्याबरोबर किती रुपये हुंडा ह्मणून घरांत येतील, इकडे पहातों! ही हुंडापद्धति आमच्या सुशिक्षित ह्मणविणारांमध्यें आणि त्यांतहि शहरांत राहाणारांत विशेष दिसते. वाढत्या सुधारणेचें हें खासें चिन्ह ह्मणावयाचें! या सुधारणेच्या काळांत गाईह्मशींइतकीसुद्धां मुलींची काळजीपूर्वक परीक्षा आह्मी करित नाहीं. आमच्या मुलांचें लग्न रुपयांच्या थैलीशीं करणें जर शक्य असतें, तर अंतर्पाट धरण्याचे वेळींसुद्धां मुलगी आणून उभी करण्याची आवश्यकता आमचे लोकांनां एवढी वाटली नसती! तिच्या ऐवजीं रुपयांची थैलीच त्यांनीं ठेविली असती!!

## प्रकरण ४४ वें.

# गंगाधराच्या मनांतली शंका.

त्या दिवशीं संध्याकाळीं अण्णासाहेबांच्या घरीं मुलांचा धुमाकूळ चालला होता. खाणेंपिणें, थट्टामस्करी व विनोद, सोंगट्या, बुद्धिबळें, पत्ते, बिझिक वगैरे खेळ यांत वेळ किती जलद निघून गेला, याचें कोणाला भानहि राहिलें नाहीं. आठ वाजले, नऊ वाजले, साडेनवांची तोफ झाली, तेव्हां मात्र मंडळी सावध झाली आणि घरोघर जाण्यास निघाली. या वेळींतरी या बालगोपाल मंडळीनें मोठ्या कष्टानेंच निरोप घेतला. रात्र झाली तेव्हां आपल्याला घरापर्यंत कोण पोंचवून देईल, ह्मणून सोनीला काळजी येऊन पडली. गंगाधराची सोबत थेट घरापर्यंत होती. ह्मणून " तिला नीट संभाळून घेऊन जा आणि जानकीबाईच्या स्वाधीन कर, " असें अण्णासाहेबांच्या कुटुंबानें गंगाधराला बजाविलें. चांदणीरात्र असल्यामुळें बरोबर कंदील देण्याचें कारणच नव्हतें. गंगाधर पुढें झाला, त्याच्या मागोमाग सोनी घराचे बाहेर पडली. अण्णासाहेब खिडकींत उभे होते. त्यांनां गंगाधराशीं कांहीं काम होतें. ह्मणून त्यांनीं त्याला हांक मारली. सोनीला घरीं पोंचवावयाचें आहे ह्मणून गंगाधर ह्मणूं लागला. इतक्यांत दाजीसाहेबांच्या पाठचा भाऊ शिदू हाहि घरीं जाण्यास निघालेला पाहिला. तेव्हां सोनीला पोंचविण्याचें काम त्याच्यावर सोंपवून गंगाधराला त्यांनीं वर बोलाविलें.

गंगाधर वर गेला आणि नम्रतेनें उभा राहिला. त्याला पाहून अण्णासाहेब ह्मणाले " तुला मीं कां बोलाविलें तें समजलास ? मी तुला आफिसांतच गांठून कांहीं सांगणार होतों, पण त्या वेळीं तें विसरलों. तुला पाहिल्याबरोबर आतां मला त्या गोष्टीचें स्मरण झालें. ह्मणून आतांचे आतां तुला ती गोष्ट सांगून टाकण्यासाठीं हांक मारली. आपल्या पेढीची शाखा गुजराथेंत काढून तुला तिकडे पाठविण्याचा प्रथम माझा बेत होता. पण तो आतां फिरला. तुझ्याबद्दल नारायणरावांनां तिकडे पाठविण्याचा माझा विचार ठरत आहे. " इतकें बोलून अण्णासाहेब थांबले. गंगाधरहि चूप राहिला.

अण्णासाहेब पुढें ह्मणाले " नारायणराव फार दिवसांचे नोकर आहेत. पेढीच्या कामाचा अनुभवहि त्यांनां तुझ्यापेक्षां फार अधिक आहे. तेव्हां नवीनच काढलेल्या दुकानीं त्यांच्यासारखा अनुभवी मनुष्यच पाहिजे."

" बरें आहे. " गंगाधरानें उत्तर दिलें.

अण्णासाहेब ह्मणाले " हे तुझे शब्द मनापासून निघालेले दिसत नाहींत. तुझी नाउमेद झाल्यासारखी दिसते. "

गंगाधराची नाउमेदतर झालीच होती. पण त्यापेक्षांहि कांहीं विलक्षण कल्पना त्याच्या डोक्यांत येऊन त्याच्या जिवाला अति वाईट वाटून राहिलें होतें. या कल्पनेची गंधवार्ताहि अण्णासाहेबांनां नव्हती.

गंगाधर ह्मणाला " नाउमेदतर खरीच. गुजराथेंत जाऊन नव्या कामांत आपली हुषारी दाखविण्याची संधि आलेली आहे ती साधावी, अशी माझी फार फार इच्छा होती. पण मालकांची जर तशी परवानगी नाहीं, तर अलबत माझी इच्छा माझेपाशींच राहिली पाहिजे, आणि ते सांगतील तसें मला वागलें पाहिजे. मला पाठविण्याचा पहिला बेत रद्द होण्याशीं परवांच्या त्या भानगडींत माझ्यावर आलेल्या संशयाचा कांहीं संबंध नसला ह्मणजे पुरे आहे. "

हें शेवटचें वाक्य ऐकून अण्णासाहेब दचकले आणि गंगाधराची त्या वेळची कांहींशी कोपाविष्ट, कांहींशी दुःखी आणि एकंदरींत असमाधानकारी मुद्रा अवलोकन केल्यावर अण्णासाहेबांनां कांहीं चमत्कारिकच वाटलें. गंगाधराचें बोलणें हंसण्यावारीं सोडावें, तर तो अगदीं गंभीरवृत्तीनें वरील शब्द बोलला होता; आपणहि तसेंच गंभीरपणानें बोलावें, तर त्याला आलेला संशय इतका पोरकट-पणाचा होता कीं, त्याचें कोणालाहि हंसूं येईल. म्हणून अण्णासाहेबांनीं थोडेंसें थट्टेंत व थोडेंसें गंभीरपणानें ह्मटलें " गंगाधर ! तुला कांहीं वेडबीडतर नाहीं लागलें ? तुझ्यावर मीं चोरीचा संशय घातला ह्मणून तुला कुणीं सांगितलें ?"

गंगाधर ह्मणाला " पण आपण त्या बाबतींत अगदीं स्तब्ध राहिलां, आपलें मन माझ्याविषयीं कलुषित झालेलें नाहीं असें आपण कधीं बोललां नाहीं !"

अण्णासाहेब ह्मणाले " हें तुझ्याजवळ बोलण्याची जरूर काय होती ? मीं तुला नोकरींत ठेवलें होतें, तुझ्या हातीं हजारो रुपयांच्या हुंड्या व महत्त्वाचे दस्तऐवज मी देत राहिलों होतों; तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास होता, या गोष्टीला आणखी दुसरा पुरावा काय पाहिजे होता ! तुझी मला खात्री न वाटती तर तुला मीं आपल्या घरीं बोलावून आमच्या मुलांमाणसांशीं इतके मोकळेपणानें वागूं दिलें असतें, असें तुला वाटतें काय ?"

गंगाधरानें ज्या उतावीळपणानें व कांहीं अंशीं अविचारानें वरील प्रश्न विचारला होता तो उतावीळपणा व तो अविचार आतां त्याच्या चटकन् ध्यानांत आला आणि आपल्या हातून ही मोठी चूक घडली याबद्दल त्याच्या मनाला

वाईटहि वाटलें. तो ह्मणाला " आतां आलें माझ्या ध्यानांत. माझ्या मनानें आपल्याविषयीं नसती कुकल्पना काढली, ही माझ्या हातून चूक घडली. माझ्या-बद्दल आपलें मन कलुषित झालें नव्हतें, ही गोष्ट माझ्या लक्ष्यांत यावयाला पाहिजे होती. मी अधिकाराबाहेर शब्द बोललों, त्याची क्षमा व्हावी. "

अण्णासाहेब ह्मणाले " गंगाधर, मी त्या वेळीं स्वब्ध बसलों याचें कारण फार निराळें होतें. नोट कशी गेली याविषयीं शेंकडो निरनिराळे तर्क माझ्या मनांत त्या वेळीं येत होते, आणि अजूनहि येतात. तुझा तर्क काय आहे ? "

हा प्रश्न ऐकून गंगाधराला फार आश्चर्य वाटलें, आणि तो चांचरतचांचरत "कांहीं नाहीं," एवढेंच बोलला. चांचरत बोलण्याचा हा त्याचा पहिलाच प्रसंग होता.

अण्णासाहेबांनीं त्याचें तें उत्तर ऐकलें किंवा नाहीं कोण जाणे ! त्यांचें त्याच्या त्या उत्तराकडे लक्ष्य नव्हतें असें दिसलें. त्यांनीं पुनः तोच प्रश्न केला. त्यावर गंगाधर पुनः ह्मणाला " माझा एक तर्क आहे, पण तो मला बोलून दाखवितां येत नाहीं."

" आला माझ्या ध्यानांत !" अण्णासाहेब ह्मणाले. " असो. पण आतां ती सगळी भानगड आपआपसांत मिटली आहे. फौजदारांनीं मुकाट्यानें मला ती नोट आणून दिली आणि मीं हें प्रकरण इथेंच दाबून टाकावें, ह्मणून विनंति केली आहे. तेव्हां आतां त्या प्रकरणाचें पुनः नांव काढायला नको. पण तुझ्या-विषयीं माझें मत काय आहे, त्याविषयीं तुझी खात्री झाली ना ? आतां पुनः अशी भलभलती कल्पना काढूं नकोस. आपण दोघे परस्परांनां चांगलें ओळखत आहों, आणि पूर्वीपासून तुला मी आपल्या मुलाप्रमाणें मानित आलों आहें. एवढ्यानेंच झालें नाहीं, तुझ्याविषयीं मला केवढा अभिमान वाटत आहे, तो आणखी कांहीं दिवसांनीं तुला कळेल !"

अण्णासाहेब नेहमीं शांत आणि मितभाषी असत. असें असतां आज गंगा-धराशीं त्यांचें वर्तन अगदीं निराळ्या प्रकारचें घडलें. कोणाविषयीं आपलें मत कसें आहे व तें आपण कोणत्या रीतीनें कृतींत व्यक्त करणार आहों, ही गोष्ट ते कधीं कोणाजवळ बोलून दाखवित नसत; परंतु आज गंगाधरापाशीं तें सगळें आपोआप स्फूर्ति होऊन बाहेर पडलें. तें ऐकून गंगाधराला केवढें समाधान वाटलें, तें त्याच्या मनालाच ठाऊक ! अण्णासाहेबांचे ते अत्यंत प्रेमळ शब्द त्याच्या कानांत सारखे गुणगुणत होते व त्यांची जेव्हांजेव्हां त्याला आठवण होई, तेव्हां तेव्हां गंगाधराला आपल्या आयुष्यांतला हा अत्यंत महत्त्वाचा उत्सवाचा काळ आहे, असें वाटल्यावांचून रहात नसे.

## प्रकरण ४५ वें.

# डोळ्यांत अंजन घातलें.

गंगाधर घरीं परत आला, तेव्हां बरीच रात्र झाली होती. राधाबाई त्याची मोठ्या उत्कंठेनें वाट पहात बसल्या होत्या. गंगाधर घरीं सुखरूप आलेला पाहून राधाबाईंना मोठें समाधान वाटलें, हें सांगावयाला नकोच. त्याच्याशीं थोडा वेळ अण्णासाहेबांच्या घरच्या जेवणाखाणाविषयींच्या गोष्टी केल्यानंतर राधाबाईंला एकाएकीं कांहीं आठवण होऊन त्या गंगाधराला ह्मणाल्या " बाळा, तूं आतां थकूनभागून आला असशील; अशा वेळीं तुला काम सांगूं नये, पण तसंच जरूरीचं आहे ह्मणून सांगत्यें. ही एवढी रवी सोनीच्या घरीं आधीं नेऊन दे पाहूं! उजाडण्याच्या अगोदर ताक करायला त्यांना लागेल. रात्रीच्यारात्रीं पोंचती करीन, अशा कबुलीवर मीं ती आणिली होती. त्या कबुलीप्रमाणं आपल्याला वागलं पाहिजे—"

गंगाधर आतां आळसावला होता. झोंपेनें त्याचे डोळेहि जड झाले होते. ह्मणून त्यानें ह्मटलें "सकाळीं उजाडल्यावर नेऊन दिली, तर नाहींका चालणार?"

गंगाधराचे हे कंटाळवाणे शब्द ऐकून राधाबाईंलाहि अंमळ चमत्कारिक झालें. 'नाहीं' ह्मणावें, तर मुलाला त्याची झोंप मोडून घराबाहेर रात्रीचें पाठवावें लागतें. 'हो' ह्मणावें, तर तोंडांतून गेलेला शब्द खोटा होतो. अशा अडचणींत क्षणभर राधाबाई मुग्ध होऊन बसल्या. पण लगेच त्यांचा स्वाभाविक चपळपणा आणि प्रतिज्ञापालनाचा धर्म जागृत होऊन त्यानें राधाबाईंच्या मनांत ' नाहीं !' ह्मणण्याची प्रेरणा केली. राधाबाईंला जसा आळस ठाऊक नव्हता, तसेंच गंगाधराला मात्राज्ञोल्लंघन ठाऊक नव्हतें त्यामुळें आईची आज्ञा होतांच गंगाधराची स्वारी उठली, आणि अंगावर आलेली सुस्ती एकदम झाडून टाकून रवी हातीं घेऊन त्वरेनें दार उघडून तो सोनीच्या घराकडे निघाला.

गंगाधर सोनीच्या घरीं गेला, तोंपर्यंत ती घरीं येऊन पोहोंचली नव्हती. अण्णासाहेबांच्या घरच्या मेजवानीहून गंगाधर परत आला, हें पाहून जानकीबाईंनीं "आमची सोनी कशी अद्याप आली नाहीं?" ह्मणून साहजिकच त्याला प्रश्न केला. गंगाधराला तो प्रश्न ऐकून आश्चर्य वाटलें. कारण, ती व त्रिंबकरावांचा मुलगा शिदू, अशीं दोघें घरीं येण्यासाठीं निघून पुष्कळच वेळ झाला होता. तीं निघाल्यावर दहापांच मिनिटें अण्णासाहेबांशीं व नंतर घरीं आपल्या आई

गंगाधर पुष्कळ वेळ बोलत बसला होता. रस्त्यानें तीं दोघें कितीहि गमलीं असलीं, तरी आतां तीं घरीं येऊन पोहोंचावयाला पाहिजे होतीं. तथापि आपलें आश्चर्य शब्दांनीं किंवा मुद्रेनें व्यक्त न करतां तो मुकाट्यानें उभा राहिला. "एवढी रात्र झाली, अद्यापि ती पोर काय करते आहे तिकडे ! गंगाधर, बाबा तूं अण्णासाहेबांच्या घरीं जाऊन तिला लवकर घेऊन ये," म्हणून जानकीबाईनीं त्याला मोठ्या विनवणीच्या शब्दांनीं सांगतांच, गंगाधर जरी झोंपेनें पेंगला होता, तरी त्याच्या सौजन्यामुळें 'नाहीं' हा शब्द त्याच्या तोंडांतून निघाला नाहीं. तो तडक अण्णासाहेबांच्या घराकडे निघाला. तों शिदू आणि सोनी वाटेंत एके ठिकाणीं चबूतऱ्यावर गप्पा मारित बसलेलीं त्याला आढळलीं. गंगाधरानें सोनीला म्हटलें "सोने! एवढी रात्र झाली, तरी तूं अद्याप घरीं नाहीं गेलीस? जानकीबाई मघांपासून तुझी वाट पहात आहेत!"

गंगाधराचें हें भाषण ऐकून सोनी फार घाबरली आणि मुकाट्यानें उठून चालूं लागली. पण शिदूला त्याचा फार राग येऊन तो म्हणतो "तुझ्यासारखे घरकोंबडे कुठें आहों आम्ही? अन् मोठी रात्र अशी ती काय झाली? सगळे अकरा वाजले हेंच कीं नाहीं? भागूबाई भित्री आणि दुसऱ्याला भीति दाखविते! सोने! तूं नकोस ग जाऊं याच्याबरोबर. काय करतोय हा, तें मी पहातों!"

गंगाधरानें त्याच्याकडे तिरस्कारयुक्त दृष्टीनें एकदा पाहिलें आणि कांहींएक न बोलतां पाठ फिरविली. सोनीनेंहि जातांजातां शिदूकडे एकदा हळूच वळून पाहिलें आणि पुनः भेटण्याविषयीं कांहीं नेत्रसंकेत करून घरची वाट धरली. गंगाधर वाटेनें सोनीशीं कांहींएक बोलला नाहीं. या उभयतांच्या नव्या मैत्रीविषयीं तर्कवितर्क करित तो चालला होता. सोनीला जानकीबाईच्या स्वाधीन करून गंगाधर नंतर आपल्या घरीं गेला.

सोनी घरांत आल्यावर जानकीबाईनीं तिला उशीर होण्याचें कारण विचारलें; परंतु "लक्ष्मीकाकूंनीं मला फार आग्रह करून चार घटका थांबवून घेतलं होतं," अशी खोटीच बतावणी करून सोनीनें ती वेळ मारून नेली. मागेंहि अशीच "राधाकाकूकडे गेल्यें होत्यें," वगैरे खोटी सबब सांगून मनास वाटेल तिकडे स्वच्छंदपणें भटकण्याची चटक तिला लागली होती, ही गोष्ट बारिक शोधाअंतीं गंगाधराला कळली होती. त्यामुळें आतांच्यासारखी तेव्हांहि ती शिदूच्या संगतीं गप्पा मारित नदीच्या घाटावर बसली असेल, अशी साहजिकच त्याची कल्पना धावली. आणि ही त्याची कल्पना कांहीं फारशी चुकली नव्हती. कारण घरीं

जानकीबाई सोनीला नेहमीं आरशांत पाहूं नकोस, लहान कुंकूं लावूं नकोस, चुनडी नेसूं नकोस, मोठ्यानें हंसूं नकोस, अशी हरएक गोष्टीची मनाई करित असत व शिवाय सोनीच्या घरांत बोलाचालायला तिच्या बरोबरीचें कोणी माणूस नसल्यामुळें, तिला वडील माणसांत नेहमीं बसावें लागे. यामुळें तिच्या वयानुरूप हंसण्याखिदळण्याची आणि मनमुराद हिंडण्याफिरण्याची तिची हौस कधींच फिटत नसे. या सासुरवासाला सोनी अगदीं मनापासून कंटाळली होती. आणि फार जाच झाला ह्मणजे मुलीहि धीट होतात, या सामान्य नियमाप्रमाणें सोनीहि जानकीबाई रागावतील कीं काय, या गोष्टीची आतां विशेषशी पर्वा न बाळगतां, मनास वाटेल तेव्हां जानकीबाईंची नजर चुकवून बाहेर पडत असे व बरोबरचा खेळगडी भेटेल त्याच्याशीं घटकाभर मनमुराद खेळून अथवा गप्पागोष्टी करून हळूच चोरून घरांत प्रवेश करित असे. चोरी उघडकीला आलीच तर "राधाकाकूंच्या घरीं गेल्यें होत्यें," ही सबब तयारच असे! दाजी व शिदू सोनीच्या या धीटपणाचा व मनमिळाऊपणाचा दुरुपयोग करून तिला अशा कामीं अधिकच उत्तेजन देत होते. जानकीबाईंनां फसविण्याच्या रोज नव्यानव्या क्लृप्त्या काढण्यांत हें बंधुद्वय निष्णात् होतें. मागें नारायणरावांच्या बंगल्याभोंवतीं गंगाधराच्या कोटासारखा कोट घालून एकजण रात्रीच्या घिरट्या घालित फिरे ह्मणून सांगितलें आहे, तो दाजीच होय, व असें करण्यांत त्याचा उद्देश सोनीच्या दृष्टीस पडून तिला बाहेर येण्याविषयीं खूण करण्याचा होता, हें सांगावयाला नकोच.

एके दिवशीं सोनी राधाबाईंच्या दारावरून जावयाला आणि गंगाधर घरांतून बाहेर पडावयाला, एकच गांठ पडली. सोनीची ती घाबरी मुद्रा व घरीं परत जाण्याची त्वरा पाहून गंगाधराला एकदम शंका येऊन त्यानें तिला थांबवून ह्मटलें "सोने, तूं कुठें गेली होतीस ग? जानकीमावशी तुला पहाण्यासाठीं दोनदा इकडे येऊन गेल्या. 'राधाकाकूंच्या घरीं गेलें होतें!' ही सबब आतां नाहीं तुझ्या उपयोगीं पडणार, बरें का!"

हें ऐकून सोनी फारच गडबडली व तिनें घाबऱ्याघाबऱ्या गंगाधराला विचारिलें "खरंच का मावशी दोनदा मला पाहून गेली?"

गंगाधर ह्मणाला "हो. पण तूं इतका वेळ होतीस कुठें? अलीकडे तुझी न् त्या दाजीची व शिदूची फार गट्टी जमली आहे. पण संभाळ हो! ते दोघेहि

एक नंबरचे द्वाड आणि वाईट आहेत. हां हां ह्मणतां तुला फशीं पाडतील."

दाजी व शिदू यांच्याविषयीं हा वाईट अभिप्राय ऐकून सोनीच्या अंगाचा मनस्वी संताप झाला. तो संताप थोड्याफार अंशानें शब्दांनीं व्यक्त केल्यावांचून तिच्यानें रहावेचना. ती ह्मणाली "पण ते कसे आहेत हें तुला कुणीं विचारलं होतं ?"

"तुझ्या अंगीं इतकी धिटाई आली असली तर मीं पाहिलेली गोष्ट जानकीबाईच्या आणि नारायणरावांच्या कानांवर मला घातली पाहिजे. तुझ्या बऱ्याची गोष्ट तुला वाईट लागते, तेव्हां त्यांनींच तुझ्या हिताला जपावें हें बरें."

गंगाधराच्या या धमकावणीनेंतर तिला अगदीं गाय करून सोडलें. सोनीचा ताठा आतां पुरा जिरला. आपण चोरून गांवांत फिरण्यास जातों व त्रिंबकरावांच्या मुलांबरोबर बसतोंउठतों, ही गोष्ट आपल्या मावशीला व बापाला कळली, तर फार वाईट परिणाम घडेल, हें ती मनांत समजली; आणि ह्मणून गंगाधराची खुशामत करण्याचा प्रयत्न करून ती ह्मणाली "बरं, तूं ह्मणतोस तसं कां होईना ? ते वाईट असतील कदाचित्. पण त्यांचा वाईटपणा माझ्या नजरेस आला नव्हता, तोंपर्यंत ते वाईट आहेत हें मला कसं बरं समजावं ? आतां तूं सांगितलंस, तेव्हां इतःपर त्यांची संगत मी धरणार नाहीं. पण त्यांचा असा कोणता वाईटपणा तुझ्या नजरेस आला, तोतर सांगशील ?"

गंगाधराला सोनीचें हें नरमपणाचें भाषण ऐकून आपला राग आंवरावा लागला. तो ह्मणाला "सोने! पोरी, तूं अगदीं भोळी आहेस. तुला अजून माणसाचा स्वभाव ओळखतां येऊं लागला नाहीं. अग, तीं मुलें जरी अगदीं सद्गुणाचे पुतळे असलीं, तरी त्यांनां भेटण्यासाठीं तूं चोरून बाहेर पडतेस, एवढ्यानेंच लोक तुला वाईट ह्मणतील. आतां त्या दोघांविषयीं ह्मणशील, तर गांवांतल्या हव्या त्या माणसाला विचार, ह्मणजे मी ह्मणतों तें खरें कीं खोटें, तें तुला कळून येईल. चोरीची चटक, खोडसाळपणा, फसवेगिरी, असे त्यांचे अनेक गुण कुठपर्यंत सांगावे ? त्यांच्यासारखेंच लोकांनीं तुला हलकें लेखावें आणि तुझ्याकडेहि तिरस्कारानें पहावें, अशीच तुझी इच्छा असल्यास तूं वाट पतकरली आहेस ती ठीकच आहे."

आतांतर सोनी अधिकच नरम होऊन ह्मणाली "आतांपर्यंत झालं तें झालं. पण आतां मी त्यांचं नांव सुद्धां काढणार नाहीं, मगतर झालं ? पण गंगाधर ! तूं यासंबंधानं घरीं कुणापाशीं एक अक्षर बोलणार नाहींस, असं वचन दे."

"मीं सांगितलें तरी तें तुझ्याच बऱ्याकरितां सांगणार! पण तूं आतां ह्मणतेस त्याप्रमाणें वागशीलच हें कशावरून?"

सोनी अगदींच गयांवयां करून ह्मणाली "देवाची शप्पथ, मी बोलल्याप्रमाणं चालेन."

गंगाधरानें या वेळींतरी निदान तिच्या शब्दांवर भरंवसा ठेविला होता. तिची मुद्रा आतां काकुळतवाणी झाली होती; डोळे पाण्यानें भरले होते आणि कंठ सद्गदित झाल्यामुळें तिचा आवाज अस्पष्ट व घोगरा झाला होता. ही तिची स्थिति पाहून गंगाधरास सोनीची करुणा आली आणि ह्मणूनच ती गोष्ट कोणाजवळ न बोलण्याचें त्यानें वचन दिलें.

सोनी आपल्या घाबरलेल्या अंतःकरणाला धीर देऊन निघाली ती तडक घरीं गेली. जानकीबाई दारांतच उभ्या होत्या. त्यांनीं ह्मटलें "सोने! तूं कुठंग सारा दिवस भटकत असतेस? तुला पहाण्यासाठीं आतां मी पुन: यायला निघालेंच होत्यें. कारटे! तूं मला पुरेपुरे करून सोडलं आहेस! दम धर, नारायणराव घरीं आले ह्मणजे सांगत्यें काय आहे तें! अलीकडच्या तुह्मां पोरींनां वडील माणसांचा धाकच कसा तो वाटेनासा झाला आहे! आह्मी तुमच्याएवढ्या होतों, तेव्हां आह्मीं नाहीं बाई कधीं केले असले ढंग! आह्मांला सासूच्या हाताखालीं रहावं लागत होतं. आमच्या सासूबाई ह्मणजे कसल्या कर्दनकाळ होत्या! त्यांच्या नुसत्या डोळयांची जरबहि आह्मांला थरथर कांपायला लावित होती. परंतु तुह्मी आतांच्या मुली अशा चिटुकल्या झालां आहांत कीं, अशा खंबीर सासूलासुद्धां पुरून उराल!"

सोनीनें यावर कांहींच उत्तर केलें नाहीं. त्यामुळें त्या दिवशींचें प्रकरण तितक्यावरच आटोपलें.

सोनीची व गंगाधराची तशी ओळख पुष्कळ होती; पण तिच्या अंतःकरणाची खरी ओळख त्याला अजून झाली नव्हती. आपल्या सोयीस पडेल तेव्हां खोटें बोलावें, वाटेल तशा बतावण्या कराव्या, डोळयांत पाणी आणावें आणि दुसऱ्याला फसवावें, ही विद्या दाजी व शिदू यांच्या संगतीनें सोनीलाहि थोडीबहुत येत चालली होती, हें त्याला आतांपर्यंत ठाऊक नव्हतें. ह्मणून तिची मघांची शोचनीय अवस्था पाहून त्यानें पाहिलेली गोष्ट घरीं कोणापाशीं न बोलण्याचें वचन देऊन तो चुकला होता. पण अशा कामीं दिलेल्या वचनाची

किंमत तितकीच असते, ही गोष्ट थोडा विचार केल्यावर त्याला कळून आली व जानकीबाईला अगदीं स्पष्ट शब्दांनीं न सांगितलें तरी थोडीशी सूचना देऊन ठेवावी, असें त्याच्या मनानें घेतलें आणि त्याप्रमाणें एकदा दाजीविषयीं सहज बोलण्याचा प्रसंग आला असतां " सोनीची व त्या दोघां भावांची मैत्री होऊं पहात आहे," असें तो बोलून गेला व " ही मैत्री होतांहोईल तों तोडली पाहिजे," असेंहि त्यानें ध्वनित केलें.

## प्रकरण ४६ वें.

# शिंक्याचें तुटलें आणि बोक्याचें पटलें.

गंगाधरानें सांगितल्यावरून दाजी व शिदू यांच्या भेटी न घेण्याचें सोनीनें कबूल केलें खरें, परंतु त्यांनां भेटण्यांत वाईट काय आहे, हें तिचें तिला कळेना. तिच्या पोरवयाला अनुरूप अशी तिची वृत्ति कायम होती. शिवाय लहानपणापासून जानकीबाईनीं तिला फारच प्रतिबंधांत ठेविल्यामुळें सर्व बंधनें एकदम झोडून टाकून स्वच्छंदानें वागण्यास तिचें मन फार चाहत होतें. घरांतून न विचारतां न सवरतां बाहेर पडणें व आपली चूक छपविण्याकरितां खोट्या बतावण्या करणें, हाच दोष तिच्या पदरीं सध्या बांधतां आला असता; परंतु हा दोषहि ह्मणजे कांहीं सामान्य नाहीं! हाच एकंदर सगळ्या गृहसौख्याची, पवित्र आचरणाची आणि नांवालौकिकाची राखरांगोळी करण्यास शेवटीं कारण झाला, अशीं शेंकडो उदाहरणें दाखवितां येतील. अशा वेळीं मुलांच्या वर्तनावर आईबापांची किंवा इतर इष्टमित्रांची फार बारीक नजर पाहिजे. गंगाधरानें सोनीच्या बाबतींत ही नजर कांहीं दिवस ठेविली होती, आणि जानकीबाईंच्याहि कानांवर तो ध्वनि गेला होता, हें खरें; परंतु सोनीच्या दुर्दैवानें लवकरच अशा कांहीं गोष्टी घडून आल्या कीं, त्यामुळें या दोघांनांहि तिच्यावर देखरेख ठेवितां येईना.

नारायणरावांनां गुजराथेंत पाठविण्याचा अण्णासाहेबांचा निश्चय झाला होता, हें मागें सांगितलेंच आहे. तसेंच गंगाधराचाहि तिकडे जाण्याचा मनोदय होता व तो त्यानें अण्णासाहेबांजवळ प्रत्यक्ष बोलूनहि दाखविला होता. त्यानंतर अण्णासाहेबांचा विचार दोघांनांहि तिकडे पाठविण्याचा ठरला. त्यांत त्यांनीं एक मोठा दूरदर्शीपणा असा केला होता कीं, दोघांनांहि एकदम पाठविल्यानें तेथील गुजराथी शेटसावकारांशीं नारायणराव गंगाधराची चांगली ओळख करून देतील आणि अशा रीतीनें ते महिना दोन महिने तिकडे राहून गंगाधराचा चांगला जम बसला ह्मणजे नारायणरावांला परत बोलावून घेतां येईल. या विचाराप्रमाणें लागलीच नारायणराव व गंगाधर या दोघांनां एकदम जाण्याचा हुकूम झाल्यावरून ते दोघेहि तिकडे रवाना झाले. जानकीबाई घरांत होत्या; पण एके दिवशीं घडवंचीवरून पडून त्यांचा पाय मोडल्यामुळें त्यांनां जागचें हालवेनासें झालें होतें. सोनीला पुनः स्वच्छंदपणानें वागतां येण्यास ही सोन्याची

संधि आयतीच मिळाली! त्यांच्या घरांत गुलाबदाणी ह्मणून एक मोलकरीण असे. ती एखादे दिवशीं सोनीला संध्याकाळचें बाहेर जाण्यास मना करी; पण तिला सोनीनें एकीकडे नेऊन ह्मणावें "गुलाब! तूं ह्मणत्येस तें खरं, पण माझा मेला जीव अष्टौप्रहर घरांत बसून कंटाळून जातो, आणि घटकाभरतरी मोकळेपणानं हिंडावंफिरावंसं वाटतं—तुलादिखील असंच वाटत असेल. आमची मावशी कीनई फार फार हट्टी आहे बाई! तिला वाटतं कीं, मीं रात्रंदिवस तिच्या बिछान्याजवळ तिच्या उशाशीं बसून रहावं. बसूनबसून हे पहा माझे पाय कसे दुखायला लागले आहेत! माझ्यासारख्या पोरीला क्षणभरदिखील खेळायला नको का? तूंच सांग. तशांतून मी कुठं कांहीं लांब जात नाहीं. फारतर या अनपूर्णेच्या मंदिरापर्यंत जात्यें. तूं ह्मणशील तर तेवढीहि नाहीं जाणार."

"तूं ह्मणशील तर," या शब्दांत अशी कांहीं विलक्षण जादू भरली होती कीं, गुलाबदाणीच्या तोंडून यापुढें सोनीच्या इच्छेविरुद्ध एक शब्दसुद्धां निघण्याची आतां भीतीच उरली नाहीं! सोनीसारखी थोरामोठ्यांची लेक अन् ती आपली खुशामत करित आहे, असें पहातांच गुलाबीला कांहीं विलक्षण अभिमान वाटला, आणि सोनीच्या कष्टमय स्थितीविषयीं आपली अनुकंपा दाखविणें—किंबहुना सोनीचें नावडतें माणूस जानकीबाई हिच्यासंबंधानें कांहीं चुगली सांगणें, हेंच त्या सन्मानाची फेड होय, असें तिच्या मनानें घेतलें. ह्मणून ती ह्मणाली "खरंच, आह्मी तुमच्याएवढ्या होतों, तेव्हां भारीच खोड्या करित होतों—वाटेल तितकं हिंडत होतों—आह्मांला कुणीहि मना करित नसे! पोरवयांत खेळूं नये, हिंडूंफिरूं नये, तर खेळावं अन् हिंडावंफिरावं केव्हां! बाई मला ह्मणाल्या 'गुलाब, माझ्यानं बिछान्यांतून उठवत नाहीं, तोंपर्यंत सोनीवर तूं नजर ठेवित जा बरं का? तिला घराबाहेर कुठं जाऊं देऊं नकोस!' कालच सकाळीं तुह्मांला त्यांनीं हांका मारल्या—अन् तुह्मी नव्हतां; मीं धुंड धुंड धुंडलं; इकड पहा, तिकड पहा, चहुंकडे शोधलं; पण तुह्मी कुठं दिसांना तेव्हां बाई बोल बोल बोलल्या!"

सोनी ह्मणाली "गुलाब, आतां तुला सांगून ठेवत्यें. पुनः 'मी कुठं आहें' ह्मणून मावशीनं विचारलंच तर 'मी बाहेर गेल्यें' असं सांगत जाऊं नकोस. एखादे वेळेस सांगावं 'लिहिण्यावाचण्यांत गुंतली आहे,' एखादे वेळीं ह्मणावं 'आतांच माझ्यादेखत परसाकडेस गेली आहे,' अशी कांहींना कांहीं नवी

सबब दर वेळेस सांगावी. मी बाहेर गेल्येंच तर कांहीं दहापांच मिनिटांपेक्षां जास्त वेळ लागणार नाहीं मला! तेवढी वेळ तूं कशीतरी मारून ने, म्हणजे झालं."

या प्रमाणें गुलाबदाणीला पढविल्यावर सोनीच्या मनाप्रमाणें सगळ्या गोष्टी होऊं लागल्या आणि सोनीच्या वर्तनाचा बोभाटा जानकीबाईच्या कानांवर जाण्याचें बंद झालें, हें सांगावयास नकोच.

आतां आपण क्षणभर दाजी आणि शिदू यांच्याकडे वळूं. तो पहा शिदू आपल्या बंगल्याभोंवतालच्या बगीचांतल्या एका झाडाच्या आडव्या फांदीवर दोन्ही पाय खालीं सोडून बसला आहे आणि तोंडानें अचकटविचकट गाणीं आणि संगीत पदें गुणगुणत आपली करमणूक करित आहे; आणि तो पहा त्याचा भाऊ दाजी, बाहेर जाण्याच्या तयारीनें निघाला असून आपल्याला कोणी पहात नाहींना, याविषयीं खात्री करण्यासाठीं वरचेवर चोरून मागेंपुढें व बाजूला चोहोंकडे घाबऱ्या मुद्रेनें पहात आहे. त्याला एवढें घाबरण्याचें कारण काय असेल बरें ? त्याच्या हातांत उपरण्यांत लपेटलेलें एक पाकीट आहे, तेंतर नाहीं ना ? पण आपण उगीच या गोष्टीची विचक्षणा कशाला करित बसावें ? लवकरच या दोघां भावांच्या भांडणांत तें कारण आपोआप बाहेर पडेल. तो पहा, शिदू दुरून दाजीला पाहून गाणीं म्हणतांम्हणतां एकदम थांबला. आपण येथें बसलों आहों, हें दाजीला कळूं नये, हाच त्याचा उद्देश असावा. आणि कर्मधर्मसंयोग म्हणतात तो कांहीं खोटा नव्हे. कारण दाजी चांगला रस्ता सोडून मुद्दाम आडरस्त्यानें कुंपणाच्या बाजूनें शिदू ज्या झाडावर बसला आहे त्याच झाडाच्या अगदीं जवळून चालला आहे. आणि तोहि मुकाट्यानें नव्हे, त्याची आपली तोंडानें बडबड चाललीच आहे ! तोंडानें पुटपुटावें, पुनः मागेंपुढें पहावें, पुनः पुटपुटावें, असा त्याचा क्रम सुरू आहे. पण हा तोंडानें एवढें पुटपुटतोतरी आहे काय ! ऐका त्याचा आवाज आतां स्पष्ट ऐकूं येत आहे.

"तरी मी नांवाचा दाजीसाहेब! काय गुलामानें माझ्यापासून पाकीट लपवून ठेविलें होतेंन्! या पाकिटांत एवढें आहेतरी काय ?—जवळपास कोणी नाहीं तेव्हां आतां इथें हें उघडून पहाण्यास हरकत नाहीं. अबबब ! कितीतरी या नोटा ! या दहा दहांच्या चार, अन् पांचा पांचांच्या तीन, मिळून किती झाले ? पासष्ट ?—छेः चाळीस न् दहा पन्नास न् पांच पंचावन— हें पाकीट म्हणजे काय मला आज कामधेनूच सांपडली म्हणायची, ! आतां या सावकारांच्या बापाला मी भीत नाहीं ! तो वाघ्या कोट जमिनींत

गाडून टाकावा लागला–त्याचें बिल अजून देणें आहे. हलवाई, नाटकवाले, अन् शापुरजी इतक्यांचें देणें देऊन टाकायला हे रुपये काय पुरणार आहेत ह्मणा ! पण दहादहा, पांचपांच रुपये तोंडावर टाकले, ह्मणजे हे कुत्रे थोडा वेळ तरी गप बसतील. आज सकाळीं उठल्याबरोबर कुणाचें बरें तोंड पाहिलें होतें ? त्याचेंच तोंड रोज पहाण्यास मिळेल तर रोज आजच्यासारखी प्राप्ति कां नाहीं होणार ?"

दाजी अशाप्रकारें मनांत मांडे खात चालला असतां त्याच्या हातांतलें तें तसेंच उघडें असलेलें पाकीट आणि तो मोजित असलेल्या नोटा कोणी पाहील, किंवा आपलें आत्मगत भाषण कोणी ऐकेल, हा विचार क्षणभर त्याच्या मनापासून अगदीं दूर झाला. परंतु शिदूचें लक्ष्य दाजीकडे होतेंच. दाजीच्या हातांत कांहीं कागद आहे एवढेंच प्रथम दुरून त्याला दिसलें होतें व तोंपर्यंत त्यानें कांहीं हालचाल केली नाहीं. पण तो जवळ येतांच त्याचा हातांत दुसरातिसरा कागद नव्हे–तर आपल्या नोटा आहेत असें पहातांच शिदूनें एखाद्या वाघाप्रमाणें पटकन् उडी मारून प्रथम एक हात दाजीच्या मानेवर ठेविला व दुसऱ्या हातानें त्याच्या हातांतल्या नोटांवर झडप घातली. शिदू जरी दाजीपेक्षां वयानें लहान होता, तरी अंगानें सशक्त आणि बळकट होता. पण दाजीच्या अंगांत जशा युक्त्या भरल्या होत्या, तशा शिदूच्या अंगांत नव्हत्या. शिवाय दाजी चपळतेंतहि शिदूपेक्षां सरस होता. त्यामुळें आपलेवर कोणीं झडप घातलेली पहातांच, दाजीला निसटून जाण्याचा प्रयत्न करण्याशिवाय अन्य मार्गच उरला नव्हता. नोटांचा अर्धाभाग दाजीच्या हातांत आणि अर्धा शिदूच्या हातांत होता— अशा स्थितींत दाजीनें शिदूच्या हाताला एक जोराचा हिसका देऊन पळण्याचा प्रयत्न केला. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्या नोटा फाटून त्यांचे बरोबर दोन तुकडे दोघांच्या हातीं आले ! ते तुकडे हातीं घेऊन दाजी धूम पळत सुटला व शिदू त्याच्या मागें लागला. शेवटीं शिदू आपल्याला खास पकडणार, असें दाजीला दिसून आल्यावर आपल्या हातांतले तुकडे आपल्या उपयोगीं न पडले तरी शिदूच्या हातींतरी निदान लागूं नयेत, अशी कांहीं तरी युक्ति करण्याचें दाजीच्या मनांत आलें. आणि त्याच्यापाशीं युक्तींची कांहीं वाण नव्हतीच ! आजपर्यंत आपल्या बुद्धीचा सारा उपयोग त्यानें अशा युक्त्या, लपवालपवीचे प्रकार व नव्यानव्या सबबी शोधून काढण्यांतच केलेला होता. तेव्हां या अडचणीचे वेळीं त्याच्या सुपीक मेंदूनें त्याला दगा दिला नाहीं,

यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं. त्यानें ते कागदाचे तुकडे लगेच फाडूनतोडून तोंडांत टाकिले. न जाणो, बाहेर पडल्यास शिदूच्या ते उपयोगास येतील !

आपल्याला नसेल तर नसो, त्याविषयीं एवढा खेद नाहीं, पण दुसऱ्याची जिन्नस त्याच्याच उपयोगीं पडलेली पाहून कित्येक मत्सरीं अंतःकरणाच्या माणसांनां मनस्वी दुःख होतें! मग ते 'नाहीं तुला, नाहीं मला, घाल कुत्र्याला!' याप्रमाणें कृति करून दुसऱ्याच्या दुःखांतच स्वताचें सुख मानून जीवाचें समाधान करून घेतात ! अशा उदार अंतःकरणाच्या विरळ व्यक्तींपैकींच दाजीसाहेबांची स्वारी होती ! हातांतून निसटून दाजी जो फरारी झाला, तो रात्रीं नऊ वाजेपर्यंत त्यानें शिदूला तोंड दाखविलें नाहीं ! शिदू जागचेजागीं चरफडत बसला.

## प्रकरण ४७ वें.

# पुरे हा नरकवास.

भावाभावांतलें वैर घरांतल्या शांतीच्या मुळावरच उत्पन्न होत असतें. या वैरानें घरें बसतात, गांवें उजाड होतात, किंबहुना राष्ट्रेंचींराष्ट्रेंहि नष्ट झाल्याचीं उदाहरणें इतिहासांत आहेत. यःकश्चित् पांचपन्नास रुपयांची गोष्ट ती काय, आणि त्याकरितां दाजी आणि शिदू परस्परांनां पाण्यांत पाहून एकमेकांचा सूड उगविण्याची संधि पहातात तें काय ! पण त्रिंबकरावांच्या मुलांनां त्यांच्या आईबापांकडून ज्याप्रकारचें शिक्षण मिळालें होतें, त्याचा परिणाम असाच व्हावयाचा होता. घरांत दाजी आणि शिदू यांची रोज धुसपुस चाले; लहानशा चकमकी उडून एकमेकांनीं एकमेकांनां नखांनीं ओरबडल्याच्या किंवा हातपाय मुरगाळल्याच्या फिर्यादी त्रिंबकरावांकडे जातच असत. परंतु त्रिंबकराव चकार शब्द बोलेनात. कधीं एखादे वेळीं बोललेच, तर गोदूबाई त्याचें एवढें रामायण करीत कीं, आपण कुठची झक मारली नी या पोरांनां बोललों, असें त्रिंबकरावांनां होई. गोदूबाईचा सगळा दिवस रुसण्याफुगण्यांत, रडण्यांत व आदळआपट करण्यांत जाई. सुखाचा एक शब्दसुद्धां उभ्या दिवसांत ऐकूं येत नसे. अशा त्रासामुळें मुलांनां बोलण्याचें त्रिंबकरावांनीं टाकून दिलें होतें. आणि याचा परिणाम जो व्हावयाचा तोच झाला. लेंकुरवाळें घर ह्मणजे सुखाचें धाम व आनंदाचें वसतिस्थान व्हावयाचें, तें दोघां आखलांच्या झुंजीचें रणमैदान झालें होतें.

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें दाजीनें शिदूच्या नोटांचें पाकीट चोरून त्या नोटांचा निकाल लाविल्यापासून त्या दोघां भावांमध्येंतर विस्तव जाईनासा झाला ! दाजीच्या नरड्याचा घोंट घेऊन भारतीय वीर भीमाप्रमाणें आपण केव्हां तृप्त होऊं, अशी शिदूला तळमळ लागली होती. दाजीला एकटा गांठण्या-साठीं तो टपून बसला होता; परंतु तो योग कांहींकेल्या लवकर येईना. घरांत परस्परांची गांठ पडे, एक पंगत होई, पण बोलण्याचे प्रसंग मात्र सहसा येत नसत. ते आले असते, तर बरें होतें. जलाशयांत सांचलेलें पाणी पाट फोडून बाहेर पडून आंतल्या पाण्याचा जोर कमी करतें, व त्या जलाशयाच्या बांधाला चिरायु करतें. त्याप्रमाणें एरवीं बोलाचाली होऊन चकमकी झडल्या असत्या खऱ्या, पण परस्परांच्या अंतःकरणांतला वैरभाव थोडाफार बाहेर पडून दोघांच्याहि मनांत तो इतका अनावर झाला नसता. खरें ह्मटलें असतां

दाजीच्या मनांत शिदूविषयीं एवढा वैरभाव नव्हता. त्यानें जें नोटांचें पाकीट शिदूच्या खोलींतून न कळतां आणिलें होतें, तें केवळ मौजेखातर किंवा आंत काय आहे हें पहाण्याच्या जिज्ञासेनें होतें. त्याला वाटलें होतें कीं, त्यांत एखादें महत्त्वाचें गुप्त ( खाजगी) पत्र आपल्यास वाचण्यास मिळेल. याचसाठीं केवळ तें पाकीट त्यानें उचलून खिशांत घातलें आणि तें उघडून पहाण्यास निवांत जागा मिळावी, म्हणून तो घराबाहेर पडला होता. पाकिटांत नोटा आहेत, हें त्याला मागाहून कळलें आणि मग त्याच्या तोंडास अर्थातच पाणी सुटून त्याचें मन लोभाविष्ट झालें–वैराविष्ट नव्हे ! शिदूची स्थिति मात्र विलक्षण झाली होती. सोनीच्या व इतर कांहीं कारणांवरून तो दाजीविषयीं आधींच मनगट चावित होता; आणि त्यांत नोटांच्या अपहाराची भर पडल्यावरतर कांहीं पुसूंच नका ! कंसाला जसा कृष्ण, तसा शिदूला दाजी जळीं स्थळीं दिसूं लागला !

भावाभावांमधल्या या वैराची हकीगत पसरतांपसरतां त्रिंबकरावांच्याहि कानीं गेली. यांत सगळा दोष शिदूकडे आहे, असें त्यांनीं साफ सांगितलें, तेव्हांतर शिदूच्या तळव्याची आग मस्तकापर्यंत गेली. त्रिंबकरावांनीं आपल्या मुलांनां उपदेश करतांना दोघांनांहि उद्देशून म्हटलें "झालें तेवढें बस आहे. आतां तुम्ही दोघे आपसांत समजा आणि लोकांनां तमाशा दाखवूं नका," तेव्हां शिदू रागाच्या झटक्यांत ताडकन् म्हणाला "बरें बरें, हा वेदांत मला समजतो आहे ! त्यानें अगोदरच हात दाखवून घेतला आहे, तेव्हां आतां शांतिरस्तु, पुष्टिरस्तु म्हणायला तो कशाला नाहीं म्हणेल ? त्याच्या कृतीचें उट्टें काढल्यावर मग मीहि तथास्तु म्हणेन पाहिजेतर ! पण तोंवर नाहीं."

त्रिंबकरावांनीं तीनतीनदा मुलांनां समजावण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. दोघेहि ऐकेनात. त्यांतल्यात्यांत दाजी थोडाफार शांतपणा करून बसला होता. पण शिदूचे डोळे इंगळासारखे लाल झाले होते. तो नागासारखा फुस्कारे टाकित होता आणि दांतओंठ चावित दाजीकडे पाठ करून स्वतांशीं पुटपुटत बसला होता. त्याला आज रोजच्या निम्म्यानेंसुद्धां जेवण गेलें नाहीं. तो पंक्तींतूनच उठला आणि आपल्या खोलींत जाऊन विचार करित 'ईझिचेअर'वर पडला.

मनुष्याचे विचार त्याला नकळत वदवून दाखविणारें एखादें यंत्र असतें, तर त्या यंत्रांतून पुढील उद्गार स्पष्टपणें निघाले असते:—"या थेराला केव्हांतरी गोष्ट यायचीच होती, तरमग ती लवकर आली हें एकाअर्थी बरेंच झालें !

दाजी माझ्याहून वयानें मोठा असला, ह्मणून काय झालें? ज्याच्यापरी त्याला स्वतंत्रपणा हा पाहिजेच! माझ्या खोलींत मला नकळत त्यानें अगोदर यावें कां? तो चोर आहे, हें दुसरे कुणाला ठाऊक नसलें, तरी मला पुरतेपणीं ठाऊक आहे. स्वारीची कवंखती त्याच दिवशीं आली होती! आपण चोरी करून त्या गरीब गंगाधरावर आळ घालूं पहातो नाहीं काय! अन् तो डगला कसा अंधारांत नेऊन पुरून ठेविला होता. मला गज्यानें तेव्हांच येऊन बातमी दिली होती. तीच बातमी मीं फौजदारसाहेबांनां जाऊन सांगितली असती तर? रात्रीं जाऊन मीं तो कोट तेथून काढून आणून माझ्या पेटींतसुद्धां घालून ठेविला होता. मुद्देमालासह दांत घशांत उतरविले असते! पण मीं गय केली, त्याचे उपकार हा अशा रीतीनें फेडतो वाटतें? सोनीला माझ्याविषयीं भलभलत्या गोष्टी सांगून मी चोर आहें, चहाड आहें, लबाड आहें, असें तिच्या मनांत या दाज्यानेंच भरविलें आहे. त्यामुळें आतांशीं बघावें, तर ती माझ्याशीं धड बोलतसुद्धां नाहीं. मग पूर्वीच्यासारखी चांदण्यांत बावडीच्या वरवंडीवर बसून तासचेतास कुठली बोलत बसायला? दाज्या! बरें गुलामा! आतां घेतों तुझा खरपूस समाचार! मी जिथेंजिथें जुळवायला जातों, तिथेंतिथें तूं पाचर मारित असतोस नाहीं? खरोखर, मला या गोष्टीचा एकदा कायमचा बंदोबस्त केलाच पाहिजे. त्यावांचून मला चैन पडणार नाहीं. हा माझा वैरी, मला सुखानें झोंप घेऊं देणार नाहीं, हें खास. सोनी मला पाहिजे, तशी त्यालाहि पाहिजे आहे. आतां शेवटीं जो उरेल त्याला ती मिळेल, हें उघडच आहे. तेव्हां आपलें पहिलें काम काय तें ठरलेंच ह्मणावयाचें!"

कोण हे भयंकर विचार! प्रत्यक्ष भाऊ असलेला वैरी मानण्यांत येतो, हा केवढा चमत्कार आहे! दाजीच्या द्वाडपणाच्या अनेक गोष्टी मागें आल्या आहेत. पण आतां शिदूच्या उद्गारांत ज्या प्रकारचा अर्थ ध्वनित केला आहे, तशा प्रकारचे विचार त्याच्या डोक्यांत कधीं आले नव्हते. शिदू सर्वांत लहान असल्यामुळें गोदूताईची प्रीति त्याच्यावर सर्वांहून अधिक होती, आणि त्या त्याचे लाडहि मनस्वी करित असत, त्याचाच हा परिणाम होता. फाजील लाडानें बिघडलेल्या मुलांचीं उदाहरणें जगांत शेंकडो दिसतात; पण या लाडांचे परिणाम इतक्या दूर गेलेले, क्वचितच असतील!

जेवणाचे वेळीं झालेला सगळा प्रकार गोदूताईनीं पाहिला होता, आणि त्यांत उर्मटपणा, खुनशीपणा व दुष्टपणा याबद्दलचा दोघांचा वांटा वास्तविकपणें

मुख्यत्वेंकरून शिदूकडेच जात होता; तथापि गोदूताईला अद्यापिहि वाटत होतें कीं, शिदूसारखा गरीब, नम्र आणि सात्विक असा मुलगा व्हावयाचाच नाहीं! शिदू एखादेवेळीं मघाच्यासारखा बापाला किंवा वडील भावाला अथवा प्रत्यक्ष आईला ( गोदूताईला )हि टाकून बोले, तो त्याचा दोष नसून त्याला दुसऱ्यांनीं चिडविल्याचा तो परिणाम समजून त्या त्याला कांहींएक न बोलतां त्याचें उलट कौतुक करीत. सतरांदा त्याला समजाविण्याचा प्रयत्न करीत. त्याला चोरून लाडू, जिलबी, हलवा वगैरे पदार्थ आणून देत, किंवा त्यानें ज्या वस्तूसाठीं हट्ट धरला असेल ती वस्तु घेऊन देत. अशा रीतीनें समजूत घालण्याची गोदूताईला जी संवय लागली होती, तिचा हा सगळा परिणाम होता. मुलांनां लाडानें बिघडवून त्यांच्या जन्माचें मातेरें करणाऱ्या गोदूताईसारख्या आया खरोखर आया नव्हेत, तर त्या मुलांच्या मागच्या जन्माच्या वैरिणीच असल्या पाहिजेत!

शिदूला त्या दिवशीं रोजच्या अर्ध्याइतकेंसुद्धां जेवण गेलें नाहीं. गोदूताई-नांहि त्या दिवशीं जेवण जाईना, हें सांगावयाला नकोच! त्यांनीं लवकरलवकर कसेतरी दोन घांस घेऊन शिदूची एकांतीं भेट घेण्याचा आणि नेहमींच्या रीतीनें त्याची समजूत घालण्याचा विचार केला, आणि शिदू काय करित आहे तें पाहून येण्याला रामा शागीर्दाला सांगितलें. रामा शिदूच्या माडींत जातो तों शिदोबांची स्वारी जामानिमा करून कोठें बाहेर पडण्याच्या तयारींत दिसली. रामा कांहींएक न बोलतां मुकाट्यानें जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागला. इतक्यांत शिदू अंमळ रागाच्या आवाजानें त्याला म्हणाला "कायरे राम्या! आजतरी दार उघडें ठेवण्याची मेहेरबानी होईल का? काल तुला दार उघडें ठेवायला बजावून गेलों असून तूं आंतून कडी व अडसर लावून मला रात्रभर बाहेर थंडींत कुडकुडत टेविलेंस नाहीं? बरें आहे गुलामा! एक दिवशीं तुझेंहि पाहून घेईन. फार मस्त झाला आहेस फुकटचें खाऊन?"

अगोदरच स्वारी बाईसाहेबांची लाडकी आणि त्यांतून रागावलेली! मग रामाच्यानें काय जाब देववणार! तो हात जोडून भीतभीत म्हणाला "नाहीं, छोटेसाहेब! मी आपला गरीब नोकर आहें. माझ्याकडे कांहीं दोष नाहीं. आपण सांगितल्याप्रमाणें मीं दाराला कडी न लावतां तें नुसतें लोटून ठेविलें होतें. पण मध्यरात्रीं दादासाहेब उठून खालीं आले आणि त्यांनीं दार उघडें पाहून मला शेंकडो शिव्या मोजल्या व स्वतः आपल्या हातानें कडी न् अडसर घातला."

आपल्या ह्मणण्याप्रमाणें रामानें केलें होतें, हें ऐकून छोटेसाहेबांची गरम झालेली तब्यत थोडीशी थंड झाली आणि ते ह्मणाले "बरें, पण आजचें नीट लक्ष्यांत ठेव ! आज कांहीं कालच्यासारखी मला फारशी रात्र व्हायची नाहीं. दहाअक्रा वाजतील." इतकें सांगून शिदू गडबडीनें घराबाहेर पडला.

शिदू बाहेर पडल्यावर रामानें छोटेसाहेब बाहेर गेल्याची खबर गोदूताईला कळवून ओसरीवरच्या आपल्या बिछान्याचा रस्ता धरला. मघाशीं शिदू त्याला रागानें वेडेंवांकडें बोलला होता, तेव्हांपासून त्याच्या मनांत कांही चमत्कारिक चलबिचल झाली होती. आतांपर्यंत ती त्यानें झांकून ठेवण्याचा यत्न केला होता, पण आतां आपण एकटेच आहों, असें पाहून त्यानें आपल्या विचारांवरचा अंकुश काढून घेतला आणि त्याचें उच्चारांत रूपांतर करून आपल्या अस्थिर मनाला थोडीशीतरी शांतता द्यावी, असा विचार केला. बोलूनचालून मोठ्या घरच्या अशिक्षित व उन्मत्त झालेल्या शागीर्दाचेच विचार ते ! मग त्यांच्यांत प्रगल्भतेचें नांव कशाला पाहिजे ! ! पण त्या विचारांतसुद्धां पुष्कळ सत्यांश असल्यामुळें त्याच्यातोंडून बाहेर पडलेले उद्गार वाचकांनां कळविणें जरूर आहे.

रामा कपाळाला आंठ्या घालून बाहेरच्या दाराशीं गेला आणि रागारागानें दार लोटून परत आपल्या बिछान्यावर येऊन पडला. या कृत्याला कांहीं दोन मिनिटें लागलीं नसतील. पण या लहानशा कामावरून त्याची जी कुरबुर चालली होती, ती जवळजवळ तासभर सुरू होती ! "नोकरी करणें अन् झक मारणें बरोबर आहे ! मोठ्या घरीं मोठाच अंधार असतो. एकाचें तोंड एका दिशेला तर दुसऱ्याचें दुसऱ्याच दिशेला ! एक ह्मणतो 'राम्या दार कां नाहीं लावलें ? तुझा एखादा बाप घरांत शिरला अन् चोरी करून गेला, तर तूं भरून देशील का ?' अन् हें मालकाचें ह्मणणें रास्त आहे. मी पांच रुपड्यांचा नोकर, मी नुकसान कुठून भरून देणार ? ह्मणून दार लावायला जावें, तर दुसरा खडसून दम भरतो 'गुलामा, खबरदार दार लावशील तर. तुझा मस्तपणाच बाहेर काढीन !' आतां आमच्यासारख्या नोकरांनां इकडे आड तिकडे विहीर, झाली कीं नाहीं ? आमचे छोटेसाहेबतरी कुठें जात असतात एवढ्या रात्रीचे कुणाला ठाऊक ? बाईसाहेब त्यांनां चोरूनमारून पैसे देतात, मग कां कमी करतील ? करीतना ते काय वाटेल तें ! मला काय त्याच्याशीं करायचें आहे ह्मणा ! पण तिसऱ्या ठिकाणीं मला बोलणीं खावीं लागतात, ह्मणून बोलणें येतें. काय भावाभावांचीं हीं भांडणें ! कलालीवर दारू पिऊन झिंगणारेसुद्धां इतके हलकट-

पणानें वागत नसतील ! दाजीसाहेब आणि छोटेसाहेब एकमेकांच्या थोबाडांत काय मारतात, अन् एक दुसऱ्याच्या छातीवर काय बसतो ! आतां भावाभावां-मधें खून पडायचे तेवढे राहिले आहेत! अन् तसें व्हायचेंच असलें, तर आपण नोकरी सोडल्यावर मागेंतरी होओत. आपल्यासमक्ष ते सोहळे व्हायलाहि नकोत, अन् कचेरींत साक्ष द्यायला जायलाहि नको. आपणतर बुवा अगदीं कंटाळलों या नोकरीला. कुठेंहि मजुरी करून पोट भरणाराला इथें काय जास्त आहे ? आणखी चार दिवसांनीं नवा महिना लागतो म्हणून मघांशीं कृष्णाजीपंत कारभारी सांगत होते. पहिल्या तारखेला पगार हातीं पडला म्हणजे आपण ठोकणार या घराला रामराम! नको ही चांडाळाच्या घरची नोकरी! हा नरकवास पुरे झाला ! !"

रामाच्या तोंडचे हे उद्गार जरी त्यानें आपल्या ग्राम्य भाषेनें व्यक्त केले होते, तरी ते किती सत्य होते? त्रिंबकरावांच्या घरच्यासारखी स्थिति जेथें असेल, त्या घराला घर म्हणण्यापेक्षां नरकवास म्हणणें किती योग्य होईल? आणि अशा ठिकाणीं रहाणारांची योग्यता किड्यांपेक्षां कितीशी अधिक असणार !

## प्रकरण ४८ वें.
## शर्वीलकाचा नवा अवतार.

शिदूची स्वारी फुणफुणत घराबाहेर पडली ती कोणीकडे गेली, हें वाचकांनीं ताडलें असेलच. आणखी दुसरीकडे कोठें जाणार? येऊनजाऊन सोनीच्या घरीं. गंगाधरानें कितीहि बजावलें, तरी दाजी आणि शिदू यांची संगत सोडण्याची बुद्धि सोनीला होईना. एक ह्मण आहे कीं, 'आधीं बुद्धि जाते आणि मागून भांडवल जातें!' तशी विचारीची अवस्था झाली होती. तिला दिवसेंदिवस शिदूच्या संगतींत अधिकाअधिक प्रेम वाटूं लागलें आणि गंगाधरासारखा सात्विक आणि खरोखर प्रेमळ माणूस, मतलबी, चुगलखोर, कपटी आणि ढोंगी दिसूं लागला. गंगाधर जातांना सोनीला जें काय सांगून गेला होता, तें वास्तविक तिच्या हिताचेंच होतें. पण तेवढेंसुद्धां तिच्या पोटांत मावेना. गंगाधराची पाठ फिरली नाहीं, तोंच तिनें तें सगळें शिदूपाशीं ओकून टाकिलें. तेव्हां शिदोबाच्या अंगाचा कोण तिळपापड झाला ह्मणतां! गंगाधर त्या वेळीं तेथें गांवांत असता, तर कोणत्याना कोणत्या उपायानें त्याचा सूड उगवण्यास त्या बहादूरानें कमी केलें नसतें. पण आतां नुसतें मनगट चावण्यापलीडे शिदूला काय करतां येत होतें!

काय करतां येत होतें? शिदू उसनें फेडल्यावांचून का स्वस्थ बसणार? छे, तें बोलावयालाच नको! रोज गंगाधराविषयीं कांहीं ना कांहीं बनावट गोष्ट रचून त्याच्यावर नवीन कुभांड घालण्यांत आणि ती गोष्ट युक्तियुक्तीनें सोनीला सांगून तिचें मन गंगाधराविषयीं कलुषित करण्यांत शिदूची सगळी करामत, सगळें बुद्धिवैभव, सगळा वेळ खर्च होई. उत्तम खुशखुशीत रुचकर चिवडा करणें झाल्यास नुसत्या तिखटमिठानें कार्यभाग होत नाहीं. पोहे, डाळ, खोबरें, वगैरे मूळचें कांहीं सामान लागतें; परंतु दुसऱ्याच्या अब्रूचा चिवडा करून ठेवणारांना याहि सामानाची गरज लागत नाहीं! तें सगळेंच ते आपल्या डोक्यांतून काढतात!! गंगाधराच्या अब्रूचा चिवडा करण्यास निघालेल्या आमच्या शिदोबाला सामुग्रीची कधींच तूट पडली नाहीं. जें कोठें कोणाविषयीं, त्यानें वाईट वाचिलें किंवा ऐकिलें असेल, किंवा जें कल्पनेनें तयार करतां येण्यासारखें असेल, तें सगळें तयार करून त्याला सुंदर मसाला घालून चरचरीत केल्यावर तो चिवडा दररोज सोनूबाईला शिदोबांनीं अर्पण करावयाचा, आणि सोनूबाईनींहि त्याच्या कृतीविषयीं बिलकूल शंका न घेतां भाविकपणें त्याचें सेवन करावयाचें व उरलासुरला दुसऱ्या कोणालातरी वांटावयाचा, असा क्रम कित्येक

दिवस चालला होता. अशा रीतीनें शिदूनें सोनीच्या मनावर आपली एकदा पुसट झालेली छाप पुनः बसविली.

आकाश निरभ्र असून स्वच्छ चांदणें पडलें आहे, अशा वेळीं नक्षत्रांकडे बघत तासचे तास उघड्या हवेंत एकटेंच बसावेंसें कोणास वाटणार नाहीं? सोनी अशीच आपल्या बंगल्याभोंवतालच्या बगीच्यांत एकटी उभी होती. पण आकाशांतील नक्षत्रांकडे तिची दृष्टि नव्हती. तिचे डोळे कोणाच्यातरी वाटेकडे लागले होते. ती वरचेवर कुंपणाच्या तारेवर झुकून रस्त्यानें कोणी येत आहे किंवा नाहीं तें लांबवर पाही, आणि कोणी दिसलें नाहीं म्हणजे त्रासून म्हणे "आज कसला येतो? मला मात्र उगाच तिष्ठत ठेविलं आहे! माणसानं मेली वाटतरी किती पाह्यची? आतां तो आला, तरी मी त्याच्याशीं बोलणारच नाहीं. मावशी आजारी पडली आहे अन् गुलाबदाणीची मीं समजूत केली आहे, म्हणून घटका अर्ध घटका मला या अंगणांत मोकळेपणानं फिरतांसवरतां तरी येतं आहे. चार दिवसांनीं मावशी उठून हिंडूंफिरूं लागली कीं, मला कोंडून ठेवित जाईल. मग नुसती भेटसुद्धां होण्याची मुष्कील, मग तासचेतास बोलत बसण्याचं नांव कशाला? पण एवढी साधी गोष्टहि का त्याला कळूं नये?"

या उद्गारांची आवृत्ति अर्ध्या घटकेच्या अवकाशांत तिनें तिनदा केली असेल. खरोखर म्हटलें, तर शिदूला त्या रात्रीं येण्याला कांहीं फारसा उशीर झाला होता असें नाहीं. दहापांच मिनिटं जास्त लागलीं असतील; परंतु सोनीला सगळ्या गोष्टीची उतावळी. आणि उतावळींत मनुष्य असलें, म्हणजे प्रत्येक पळ त्याला घटकेसारखें कंटाळवाणें होत असतें, हें सांगावयाला नकोच.

शिदू आतां येत नाहीं, असें समजून सोनी घरांत जाऊन निजणार होती, इतक्यांत शिदोबांची स्वारी धापा टाकित टाकित तेथें येऊन पोहोंचली. सोनीनें उशीराबद्दलचें कारण विचारतांच शिदू म्हणाला "मी आलों, हीच अगोदर मोठी गोष्ट समज! खरोखर आज तुझ्याकडे न येतां घरींच राहून दाजीची खूप खोडकी जिरवावी, असेंहि एकदा मनाला वाटलें होतें. पण तुझी भेट झाल्याशिवाय चैन पडेना, म्हणून धडपडत आलों."

"दाजीची, अन् खोड जिरवायची?" सोनीनें आश्चर्यचकित होऊन विचारिलें. "त्यानं तुझं असं काय घोडं मारलं होतं?"

शिदूनें भांडणाची साग्र हकीगत न सांगतां नुसती दाजीच्या वर्तनाविषयीं कुरकुर चालविली होती. अर्थात्, सगळा दोष दाजीकडेस असून सहनशीलतेचं

सगळा मक्ता आतांपर्यंत आपलेकडे होता, असें भासविण्यास त्यानें बिलकूल कसूर केली नाहीं. शिदूच्या तोंडची हकीगत ऐकून दाजीविषयीं सोनीचें मन जितकें कलुषित झालें, तितकीच शिदूची क्षमाशीलता आणि निरुपद्रवीपणा या दोन अवास्तविक गुणांची छाप तिच्या मनावर उमटून ती शिदूला अधिक चाहूं लागली, हें सांगावयाला नकोच. तीं म्हणाली "पण शिदू! तूं संभाळून रहा हो, नाहींतर एखादे दिवशीं तुला अंधारांत गांठून चोप द्यायला तो कमी नाहीं करायचा."

"अं:, त्याची काय ताकद लागली आहे मला मारायला ह्मणा! त्यानें नुसता माझेवर हात उगारला पुरे, कीं त्याची पुरती चांदी करून सोडीन! मग दादासाहेबांनीं मला घरांतून काढून दिलें तरी बेहेत्तर!"

यावर कांहीं वेळ स्तब्ध राहून नंतर सचिंतमुद्रेनें सोनीनें प्रश्न केला "पण कायरे! दोघांतून कुणातरी एकाला काढून द्यायचंच झालं, तर दादासाहेब दाजीला काढून देतील का तुला?"

"तसा प्रसंग आलाच तर दादासाहेब न्यायअन्याय न पहातां मलाच हात धरून बाहेर काढतील, हें मी जाणून आहें; पण मी कुठें त्या गोष्टीची फिकीर करतों आहें? उद्यां काढणार तो आजसुद्धां जाण्याला मी तयार आहें. कुठेंहि हमाली करीन तर आठ आणे रोज मिळवीन!"

शिदूचें हें अभिमानाचें भाषण ऐकून सोनीला अंतर्यामीं फार संतोष झाला, आणि ती शिदूशीं अधिक सलगीनें बोलूं लागली. या बोलण्याच्या नादांत तीं दोघेंहि इतकीं दंग झालीं कीं, वेळेचें भान त्यांना मुळींच राहिलें नाहीं. इकडे असें झालें कीं, गुलाबदाणीनें घरांतलीं सगळीं कामें उरकल्यावर नित्यक्रमाप्रमाणें बाहेरच्या दारास आंतून कडी लाविली. सोनी बाहेर अंगणांत शिदूशीं कुजबूज करित उभी आहे, हें तिनें पाहिलें नव्हतें. सोनी आपल्या खोलींत जाऊन निजली असेल, ही तिची समजूत. इकडे बोलतांबोलतां अर्धी रात्र झाली व बारांचे ठोके पडलेले त्या दोघांनीं ऐकले. तेव्हां मात्र सोनी घाबरली. इतका वेळ आपण बाहेर होतों, ही गोष्ट जानकीबाईला कळली, तर त्या आपणाला काय ह्मणतील, या विचारानें ती अगदीं गोंधळून गेली. तिनें झट्दिशीं शिदूचा निरोप घेतला आणि लवकरलवकर पाऊल उचलून ती दाराकडे गेली. दार हलूच ढकलून पहातां तें आंतून बंद आहे, असें आढळल्यावर तिच्या मनाची स्थिति काय विलक्षण झाली असेल, त्याची कल्पना तिच्यासारखा प्रसंग लहान-

पणीं ज्यांच्यावर आला असेल, अशांनांच बरोबर करतां येईल ! आतां सारी रात्र आपणाला थंडींत कुडकुडत काढावी लागेल; अंथरायला नाहीं, पांघरायला नाहीं व सोबतीलाहि कुणी नाहीं, अशा स्थितींत भय वाटल्यावांचून कसें राहील ? रात्रीचीं संचारणारीं भुतेंखेतें, हडळीडाकिनी वगैरेच्या गोष्टी सोनीनें पुष्कळ ऐकल्या होत्या, त्यांची आतां तिला एकदम आठवण होऊन तिचें अंग भीतीनें थरथर कांपूं लागलें. गुलाबदाणीला हांक मारावी, असें एकदा तिच्या मनांत आलें. पण त्याबरोबर जानकीबाई जाग्या झाल्या आणि इतका वेळ कुठें होतीस ह्मणून विचारलें तर काय सांगावें ? आपल्या अंगणात चांदण्यांत बसल्याजागीं झोंप लागली ह्मणून सांगावें,तर तें जानकीबाईला खरें वाटणार नाहीं; आणि बाहेर रहाण्याला दुसरी कांहीं बिनतोड सबबहि दिसत नाहीं; अशा नानाविध विचारांनीं ती अगदीं गोंधळून गेली. तिला कांहीं सुचेना. तिला रडायला आलें. अशा वेळीं मनाला धीर देणारें कोणी माणूस जवळ असतें तर तिची अशी गाळण उडाली नसती; पण तसेंहि कोणी नव्हतें. शिदूला तिनें नुकताच निरोप दिला होता; आणि तो गेला असेल अशी तिची समजूत होती; परंतु सुदैवानें ती तिची समजूत खोटी ठरली. सोनीनें निरोप दिल्यावर शिदू घरीं जाण्यास निघाला खरा, पण सोनी आतां पुढें काय करते, तें पहाण्यासाठीं ह्मणून तो कांहीं अंतरावर थबकून उभा राहिला होता. सोनी दाराशीं विचारांत निमग्न उभी आहे असें पाहून तिला संकटांतून तारण्यासाठींच कीं काय, शिदू तिच्या मागोमाग आला आणि तिला एकीकडे बोलावून नेऊन कोणीकडूनतरी तुझा घरांत प्रवेश होईल अशी युक्ति करतों, असें तिला आश्वासन देऊं लागला; परंतु कांहींकेल्या सोनीचें समाधान होईना. ती आतां मोठ्यानें गळा काढून रडण्याच्या बेतांत आली होती. शेवटीं शिदू उठला आणि खिडकीपाशीं जाऊन तिच्या फुटक्या तावदानांतून आंत हात घालून वरचा 'बोल्ट' त्यानें युक्तीनें खालीं ओढला. त्याबरोबर ती खिडकी उघडली. मग हळूच सोनीला वर उचलून त्यानें त्या खिडकींतून खालीं घरांत सोडून दिलें आणि ," आतांतर झालें ? अग, माणसाजवळ युक्त्या असल्यावर त्याला काय हवें तें करतां येईल ! बरें तूं आतां जाऊन स्वस्थ नीज. आणि या खिडकीची आणि माझ्या शर्वीलकी कामगिरीची खूब आठवण ठेव !" असें ह्मणून तो चालता झाला.

खिडकी उघडून आंत घरांत सुखरूपपणें येऊन पोहोंचल्यावर सोनीच्या जिवांत जीव आला. आतांपर्यंत शिदूच्या धाडसाच्या आणि युक्तिबाजपणी-

विषयींच्या नुसत्या वल्गना तिनें ऐकिल्या होत्या. पण आजतर तिला त्या दोन्ही गुणांचा प्रत्यक्ष अनुभव घेण्यास मिळाला; आणि शिदूच्या या गुणांमुळेंच तिचा आज बचाव झाला. तेव्हां तिला शिदूविषयीं केवढें प्रेम, केवढी धन्यता व केवढें कौतुक वाटलें असेल! तशांतून शिदूनें फुटलेल्या तावदानांतून हात घालतांना त्याच्या हाताला फुटकी कांच लागून रक्त निघालें होतें, आणि सोनीला उचलतांना तें रक्त तिच्या हाताला लागलें तें नजरेस पडलें तेव्हांतर शिदूविषयीं तिची भक्ति अधिकच दृढ झाली. आपल्यासाठीं एवढी झीज ज्यानें सोशिली, त्याचा स्वभाव किती चांगला व परोपकारी असला पाहिजे, असें तिला वाटून ती मनांत शिदूला अनेक धन्यवाद देऊं लागली.

वेडे मुली! या एका गोष्टीवरून तूं शिदूची जी परीक्षा केलीस ती किती चुकीची आहे? जो शिदू आज तुझा उपकारकर्ता म्हणून वाटत आहे, तोच अखेर केंसानें तुझा गळा कापण्यास तयार होणार नाहीं कशावरून? पण तुझ्या एवढ्या पोरीच्या अंगीं एवढें जगाचें शहाणपण असतें, तर तुझ्यासारख्या भोळ्या भावड्या पोरींना फसवून आपला आत्माराम गार करणाऱ्या नीचांचा धंदा कसा चालता?

## प्रकरण ४९ वें.

# खून ! खून !! खून !!!

दुसरे दिवशीं सकाळींच शिवापुरांत एकच गडबड उडून गेली. त्रिंबकरावांचा मुलगा दाजी याचा कोणीं दुष्टानें खून केला, ह्मणून जिकडेतिकडे बातमी पसरली. आणि तो दुष्ट ह्मणजे शिदूच, असेंहि लोक कुजबुजूं लागले.

पिठासारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें. रस्त्यांतून लोकांची वर्दळ कमीकमी होत आतां बहुतेक अगदीं शांत झालें होतें. अशा वेळीं शिवापुरांतल्या शनिवार-पेठेंतून एक घोड्याची बगी घरघरघर आवाज करित त्रिंबकरावांच्या घराच्या दारासमोर येऊन थांबली. देवडीवरच्या शिपायानें लगबगीनें पुढें येऊन बगीचें दार उघडलें आणि त्रिंबकराव, गोदूताई व एक मुलगा अशीं तिघें त्या बगींतून उतरून घरांत गेलीं. रावसाहेब मामलेदार यांना फार दिवसांनीं व मोठ्या नवसासायासांनीं वृद्धपणीं मुलगा झाला होता. त्याबद्दलच्या आनंदोत्सवानिमित्त रावसाहेबांनीं गांवांतल्या प्रतिष्ठित शेट सावकार, आफिसर, वकील वगैरे गृहस्थांना गांवाबाहेर बगिच्यांत ‘पार्टी’ दिली होती. या मेजवानीस संभावित स्त्रियांनांहि आमंत्रण होतें. मेजवानी झाल्यानंतर कांहीं वेळ गाणेंबजावणें झालें. अर्थात् मंडळी घरोघर परतली तेव्हां मध्यरात्र उलटून गेली होती.

त्रिंबकराव गाडींतून उतरले ते थेट आपल्या माडींत गेले. कपडे वगैरे उतरल्यावर निजावयास जाण्यापूर्वी त्यांच्या नेहमींच्या सवयीप्रमाणें त्यांना चिरूट ओढण्याची आठवण झाली. परंतु चिरुटाची पेटी कोठें सांपडेना. ह्मणून त्यांनीं अंमळ रागावून नोकराला हांक मारली आणि “इथली पेटी काय झाली?” ह्मणून विचारिलें. नोकराला बिचाऱ्याला काय माहीत ? त्यानें येथें पहा, तेथें पहा, असें पुष्कळ ठिकाणीं दिवा घेऊन पाहिलें; पण पेटी कोठेंच सांपडेना. इतक्यांत त्याला आठवण झाली कीं, दाजीसाहेब चिरूट ओढित असतात, तेव्हां त्यांनीं कदाचित् ती नेली असेल. ह्मणून त्यांच्या खोलींत जाऊन पहाण्याचा विचार करून तो हातांत दिवा घेऊन तिकडे गेला. त्याला दाजीसाहेबांच्या खोलींत चिरुटाची पेटी सांपडली खरी, पण तेथें त्यानें जो भयंकर देखावा पाहिला, त्यानें, त्याच्या तोंडून एकदम एक भयसूचक आरोळी निघाली, आणि पुढें त्याची अगदीं बोबडीच वळली. त्याची इतकी लटपट उडाली कीं, पाहिलेला प्रकार कळविण्यासाठीं धावण्याच्या धांदलींत त्याच्या हातांतली चिरुटाची पेटी पडली, दिवा विझला आणि तोहि जिन्याच्या पायऱ्यांत पाय अडखळून गडगड

खालीं आला. ही गडबड ऐकून काय प्रकार आहे ह्मणून पहाण्यासाठीं त्रिंबकराव टेबलावरचा दिवा घेऊन धावले. पहातात तों आपला नोकर जिन्यांतून घडघडत खालीं आल्यामुळें पाय मुरगळून पडला आहे व भीतीनें अगदीं भेदरून गेला आहे. त्रिंबकरावांनां पहातांच तो कसाबसा उठण्याचा प्रयत्न करूं लागला; आणि "काय गडबड आहे?" ह्मणून त्यांनीं विचारतांच "द-द-दा-दाजीसाहेबां—" पुढें बिचाऱ्याला बोलतांच येईना.

झालेल्या प्रकाराचें यत्किंचित् स्वप्नसुद्धां त्रिंबकरावांनां पडलें नव्हतें. अलीकडे दाजी वाईट लोकांच्या संगतीं लागून भांग ओढूं लागला होता. नुक्ता तीनचार दिवसांपूर्वीच तो भांग पिऊन अगदीं तर्र होऊन पडल्याबद्दलचें त्रिंबकरावांनां कळल्यावरून ते त्याला सुडकून बोलले होते. तथापि एकदा ज्या गोष्टीबद्दल आपण बोलणें खाल्लें, ती गोष्ट पुनः करावयाची नाहीं, असा निश्चय चालविणारां-पैकीं दाजी नसल्यामुळें तो पुनः कोठूनतरी असाच निशा करून आला असेल, असें अर्थातच त्रिंबकरावांनां वाटलें व ते तसेच पुढें दाजीच्या खोलींत गेले. तेथें त्यांनीं जो भयंकर प्रकार पाहिला, तो काय वर्णावा! दाजी अंथरुणाचे अंथरुणावरच पडला असून त्याचें सगळें अंग रक्तानें भरलें आहे; त्याचे कपडे व बिछाना हींहि रक्तानें चिंब भिजलीं असून तोंडांत चिंध्यांचा बोळा दिलेला असल्यामुळें त्याचें तोंड वासून गेलें आहे, डोळे फाडलेले आहेत व गळ्यापाशीं शस्त्रानें जखमा झालेल्या स्पष्ट दिसत आहेत. एकंदरींत दाजीचा चेहेरा व त्याची ती खोली या वेळीं फार भेसुर दिसत होती. त्रिंबकराव पुरुषासारखे पुरुष, पण तेहि हा भयंकर प्रसंग पाहून अत्यंत घाबरले व आपल्या नोकरांनां हांका मारूं लागले. त्यांच्या हांका ऐकून गोदूताई दडदड जिना उतरून काय गडबड आहे ह्मणून पहाण्यासाठीं धावत आल्या. नोकरचाकर जमा झाले. या सर्वांची गडबड ऐकून मुलेंहि जागीं झालीं आणि दाजीच्या खोलीकडे धावत गेलीं. गोदूताईंनां व मुलांनां भीति वाटेल ह्मणून आंत येण्याचें त्रिंबकरावांनीं मना केलें, तथापि गोदूताईंचा जीव राहीना. त्या बाहेरून "अरे काय आहे तें मला कळूं द्या—" ह्मणून एकच आकांत करूं लागल्या. तेव्हां एका नोकरानें धीर करून ह्मटलें "काय सांगूं बाईसाहेब! आपल्या दाजीसाहेबांचें शीर कोणीं दुष्टानें कापलें."

हें ऐकतांच गोदूताई मूर्च्छा येऊन पडल्या. त्यांनां सांवरतांसावरतां पुरेवाट झाली. मुलांनां आंत कोणी जाऊं देईना. पण त्यांची जिज्ञासा जबर होती.

त्यांनीं मोठ्या माणसांच्या पायांखालून निसटून आंत जाण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण त्रिंबकरावांनीं हा प्रकार पाहून त्या मुलांनां दोन्ही हातांनीं बाहेर लोटून दिलें व ते फारच त्रासले तेव्हां एकाच्या तोंडांत देऊन त्यांनां वर घेऊन जाण्यास एका नोकराला सांगितलें.

या जमलेल्या नोकर मंडळींत रामा शागीर्द हाहि अर्थात् होताच. त्यानें तो खुनाचा प्रकार पहातांच चमत्कारिक तोंड केलें. जणूं काय हा खून कोणीं केला असावा, हें आपणांस सहज सांगतां येईल, पण त्याचें नांव घ्यावें कोणीं? असें तो आपल्या मुद्रेनें सुचवित होता. त्रिंबकराव राम्याला पाहून ओरडून ह्मणाले "राम्या! लेका तोंडाकडे काय पहातो आहेस? जा धाव आणि डाक्तरसाहेबांला घेऊन ये."

मालकाचा हुकूम मान्य केलाच पाहिजे, ह्मणून राम्या धावला; पण हें कृत्य शिदूचेंच असलें पाहिजे, हा तर्क या वेळीं त्याच्या डोक्यांत इतका घोळून राहिला होता कीं, जातांजातां त्याच्या तोंडून त्याबद्दल उद्गार निघाल्यावांचून राहिले नाहींत. तो आपल्याशींच पुटपुटूं लागला "पुष्कळ भाऊ भाऊ पाहिले, पण अशी भाऊबंदकी साधलेली नव्हती बुवा कधीं ऐकिली! छोटेसाहेबांच्या धाडसाची कमालच ह्मटली पाहिजे!! काल संध्याकाळीं दोघां भावांनीं चाकू उपसले, तेव्हांच खून पडायचे! पण मीं मध्यें पडून तो प्रसंग टाळला. तरी अखेर छोटेसाहेबांनीं डाव साधायचा तो साधलाच."

डाक्तरला लवकर आणण्याचें सोडून रामा कांहीं पुटपुटत आहे, हें पाहून त्रिंबकराव संतापले आणि "काय चालली आहे रे याची पिरपिर!" ह्मणून त्यांनीं तेथें असलेल्या दुसऱ्या एका नोकराला विचारिलें. नोकरांची आपापसांत खाजगी अदावत असतेच; आणि एक दुसऱ्याच्याविरुद्ध मालकाजवळ चुगली सांगण्याची वाटच पहात असतो. तेव्हां राम्याच्या तोंडचे शब्द मालकाच्या कानीं घालून त्याला नोकरीवरून दूर करविण्याची ही सोन्यासारखी संधी कोण घालवील? राम्याचे शब्द तो गेल्यावर पाठीमागें जसेचे तसे त्रिंबकरावांच्या कानांपर्यंत जाऊन पोहोंचले, हें सांगावयास नकोच.

भावाभावांमधलीं हीं भांडणें एकमेकांवर शस्त्र उपसण्याच्या पल्ल्यापर्यंत गेलेलीं त्रिंबकरावांनां ठाऊक नव्हतीं. यामुळें दाजीच्या खुनाचें मूळ अंदाजानें कांहींच काढतां येईना. पण राम्याच्या तोंडचे शब्द ऐकून त्यांच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडल्यासारखें दिसलें. इतकेंच नाहीं, तर या गोष्टीचा बोभाटा

न व्हावा, ह्मणून राम्याच्या तोंडाला कुलूप घालण्यास काय करावें, हाहि विचार त्याच्यावरोबरच त्रिंबकरावांना येऊन पडला. त्यांनीं राम्याची चुगली सांगणारावर रागावून त्याला चूप बसविलेंच; परंतु राम्याला चूप बसविणें हें काम तितकें सोपें नव्हतें. तो अंमळसा माथेफिरू होता. यामुळें त्याचें तोंड कसें बंद करावें, ही चिंता त्यांना येऊन पडली होती. कारण एकदा का राम्याच्या तोंडचे शब्द पोलीसाच्या कानांपर्यंत जाऊन पोहोंचले कीं पिशाचांच्या हातीं कोलीत दिल्याप्रमाणें परिणाम होणार, पोलीस त्या शब्दांवर भला जंगी व्यूह रचून शिदूवर गुन्हा शाबीद करण्यासाठीं भगीरथ प्रयत्न करतील, त्याला पकडून नेऊन एकीकडे समज देतील, त्याचेकडून कबुली लिहून घेतील, घरच्या माणसांना वेळोवेळीं साक्षीकरितां बोलावून नेऊन एकंदर घराण्याच्या अब्रूच्या चिंधड्या उडवितील, पैसे काढण्याकरितां छळतील, काय हवें तें करतील, अशी भीति त्रिंबकरावांच्या मनाला खात होती; आणि ही भीति केवळ काल्पनिक होती, असें नाहीं. त्रिंबकरावांनीं आज जवळजवळ वीस वर्षें वकिलीचा धंदा केलेला होता. या धंद्याच्या कामांत पोलीसच्या कृत्यांचा त्यांना पुरा अनुभव आला होता. पोलीसांकडून समज कशी काय मिळत असते, याविषयीं कोर्टांतून आरोपींच्या तोंडून अनेक वेळां निघालेल्या अत्यंत हृदयद्रावक कथा त्यांनीं ऐकिल्या होत्या. सेशन जज्जांनीं व हायकोर्टांनींसुद्धां आपल्या निवाड्यांतून पोलीसांच्या कृष्णकृत्यांवर केलेली सक्त टीका त्यांनीं वाचिली होती; आणि इतकें झालें तरी त्यांच्या जुलमास यत्किंचितहि आळा न पडतां दिवसेंदिवस त्यांचा शिरजोरपणा उलट वाढतच चालला आहे, हेंहि त्यांना ठाऊक होतें. राम्याच्या या स्पष्टोक्तीच्या भावी परिणामाचें काळेंकुट्ट चित्र त्यांच्या डोळयांपुढें उभें राहून ते अत्यंत भयभीत झाले होते, यांत नवल नाहीं. दाजीच्या आकस्मिक अपघातामुळें त्यांचें अंतःकरण शोकाकुल झालें होतेंच. पण या पुत्रशोकापेक्षांहि त्यांना भावी हालअपेष्टेचें आणि अब्रूस लागणाऱ्या कलंकाचें भय जास्त व्याकुळ करित असावेंसें स्पष्ट दिसत होतें.

इकडे डाक्तरसाहेबांना आणण्यासाठीं ह्मणून राम्या गेला होता, तो पलीकडल्या आळीला वामनराव शिधये एल्. एम्. एण्ड एस्. रहात होते त्यांच्या घरीं गेला. इतक्या अपरात्रीं त्रिंबकरावांच्या घरचें बोलावणें आलेलें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. कारण, अकरा वाजेपर्यंत त्रिंबकरावांना मेजवानीच्या तेथें त्यांनीं पाहिलें होतें. त्या वेळेस ते नेहमींच्यासारखे आनंदांत दिसले. वामन-

रावांना एका 'पेशंट'कडून जरूरीचें बोलावणें आल्यामुळें ते जेवण झाल्याबरोबर गाण्याबजावण्यांत सामील न होतां तसेच निघून आले होते. पण त्यालाहि कांहीं ह्मणण्यासारखा फारसा अवकाश झालेला नव्हता. फारतर दोन तास झाले असतील. इतक्यांत त्रिंबकरावांच्या घरीं काय झालें तें डाक्तरसाहेबांच्या लक्ष्यांत येईना. म्हणून त्यांनीं "कोण आजारी आहे रे ?" ह्मणून राम्याला प्रश्न केला.

राम्यानें घाबऱ्याघाबऱ्या घडलेली हकीगत थोडक्यांत सांगितली. दाजीचा इतक्यांत कोणीं खून केला, या गोष्टीवरहि एकदम त्यांचा विश्वास बसेना. कारण नुक्ता साडेअकरांच्या सुमारास त्यांनीं त्याला त्याच्या घराकडे जातांना पाहिलें होतें. तेव्हां डाक्तरसाहेबांना वाटलें कीं, दाजी कोठूनतरी भांगगांजा पिऊन आला असेल आणि त्याच्या नशानें चक्कर येऊन एखाद्या दगडावर डोकेंबिकें आपटून जखम झाली असेल. त्याचा खून कोण आणि कशासाठीं करील ?

पण आतां घरीं बसून तर्क करण्यांत अर्थ नव्हता. वामनराव जखम बांधण्याचें साहित्य व 'स्टेथास्कोप' वगैरे घेऊन एकदम घराबाहेर पडले आणि तडक त्रिंबकरावांच्या घरीं आले. दाजीच्या खोलींत येऊन झालेला प्रकार पहातांच ते अगदीं थक्क होऊन गेले. त्यांनीं केलेला तर्क अगदीं चुकीचा होता, हें त्याला पाहिल्याबरोबरच कळून चुकलें. त्यांनीं आल्याबरोबर दाजीच्या नाडीला हात घातला, तों नाडीचा पत्ता नसून सर्व अंग बर्फासारखें थंडगार पडलें होतें. त्यांनीं एक सुस्कारा टाकून सांगितलें "अंत केव्हांच झालेला आहे. शस्त्रानें वर्मी जखम होऊन त्यापासून रक्तस्राव झाला असला पाहिजे."

'पेशंट' मेला तरी येथें चाचपून पहा, तेथें पहा, असें डाक्तरसाहेबांचें चाललेंच होतें. कोणत्या ठिकाणीं कशी व कशानें जखम लागली हें ते पहात होते. जणूं काय हें कळल्यापासून मृतांच्या मातापितरांना तितकेंच समाधान होणार होतें ! चाचपतां चाचपतां दाजीच्या अंगाखालीं कांहींसें हाताला लागलें. तें डाक्तरसाहेबांनीं ओढून बाहेर काढिलें. पहातात तों शिदूच्या डोक्याचा रुमाल. डाक्तरसाहेबांना त्या वस्तूचें एवढें महत्त्व वाटलें नाहीं. त्यांनीं तो बाजूला ठेविला आणि कांहींएक न बोलतां उठून बाहेर येऊन खिशांतली एक विडी पेटवून झुरके घेतघेत स्वारी घरीं जाण्यास निघाली.

## प्रकरण ५० वें.

## गरीब बिचारे त्रिंबकराव !

दाजीच्या अंगाखालून काढलेला रुमाल शिदूचाच आहे, हें हजर असलेल्या सर्वांनीं ओळखलें; आणि एवढी गडबड झाली, शेजारचेपाजारचेसुद्धां लोक जमा झाले, तरी शिदू आपला खुशाल आपल्या गाडींत झोंप घेत पडला आहे, हें पाहूनतर त्रिंबकरावांचा शिदूविषयींचा संशय अधिकच दृढ झाला. त्यांनीं राम्याला विचारिलें "कायरे, हा घरीं आला तेव्हां किती वाजले होते?"

"वाजले असतील अक्रा साडे अक्रा."

"अन् शिदू आला तेव्हां ?"

"तेव्हां एकाचा ठोका नुकताच पडला होता."

"आज इतका उशीर कां झाला म्हणून तूं त्याला विचारलें होतेंस काय?"

"उशीर रोजचाच आहे! रोज काय विचारायचें आहे?"

"म्हणजे! आणि रोज त्याला इतक्या रात्रीं दार कोण उघडतें?"

"काय सांगूं महाराज, छोटेसाहेब रोज रात्रीचे बाहेर जातात, तेव्हां मला सांगून जातात कीं, दार नुसतें लोटून घे, कडी घालूं नकोस. मी कमीजास्ती बोललों तर माझे अंगावर वस्कन् धावून येतात, तोंडांत मारतात—"

"दाराला कडी घालून निजाय्ला काय झालें? तूं रोज रात्रीचें दार उघडें ठेवितोस, अन् रात्रीं तुझा बाप येऊन चोरी करून गेला तर देशीलका नुकसान भरून ?"

"पण रावसाहेब, माझ्या बापाला मरून चौदा वर्षे झालीं. आतां तो चोरी करायला कसा येणार? आपल्या घरीं चोरी होऊं नये अशी आपली इच्छा असली तर मुलांनीं रात्रीचें बाहेर पडूं नये असा बंदोबस्त करावा. दार उघडें ठेवूं नये तर करावें तरी काय? एक राजेश्री येणार रात्रीं साडे अकरा वाजतां तर दुसरे येणार एक वाजतां, आणि आज खास यजमानांची स्वारी तर एक वाजून गेल्यावर आली! आतां इतक्यांस प्रत्येक वेळीं दार उघडायला उठायचें आपल्या बापाच्यानें नाहीं होणार! ही बेटी नोकरी नाहीं, तर सुळावरची पोळी आहे. ही नोकरी करण्यापेक्षां चार घरें भिक्षा मागितलेली बरी! बरें मीं दाराला कडी लाविल्यानें चोरी होणार नाहीं असें थोडेंच आहे? दार बंद असलें तर दाजीसाहेबांच्या खोलींतली रस्त्यावरची खिडकी बाहेरून हात घालून आमचे छोटेसाहेब उघडतात, त्यांना कोणीं बोलावें?"

आपल्या दोन्ही चिरंजिवांचा हा नित्यक्रम ऐकून त्रिंबकराव चूप बसले. त्यांच्यावर देखरेख ठेवावयास पाहिजे होती ती ठेविली नाहीं, उलट त्यांचे लाड केले त्याचाच हा परिणाम झाला, हा विचार त्यांच्या मनाला आतां खाऊं लागला. ते शिदूकडे जाण्यासाठीं निघाले. जातांना शिदूच्या रुमालासंबंधाचे विचार व राम्याचे शब्द त्यांच्या कानांत एकसारखे गुणगुणत होते, आणि हें त्याचेंच खास कृत्य असावें, असेंहि त्यांची मनोदेवता त्यांनां खात्रीपूर्वक सांगत होती. त्रिंबकराव जिना चढून वर गेले तों शिदू पाय पसरून आणि तोंडावरून पांघरूण घेऊन स्वस्थ निजला होता. ही स्वस्थता केवळ बाह्यात्कारी होती, हें सांगावयास नकोच. त्रिंबकरावांनीं एकदोन हांका मारिल्या, तरी झोंपेचें मिष करून शिदू निजूनच राहिला. शेवटीं त्रिंबकरावांनीं संतापानें त्याच्या अंगावरची दुलई फराफरा ओढली. तेव्हां नाइलाजास्तव तो बिछान्यावर उठून बसला आणि कपाळाला आंठ्या घालून डोळे चोळितचोळित ह्मणाला "कोण बुवा हा त्रास! आपल्याला नाहीं असें खपायचें; धडपणें झोंपसुद्धां कोणी घेऊं देईना!"

एरवींच्या वेळीं त्रिंबकरावांनीं हे शब्द मुकाट्यानें ऐकून घेतले नसते. पण सध्याचा प्रसंग कांहीं निराळा होता. पुत्रशोक आणि अब्रूला कलंक लागण्याची भीति, या दोन गोष्टींनीं त्यांचें मन अत्यंत कातर झालें होतें. आणि शिदूनेंतर ढुंगणाचें सोडून डोक्याला गुंडाळलें होतें! तेव्हां अशापुढें त्रिंबकरावांचें काय चालणार? प्रत्यक्ष मुलानें उच्चारलेले अपमानकारक शब्द ते आतां मुकाट्यानें गिळून बसले. ते एवढेंच ह्मणाले "शिदू! हें तूं आपल्या भावाला केलें आहेस तरी काय? त्यानें अशी तुझी काय खोडी केली होती?"

जणूं काय ह्या प्रश्नाचा आपल्याला अर्थच कळला नाहीं, अशा विस्मयपूर्ण दृष्टीनें शिदू बापाच्या तोंडाकडे क्षणभर पहात बसला, आणि आपण काय बोलत आहों त्याचें देहभान विसरून चटकन् ह्मणाला "कोणाला! दाजीला? मीं काय केलें? मला ठाऊकहि नाहीं; झालें आहे काय त्याला?"

त्रिंबकराव ह्मणाले "आणखी व्हायचें तें काय राहिलें आहे बाबा? त्याचा खून झाला. शिदू, खरें सांग, तुझा कांहीं यांत हात आहे कीं नाहीं?"

शिदू बिछान्यांतल्या बिछान्यांत अगदीं भांबावल्यासारखा होऊन बसला. त्रिंबकरावांच्या बोलण्याचा भावार्थ त्याला कळला नाहीं; निदान न कळल्यासारखी बतावणी तरी तो करित आहे, असें स्पष्ट दिसत होतें. ऐकलें न ऐकलेंसें करून तो ह्मणाला "काय? दाजीला काय झालें?"

"खून झाला, खून ! काय शंभरवेळां ओरडून सांगूं ? ( त्याच्या पायां पडून व डोळ्यांत अश्रु आणून ) बाबा, हात जोडून तुला विचारितों, तुझें यांत जर कांहीं अंग असेल तर मला आत्तां कळूं दे. पोराच्यापायीं पोर गेलें आणि आतां अब्रूचे खिंडवडे होतील ते वर ! तूं यांत सामील असलास तर मला आतां हिरकणी खाऊन जीवच दिला पाहिजे. बाबा, बोल लवकर. तुझें हें कृत्य नाहीं असें ऐकण्याचें जर माझें भाग्य असेल, तर मला पुत्रशोकाचेंहि एवढें दुःख वाटणार नाहीं." इतकें ह्मणून त्रिंबकराव थांबले.

पुरुषासारखे पुरुष, पण त्यांचें धैर्य या वेळीं इतकें खचलें कीं, ते मटकन् खालींच बसले. आपण इतकी विनवणी करित आहों, तरी शिदू एक अक्षरसुद्धां बोलत नाहीं, हें पाहून त्रिंबकरावांच्या मनाला काय वाटलें असेल ? ज्या गोष्टीला आपण एवढे भितों, त्या गोष्टीच्या–तोंडास कलंक लागण्याच्या–निश्चितपणाविषयीं मनाची खात्री होऊन भावी स्थितीचा काळाकुट्ट अंधार डोळयांपुढें आल्यामुळें त्यांची किती शोचनीय स्थिति झाली असेल ? आतां सरकारी अधिकारी येऊन चौकशी करतील आणि नानातऱ्हेचे प्रश्न विचारून पुरेपुरेसें करतील, त्यांना काय सांगावें, कसें समजवावें, कोणत्या उपायांनीं आलेला प्रसंग टाळावा, आपल्या घराण्याची लाज कशी राखावी, मिळविलेला नांवलौकिक कसा जतन करावा, शिदूचे प्राण कोणत्या रीतीनें वांचवावे, बायकोच्या मनाला कसा धीर द्यावा आणि लोकांत उजळ माथ्यानें फिरतां येण्यास काय करावें, या गोष्टीच्या चिंतेनें त्रिंबकरावांचें मन इतकें व्याकुल झालें होतें कीं, त्याच्या योगानें मूर्च्छा येऊन त्यांनीं तेथेंच मान टेंकली. कांहीं कालपर्यंत शून्य अंतःकरण होऊन ते तसेच बसले राहिले.

## प्रकरण ५१ वें.

## सदूला नेलें.

या खुनाचें गूढ उकलण्यास त्या दिवशीं संध्याकाळीं घडलेलें वर्तमान कळणें अवश्य असल्यामुळें ती थोडीशी हकीगत येथें देतों.

दाजी हा वाईट लोकांच्या नादीं लागून व्यसनाधीन झाला होता, ही गोष्ट आमच्या वाचकांनां अश्रुतपूर्व आहे, असें नाहीं. महिन्याच्या महिन्यास मिळणारा पगार दाजी खिशांत टाकी, त्यांतून एक कवडीहि घरांत देत नसे व तिची अपेक्षाहि पण त्रिंबकरावांनीं कधीं केली नव्हती. ज्याचें त्यानें मिळवावें आणि ज्याचें त्यानें उडवावें, अशा रीतीचें शिक्षण त्रिंबकरावांकडून मुलांनां मिळालें होतें. दाजीनें अर्थातच या शिक्षणाचा पूर्ण फायदा करून घेतला होता. इतकेंच नाहीं, तर पगारापेक्षां कमीअधिक खर्च झाल्यास आईचा पिच्छा पुरवून तिच्याकडून चोरूनमारून रकमा काढण्याचे, किंवा आपणास नोकरी लागली आहे या सबबीवर मारवाड्याकडून कर्ज काढून आयतेवेळीं ती कर्जाची रकम बापाच्या अंगावर टाकण्याचे प्रसंग त्याला थोडेथोडके आले होते, असें नाहीं; आणि थोडेतरी कां यावे! इष्कीबाज पोषाख, गाणेंबजावणें, नाचतमाशे व नाटकें यांचा शोक, सुराबाईवरचें निस्सीम प्रेम, जुगाराविषयीं आसक्ति, अशा अनेक व्यसनांच्या पायीं कुबेरसुद्धां भिकेस लागावयाचा! तशांत अलीकडे त्याला गांजा पिण्याचें व्यसनहि जडलें होतें. पापमुक्तेश्वराच्या मंदिरांत बद्रीनारायणाकडचे कोणीएक साधू हल्लीं उतरले होते, त्यांचा प्रसाद ह्मणून गांजाची चिलीम जी एकदा दाजीनें तोंडास लाविली, तिचा, गुरुशापभयास्तव त्याला अव्हेर करितां येईना. या साधूनें त्याला कधीं वेदांताच्या गोष्टी सांगून तर कधीं योगाचे चमत्कार दाखविण्याचें कबूल करून, कधीं गुरुसिद्धीचें आमिष दाखवून तर कधीं किमयेची युक्ति शिकविण्याचें पतकरून इतकें नादीं लाविलें होतें कीं, त्या गुरूच्या पायीं घरदार व नोकरी यांकडे त्याचें पूर्ण दुर्लक्ष्य झालें होतें. स्वताजवळ होतेंनव्हतें तेवढें सर्व गुरुचरणीं अर्पण करून प्रसंग पडेल तेव्हां चोऱ्यामाऱ्या करण्यांतहि स्वारी पटाईत झाली होती. शिदूच्या खोलींतलें नोटांचें पाकीट चोरल्याची हकीगत मागें सांगितलीच आहे. त्यांपैकीं कांहीं नोटाहि गुरुचरणारविंदींच अर्पण व्हावयाच्या होत्या. अस्तु.

ज्या दिवशीं खून घडला त्या दिवशींच संध्याकाळीं दाजीला त्याच्या गुरू-कडून जरूरीचें बोलावणें आलें होतें; परंतु शिदूची व त्याची धुसपूस चालली

होती व दुसरेंहि कांहीं अगत्याचें काम असल्यामुळें दाजीला त्या वेळीं जातां येईना. म्हणून त्यानें मी रात्रीं येईन, असा निरोप पाठविला होता. कबूल केल्याप्रमाणें जेवणखाण उरकल्यावर दाजी आपल्या गुरूकडेस जाण्यास निघाला. गुरूची आज्ञा पाळणें हातर त्या भेटीचा उद्देश होताच, पण संतापलेल्या डोक्यास शांत करण्याची जी अमृतवल्ली गुरूपाशीं होती, तिच्या सेवनाचाहि लाभ घ्यावा, हा त्या भेटीचा आणखीहि एक उद्देश होता. रात्रीं गुरूच्या मठींत या अमृतवल्लीचें यथेच्छ सेवन करून दाजीची स्वारी परतली, तेव्हां साडे अकरांचा सुमार झाला होता. घराचा पुढील दरवाजा लागला असेल, अशा समजुतीवर दाजी बाजूच्या खिडकींतूनच आंत शिरला. रस्त्यावरच्या पोलीसशिपायानें त्याला आंत शिरतांना पाहिलें होतें. दुसरे दिवशीं सकाळीं फौजदारसाहेब चौकशीसाठीं आले, तेव्हां त्या पोलीसशिपायाच्या तोंडूनच ही हकीगत निघाली. दाजीच्या मागून दोनअडीच तासांनीं शिदोबा घरीं आले. ते रोजच्याप्रमाणें पुढल्या दरवाजानें आंत शिरले, आणि दाजीच्या खोलींतून माडीवर जाण्यास जिना होता त्या जिन्यानें वर आपल्या माडींत जाऊन निजले. ही हकीगत राम्याच्या तोंडून फौजदारसाहेबांनीं काढली. राम्याला यापेक्षां कांहींतरी जास्त माहीत असलें पाहिजे, असें फौजदारसाहेबांनीं तेव्हांच ताडिलें आणि ते त्याच्यापासून अधिक माहिती काढण्याकरितां खोदखोदून विचारूं लागले.

"शिदू बाहेरून आल्यावर किती वेळानें माडीवर गेला? मध्यंतरीं तो काय करित होता? कुणाशीं बोलत होता कीं काय?" वगैरे प्रश्न फौजदारसाहेबांनीं त्याला विचारिले; परंतु त्याचें आपलें एकच उत्तर होतें. तो म्हणाला "मीं शंभरदां सांगितलेंना कीं, छोटेसाहेब आले आणि माडीवर गेले, यापलीकडे मला कांहीं माहीत नाहीं. मीं तोंडावरून पांघरूण घेतल्यामुळें कुणी बोलत होतें किंवा काय, तें मला कांहीं माहीत नाहीं. भाऊभाऊ नेहमीं भांडून एकमेकांवर चाकू घेऊन धावत. त्यांच्या भांडणांत पडून मला काय करायचें होतें? मी कशाला तिकडे लक्ष्य देऊं? मी आपला तोंडावरून पांघरूण घेऊन स्वस्थ निजलों होतों."

रामाच्या या हकीगतींत दोन गोष्टी फौजदारसाहेबांना फार महत्त्वाच्या वाटल्या, आणि त्या दोहोंचा उलगडा झाल्याशिवाय या खुनाचा पत्ता लागणार नाहीं, अशी त्यांनींहि मनामध्यें गांठ बांधिली. एक गोष्ट ही कीं, दाजीच्या खोलीबाहेर राम्या व दुसरा एक गडी असे दोघे निजले असतां दाजीचा खून होतांना कांहींच आवाज कोणाला ऐकूं गेला नाहीं हें कसें? आणि दुसरी गोष्ट,

दाजी खिडकींतून आंत आल्यावर ती आंतून कोणीं लावून घेतली? कारण दाजीतर त्या वेळीं इतका तर्र झाला होता कीं, खिडकी लावून घेण्याइतकी शुद्धि त्याला खास नव्हती. मग खिडकी लाविली कोणीं? शिदूनें बाहेरून आल्यावर बाहेरच्या दरवाजाला आंतून कडी लाविली, असें राम्याच्या जबानींत साफ आलें होतें. हें खरें असेल तर खुनी मनुष्य कोणी घरांतलाच असला पाहिजे, हें उघड आहे. घराचीं सगळीं दारें व खिडक्या बंद आणि घरांत खून होतो, तेव्हां साहजिकच वरच्यासारखा तर्क कोणींहि केला असता.

या वर सांगितलेल्या दोन गोष्टींपैकीं एकीचा–खिडकी लावण्याचाहि खुलासा शिदूनें लवकरच केला. "आपण बाहेरच्या दरवाजानें घरांत शिरून दाजीच्या खोलींतून वर जाऊं लागलों, तेव्हां खिडकी उघडी राहिलेली पाहून कोणी चोरबीर येईल अशा भीतीनें ती लावून घेतली," असें शिदू ह्मणाला; पण ती हकीगत सांगतांना त्याची मुद्रा कावरीबावरी दिसत होती. ह्मणून फौजदारसाहेबांनीं "तूं काल काय केलेंस, कुठेंकुठें गेला होतास, घरीं येण्यास इतकी रात्र कां झाली?" वगैरे गोष्टी खोदखोदून त्याला विचारल्या. त्या प्रश्नांचे जबाब देतांना तो कचरत होता. यावरून फौजदारसाहेबांनां त्याच्या वर्तनाविषयीं साहजिकच संशय येऊन ते शिदूला हातीं धरून त्याच्या माडींत घेऊन गेले आणि कोठें शस्त्र किंवा रक्तानें भिजलेले कपडे वगैरे असतील तर पहावे ह्मणून बारकाईनें शोधूं लागले. पण तसें कांहीं आढळलें नाहीं. त्याच्या कपड्यांत त्याच्या डोकीचा रुमाल मात्र कोठें दिसेना, ह्मणून त्याबद्दल फौजदारांनीं त्याला विचारलें असतां त्याचें समाधानकारक उत्तर त्याच्यानें देववलें नाहीं. पुढें शोध करतां तो रुमाल मृताच्या अंगाखालीं होता, असें कळून आलें. शिदूविषयींच्या संशयाला या गोष्टीनें पुष्टीकरण मिळालें. "हा रुमाल दाजीच्या खोलींत कसा आला?" ह्मणून विचारतां शिदूनें जबाब दिला कीं "मी प्रथम हा रुमाल घालून बाहेर जाण्यास निघालों होतों; परंतु दाराबाहेर पडतों तों मला वाटूं लागलें कीं, रात्रीच्या वेळीं डोक्यावर एवढें ओझें ठेवून काय करायचें आहे? ह्मणून तो आळसानें दाजीच्या खोलींत फेंकून देऊन मी टोपी घालूनच चालता झालों." "टोपी कुठून आणली?" म्हणून विचारत तो कांहींएक बोलेना. कारण टोपी जर माडीवरून आणली, तर रुमाल ठेवण्या पुरता माडीवर जाण्याचा आळस केला, असें ह्मणण्यांत तात्पर्य नव्हतें. या वेळीं राम्याच्या बोलण्यांत मघाशीं सहज निघालेल्या चाकूविषयींच्या शब्दांची

फौजदारसाहेबांनां आठवण झाली आणि ते शिदूला ह्मणाले "पण तूं दाजीवर चाकू घेऊन धावला होतास तें कां?"

शिदू ह्मणाला "तो मला चीड येण्यासारखें बोलला ह्मणून! तें सहज रागाच्या झपाट्यांत झालें; ह्मणून मी चाकू घेऊन भावाचा गळा खरोखरीच कापीन, असें तुह्मांला वाटतें काय?"

फौजदार म्हणाले "तूं आपली काय जबानी असेल ती मॅजिस्ट्रेटसाहेबांपुढें दे. मग त्यांनां वाटेल तर तुझें ह्मणणें खरें समजून ते तुला सोडून देतील." असें ह्मणून फौजदारसाहेबांनीं लागलीच त्याचा हात धरला आणि ते त्याला पोलिसठाण्यांत घेऊन गेले. त्रिंबकराव, गोदूताई व शेजारीपाजारी मंडळी सगळी तोंडाकडे पहात राहिली!

शिदूवर संशय घेऊन पोलिसांनीं त्याला धरून नेलें, ही बातमी हां हां ह्मणतां सगळया गांवभर पसरली, आणि जो तो आपलें कामधाम सोडून ती गंमत पहाण्यासाठीं धूम पोलिसठाण्याकडे जाऊं लागला. तेथें रस्त्यांत एकच गर्दी झाली. जो तो शिदूकडे बोट दाखवून घडलेल्या हकीगतींत कल्पनेची भर घालून ती दुसऱ्यास सांगूं लागला. या हकीगती काल्पनिक रंगांनीं इतक्या चित्रविचित्र शृंगारल्या होत्या कीं, एकाच घडलेल्या प्रकाराचीं हीं सगळीं चित्रें आहेत, असें कोणालाहि वाटलें नसतें. कोणी ह्मणाले "शिदूनें पोलिसशिपायाशीं मारामारी केली, तेवढ्यावरून त्याला अटकेंत ठेविलें आहे." कोणी ह्मणाले "आईबापांशीं भांडून शिदू व त्याचा भाऊ असे दोघे पळून चालले होते. पैकीं शिदू जिवंतपणें पोलिसांच्या हातीं लागला आणि दाजीचा कोणीं दुष्टानें खून करून त्याचें प्रेत एका शेतांत टाकिलें होतें. त्याची खबर त्रिंबकरावांला लागून त्यांनीं तें मुलाचें शव घरीं आणविलें." एकानेंतर अशीहि गप्प झोंकली कीं "त्रिंबकराव व त्यांचें कुटुंब अशीं दोघेंहि मामलेदारसाहेबांकडेस रात्रीं जेवण्यास गेल्यावर मागें भावाभावांनीं आपल्या मित्राच्या साह्यानें नाटक करून दाखविलें. त्यांत शिदू लहान असल्यामुळें राम झाला होता व दाजी रावण झाला होता. रामरावणांचें युद्ध होऊन रामाच्या हातून रावणाला मृत्यु आला, ही कथा खरोखर जशी घडली तशीच ती मुलांनीं नाटकांत करून दाखविली!" शिदूच्या वर्गांतल्या मुलांनां शिदूला पकडून नेल्याचें वर्तमान कळलें, तेव्हां त्यांतल्या पुष्कळांनां एकेप्रकारें आनंद झाला, आणि "बरी एकदाची व्याद गेली!" ह्मणून ते समाधान मानूं लागले. गंगाधराचा भाऊ कृष्णा हा यंदा मॅट्रिक्युलेशनच्या

परीक्षेस बसणार होता. त्याला हें वर्तमान रस्त्यांत कळल्यावर थोडेंसें वाईट वाटलें आणि ' या जगांतहि दुष्टांस त्यांच्या कर्मानुरूप बक्षीस मिळतें,' याबद्दल बरेंचसें समाधानहि झालें. तो ती खबर आपल्या आईला देण्यासाठीं त्याच पावलीं परतला. वाटेंत नारायणरावांचें घर होतें. जानकीबाई व सोनी यांनां ही हकीगत अद्यापि कळली नव्हती. तेव्हां उभ्याउभ्या त्यांनांहि ती कळवावी, ह्मणून तो जानकीबाई आपल्या खोलींत बिछान्यावर पडून होत्या त्यांचेकडे गेला. सोनी मावशीजवळच हातांत सुईदोरा घेऊन कांहीं शिवित बसली होती. दाजी मारला गेल्याची व शिदूला पकडून नेल्याची खबर कृष्णाच्या तोंडून ऐकतांच जानकीबाई आश्चर्यानें ताटकन् उठून बसल्या. सोनीतर वेड्यासारखी तोंड वासून त्याच्या व मावशीच्या तोंडाकडे पाहूं लागली. तिला या बातमीचा अर्थच कळेना. शिदू रात्रीं बारा वाजेपर्यंत आपले येथें होता, तोंपर्यंत त्याच्या चर्येंत कांहीं गडबड दिसली नाहीं, भावाच्या वर्तनासंबंधानें तो कुरकुर करित होता इतकेंच काय तें ! असें असून चार घटकेंत हा काय प्रकार आपण ऐकतों, हें तिला कळेना ! ती आश्चर्यानें अगदीं मुग्ध होऊन बसली.

इकडे बिचाऱ्या त्रिंबकरावांची आणि गोदूताईची कोण शोचनीय अवस्था झाली होती ! जे त्रिंबकराव कर्दनकाळ, मोठमोठ्या प्रतिष्ठित गृहस्थांत प्रमुख ह्मणून गणले जाणारे, त्यांनां आतां बाहेर तोंड काढण्यास लाज वाटूं लागली. गोदूताईची दशातर कांहीं पुसूंच नये ! त्यांच्या नाकावर माशी ठरत नसे, त्या आतां गोगलगायीसारख्या गरीब होऊन गेल्या. त्यांचा गर्व एकदम सारा गळाला. लोक तोंडावर उघडपणें ह्मणूं लागले " या वयेनें फाजील लाड केल्यामुळेंच मुलें बिघडलीं आणि या परिणामावर गोष्ट आली ! " हीं सगळीं बोलणीं आतां निमूटपणें ऐकून घेण्याशिवाय गोदूताईला दुसरी तोडच नव्हती !

## प्रकरण ५२ वें.

# गंगाधराचें सुखस्वप्न.

इतकी चळवळ शिवापुरांत पूर्वी कधींहि झाली नव्हती. या खुनासंबंधाच्या हजारों गप्पा फैलावल्या होत्या. त्रिंबकरावांसारख्या प्रतिष्ठित गृहस्थांच्या घरांत इतका अंधार व त्याचे इतके घोर परिणाम इतर ठिकाणीं एवढे अश्रुतपूर्व वाटले नसते; पण शिवापुरासारख्या लहानशा शहरांत ती नवल करण्यासारखीच गोष्ट होती. असो.

शिदूनेंच हें कृत्य केलें असावें, असा सगळ्या गांवाचा संशय होता. पोलिस या गुन्ह्याचा बारकाईनें तपास करित होते, त्यांचाहि शिदूवरच वहीम होता. एका अर्थी ही मोठ्या दुर्दैवाचीच गोष्ट म्हटली पाहिजे! कारण, अमक्याचें हें कृत्य आहे, अशी एकदा सामान्यतः लोकांची व विशेषतः पोलिसांची समजूत झाली, कीं, मग ती खोटी असली तरी खरीच भासूं लागते, आणि त्यामुळें खरा गुन्हेगार दुसरा कोणी असल्यास त्याच्या तपासाकडे कोणाचेंच लक्ष्य जाईनासें होतें!

शिदू या आरोपांतून मुक्त होईल, अशी आशा करण्यास विशेषशी जागा नव्हती. जेवढ्या गोष्टी बाहेर आल्या होत्या, तेवढ्यांवरून त्याच्याविषयींच्या संशयाचें दृढीकरण मात्र होत होतें. भावाभावांमध्यें वैमनस्य होतें; भावाभावांनीं परस्परांवर चाकू उपसले होते, हेंहि खरें होतें; राम्या शागीर्द मध्यें पडला नसता तर त्याच वेळीं दाजीचा खून पडला असता; राम्यानें त्या वेळीं दाजीला एकीकडे केलें व शिदूला समजाविलें, पण शिदूचें तोंड त्याला कुठें बंद करतां येत होतें? 'एखादे वेळीं तुझें पाहून घेईन!' असे शब्द शिदूनें तोंडून काढलेले पुष्कळांनीं ऐकले होते. कदाचित् ते शब्द त्यानें त्या वेळीं रागाच्या सपाट्यांत काढले असतील; ते खरे करण्याचा उद्देश त्याच्या मनांतसुद्धां नसेल; पण लोकांना त्याचें मन कोठें दिसत होतें! त्याचे शब्द तेवढे लोकांच्या कानीं गेले होते. त्याच्या अंतःकरणांतला उद्देश त्याला एकट्यालाच ठाऊक होता!

तिसरीहि एक गोष्ट शिदूच्या विरुद्ध जमेस धरण्यासारखी होती. रात्रीं बाहेर जातांना त्यानें रुमाल घातलेला होता; आणि तोच रुमाल मागून दाजीच्या अंगाखालीं निघाला. पंचनाम्याचे वेळीं पंचांसमोर व मॅजिस्ट्रेटसाहेबांपुढें शिदूनें रुमालाची जी हकीगत सांगितली, ती अशी होती कीं "अगोदर रुमाल घालून निघालों होतों खरा, पण मग डोक्यास त्रास होईलसें वाटल्यावरून तो दाजीच्या

खोलींत फेंकून देऊन मी टोपी घालूनच बाहेर पडलों. " परंतु हें त्याचें बोलणें कोणालाच खरें वाटेना. कारण रुमाल फेंकतांना त्याला कोणींहि पाहिलें नव्हतें; आणि शिवाय दुसरें असें कीं, शिदू आतां आरोपी ह्मणून ठरला होता व आरोपीचें ह्मणणें खोटें असावयाचेंच, असा आपला सामान्यतः सर्वांचा पूर्वग्रह होऊन चुकला असतो.

चौथी गोष्ट अशी कीं " त्या रात्रीं तूं कुठें गेला होतास ? " ह्मणून त्याला पोलिसांनीं व मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं खोदखोदून विचारिलें असतांहि तो समाधानकारक उत्तर देईना. " मी नवांच्या सुमाराला घरांतून बाहेर पडलों, आणि रात्रीं एक वाजून गेल्यावर घरीं आलों. " एवढेंच त्यानें सांगितलें. मध्यंतरीं आपण कोठें गेलों होतों, त्याविषयीं तो चकार शब्द बोलेना. दाजीचा खून दहा आणि एक यांच्या दरम्यान केव्हांतरी झाला, हें खास; पण त्या वेळीं शिदू घरीं नव्हता, असें निश्चयात्मक ठरवितां येईना. " नऊ वाजतां जाऊन एक वाजल्यावर घरीं आलों, " एवढें शिदूनें शंभर वेळां सांगितलें, तरी मधल्या वेळांत तो कोठें होता, हें सांगेपर्यंत त्याचें ह्मणणें कोणीच खरें मानीना. यामुळें या मुद्यावर शिदूवर आरोप ठेवण्यास जागा मिळून त्याचा खटला मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं सेशनकमिट केला. खुनासारखा भयंकर गुन्ह्याचा आरोप असल्यामुळें अर्थातच आरोपीस जामिनावर मोकळें करतां येईना; आणि सेशन सुरू होण्यास अद्यापि कांहीं दिवस अवकाश होता; तेवढ्यांत शिदोबाला सरकारी तुरुंगाची हवा दिसली, हें सांगावयास नकोच.

इकडे ज्या दिवशीं दाजीचा खून झाला, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं संध्याकाळीं नारायणराव आणि गंगाधर गुजराथेंतून परत आले. आल्याबरोबर त्यांना पहिली खबर अर्थात् आदले दिवशीं रात्रीं घडलेल्या खुनाबद्दलची आणि शिदूला पकडून नेल्याविषयींची लागली. ती ऐकून नारायणरावांला इतकें चमत्कारिक वाटलें कीं, कांहीं पुसूं नये ! गंगाधराचाहि त्या बातमीवर एकाएकीं विश्वास बसेना.

अण्णासाहेबांनीं गंगाधराला गुजराथेकडील खबर विचारण्याकरितां बोलाविलें होतें. तिकडील कामाविषयींचें बोलणें संपल्यावर अर्थातच शिवापुरामधील चालू चळवळीविषयीं गोष्टी निघाल्या. याविषयी बोलतांना अण्णासाहेब ह्मणाले " शिदू खरोखरच गुन्हेगार आहे किंवा काय, तें ठरविणें कठीण आहे. पुरावा पाहिला, तर तो मात्र त्याला प्रतिकूल आहे, एवढें खास. तीं मुलें द्वाड आहेत खरीं, पण त्यांचा द्वाडपणा इतक्या लांबच्या पल्ल्यावर गेला असेल, हें गांवांत एकालासुद्धां

खरें वाटत नाहीं. आतां या आरोपांतून जरी तो निर्दोषी ठरला, तरी नांवाला लागलेला डाग कधींहि धुतला जाणार नाहीं. मिळून, झालेला प्रकार अत्यंत अनिष्ट होय, याविषयीं कोणाचाहि मतभेद असण्याचा संभव नाहीं. ”

गंगाधर ह्मणाला “ अनिष्ट यांत काय संशय ! त्रिंबकरावांसारख्या अब्रूदार माणसाला हा कलंक मरणाहूनहि अधिक यातनादायक होत असेल.”

अण्णासाहेब ह्मणाले “ त्रिंबकरावांनांतर होतच असेल ह्मणा, पण तुमच्या-आमच्यासारख्या त्यांच्या आप्तसंबंधी माणसांनांसुद्धां झालेला प्रकार ऐकून आपल्या स्वताच्या कुटुंबाची हानि व्हावी, इतकें वाईट वाटत आहे. काय सांगूं गंगाधर ! त्रिंबकराव आमच्या नात्यांतले असल्यामुळें माझ्या काळजाला या गोष्टीनें जबरदस्त धक्का बसला आहे ! ”

गंगाधर विनयपूर्वक ह्मणाला “ते आपले नातलग आहेत, तसे माझेहि आहेत. त्रिंबकरावांचें कुटुंब गोदूताई, या, माझ्या वडिलांची सख्खी मावसबहीण ! त्रिंबकरावांचे मामेसासरे बाबासाहेब आपणांस ठाऊक असतीलच.”

“ हो, चांगले ठाऊक आहेत. त्यांचीच इस्टेट त्रिंबकरावांनां मिळाली.”

“ बाबासाहेबांनां दोन बहिणी होत्या. एकीचा मुलगा ते आमचे वडील, आणि दुसरीची मुलगी त्याच गोदूताई, असें आमची आई सांगत होती. ”

ही हकीगत ऐकून अण्णासाहेब किंचित् थांबले. ते मागची सगळी हकीगत आठवित असावे, असें दिसत होतें. कांहीं वेळानें ते ह्मणाले “ तरमग तुझें आणि आमचेंहि जुळविल्यास नातें जुळवितां येईल ! आणि हें फार छान झालें ! ! तुझ्याविषयीं मला पूर्वीपासूनच अभिमान वाटत आहे, आणि आतांतर त्यांत नात्याची भर पडली आहे ! ”

गंगाधर मनांत फार आनंदित झाला. अण्णासाहेबांच्या तोंडून आपल्याविषयीं असे प्रेमळ व अभिमानास्पद उद्गार निघालेले ऐकून कां बरें त्याला आनंद होणार नाहीं ? अण्णासाहेबांनीं चांगलें ह्मणावें, हीतर शिवापुरांतल्या प्रत्येक तरुणाची महत्त्वाकांक्षा असे; आणि ती पुरी करण्यासाठीं कांहीं थोडेथोडके लोक झटत होते, असें नाहीं.

अण्णासाहेब पुढें ह्मणाले “ इतके दिवस तूं ही गोष्ट कशी लपवून ठेविलीस, याचेंच मला आश्चर्य वाटतें. तूं हें आपल्या स्वताच्या बुद्धीनें केलेंस, कीं तुला आईचीच तशी शिकवणी होती ? ”

गंगाधर ह्मणाला "मला हा नात्याचा संबंध नुक्ताच वर्ष दीड वर्षापूर्वी कळला; आणि तो आपलेपासून लपवून ठेवावा, ही गोष्ट माझ्या मनींमानसींहि नव्हती, किंवा आईनें कधींहि तसें करण्यास मला सांगितलें नाहीं; तथापि एवढें खरें कीं, आपण गरीब असलों आणि आपले आप्तवाईक श्रीमंत असले, तर आपण होईल तितकें त्यांच्यापासून दूर रहावें, यांतच शोभा रहाते, असें आमची आई नेहमीं सांगत असते. श्रीमंतांच्या घरीं कधींहि लघळपणा करूं नये, जें काय परमेश्वर आपल्यास देईल त्यांत अन्नूनें आणि अभिमानानें रहावें, असें आमच्या आईनें आह्मांला शिकविलें आहे. त्यामुळें मोठ्या घरीं जाऊन मुद्दाम ओळखी काढणें किंवा नात्याचा संबंध जुळविणें, हें माझ्या हातून होत नाहीं. हें मी मुद्दाम करतों, असें नाहीं; तो आपला आमचा सर्वांचा स्वभावच बनला आहे."

ही सगळी हकीगत ऐकल्यापासून, विशेषतः गंगाधराच्या आईचा करारी स्वभाव व तिनें आपल्या मुलांनां लाविलेलें वळण पाहून अण्णासाहेबांनां त्यांचे विषयीं अधिक माहिती करून घेण्याची साहजिकच इच्छा झाली. त्यांनीं पुढें विचारलें " मग तुमचें त्रिंबकरावांच्या घरीं कधीं जाणेंयेणें नसेल तर ? "

गंगाधर ह्मणाला " आमचे वडील नुक्तेच येथें आले होते तेव्हां त्यांच्या आग्रहावरून आई एकदा गोदूताईनां भेटण्याकरितां गेली होती."

" बरें मग."

"मग काय! त्या वेळेस गोदूताईनीं ओळखलें न ओळखलेंसें केलें, कपाळाला आंठ्या घातल्या अन् धडपणें बोलल्यासुद्धां नाहींत. तेव्हांपासून पुनः ती त्यांच्या घरची पायरी चढली नाहीं ! ते पडले श्रीमंत व आह्मी आहों आपले गरीब. त्यांचें अन् आमचें कसें जुळावें ? त्यावर मला स्वताला एकदा घरभाड्याच्या संबंधांत त्रिंबकरावांकडे जाण्याचा प्रसंग आला होता. त्या वेळेस त्यांचें वर्तन पाहिलें तर गोदूताईचाच नमुना ! मग कशाला जा वारंवार त्यांच्या दाराशीं ? ह्मणून नाहीं गेलों. "

घरभाड्याचें नांव काढतांच अण्णासाहेबांनां मागची आठवण झाली. त्रिंबकरावांनीं घरभाड्याकरितां विलक्षण तगादा लाविला होता, त्यामुळें राधाबाई एकदा आपलेकडे आल्या होत्या व आपण त्याच वेळीं त्रिंबकरावांनां चिठ्ठी लिहून तगाद्याची मनाई केली होती, वगैरे गोष्टी एकामागून एक त्यांनां आठवूं लागल्या. ते ह्मणाले "तुह्मांला इतका त्रास देण्यांत त्रिंबकरावांचा हेतुतरी काय असावा?"

गंगाधर ह्मणाला " दुसरा कोणता हेतु असणार ? बाबासाहेबांनीं ठेविलेल्या इस्टेटीचा वांटा आमचे वडील कदाचित मागतील, ही भीति त्रिंबकरावांनां पडली असावी. त्यापेक्षां कांहींतरी युक्ति करून आह्मांला या गांवांतून बाहेर लावून द्यावें, एवढाच त्यांचा मनोदय असावा."

अण्णासाहेब ह्मणाले " हां हां, हा तुझा तर्क अगदीं बरोबर आहे. बाबासाहेबांच्या इस्टेटीचा अर्धा हिस्सा हक्कानें तुझ्या वडिलांचा होता, हें खरें आहे. तो ते बळकावून बसले आहेत."

गंगाधर ह्मणाला " आई ह्मणते, त्या इस्टेटीवांचून आतां आमचें कांहीं अडलें नाहीं. आरंभींआरंभीं आह्मांला फार जड गेलें, नेहमीं दुःखांत आणि संकटांत दिवस काढावे लागले, हें खरें; पण आतां ईश्वरकृपेनें आणि आपल्यासारख्यांच्या आश्रयानें निढळाच्या घामाची कमाई करण्याची शक्ति आमचे अंगांत आली आहे. परमेश्वरसत्ता असेल तर त्याहूनहि मोठी इस्टेट आह्मांला मिळवितां येईल. "

अण्णासाहेब अश्रुपूरित नेत्रांनीं ह्मणतात " अलबत् ! तुमच्या आईचें ह्मणणें अगदीं बरोबर आहे ! आणि परमेश्वराची करणीहि अचिंत्य आहे. व्यवहारांत कोणाला लाभ किंवा हानि कशी होईल, तें सांगतां यावयाचें नाहीं. तें सगळें सूत्र ईश्वरानें आपल्या हातीं ठेविलें असून त्यानें मनुष्याच्या हातीं उद्योग व दानत या त्याच्या दोन किल्ल्या देऊन ठेविल्या आहेत. या किल्ल्यांचा नीट उपयोग केल्यावर सुखाचा खजिना हातीं यावा, अशी त्या सर्वशक्तिमान् प्रभूची योजना दिसते. उलट उपयोग केला, कीं, विपरीत परिणाम होतो. त्रिंबकरावांच्याच घरचें उदाहरण पहाना ! तुमच्या आणि त्यांच्या स्थितींत केवढें जमीन-अस्मानाचें अंतर होतें ! त्यांनां संपत्ति, मानमान्यता आणि धंद्याची चलती, या सगळ्या गोष्टी अनुकूळ होत्या; मध्यम स्थितींतल्या घराण्याला आणखी काय पाहिजे असतें ! तेंच तुमच्याकडे पहा. पैसा नाहीं, वशिला नाहीं, कीं कांहीं नाहीं ! उलट लोकांचा छळ सोसावा लागला, संकटाशीं टक्कर द्यावी लागली आणि एकेक दिवस कष्टानें काढावा लागला. पण आतां दोघांच्या स्थितीची तुलना करून पाहिली, तर केवढा चमत्कार दिसतो ! त्रिंबकरावांचा पैसा उडाला —फार काय, मला खाजगी रीतीची खरी माहिती आहे ती तुझ्याजवळ ह्मणूनच बोलतों—त्यांनीं कर्जाची अशी बजबजपुरी करून ठेविली आहे कीं, सावकार त्यांनां तोंड काढूं देत नाहींत ! घरांत पहावें, तर मूर्खपणा आणि अंदाधुंदी यांचा बाजार ! कुणाचा पायपोस कुणाच्या पायांत नाहीं. मुलेंतर कांहीं पुसूं

नका ! एकाहून एक द्वाड आणि पाजी. थोड्याच दिवसांत तूं पहाशील, तीं आपल्या घराण्याचा कसा दुर्लौकिक करतील तीं ! मला हें भविष्य अगदीं ढळढळीत दिसून राहिलें आहे. त्यांच्या सुखाचे दिवस तुह्मांला आणि तुमचे दुःखाचे दिवस त्यांना जावयाचे आहेत. परमेश्वराची तुमच्यावर मोठी कृपा आहे, यांत शंका नाहीं. तुमच्या आईपासून तुह्मांला जें वळण मिळालें आहे, तें फार चांगलें आहे. माझी खात्री आहे कीं, तुह्मीं तें वळण कायम ठेविलें तर लवकरच नांव काढाल. बरें कायरे गंगाधर ! आपण मोठे होऊं असें तुझें तुला नाहीं का वाटत ? "

गंगाधर खालीं पहात ह्मणाला " माझ्या स्वताविषयीं मला विशेषशी उमेद वाटत नाहीं. किंबहुना या गोष्टीसंबंधीं अभिप्राय देण्याचा अधिकारहि मला पोहोंचत नाहीं, अशी माझी स्वताची समजूत आहे. "

हें उत्तर ऐकून अण्णासाहेब थोडे हंसले आणि ह्मणाले " पण या शहरांत आपण पैसा व नांवलौकिक मिळवून शिष्टलोकांपैकीं एक व्हावें, अशी तुझी इच्छातरी आहे कीं नाहीं ? "

" नुसती इच्छा असून उपयोग काय ! तसें होण्याचा कांहीं संभवतरी असला पाहिजे कीं नाहीं ? "

" आणि तो असला तर ? "

" पण तशीं भावी सुखाचीं नुसतीं स्वप्नें पहाण्यांत काय अर्थ आहे ? संभव असलाच, तर तो इतका पाहिजे कीं, मला आपल्यासारखें सर्व तऱ्हेनें होतां आलें पाहिजे. तर कांहीं उपयोग ! "

" सर्व तऱ्हेनें ह्मणजे ? "

" ह्मणजे मानमान्यता, सुस्वभाव, दानत, उद्योग सर्व कांहीं त्यांत आलें. इतकें मिळाल्यावर जन्माचें सार्थक झालें ह्मणून मी समजेन."

"एवढ्यानें तुझी तृप्ति होईल असें तूं ह्मणतोस; पण मला नाहीं तें खरें वाटत! कारण ह्मटलें आहे:— '**सहस्रमिच्छन्ति शती, सहस्री लक्षमीहते, लक्षाधिपस्तथा राज्यं राज्यस्थः स्वर्गमीहते.**' माझ्या योग्यतेला तूं आलास, ह्मणजे तुला त्याहूनहि अधिक मोठें होण्याची हांव सुटेल. म्युनिसीपालिटीचे प्रेसिडेंट, कायदेकौन्सिलचे मेंबर, राष्ट्रीयसभेचे अध्यक्ष, या पायऱ्या पुढें क्रमानें येतील. तुझी एकेक महत्त्वाकांक्षा पुरी होत जाईल तसतशी नवी एकेक तुझें चित्त आकर्षण करित जाईल."

गंगाधर हंसून ह्मणाला " पण आतां उगीच मनांत मांडे खाऊन अजीर्ण करून घेण्यांत काय हंशील आहे ? मला मुख्य मुनीम व्हायला अवकाश आहे, तों राष्ट्रीयसभेच्या अध्यक्षांपर्यंत मजल जाऊन पोंहोंचली ! ! "

" राहिली दूरची पायरी. पण जवळच्या पायरीवर पाय ठेवण्यासतर तुझी हरकत नाहीं ना ? मुख्य मुनीमीची जागा ही पहिली पायरी, आणि माझ्या कारखान्यांत भागीदार ही तिच्या पुढची. या दोन पायऱ्यातर जवळच्या आहेत ?"

अण्णासाहेबांच्या भाषणाचा उद्देश आतां अगदीं स्पष्ट झाला होता. तो कळल्यावर गंगाधराच्या मुद्रेवर एकदम टवटवी दिसूं लागली. तथापि आढेवेढे घेत तो ह्मणाला " मी आपला गरीब नोकर ! आपला भागीदार होण्याइतकें माझें भाग्य कुठें आहे ? "

अण्णासाहेब गंभीर मुद्रेनें ह्मणाले " गंगाधर ! तूं असें ह्मणूं नकोस. होणेंजाणें परमेश्वराधीन आहे ह्मणा, पण तुला बढती देतदेत तेथपर्यंत न्यावें, असा माझा विचार आहे. माझे हातपाय आतां थकत चालले; माझा उद्योगधंद्याचा पसारा पडला फार मोठा; माझ्या मागें तो चालवून संभाळणारा कोणी दिसत नाहीं. नाना आहे, पण तो पडला पंगू. त्याच्यानें काय काम होणार ? त्याची प्रकृति त्यानें संभाळली ह्मणजे पुरे आहे. त्याला जन्मभर किंबहुना पिढ्यानूपिढ्या खातां येईल, एवढा बंदोबस्त मीं करून ठेविला आहे. व्यवस्था पहाणारा मात्र इमानी असला पाहिजे. तसा मनुष्य तुझ्यावांचून मला कुणी दिसत नाहीं. माझें प्रेम तुझ्यावर एवढें जडलें आहे, तें एवढ्याचसाठीं. नारायणराव आहेत, पण तेहि आतां पेनशन घेऊन हरिहरि ह्मणत बसण्याच्या लायकीचे झाले. तेव्हां तुझ्यावरच आमची सगळी आशा अवलंबून आहे."

हे शब्द तोंडावाटे काढतांना अण्णासाहेबांच्या डोळ्यांत अश्रू आले होते, कंठ सद्गदित झाला होता आणि ओंठ थरथर कांपत होते. ते पुढें ह्मणाले "तुझ्या गुजराथेंतल्या कामगिरीबद्दल नारायणराव तुझी फारफार तारीफ करित होते. त्यांच्या तोंडून कधीं कुणाविषयीं स्तुतिपर उद्गार निघायचे नाहींत. त्यांनींसुद्धां तुझ्या कामाची इतकी प्रशंसा केली."

अण्णासाहेबांच्या तोंडचे हे शब्द ऐकून गंगाधराला फार धन्यता वाटली. तो विनयानें खालीं मान घालून ह्मणाला " माझें काम वरिष्ठांच्या पसंतीस उतरलें, हें ऐकून मला संतोष होतो. "

इतक्यांत अण्णासाहेबांकडे कोणी मंडळी आली, त्यामुळें तें बोलणें तितकेंच राहिलें. गंगाधर अण्णासाहेबांची परवानगी घेऊन घरीं जाण्यास निघाला.

प्रकरण ५३ वें.

## लोक काय बोलतात !

दाजीच्या खुनामुळें शिवापुरच्या लोकांमध्यें उडालेल्या चळवळीचें यथायोग्य वर्णन करणें हें काम जितकें मुष्किलीचें आहे, त्यापेक्षां, ती बातमी ऐकून आणि विशेषतः शिदूला संशयावरून फौजदारसाहेबांनीं पकडून नेल्याचें वर्तमान कळतांच व पुढें काय स्थिति होईल, पोलिस त्याची किती हालअपेष्टा करतील, कसें छळतील, व जज्जसाहेब अखेर कोणती भयंकर शिक्षा देतील, इत्यादि गोष्टीं-विषयींची लोकांमधील चर्चा ऐकून सोनीचें अंतःकरण कसें विव्हळत होतें, तिचें चित्त घरांतल्या कामावरून उडून ती अगदीं शून्य अंतःकरणानें कोणाशीं न बोलतां न चालतां एकटीच बंगल्याभोंवतालच्या बगीच्यांत अष्टौप्रहर कशी वेड्यासारखी एकाच झाडाकडे टक लावून बसत होती, मावशी आपणास रागें भरेल कीं काय, या गोष्टीची पूर्वीसारखी पर्वा न करतां एकांतांत बसून कशी अश्रु गाळित होती, वगैरे गोष्टींचें हुबेहुब चित्र रंगविण्याचें काम अधिक दुर्घट आहे, हें आह्मी येथें निरभिमानतेनें कबूल करितों. प्रत्यक्ष आपल्या भावाला मारून टाकण्याइतका दुष्टपणा शिदूच्या अंगीं असेल, ही गोष्ट कांहींकेल्या तिला खरी वाटेना. साक्षात् बृहस्पति या भूमंडलावर उतरून त्यानें आपल्या रसाळ आणि गंभीरवाणीनें ही गोष्ट सोनीच्या हृत्पटलावर बिंबविण्याचें मनांत आणिलें असतें, तरीहि त्या वाक्पतीचें सगळें कौशल्य तिच्या मनाच्या खात्रीपुढें खरोखर लटपटलें असतें ! पण पोलिसांनीं त्याला धरून नेलें, आणि लवकरच जज्जसाहेब त्याला शिक्षा सांगणार, या घोर लोकवार्तेपुढें तिच्या मनाची खात्री काय करणार ! या मूर्त-सृष्टींत, या दोषपूर्ण व्यवहारांत, निखालस निर्मळ, अत्यंत शुद्ध असा न्याय कोठें मिळतो ? पुरावा नसला ह्मणजे खरा गुन्हेगारहि निर्दोषी ठरतो, आणि पुष्कळ वेळां खोट्या पुराव्याच्या साधनानें दुष्ट लोक निरापराधी माणसाचा छळ करून त्याच्या गळ्यालाहि फांस लावण्यास कमी करित नाहींत, हा व्यवहारांतला अनुभव लोकांच्या तोंडून अनेक वेळां तिनें ऐकिला होता. त्यामुळें शिदूच्या निरपराधीपणाविषयीं मनाची पक्की खात्री असूनहि तिचें मन चिंताग्रस्त झालें होतें. भय, चिंता, संशय आणि आकांक्षा, यांनीं या वेळीं तिच्या अंतःकरणांत असें काहूर उठवून दिलें होतें कीं, कसल्याहि गोष्टींत तिचें लक्ष्य लागेना. शिदूसंबंधानें जें जें घडेल तें तें सर्व साद्यंत आपल्यास कळावें, ही तिची अत्यंत

उत्कंठा होती; परंतु ही तिची जिज्ञासा कशी पुरी व्हावी ? शिवापुरांत एक वर्तमानपत्र निघत असे ह्मणून मागें सांगितलेंच आहे. पण तें आठवड्यांत एकदा निघणार; आणि शिवाय सोनीच्या हातीं त्याचा अंक कसा पडणार ? नारायणरावांना वर्तमानपत्रें वाचण्याचा मनापासून कंटाळा असल्यामुळें ते वर्तमानपत्रांच्या किंवा वर्तमानपत्रें त्यांच्या भेटीस क्वचितच जात येत. शिदूच्या खटल्याच्या हकीगतीसंबंधानें ते घरींतरी कोणाशीं बोलणार ? सोनी बोलूनचालून लहान पोरच. तिच्याशीं गांवांतल्या गटारबातम्यांची चर्चा करण्यासारखें अर्थात् तिचें वय नव्हतें. जानकीबाईहि बिचारी अंथरुणावर पडूनच होती. त्यामुळें तिच्याशींहि नारायणरावांचें बोलणेंचालणें बेताबाताचेंच असे. अगोदरच नारायणरावांचा स्वभाव अत्यंत संकोचित असे, फारसें बोलणेंचालणें त्यांना नको असे, आणि तशांतून आतां जानकीबाईच्या दुखण्यांत त्यांच्या बिछान्यापाशीं बसून गांवांतल्या गोष्टींसंबंधानें त्यांच्या कानाशीं किटकिट करित बसणें नारायणरावांना आवडलें नाहीं, यांत नवल नाहीं.

शिदूविषयीं कांहींच खबर न कळल्यामुळें सोनी अगदीं उदास व सचिंत होऊन बगीच्यांत उभी असतां एके दिवशीं गंगाधर सहज नारायणरावांकडे आला; परंतु वाटेंत सोनीला पाहून क्षणभर तिच्याशीं बोलण्यासाठीं थांबला. ती त्या वेळीं गुलाबाच्या ताटव्यापाशीं उभी होती आणि तिची शून्य दृष्टि या वेळीं एका गुलाबाच्या फुलाकडे लागलेली होती. गंगाधर जवळ आला हें तिच्या लक्ष्यांतहि आलें नाहीं. सोनी आपल्याकडे वळून पहात नाहीं, हें पाहून गंगाधराला प्रथम थोडेंसें आश्चर्य वाटलें; पण मागाहून त्याला असें वाटलें कीं, मागें आपण तिची जी निर्भर्त्सना केली होती, तिजवरून ती रागावली असेल. तिची समजूत घालण्यास ही संधि चांगली आहे, असा विचार करून त्यानें आपण होऊनच तिच्याशीं बोलण्यास सुरवात केली. तो ह्मणाला " कां ताई ! हें गुलाबाचें झाड स्वतः लाविलें आहे वाटतें ? ह्मणूनच त्याची एवढी निगा राखण्यांत सगळें लक्ष्य गुंतलें आहे. "

गंगाधराचा हा आवाज ऐकतांच सोनी चपापली. तिनें चटकन् पदरानें डोळे पुसून त्याच्याकडे वळून पाहिलें. या वेळीं तिचा चेहेरा अगदीं निस्तेज दिसत होता. ती ह्मणाली, " तात्या ! आज फार दिवसांनीं भेटलास ! गांवांतली कांहीं खबर तुला विचारावी ह्मणून मीच तुझ्या घरीं आतां येण्याच्या विचारांत होत्यें, तों तूंच आलास, हें बरं झालं. "

गंगाधर मुद्दामच ह्मणाला " गांवांतली खबर, ती कसली ? "

" कसली ह्मणजे ! त्या भयंकर खुनासंबंधाची. तुला कायकाय माहित आहे, तें सगळें सांग मला. "

" उं: ! तुला तें विचारून काय करायचें आहे ? तुझ्यासारख्या पोरीला या गांवांतल्या उठाठेवी कशाला हव्यात ? "

" कशाला ह्मणजे ! शिदूची आणि माझी एके काळीं गट्टी होती, हें तुला ठाऊक आहेच. ह्मणून त्याच्याविषयीं काळजी वाटते, दुसरं काय. "

गंगाधरानें तिच्या चेहऱ्याकडे एकदा न्याहाळून पाहिलें. त्याबरोबर तिची अगोदरच निस्तेज झालेली मुद्रा अधिकच पांढरीफटक दिसूं लागली. ' एके काळीं गट्टी होती' हे शब्द तोंडावाटे काढतांना तिची जीभ नुसती चाचरली होती, पण आतां गंगाधराची व तिची दृष्टादृष्ट होतांच ती टाळूलाच जणूं काय चिकटून बसली ! जाणूनबुजून खोटें बोलण्यास धजण्याइतकी ती अद्याप निढावली नव्हती, असें तिच्या दुःखित पण त्याबरोबर अत्यंत घाबरलेल्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. तिची जीभ जरी एक बोलत होती, तरी तिची विवेकवाणी तिच्या मुद्रेच्या द्वारें निराळेंच व्यक्त करून दाखवित होती; आणि आपली मुद्रा या वेळीं घरभेदीपणा करून आपल्यास तोंडघशीं पाडित आहे, असें वाटूनच कीं काय, सोनी अत्यंत लज्जित होऊन खालीं मान घालून उभी होती. गंगाधराच्या तोंडाकडे पहाण्याचें धैर्य तिला आतां होईना.

तिची ती केविलवाणी स्थिति पाहून गंगाधरालाहि तिची दया आली, आणि तिची जिज्ञासा आपले हातून होईल तितकी पुरी करावी, अशा विचारानें तो ह्मणाला "तुला साद्यंत हकीगत ऐकण्याची इच्छा असली, तर माझें काय जातें ! मी सांगतों. तुझ्या मनाला उगीच वाईट वाटेल ह्मणून मी नव्हतों सांगत. पण तूं ऐकायला तयार असलीस तर मी कशाला आढेवेढे घेऊं ? " असें ह्मणून गंगाधरानें क्रमाक्रमानें सगळी हकीगत तिला सांगितली व सोनीनेंहि ती अगदीं लक्ष्य देऊन ऐकिली. गंगाधर थांबल्यावर ती ह्मणाली " शिदूच्या बोलण्यावर लोकांचा विश्वास बसत नाहीं, तो कां ? "

" पण तो ह्मणतो त्याला कांहीं पुरावा पाहिजे ना ? एरवीं लोकांनीं त्याच्यावर भरंवसा कसा ठेवावा ? आणि कोर्टापुढेंतर पुराव्यावांचून पान हलायाचें नाहीं !"

" त्या वेळीं तो कुठं होता हेंहि त्यानं सांगितलं पाहिजे ? 'खून घडला तेव्हां मी घरीं नव्हतों,' एवढं सांगितल्यानं नाहीं काम व्हायचं ? "

" छेः, कुठें होतों तेवढेंदेखील नुसतें सांगून उपयोगी नाहीं, त्यालाहि पुनः पुरावा पाहिजेन. "

" समज, शिदू ह्मणाला कीं, त्या वेळीं ' मी नारायणरावांचे घरीं सोनीशीं बोलत होतों,' तर या गोष्टीला त्यानं पुरावा काय द्यायचा ? "

" तशी कल्पना केल्यास, तुला कोर्टापुढें साक्षीदार ह्मणून जावें लागेल; किंवा दुसरे कुणीं माणसांनीं त्या वेळीं तुह्मां दोघांनां बोलतांना पाहिलें असेल, तर त्यांनां हजर करावें लागेल. अशा साक्षीदारांनीं सांगितलें कीं, अमक्या अमक्या वेळीं ( जेव्हां खून झाला तेव्हां ) शिदू अमक्या अमक्या ठिकाणीं होता, तर अर्थातच खुनाचे जागीं तो नव्हता, हें त्यावरून जज्जसाहेब अनुमान काढतील. अशा पुराव्याला इंग्रजींत 'ॲलिबि' ह्मणतात. खुनासारख्या खटल्यांत हा पुरावा महत्त्वाचा समजतात, असें वकीललोक ह्मणतात. "

सोनीनें आतुरतेनें विचारिलें " हा पुरावा मिळाला, तर शिदूवरचा आळ दूर होईल ? "

" अलबत् ! "

" असें सांगणारा एकच साक्षीदार भेटला तरी ? "

" एकच साक्षीदार कां असेना, पण तो विश्वासास्र पात्र मात्र असला पाहिजे !"

" पण ह्या साक्षीदाराला कुणीं बोलवायचं ? का त्या साक्षीदारानं न बोलावतां आतांच जाऊन कोर्टापुढं काय सांगायचं तें जाऊन सांगावं ? "

" आतां सांगून काय उपयोग ! सेशन भरून कोर्टापुढें खटला चालेल तेव्हांची ही गोष्ट. खरें ह्मटलें, तर शिदूनेंच आपण तेव्हां कुठें होतों तें चटकन् सांगून याबद्दलचा ' ॲलिबि ' पुरावा गोळा करायचा. पण त्याला एवढें संकट कशाचें येऊन पडलें आहे, कुणाला ठाऊक ! "

" तो त्या वेळीं कुठं गेला असावासं लोक बोलतात ? "

" ' आपण त्या वेळीं घरांत नव्हतों, बाहेर गेलों होतों,' असें शिदू ह्मणतो. तेंच लोकांनां अगोदर खरें वाटत नाहीं. ते समजतात कीं, हा त्या दिवशीं घरांतच लपून बसला असेल. "

"कोणबाई लोकतरी मेले दुष्ट ! तो धडधडीत ह्मणतो कीं ' आपण घरीं नव्हतों,' आणि लोक ह्मणतात ' होता. ' आतां तो कुठं होता, हें लोकांनां अधिक माहीत, कीं त्याला ? "

" सगळेच लोक कांहीं तूं ह्मणतेस तसे दुष्ट नाहींत. तो खरोखरीच घरीं नव्हता, असें समजणारेहि कित्येक आहेत. "

" त्यांनांतरी शिदू या रात्रीं बाहेर कुठं गेला होतासं वाटतं?"

गांवांत चार तऱ्हेचे लोक चार तऱ्हेच्या गप्पा पसरतात, पण त्या सगळ्या सोनीसारख्या अल्पवयी पोरीच्या कानांवर घालणें चांगलें नाहीं, असा विचार करून गंगाधर स्तब्ध बसला. पण तो त्याचा स्तब्धपणा तिची जिज्ञासा शांत करण्याचे ऐवजीं उलट अधिक तीव्र करण्यास मात्र कारण झाला. ती त्याच्या अधिकाधिक काकुळतीस येऊन खोदखोदून विचारूं लागली. सोनी ह्मणाली " तात्या ! असं रे काय करतोस ? सांगना परता ! अर्धवट सांगून मला उगीच असा घोटाळ्यांत पाडूं नकोस. "

शिदूविषयींची हकीगत ऐकून घेण्याविषयींची सोनीची आतांची आतुरता, आणि ' एके काळीं त्याची व माझी गट्टी होती,' असें बेपर्वाईचें मघांचें वाक्य, यांची सांगड कशी घालावयाची, तें गंगाधरास कळेना. तथापि तिच्या भाषणांतला व वर्तनांतला विसंगतपणा तिच्या नजरेस आणून देण्यास सध्याचा हा प्रसंग बरा नव्हे, असा विचार करून तो तिचें समाधान करण्याच्या उद्देशानें ह्मणाला " ताई, तूं स्वतः अशी घाबरूं नकोस, आणि प्रश्न विचारूनविचारून माझ्या-सारख्या तिऱ्हाइतालाहि घाबरवून सोडूं नकोस. त्या दिवशीं शिदू कुठें होता, हें जसें तुला माहीत नाहीं, तसेंच मलाहि माहीत नाहीं, आणि लोकांनांहि पण ठाऊक नाहीं; आणि ह्मणूनच तर एवढी पंचाईत. नाहींतर शिदू केव्हांच नसताका सुटला ? तो कुठें होता कुणास ठाऊक ! तेवढें ठाऊक असतें, तर आणखी काय पाहिजे होतें ! तो बाहेर कुठेंतरी असेल. आणि मागें घरीं घडलेल्या खुनाची गंधवार्तासुद्धां अगोदर त्याला कळली नसेल. पण उपयोग काय ! आपण कुठें होतों, हें तो सांगेल तर कीं नाहीं ? "

सोनीनें कष्टानें उसासा टाकून ह्मटलें "नसेल कशाला ? मी खात्रीनें सांगतें कीं त्याला घरीं घडलेल्या प्रकाराची यत्किंचितहि गंधवार्ता नव्हती. तो इतका दुष्ट नाहींच. तो तसा असता, तर मीं त्याचा एवढा कैवार घेतला असता असं का तुला वाटतं ?"

गंगाधराचा या शेवटच्या मुद्यासंबंधानें मात्र मतभेद होता. पण तो त्यानें या वेळीं बोलून दाखविला नाहीं; आणि तो बोलण्याचा वेळहि पण नव्हता.

इतक्यांत आंतून गुलाबदाणी सोनीला बोलविण्यासाठीं, आली, म्हणून ती गंगाधराचा निरोप घेऊन आंत जाऊं लागली. गुलाबदाणीनें नारायणराव घरांत नाहींत असें सांगितल्यामुळें गंगाधरहि बाहेरच्या बाहेर गेला.

## प्रकरण ५४ वें.

# हांसत कर्म करावें, भोगावें रडत तेंचि परिणामीं !

'प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे,' हा चरण कोणत्याहि गुन्ह्याचा तपास करतांना फौजदारसाहेबांच्या डोळ्यांसमोर नेहमीं असल्यामुळें पुरावा गोळा करण्याच्या कामीं प्रयत्नांत शिथिलता त्यांचे हातून कधींहि घडत नसे. दाजीचा खून घडला त्या दिवशीं शिदू कोठेंकोठें गेला होता, याचा बारकाईनें तपास त्यांनीं चालविलाच होता. त्याची जेवढी ह्मणून स्नेही मंडळी होती, त्या सर्वांच्या घरीं त्यांनीं शोध केला. शिदूला तालमीचा शोक असल्यामुळें तो कोठें आखाड्यांत गेला असेल, अशा समजुतीवर त्यांनीं सर्व आखाड्यांतून शोध केला; चवाठ्याच्या जागा, अड्डे, नाटकगृहें, चहाकाफीचीं दुकानें, फार काय—वेश्यांचीं घरेंसुद्धां—एकूनएक पाहून त्या ठिकाणीं शिदू त्या रात्रीं आला होता काय, ह्मणून त्यांनीं बारकाईनें चौकशी केली; परंतु कोणींहि ' हो,' ह्मणून ह्मणेना. मुद्दाम खोटें सांगण्याचें त्यांना कारण नव्हतें. शिदू या सगळया मंडळींत नेहमीं वागणारा व बसणाराउठणारा रंगेल गडी होता; शिवाय ' नाहीं,' ह्मणण्यापेक्षां ' होय,' ह्मणण्यानेंच शिदूचे प्राण वांचणार होते; तेव्हां त्याचे प्राण वांचविण्यासाटीं मुद्दाम ' नाहीं ' ह्मटलें, अशी शंका घेण्यास यत्किंचित्सुद्धां कारण नव्हतें. इतके आयास करूनसुद्धां जेव्हां कांहीं सुगावा लागेना, आणि शिदूला कितीहि शिकविलें, समजाविलें, सुटकेची लालूच दाखविली, विनवण्या केल्या—नव्हे धमकावण्याहि दिल्या, तरी त्याच्या तोंडून त्याबद्दल एक अक्षरहि निघेना, तेव्हां मात्र फौजदार साहेबांनीं हात टेंकले ! शेवटीं निरुपायास्तव ते ह्मणूं लागले " आपण त्या रात्रीं बाहेर गेलों होतों असें जें शिदू सांगतो, ती त्याची निवळ लबाडी असली पाहिजे. तो घरींच लपून बसला होता, यांत मुळींच संशय नाहीं." पोलिसखात्यांतल्या लोकांनांतरी याहून अधिक तें काय पाहिजे असतें ! कोणत्यातरी गुन्ह्याचा कोणातरी माणसाशीं बेमालूम संबंध जुळवून दिला आणि जज्जसाहेबांच्या व ज्युरीच्या डोळ्यांत धूळ फेंकिली, ह्मणजे मोठी बहादुरी केली, अशी त्यांची समजूत असते. पण शिवापुरचे फौजदार त्यांतले नव्हते. ते चांगले घरंदाज व साधारणतः शिकलेले असल्यामुळें, खरा गुन्हेगार पाहून काढण्यासाठीं त्यांनीं एवढी यातायात केली होती. शिदू ह्मणतो त्याप्रमाणें तो त्या रात्रीं खरोखर बाहेर असला आणि आपण त्यावर बळेंच आरोप लादून तो 'येनकेन

प्रकारेण ' शाबित केला, तर निरपराधी मुलाला छळल्याबद्दल किंबहुना त्याचा सर्वस्वी नाश केल्याबद्दल या लोकच्या जरी नव्हे तरी परलोकच्या न्यायासनापुढें आपण गुन्हेगार ठरूं, असें भय त्यांच्या मनाला अद्याप वाटत होतें. याच भयामुळें मागें अण्णासाहेबांच्या आफिसांतून नोट चोरीला गेली होती त्या वेळीं गंगाधरावर विनाकारण संशय घेऊन त्याला छळण्याचें त्यांनीं साफ नाकारिलें होतें. सध्याच्या प्रसंगीं आरोपी हा त्यांचे स्नेही त्रिंबकराव वकील यांचा प्रत्यक्ष मुलगाच असल्यामुळें, भक्कम पुरावा मिळविल्याशिवाय घाईघाईनें एखादी गोष्ट करावयाची नाहीं असा त्यांचा निश्चय होता, ह्मणूनच शिदू त्या रात्रीं बाहेर कोठें गेला होता काय, या गोष्टीचा एवढा बारिक तपास करण्याची त्यांनीं इतकी तसदी घेतली होती. त्यांचे अंगीं एवढी पापभीरुता नसती, तर शिदूच्या स्तब्धपणाचा फायदा घेऊन त्यांनीं अधिक चौकशी करण्याचा प्रयत्नच केला नसता; किंवा प्रयत्न केलाच असता तर तो उलट दिशेनेंच केला असता. ह्मणजे शिदू त्या रात्रीं घराबाहेर पडलाच नव्हता, असें साक्षीदारांच्या तोंडून वदविलें असतें. अशा उलट्या काळजाच्या पोलिस अंमलदारांनीं अशीं अनन्वित कृत्यें करून बहादुरी गाजविल्याचीं व हुषारीबद्दल सर्टिफिकिटें, चांद, बढत्या वगैरेहि मिळविल्याचीं उदाहरणें अदृष्टपूर्व होतीं, असें नाहीं; तथापि शिवापूरचे फौजदार खरे कुलशीलानें युक्त असल्यामुळें निरपराधी लोकांच्या माना फांसावर लटकावून चांद व किताब पटकावण्याचा नीचपणा करण्याचा विचार त्यांच्या मनाला कधींहि शिवला नाहीं.

सध्या शिवापुरांत ज्याच्यात्याच्या तोंडीं हें खुनाचें प्रकरण झालें होतें. शिदूचा द्वाडपणा जरी सर्वांनां ठाऊक होता, तरी त्याच्यावर आतां आलेला दुर्दैवाचा फेरा व त्याच्या अत्यंत उद्वेगकारक अशा भावी परिणामाची कल्पना, यांच्या योगानें लोकांचीं मनें फार चलबिचल झालीं होतीं. त्रिंबकराव व त्यांचें कुटुंब गोदूताई यांच्या मनाची स्थिततर कांहीं अवर्णनीयच झाली होती. पुत्रशोकाचा धक्का व अब्रूची माती झालेली, या दोन गोष्टींनीं त्यांच्या काळजाला चरका बसला होता. त्यांचीं तोंडें लज्जेनें काळींठिक्कर पडलीं होतीं. रात्रीची झोंप कशी ती अलीकडे बिचाऱ्यांनां ठाऊकहि नव्हती. सदोदित मनाला तळमळ लागून राहिलेली असे. दाजीसारखा कर्तासवरता बरोबरीचा मुलगा मेला, तरी त्याचें एवढें दुःख त्यांनां या वेळीं वाटत नव्हतें. प्लेगसारखी भयंकर सांथ येऊन सर्व घरचें घर बसलें असतें, तरी त्याचेंसुद्धां एवढें वाईट वाटलें नसतें. पण आज तोंडाला

काळोखी लागली तशी काळोखी घेऊन आतां लोकांनां कसें तोंड दाखवावें, अशी चिंता त्रिंबकरावांला येऊन पडली होती. शिदू आतां अपराधी ठरला काय आणि दोषमुक्त होऊन सुटून आला काय, त्रिंबकरावांच्या दृष्टीनें सारखेंच होतें. अमक्या अमक्याच्या मुलावर खुनासारखा भयंकर आरोप येऊन तो पोलिसाच्या अटकेंत राहिला, एवढा डाग लागलेला कशानेंहि धुतला जाणार नव्हता. स्वतावर प्रसंग आल्याशिवाय माणसाला दुसऱ्याच्या अब्रूची किंमत कळत नाहीं, असें ह्मणतात तें आतां त्रिंबकरावांच्या पूर्णपणें प्रत्यंतरास आलें. मागें गंगाधरावर चोरीचा आळ घेऊन त्याच्या अब्रूचे धिंडवडे करण्यासाठीं फौजदारसाहेबांस आपणच गळ घालित होतों; त्याप्रमाणें त्यांनीं केलें असतें तर काय परिणाम झाला असता ? त्या बिचाऱ्या निराश्रित पण अब्रूनें रहाणाऱ्या निरपराधी मुलाच्या उज्वल कीर्तिला कायमचा काळिमा लावण्यास आपण उद्युक्त झालों होतों, त्याबद्दलची ही शिक्षा ह्मणूनतर परमेश्वरानें आपल्यावर हा प्रसंग आणिला नसेलना ? अशीहि शंका त्रिंबकरावांनां आतां येऊं लागली. मनुष्य संकटांत पडला ह्मणजे त्याचें मन अत्यंत पापभीरु, शंकाखोर आणि ईशपरायण होत असतें. ज्या त्रिंबकरावांनां पापाचें भय कसें तें ठाऊक नव्हतें, दुसऱ्यांची छळणूक करणें हीच ज्यांची करमणूक असे, आणि स्वताच्या कर्तृत्वाबद्दल ज्यांनां एवढी घमेंड होती, कीं त्यापुढें दैवीशक्तीलाहि जे तुच्छ मानित होते, तेच त्रिंबकराव आतां मागच्या कृतकर्माबद्दल पश्चात्ताप पावून व दीनवदन होऊन परमेश्वराची करुणा भाकूं लागले आणि या संकटांतून निभावण्यास त्याचें साह्य मागूं लागले ! खऱ्या शुद्ध भावानें आणि पवित्र अंतःकरणानें धावा केल्यावर तो दयाघन परमेश्वरतरी कोठें दूर आहे ? त्यानें त्रिंबकरावांची प्रेमळ प्रार्थना ऐकिली व त्यांच्या साह्यास तो धावून आला. परंतु हा पुढचा कथाभाग आतांच सूचित करून कादंबरीचा रसभंग करण्याचा प्रमाद आह्मींतरी काय ह्मणून करावा ?

त्रिंबकराव आतांशा कोठेंहि बाहेर पडत नसत. ते नेहमीं आपल्या कचेरींत विचारांत निमग्न असत. ते व गोदूताई यांच्या नेहमीं याचसंबधाच्या गोष्टी चालत. त्रिंबकराव एके दिवशीं अत्यंत उदास होऊन आपल्या मागील सगळ्या चरित्राचें सिंहावलोकन करित होते. इतक्यांत गोदूताई तेथें आल्या. तेव्हां साहजिकच बोलण्याचा उपक्रम झाला. त्रिंबकराव ह्मणाले "मीं पुष्कळ विचार करून पाहिला, आपल्या मुलांचे ग्रह फिरले आहेत खास. मला या गोष्टीविषयीं

तिळप्राय शंका नाहीं. त्यांच्या जन्मस्थानीं नीचीचे ग्रह पडले असले पाहिजेत. एरवीं आपल्या सर्वच मुलांची आज जी स्थिति आहे, तशी ती खास नसती. काय बाब्या सांगूं, कीं दाजी सांगूं? शिदूनेंतर कळसच केला. चांगले ध्वज लाविले! एकतरी मुलगा चांगला पाहिजे होता कीं, ज्याच्याकडे पाहून मनाला क्षणभर समाधान वाटेल! असा एकतरी आहे का तूंच सांग?"

गोदूताईला अर्थातच त्रिंबकरावांचें हें बोलणें रुचलें नाहीं. इतकेंच नाहीं, तर तें सहनहि झालें नाहीं. दुःखानें अगोदरच पोळलेल्या त्यांच्या अंतःकरणावर या डागण्या आहेत, असें त्यांच्या मनानें घेतलें आणि तें खरेंहि होतें. त्रिंबकराव म्हणतात तशी खरोखर स्थिति असली—आणि ती तशी होती याविषयीं आमच्या वाचकांनातरी निदान आतां पक्कें ठाऊक झालें आहे—तरी ती उघड करून दाखविण्यास सध्याचा प्रसंग योग्य नव्हता. पण आलेला प्रसंग स्वताच्या कृतीचा नसून कांहीं अदृष्ट अशा ग्रहांचा परिणाम आहे, ही समजूत त्रिंबकरावांच्या मनाला दुःखांत समाधान देत असे. म्हणून त्यांच्या भाषणांत त्या गोष्टीचा अलीकडे वारंवार उल्लेख होत असे. गोदूताईच्या दुःखावर डागण्या देण्यासाठीं मुद्दाम त्यांनीं ते शब्द उच्चारले होते, असें नाहीं. पण गोदूताईला तसें वाटलें. त्या म्हणाल्या "घरोघर अशींच मुलं असतात; पण एखाद्याचं नांव कानफाट्या पडून जातं झालं. देवानं तीन सोन्यासारखीं लेकरं दिलीं, पण त्यांचासुद्धां बाई इकडे कंटाळा आला आहे! त्यांनीं काय असं आपलं नुकसान केलं त्यांच्यावर एवढं संतापायला?"

त्रिंबकराव आवेशानें म्हणाले "काय केलें? आतां काय करायचें राहिलें आहे? माझ्या घराण्याच्या नांवलौकिकावर वरवंटा फिरविला, आणखी करायचें तें काय असतें?"

इतका वेळ त्रिंबकराव मुलें बिघडविल्याबद्दलचा सगळा दोष जन्मस्थानच्या ग्रहांवर लादित होते; परंतु इतका प्रकार करूनहि आपलीं मुलें चांगलींच आहेत, लोक मात्र त्यांनां उगाच नांवें ठेवितात, असें गोदूताईचें भाषण ऐकतांच त्यांच्या अंगाचा संताप झाला आणि त्या संतापाच्या भरांत त्यांच्या डोक्यांत वस्तुस्थितीचा लख्ख उजेड पडून ते म्हणाले "अशानेंचतर ही स्थिति आली! घरोघर अशींच चोऱ्या करणारीं, परभारें कर्ज काढून बापाला फेडायला लावणारीं, भावाभावांत वैमनस्याच्या पायीं हत्यार उचलणारीं, आणि घरादाराचें वाटोळें करणारीं मुलें असतात, नाहीं काय?"

गोदूताई ह्मणाल्या "मुलगा मोठा पुरुषासारखा पुरुष झाला, आणि त्याला कुठं नोकरीचाकरी लावून दिली नाहीं, ह्मणजे त्यानं आपल्या वयाप्रमाणं खर्च करायला हवा, तो कर्ज काढून नाहीं, तर कसा करायचा? चार मंडळीमधें वागायचं, ह्मणजे घटकाभर त्यांच्यासारखं व्हावं लागतं; तें पैशावांचून कसं होईल? बाबाला कुठंतरी नोकरी लावून दिली असती, तर तो आपला खर्च स्वतः चालविता कीं नाहीं? दाजी नव्हता आपला चालवीत?"

त्रिंबकराव क्रुद्धमुद्रेनें ह्मणाले "पुरे दाजीचें उदाहरण! नोकरींत पैसे मिळवून असे खर्च चालते, तर चोऱ्या कशाला कराव्या लागल्या?"

गोदूताई आश्चर्यानें ह्मणतात "चोऱ्या! कुणीं केल्या?"

"तुझ्या लाडक्या दाजीनें! त्या वेळेस फौजदारसाहेब आपल्या वळणांतले होते ह्मणूनच दाजी वांचला. नाहींतर आज शिदू ज्या ठिकाणीं गेला आहे तेथेंच दाजी जावयाचा होता त्याच्या अगोदर!"

हें त्रिंबकरावांचें भाषण ऐकून गोदूताई आश्चर्यचकित होऊन त्यांच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागल्या. त्यांच्या तोंडांतून शब्द फुटेना. पत्नीची ती अवस्था पाहून त्रिंबकराव ह्मणाले "मुलांनां दुष्ट ग्रहांची बाधा आहे असें मी मघांपासून ह्मणत आहें, तें कांहीं उगीच नाहीं. एवढ्यानेंच संपलें किंवा आणखी कांहीं दैव पुढें वाढून ठेवणार आहे, कुणाला ठाऊक!"

"पण सगळ्याच मुलांचे ग्रह एकदम कसे बाई फिरले?"

"आईबापांच्या कृतीचें फळ मुलांनां मिळतें ह्मणून म्हणतात. तसें कांहीं नसेल कशावरून? आपल्या हातून काय आजपर्यंत थोडीं पुण्यकर्में झालीं आहेत! केवढी आपली इस्टेट आणि केवढा नांवलौकिक! पण तो सगळा एकदम नाहींसा होण्याचा प्रसंग आला, हें प्राक्तन नाहीं ह्मणावें तर दुसरें काय! गोविंद-रावांचा पैसा आपण पचवला; पण दैव तो कसा पचूं देईल? ब्रह्मस्व तें! तें अन्यायानें घरांत आणिल्यापासूनच आपल्या वैभवाला क्षय लागला! आज कित्येक दिवसांपासून ही गोष्ट माझ्या मनाला सारखी लागून राहिली आहे. पण बोलून दाखवितां येईना. गोविंदरावांचा पैसा अन्यायानें बळकावून त्याच्या बायकापोरांनां आपण छळिलें, तें देवास कसें सहन होईल?"

त्रिंबकरावांचें हें भाषण ऐकून गोदूताई बिचाऱ्या भीतीनें अगदीं गांगरून गेल्या. त्या कांहींच बोलल्या नाहींत. त्रिंबकरावच पुढें ह्मणाले "बाबासाहेब मरतांना ह्मणाले त्याची मला पुरीपुरी आठवण आहे. 'गोविंदाचा वांटा त्याला

देऊन टाका. तो तुह्मीं बळकावला तर तुमचें कधींहि कल्याण व्हावयाचें नाहीं!' असें त्यांनीं मरतांना वारंवार बजावून आणि देवाधर्माच्या शपथा घालून सांगितलें होतें; परंतु लोभानें अंध होऊन आपण त्या शपथा मोडल्या आणि दुसऱ्याच्या द्रव्याचा अपहार केला, त्याचें हें फळ आज भोगित आहों. ह्मणतात ना "हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं !"

गोदूताई स्वतः भेदरल्या होत्या; तथापि नवऱ्यास धीर देण्याच्या बुद्धीनें ह्मणाल्या "कांहींतरी कल्पना काढित बसून व्यर्थ जिवाला काळजी लावून घेणं आहे झालं."

"नाहीं नाहीं. ही व्यर्थ कल्पना नाहीं. माझें मन इतकें लोभी नव्हतें. तुझ्याच संगतीनें तें तसें झालें. मीं तुझ्या नादास लागून दुसऱ्याच्या पैशाचा अपहार केला आणि पुष्कळ इस्टेट आयती मिळाली तेव्हां उधळपट्टी मांडली. ती उधळपट्टीची संवयच अखेर माझ्या व मुलांच्या नाशाला कारण झाली, यांत संशय नाहीं."

गोदूताई ह्मणाल्या "ती कशी ?"

"घरांत रगड द्रव्य आहे, या भ्रमावर मुलांच्या शिक्षणाकडे मीं पाहिलें नाहीं. त्यांचे वाटतील तसे चोंचले पुरविले. त्यामुळें मुलें शंख राहिलीं व इस्टेटीचीहि उधळपट्टी झाली. इकडे तूंहि मुलांचे नसते लाड केल्यामुळें तीं द्वाड, भांडखोर आणि व्यसनी निघालीं. आपण कांहीं उद्योगधंदा न केला तरी चार पिढ्या सुखानें खाऊं, अशी त्यांची समजूत झाल्यामुळें उद्योगधंदा असा तीं कांहींच शिकलीं नाहींत. यापेक्षां देवानें गरिबी दिली असती, तर पोटाच्या काळजीमुळें तरी तीं हुषार निघून विद्या शिकतीं आणि गंगाधरासारखीं नांवलौकिक मिळवितीं !"

गोदूबाई यावर काय बोलणार ! बिचाऱ्या निमूटपणें स्वस्थ बसल्या.

## प्रकरण ५५ वें.

# अखेर धाबें दणाणलेंच !

त्रिंबकराव स्वतः वकील होते, तरी शिदूचा खटला चालविण्याचें काम त्यांनीं बापूसाहेब वकिलांकडे दिलें होतें. वकील व डाक्तर यांच्या स्वतावर प्रसंग आला, म्हणजे त्यांनां आपल्या व्यवसायबंधूंकडे जावें लागतें ! याचें कारण खटला चालवितांना किंवा औषधपाणी करतांना जी मनाची शांतता, दूरदृष्टि व दक्षता पाहिजे, तितकी स्वतावरच्या प्रसंगाच्या वेळीं माणसाचे ठायीं रहात नाहीं, आणि यामुळें एखादे वेळीं धोका होण्याचा संभव असतो. बापूसाहेब वकील चांगल्या नामांकित वकिलांपैकीं होते आणि त्यांचा व त्रिंबकरावांचा चांगला स्नेह होता. त्यामुळें आपल्या घरच्या सारखेंच समजून ते शिदूच्या खटल्याची सगळी हकीगत समजून घेत होते व मोठ्या दक्षतेनें सल्लामसलत देत होते. त्यांनीं मॅजिस्टेटाच्या परवानगीनें तुरुंगांत जाऊन शिदूची भेट घेतली आणि “ खुनाच्या रात्रीं तूं कुठें होतास तें अजूनतरी सांग, ह्मणजे तुझी सुटका खात्रीनें करतों. ” असें त्याला वारंवार आग्रहपूर्वक सांगितलें; आणि “एवढें तूं न सांगशील तर आमचें कांहीं न चालतां व्यर्थ जिवाला मुकशील व एकंदर कुळाच्या नांवाला काळिमा लावशील, ” अशा तऱ्हेची भीतीहि त्यांनीं घालून पाहिली; पण व्यर्थ ! शिदू त्यासंबंधानें एक अक्षर काढीना ! बापूसाहेबांचें सामदामादिप्रकारयुक्त भाषण अरण्यरोदनाप्रमाणें निष्फळ झालें ! आपण रात्रीं नऊ वाजल्यापासून तों एक वाजेपर्यंत घराबाहेर होतों. ” एवढें तो सांगे. पण कुठें, हें विचारलें ह्मणजे मात्र गप्प बसे.

शिदू जेवढें सांगे तेवढें अत्यंत कळकळीनें सांगे. त्यामुळें तें अगदीं खरें असलें पाहिजे, असें एकदा बापूसाहेबांस वाटे; पण तें अर्धवट सत्य आहे, पुरें नाहीं, असें दिसलें ह्मणजे स्वताच्या बचावासाठींदेखील जो संपूर्ण सत्य सांगत नाहीं, त्याच्या बोलण्यावर माणसानें विश्वासतरी कसा ठेवावा, असा विचार त्यांनां पडे. शिवाय बापूसाहेब आज वीसपंचवीस वर्षें फौजदारी खटले चालवित होते, आणि आरोपी स्वताच्या बचावासाठीं कशा बनावट गोष्टी डोळ्यांत आंसवें आणून आणि देवादिकांच्या आणाशपथा वाहून सांगतात तेंहि त्यांनां माहित होतें. त्यामुळें शिदूच्या बोलण्यावर विश्वासतरी कितपत ठेवावा, अशी त्यांनां पंचाईत येऊन पडली. शेवटीं ते त्रासून ह्मणालेसुद्धां कीं

"तूं जर खरोखर घराबाहेर असतास, तर आपला जीव वांचविण्याकरितांतरी निदान त्या रात्रीं कुठें होतास तें सांगितलें असतेंस."

परंतु याहि बोलण्याचा शिदूवर कांहींएक परिणाम झाला नाहीं. शिदू अगदीं निगरगट्टपणानें सगळें ऐकून घेत होता. आपला जीव धोक्यांत आहे, या गोष्टीची त्याला यत्किंचित्‌हि फिकीर वाटत नव्हती. खरी हकीगत कळल्यावर जज्जसाहेब आपणांस सोडून देतील, अशी त्याला पक्की खात्री वाटत होतीसें दिसलें.

बापूसाहेबांनीं आपलें वकिली चातुर्य खर्चून तोच तो प्रश्न निरनिराळ्या तऱ्हेनें करून पाहिला. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. "मी त्या रात्रीं कुठें होतों तें सांगून या गुन्ह्याशीं माझा अर्थाअर्थी संबंध नाहीं, हें मला सहज दाखवून देतां येईल. पण मला तें कर्तव्य नाहीं, आणि स्तब्ध बसण्यांत माझा कांहीं हेतु आहे." असें शिदूनें स्पष्ट सांगितलें.

मुळींच स्तब्ध होता त्यापेक्षां हा बोलूं लागला, हें काय थोडें आहे, असें समाधान मानून बापूसाहेबांनीं पुनः युक्तीयुक्तीनें तें संभाषण चालू ठेवण्याचा यत्न करून पाहिला. ते म्हणाले "हें बघ, तूं समजूतदार आहेस. तेव्हां तुझ्यापुढें कायद्याची बाब मीं चांगली सोप्या भाषेनें मांडली असतां तुला चटकन् समजेल. असें पहा कीं, तुझ्या घरांत खून झाला हीतर गोष्ट खरी? बरें, तुझें अन् दाजीचें भांडण होऊन तुम्ही एकमेकांवर चाल करून गेलां होतां, हीहि गोष्ट तूं नाकबूल जाणार नाहींस. घरांत दुसऱ्या कुणाशीं त्याचें वैर किंवा भांडण नव्हतें. तरमग त्याचा खून केल्याबद्दलचा संशय कुणावर प्रथम येईल? अर्थात् तुझ्यावर. तूं घरांत त्या वेळीं होतास, एवढें पोलिसांनीं आतां सिद्ध केलें म्हणजे बस आहे. त्याच्या खोलींतूनच तुझ्या माडीचा रस्ता आहे, खिडकी आंतून लाविली होती, आणखी 'एखादे वेळीं पाहून घेईन' म्हणून तूं त्याला धमकावणी दिली होती ती ज्यांनीं ऐकिली, तेहि साक्षीदार कोर्टापुढें येतील. शिवाय तुझा रुमालहि त्याच्या अंगाखालीं सांपडला. एवढा सगळा पुरावा तुझ्याविरुद्ध जय्यत तयार आहे. तूं आरोपी नसून न्यायाधीश असतास तर एवढ्या पुराव्यावरून आरोपीविषयीं तुझें मन कलुषित झालें असतें कीं नाहीं? आतां या पुराव्याच्या कचाट्यांतून सुटायला तुला एकच तोंड आहे. ती केलीस तर तूंहि जिंकशील आणि आम्हांला यश व तुझ्या आईबापांनां आनंद देशील. ती गोष्ट करायला तुझी कां हरकत असावी, तें कळत नाहीं. (हंसत हंसत) त्या वेळीं तूं दुसरीकडे असेंच 'कांहीं

खुनासारखें भयंकर कृत्यतर करित नव्हतास ना? मग तुला तें सांगण्याची एवढी भीति कां वाटते?"

"तसें कांहीं नाहीं." शिदूनें शांतपणें उत्तर केलें.

बापूसाहेब ह्मणाले "मग. तें एवढें गुप्त ठेवण्याबद्दल तुझा हट्ट कां?"

"तें माझें मला माहीत."

"नाहीं. तें तूं दुसऱ्याला सांगितलें पाहिजे. कारण तूं निरपराधी आहेस हें जर खरें असेल तर—"

"हें अगदीं खरें आहे—"

"हें जर खरें आहे, आणि तें खरें आहे हें सिद्ध करून देण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं आहे, तर व्यर्थ हट्ट धरून आईबापांच्या नांवालौकिकाला कां बट्टा लावतोस व स्वताचें नांव बट्टू करून घेतोस? आईबापांच्या पोटीं जन्म घ्यायचा तो त्यांनां दुःख देण्यासाठींच कीं काय? अरे जन्मदात्यांनां दुःखांत टाकणें यासारखें घोर पातक नाहीं. अध्यात्मरामायणांत ह्मटलें आहे—"

शिदू मध्येंच तिरस्कारानें ह्मणाला "पण येथें माझा नाइलाज आहे. तुमचें रामायण आणि भारत माझ्यापुढें नको!"

बापूसाहेब रागावून ह्मणाले "याचें प्रायश्चित्त तुझें तुलाच भोगावें लागणार आहे याचा विचार कर."

शिदू शांतपणें ह्मणाला "आणि मी तें भोगण्यास तयार आहें."

बापूसाहेब ह्मणाले "मीं तें भोगण्यास तयार आहें, एवढें ह्मणणें आणि प्रत्यक्ष तयार होणें, यामध्यें जमीनअस्मानाचें अंतर असतें, समजलास! पक्के बिलंदर दरवडेखोर व खुनी, ज्यांनां फांशीच्या शिक्षेचें नांव ऐकून यत्किंचितसुद्धां भीति वाटत नाहीं, तेसुद्धां ती शिक्षा अमलांत येण्याचे दिवशीं अत्यंत भयभीत होऊन त्यांचे हातपाय गळाल्याचीं, वधस्थानापाशीं जातांजातां मूर्च्छा येऊन पडल्याचीं, आणि तोंडावाटे शब्द फुटत नाहीं अशा तऱ्हेनें घाबरल्याचीं उदाहरणें कांहीं थोडींथोडकीं आहेत, असें नाहीं!"

शिदू कितीहि धीराचा असला, तरी अद्याप कालचें पोर होता. त्याचा खटला सेशनकोर्टांत एप्रीलच्या २३ व्या तारखेस चालावयाचा होता. ती तारीख जवळजवळ येत चालली, तसतसें त्याचें धैर्य सुटत चाललें. रात्रीं तुरुंगांतल्या कोठडीसारख्या भयाण जागीं व त्याहून भयंकर अशा स्वप्नांमुळें त्याला स्वस्थ झोंप लागेनाशी झाली; या कुशीवरून त्या कुशीला वळावें, मध्येंच उठून बसावें,

तासचे तास विचारांत घालवावे, पुनः निजावें, पुनः उठावें, अशा रीतीनें कोणी बोलायचालायला नाहीं, पहारेकरी संत्री संशययुक्त नजरेनें पहात आहेत, आणि तूं कुणाचा मुलगा, आणि कुठें आलास ! असा दैवदुर्विलास शब्दांनीं नव्हे तरी गंभीर मुद्रेनें व्यक्त करित आहेत, अशा स्थितींत तो रात्रीच्या रात्री काढूं लागला. त्याला बापूसाहेबांनीं खुनाच्या गुन्ह्याचें स्वरूप, त्याला लागणारा पुरावा आणि शाबीत झाल्यास होणारी भयंकर शिक्षा, याविषयींची पुरीपुरी माहिती करून दिली होती. त्यावरून आपण त्या रात्रीं कुठें होतों, तें गुप्त ठेविल्यास आपली योजना अखेर कुठं व्हावयाची, तें शिदूला कळून चुकलें होतें; आणि रात्रंदिवस त्याबद्दलचेच विचार डोक्यांत घोळत राहिल्यामुळें त्याला स्वप्नेंहि तशाच प्रकारचीं पडूं लागलीं होतीं. सेशनकोर्टांत आपली चौकशी चालली आहे, आपण आरोपीच्या पिंजऱ्यांत उभे राहून चाललेला प्रकार पहात आहों, जज्जांनीं सगळा पुरावा ऐकून आपणांस गुन्हेगार ठरवून फांशीची शिक्षा सांगितली आहे, सर्व लोक ती ऐकून हळहळत आहेत, फांशी देण्याचा दिवस उजाडला आहे, तो दिवस उजाडतांच जेलर आपलेकडे येऊन आपणांस फांशीच्या जागीं घेऊन जात आहे, वधाच्या स्थलीं एक भली मोठी काळयाकुट्ट रंगानें रंगविलेली लांकडी चौकट आहे व तिला एक फांस अडकविला असून खालीं उभें रहाण्यासाठीं एक फळी आहे, त्या फळीवर आतां आपणांस उभे करित आहेत, आपली मान त्या फांसांत अडकली, पायांखालची फळी पडली—अशीं भयंकर स्वप्नें त्याला वरचेवर पडूं लागलीं. ‘ मी शिक्षा भोगण्यास तयार आहें’ असें जो आतांपर्यंत बापूसाहेबांस, फौजदारसाहेबांस व प्रत्येक माणसास मोठ्या धिटाईनें सांगत असे, त्याच शिदूची नुसतें वरील भयप्रद स्वप्न पाहूनच इतकी गाळण उडाली कीं, आपली हकीगत न सांगण्याचा त्याचा निश्चय पार वितळून जाऊन आतां मी ती खरी हकीगत सांगून आपली केव्हां सुटका करून घेईन व सुखनिद्रेचा पुनः एकवार अनुभव घेईन, असें त्याला झालें. त्यानें उजाडतांच सकाळीं अगोदर तुरुंगावरील अधिकाऱ्यांचेमार्फत बापूसाहेब वकिलांस बोलावणें पाठविलें.

तुरुगांतदेखील शिदूची व्यवस्था इतर कैद्यांपेक्षां पुष्कळ चांगली ठेवण्यांत आली होती. जेलरसाहेब त्रिंबकरावांच्या चांगले परिचयाचे होते; शिवाय मॅजिस्ट्रेट, सेशनजज्ज, वगैरे सगळी बडीबडी मंडळी वळणांतलीच असून त्रिंबकरावांवरच्या या संकटांत त्यांच्याशीं सौम्यतेनें वागणारी किंबहुना मदत करणारी होती. यामुळें पुष्कळ वेळां सरकारी नियम अंमळ बाजूला ठेवून थोड्यांशा

सवलतीनें शिदूला वागविण्यास जेलरसाहेबांनां यत्किंचितहि अडचण पडली नाहीं; इतकें असून शेवटीं शिदूचें धैर्य सुटलें व आयत्या वेळीं त्याच्या मनाचा निश्चय ढांसळला! तुरुंगवासाची नुसती कल्पनासुद्धां भयंकर असते, मग प्रत्यक्ष अनुभव कसा असेल? शिदूचा निरोप बापूसाहेबांनां पोहोंचल्याबरोबर ते त्वरेनें येऊन दाखल झाले.

बापूसाहेब येऊन पोहोंचल्याबरोबर शिदू त्यांनां ह्मणाला "सगळें सांगून टाकण्याचा माझा विचार आतां नक्की ठरला आहे, ह्मणून तुह्मांला बोलाविलें."

बापूसाहेबांनीं "फार चांगलें आहे," एवढेंच थोडक्यांत उत्तर केलें. त्यांचें मन या वेळीं संशयग्रस्त असावेंसें त्यांच्या चर्येवरून स्पष्ट दिसत होतें. आपण आज इतके दिवस सगळी हकिगत खुल्या अंतःकरणानें सांगण्याविषयीं आग्रह करकरून थकलों असतांहि त्यानें ती सांगितली नाहीं, आणि आतां तोच शिदू आपण होऊन ती सांगण्यास तयार होतो! यावरून स्वारीनें कांहींतरी बनावट कथा रचून तिची संपादणी करण्याचा विचार केला आहे कीं काय नकळे! अशा प्रकारचे संशयतरंग बापूसाहेबांच्या मनांत या वेळीं उद्भवल्यामुळें 'फार चांगलें आहे' या तीन शब्दांपलीकडे अधिक उत्साहप्रदर्शक अथवा पसंतीचे शब्द त्यांनीं तोंडावाटे काढले नाहींत.

शिदू ह्मणाला "मीं अमक्याअमक्या ठिकाणीं त्या वेळीं होतों, एवढें सांगून कांहीं उपयोग होणार नाहीं. मी जें सांगेन तें साक्षीदारांच्या जबानीवरून सिद्ध झालें पाहिजे, असेंच तुमचें ह्मणणें कीं नाहीं?"

बापूसाहेबांनीं उत्तर केलें "होय, असेंतर खरेंच."

"माझ्या ह्मणण्याला पुरावा आहे. पण जबानी देण्यासाठीं साक्षीदार कोर्टापुढें येतील कीं नाहीं, एवढीच शंका आहे."

"यायला त्यांनां काय हरकत आहे? प्रत्यक्ष एखाद्या माणसाच्या जिवावर बेतली असतां आपल्याला जें खरें माहीत आहे तें सांगून त्याचा जीव वांचत असेल, तर तसें कोण करणार नाहीं?"

"तें खरें, पण त्यांतहि अवांतर गोष्टींचा विचार करावा लागतो."

"साक्षीदार कोर्टापुढें जबानी देण्यास येतील किंवा नाहीं या शंकेमुळेंच आतांपर्यंत खरी हकीगत न सांगण्याचा तुझा हट्ट होता वाटतें?"

"तेंच केवळ कारण नव्हतें. दुसरीहि एक अडचण अजूनहि होती, आणि ती आहेच! पण बापूसाहेब, तुह्मी माझ्याकडे असें शंकायुक्त दृष्टीनें पहातां हें

काय ? मी तुह्मांला खरें सांगतों, माझ्याविषयीं कांहींएक शंका घेण्याचें कारण नाहीं, हें, मी जी हकीकत आतां तुह्मांला सांगणार आहें तिजवरून कळून येईल."

" बरें आहे, चालूंदे."

" या कामांत फार काळजीपूर्वक आणि जपून पाऊल टाकिलें पाहिजे, आणि तें कसें टाकावें, याचीच अडचण मला येऊन पडली आहे. तथापि बापूसाहेब, तुमच्यापाशीं एकदाचें मन मोकळें करून सगळी खरी हकीगत सांगावी आणि तुमची पोक्त सल्लामसलत घेऊन त्याप्रमाणें वागावें, असें माझ्या मनानें घेतलें आहे. पण संभाळाहो ! नाहींतर तुह्मांला विश्वासानें सांगितलेली गोष्ट तुह्मी षट्कर्णी कराल. सगळी हकीगत ऐकून घेतल्यावर तुमचें तुह्मांलाच वाटेल कीं, खरेंच, ही गोष्ट कोणाजवळ बोलून उघड करूं नये. "

याप्रमाणें प्रस्तावना केल्यावर शिदूनें बापूसाहेबांच्या कानांत सगळी खरीखरी हकीगत सांगितली.

## प्रकरण ५६ वें.

# सेशनकोर्टापुढें चौकशी.

आज एप्रीलची तेविसावी तारीख. सोमवार. आज शिदूच्या खटल्याची चौकशी सेशनकोर्टापुढें सुरु झाली. शिवापुरांत या दिवशीं कोण गडबड! अकरा वाजतां कोर्ट सुरु व्हावयाचें, पण लोक नऊ वाजल्यापासूनच जाऊन जागा धरून बसले होते. साधारण शिकलासवरलेला मनुष्य रिकामा असला, कीं तो आज सेशन-कोर्टांत आढळावयाचाच. कित्येकांनींतर कांहींतरी निमित्त करून सुटी मिळविली, व शिदूच्या आरोपाची चौकशी चालतांना पहाण्याची ही अमोलिक संधि वायां जाऊं दिली नाहीं. या दिवशीं कोर्टांत प्रेक्षकांची इतकी गर्दी जमली कीं, साडेदहा अकरा वाजतां आलेल्या प्रेक्षक मंडळीला तेथें उभें रहाण्यापुरतीसुद्धां जागा मिळाली नाहीं! तथापि वकील, प्रतिष्ठित शेटसावकार व कांहीं बडीबडी जहागिरदार मंडळी, यांचेसाठीं कांहीं खुर्च्या मुद्दाम राखून ठेविल्या होत्या, म्हणून उशिरां येऊनदेखील त्यांनां जागा मिळाली. पण हें त्यांचें महद्भाग्यच म्हटलें पाहिजे; आणि या त्यांच्या भाग्याचा हेवा करणारे कांहीं थोडेथोडके लोक प्रेक्षकांत होते, असें नाहीं. अकरा वाजण्याचा सुमार झाला, तशी प्रेक्षकांत कुजबुज सुरू झाली. कोणी ह्मणाले "त्रिंबकरावांनीं अशा वेळीं पैशाकडे न पहातां मुलाच्या बचावासाठीं मुंबईचा इन्व्हेन्यारिटी किंवा ब्यानूसनसारखा बॅरिस्टर आणावयास पाहिजे होता." कोणी या वेळीं महादेव चिमणाजी आपटे यांची आठवण काढून ह्मणाले "या वेळेस माधवराव पाहिजे होते, ह्मणजे सरकारी वकिलाची त्यांनीं कशीसोळा आणे फजिती उडविली असती!" सरकारतर्फे निकलसन बॅरिस्टर येणार असें कळलें, तेव्हांतर आरोपीतर्फे बॅरिस्टर आणिला नाहीं ही त्रिंबकरावांनीं फारच ढोबळ चूक केली, असें सर्वांनां वाटलें. कोणी ह्मणाले "युरोपीयन बॅरिस्टरांनां देण्याइतका पैसा नव्हता, तर निदान मेथा, डावर, सेटलवाड यांच्यासारखा नेटिव्ह बॅरिस्टर आणिला असता, तरी त्यानें तोडीस तोड केली असती." परंतु याच्या उलट कित्येक असेंहि ह्मणत होते कीं "युरोपिअन जज्जापुढें खटला असेल तर युरोपियन बॅरिस्टरच आणिला पाहिजे. तेथें नेटिव्ह बॅरिस्टर कितीहि हुशार असला तरी त्याची छाप पडत नाहीं. तोच जज्जसाहेबांच्या रंगाशीं बॅरिस्टरसाहेबांचा रंग जमला, ह्मणजे अर्धें काम झालें ह्मणून समजावें!" शिवापुरच्या टवाळ लोकांच्या या गटारवादांत कांहीं अर्थ नव्हता, हें निराळें सांगावयास नकोच.

बरोबर अकांचे ठोके पडतांच जज्जसाहेब आपल्या न्यायगृहास लागून असलेल्या आरामगृहांतून बाहेर पडले. चोपदार ललकारतललकारत पुढें आला व जज्जसाहेबांनां खडी ताजीम द्या, असें लांबच लांब हेल काढून ह्मटलेल्या कांहीं हिंदुस्थानी शब्दांनीं त्यानें सुचविलें. त्याच्यामागून गंभीर मुद्रा धारण केलेल्या जज्जसाहेबांची स्वारी येऊन न्यैायासनावर विराजमान झाली. त्यांनीं आपल्या उच्चासनावरून एकदा सभोंवार पाहिलें, हळूच मान किंचित् वांकवून लोकांच्या स्वागताचा स्वीकार केला, आणि ते खालीं बसले. जज्जसाहेब बसल्यावर लोकहि आपापल्या जागीं विराजमान झाले. जज्जसाहेबांनीं प्रथम सरकारतर्फे आलेल्या बॅरिस्टरसाहेबांचा थोडासा परिचय करून घेतला, आणि आजच्या कामांत उभय पक्षांकडील बॅरिस्टर व वकील यांचेकडून आपल्याला उत्तम प्रकारें साह्य मिळेल अशी आशा प्रदर्शित करून खटल्याच्या चौकशीस सुरुवात केली.

ज्युरीची नेमणूक होऊन ज्युरर शपथा घेऊन आपापल्या जागीं बसल्यावर शिरस्तेदारसाहेबांनीं आरोपी श्रीधर त्रिंबक याला, त्याच्यावर कमिटिंग मॅजिस्ट्रेटांनीं ठेविलेला आरोप मराठींत वाचून दाखविला. तेव्हां जज्जसाहेबांनीं "हा आरोप तुला कबूल आहे काय ?" ह्मणून त्याला विचारिलें.

आतां शिदूकडे सर्वांचे डोळे लागले होते. त्याला आरोपीच्या पिंजऱ्यांत उभें केलें होतें. तो तेथून धीटपणानें सर्वांच्या तोंडाकडे पहात होता. लज्जेची झांक त्याच्या चेहेऱ्यावर मुळींसुद्धां दिसत नव्हती. त्यानें न घाबरतां "नाहीं, मीं गुन्हा केला नाहीं," असें मोठ्यानें सांगितलें.

मग सरकारपक्षाच्या बॅरिस्टरानें खटल्याची हकीगत थोडक्यांत सांगितल्यावर साक्षीदारांच्या जबान्या घेण्यास सुरुवात झाली. पहिल्यानें त्रिंबकरावांच्या नोकराची साक्ष झाली. त्यानें आपण त्रिंबकरावांची गाडी आली तेव्हां दार उघडल्याचें आणि त्यांची चिरुटाची पेटी शोधण्यासाठीं कंदील घेऊन दाजी-साहेबांच्या खोलींत गेलों असतां तेथें त्यांला भयंकर रीतीनें मरून पडलेले पाहिल्याचें आपल्या जबानींत सांगितलें. "मग तूं काय केलेंस ?" ह्मणून विचारतां तो ह्मणाला "मी मोठ्यानें ओरडलों आणि तसाच माडीवर जाण्यास निघालों असतां अडखळून पडलों. तें ऐकून वकीलसाहेब धावून आले आणि काय झालें ह्मणून मला विचारूं लागले. माझ्यानें जास्त बोलवेना. मीं ह्मटलें दाजीसाहेबांकडे पहा."

बॅरिस्टरांनीं विचारिलें "त्या दिवशीं दाजीचें कुणाशीं भांडण वगैरे झालेलें तुला माहीत होतें?"

या प्रश्नाला आरोपीतर्फेच्या वकीलानें हरकत घेतली. पण जज्जसाहेबांनीं ती कबूल केली नाहीं. या प्रश्नास उत्तर देतांना तो ह्मणाला "संध्याकाळीं थोडीशी धुसपुस झाली होती व रात्रीं जेवण्याचे वेळीं पुष्कळच कडाक्याचें भांडण झालें ह्मणून दुसरे नोकर सांगत होते."

"दुसरे नोकर काय सांगत होते तें नको ! तुला स्वताला काय माहित असेल तेवढें सांग." ह्मणून जज्जसाहेबांनीं साक्षीदाराला एकदा बजावून सांगितलें. पण त्यानें स्वता तें भांडण पाहिलें किंवा ऐकिलें नव्हतें. पुढें रुमाला-विषयीं सरकारी बॅरिस्टरानें कांहीं प्रश्न विचारिले. त्याचीं साक्षीदारानें त्याला माहित असलेलीं उत्तरें दिलीं. उलट तपासणीचे वेळीं बापूसाहेबांनीं विचारिलें "तो रुमाल आरोपीचाच आहे, असें तूं कशावरून ह्मणतोस?"

साक्षीदार ह्मणाला "आरोपीचा आहे, असें मीं मुळींच ह्मटलें नाहीं. तो आमच्या छोटेसाहेबांचा आहे, असें मी ह्मणतों." साक्षीदाराचें हें उत्तर ऐकून कोर्टांत एकच हंशा पिकला.

वकिलानें विचारिलें "छोटेसाहेबांचा आहे, हेंतरी तुला कसें कळलें?"

"कशावरून ह्मणजे? तें मला माहित आहे. त्याच्या खुणा मला ठाऊक आहेत."

"आरोपी ह्मणजे तुझे छोटेसाहेब बाहेर गेले, तेव्हां त्यांच्या डोक्याला तो रुमाल तूं पाहिला होता?"

"होय, पाहिला होता."

"ते परत आले आणि त्यांनीं रुमाल टाकून टोपी घातली, हेंहि तूं पाहिलेंस?"

"नाहीं."

"तूं तेथें किती वेळ उभा होतास?"

"मला नक्की सांगतां येत नाहीं."

"नक्की नाहीं, पण अंदाजानें सांग. तेथून जिना उतरून खालीं जाण्यास जितका वेळ लागेल तितका वेळ होतास?"

"कुणाला जिना उतरण्यास वेळ लागला असें मी धरून चालूं? माझ्या-सारखा जवान गडी वीस अंक मोजीपर्यंत जिना उतरून मैदानाच्या पार निघून

जाईल. तेंच आपल्यासारख्या बुड्ढेबावांनां तितक्याच वेळांत जिन्याच्या अर्ध्या पायऱ्यासुद्धां उतरवणार नाहींत !"

हें मार्मिक व खोंचदार उत्तर ऐकून प्रेक्षक मंडळींत खूप हंशा पिकला व साक्षीदाराच्या हुषारीची व धीटपणाची प्रशंसा होऊं लागली. बापूसाहेब मात्र अंतर्यामीं संतापून गेले. तथापि वरकरणीं शांतता राखून त्यांनीं पुनः विचारिलें "दुसऱ्याशीं तुला काय करायचें आहे ? तुला स्वताला जितका वेळ लागेल तेवढा वेळतरी तूं तेथें उभा होतास काय, तें सांग."

• याला "नाहीं" हें उत्तर येतांच बापूसाहेबांनीं "हें उत्तर कोर्टानें लिहून घ्यावें," म्हणून सुचविलें. या उत्तरानें आपली बाजू बरीच सांवरली, असें त्यांस वाटलें.

नंतर दुसरे पुष्कळ मुद्द्याचे व अवांतर प्रश्न विचारण्यांत आले. या सर्वांचीं उत्तरें साक्षीदारानें सरळ दिलीं. त्यांत विशेष कांहीं निष्पन्न झालें नाहीं. पुढें राम्या शागीर्द याची साक्ष झाली. त्यानें सांगितलें "रात्रीं जेवण्याच्या अगोदर पासूनच भावाभावांत भांडणें सुरू होतीं; जेवणाचे वेळीं तीं विकोपास गेलीं. जेवण झाल्यावर छोटेसाहेब रुमाल घालून बाहेर पडलेले मीं पाहिले. ते रात्रीं एकाच्या सुमारास वकीलसाहेबांची गाडी येण्याचे अगोदर परत आले. दाजी-साहेब दहा वाजण्याचे सुमारास कुठें बाहेर गेले होते, पण ते लागलीच परत आले ते बाहेरच्या दारानें आंत न शिरतां खिडकींतून शिरले. मी बाहेरच दाराशीं निजलों होतों. सारा वेळ जागा नव्हतों व दाजीसाहेबांच्या खोलीचें दार लोटलेलें होतें, यामुळें मला आवाज वगैरे कांहीं ऐकूं आला नाहीं. दाजीसाहेबांचा खून छोटेसाहेबांनीं—"

पुढें तो कांहीं म्हणणार होता; पण जज्जसाहेबांनीं "विचारल्या प्रश्नाचा तेवढा जबाब दे. अधिक बोलूं नकोस," असें म्हणून त्याचें तोंड बंद केल्यामुळें तो काय सांगणार होता याविषयींची लोकांची जिज्ञासा अतृप्त राहिली.

त्याच्यानंतर दाजीसाहेबांच्या गुरुजींची साक्ष झाली. त्यांच्या जबानींत दाजी-साहेबांच्या व्यसनाचा एकंदर इतिहास पुष्कळांनां अश्रुतपूर्व होता तो अनायासेंच बाहेर आला. दाजीसाहेब गुरुजींच्या मठींतून घरीं येण्यास निघाले, तेव्हां त्यांनीं गांजाचे दम मारले होते व शक्तिदेवीचा तीर्थप्रसाद घेऊन,स्वारी तर्र होऊन निघाली होती, म्हणून गुरुजींनीं सांगितलें.

यावर त्यांनां विचारण्यांत आलें “ त्याला चालण्याइतकीतरी शुद्धि होती कीं नाहीं ? ”

गुरुजी ह्मणाले “होतीतर ! तो झिंगत व झोकांडे खातखात आपल्या घराकडे चालला होता. ” पुनः हंशा.

या साक्षीदाराची सगळी जबानी देण्यास आम्हचे जवळ स्थळ नाहीं. नाहींतर ह्या जबानीनें आमच्या वाचकांची घटकाभर चांगलीच करमणूक झाली असती. तथापि मुख्य मुख्य साक्षीदारांच्या जबान्यांचा गोषवारा येथें देत आहों. या सर्व साक्षींत राम्या शागीर्दाची जबानी लोकांनां खूब हंसवित होती. तशीच ती महत्वाचीहि पण होती. सरकारतर्फेच्या बरिस्टरानें युक्तीनें या साक्षीदाराच्या तोंडून एवढें काढून घेतलें कीं “ एकदा शिदू चाकू घेऊन दाजीला मारावयाला धावला होता पण नोकराचाकरांनीं मध्यें पडून ती वेळ टाळली. तरी याचें उट्टें आणखी एखाद वेळ काढून घेईन, अशी धमकी शिदूनें जातां जातां दिलीच. ” राम्या एकीकडे तोंडानें अशी एकेक गोष्ट सांगत जाई व लागलीच ह्मणे कीं “ पण हा खून छोटेसाहेबांनीं केला नाहीं, अशी माझी खात्री आहे. ” या वेळीं राम्याची ती उभी राहण्याची ऐट, आणि यथावस्तुप्रदर्शनासाठीं केलेले हातवारे पाहून व विशेषतः त्याची तळ कोंकणची विचित्र मराठी भाषा ऐकून लोकांनां मोठी गंमत वाटली. त्याच्या भाषेंत त्याचें बोलणें आह्मीं दिलें असतें, तर आमच्या वाचकांनांहि मोठी मौज वाटली असती खरी; पण त्याबरोबर एक गैरसोयहि झाली असती. त्याचा भावार्थ समजून घेण्यासाठीं एकेक दुभाष्या त्यांनां ठेवावा लागला असता. परंतु आमच्या वाचकांनां एवढ्या खर्चांततरी कां घाला ? असा विचार करून आह्मीं त्याचें बोलणें सरळ मराठी भाषेंत तर्जुमा करून ठिकठिकाणीं घातलें आहे.

दुसऱ्याहि पुष्कळ साक्षीदारांच्या जबान्या झाल्या. पण त्या देण्यापासून खटल्याच्या हकीगतीवर अधिक प्रकाश पडण्यासारखा नसल्यामुळें त्याहि गाळणें भाग आहे. तथापि एक महत्त्वाची जबानी संक्षेपरूपानें येथें दिलीच पाहिजे. ती आमच्या वाचकांचे परिचित असलेले वकील त्रिंबकराव यांची स्वताची होय.

त्रिंबकराव साक्षीदारांच्या पिंजऱ्यांत येऊन उभे रहातांच जिकडेतिकडे शांतता होऊन सर्वांचे डोळे त्यांच्या जबानीकडे लागले. या एका महिन्यांत काळजी आणि लज्जा, यांमुळें त्यांचें तोंड अगदीं काळवंडलें होतें, केंस भुरके

झाले होते व शरीर कृश झालें होतें. यामुळें हेच त्रिंबकराव वकील असें एखाद्यास सांगितलें असतें तर त्याला तें खरेंसुद्धां वाटलें नसतें. त्यांची ही दुःखावस्था पाहून जमलेल्या प्रेक्षक मंडळीपैकीं पुष्कळांनां त्यांची फार कींव वाटली.

रीतीप्रमाणें हातांत गीतेचें पुस्तक व गंगोदक घेऊन खरें सांगण्याबद्दल शपथ घेतल्यानंतर व आपण कोण, काय तें सांगणें झाल्यानंतर प्रश्नोत्तरांस सुरुवात झाली. त्यांत मुलांमुलांमध्यें मागें अनेक वेळां भांडणें झालीं होतीं व ते आपआपसांत दांडगाई करीत तेव्हां आपल्यास मध्यें पडून सोडवावें लागे, वगैरे मजकूर आला. तसेंच खुनाच्या दिवशीं जेवतांना कडाक्याचें भांडण होऊन हातावर पाणी पडल्याबरोबर शिदू बाहेर गेल्याचें व रात्रीं फार उशिरां आल्याचें आपणांस माहित आहे, असेंहि त्यांनीं सांगितलें. खून उघडकीस आल्यानंतर घरांत एवढी गडबड चालली होती, हेंहि त्रिंबकरावांनां कबूल करावें लागलें. आणखीहि बरीचशी हकीगत त्यांच्याकडून काढून घेतल्यावर, बॅरिस्टरांनीं त्यांनां विचारिलें " त्या दिवशीं रात्रीं शिदू बाहेर कुठें गेला होता, हें तुह्मांस माहित आहे काय ? "

त्रिंबकराव ह्मणाले " नाहीं. "

पण हा शब्द उच्चारतांना त्यांचा आवाज कांपत होता. कारण आरोपीपक्षाकडील पुराव्याचें सगळें व्यंग या एका मुद्द्यांत आहे, हें त्यांनां ठाऊक होतें.

" तूं कुठें होतास, ह्मणून तुह्मीं त्याला विचारलें होतें ? "

" विचारलें, परंतु त्यानें सांगितलें नाहीं. तथापि ' आपला या गुन्ह्याशीं यत्किंचित्सुद्धां संबंध नाहीं,' असें तो प्रारंभापासून माझेपाशीं निक्षून सांगत आहे आणि तो जेवढें सांगतो तेवढ्यावरून तो निरपराधी आहे अशी माझी खात्री आहे."

" तुमची खात्री कोर्टाला नको आहे. विचारतों तेवढ्या प्रश्नाचा जबाब द्या. आरोपी हा तुमचा मुलगा नेहमीं तुमच्या आज्ञेंत वागणारा होता काय ? "

" हा असंबद्ध प्रश्न आहे, " अशी बापूसाहेबांनीं हरकत घेतली; पण ती कोर्टानें ऐकिली नाहीं. हा प्रश्न अंमळ अडचणीचा होता. कारण ' होय ' असें ह्मणावें, तर ' मग तूं दाजीशीं भांडूं नकोस व त्याच्या वाटेस जाऊं नकोस असें तुह्मीं सांगितलें असतें तर तें शिदूनें ऐकलें' असतें ना ? असा प्रश्न पुढें व्हावयाचा आणि या कामांत त्रिंबकरावांचीच सगळी चूक आहे,

असें सहज उघडकीला आलें असतें; 'नाहीं' ह्मणावें, तर त्यावरून शिदूचें वर्तन त्याच्या वयाला न शोभणारें होतें, असें ठरून त्याच्याविषयीं जज्ज आणि ज्यूरी यांचीं मनें कलुषित झालीं असतीं. ह्मणून त्रिंबकराव प्रथम थोडे घोटाळले आणि या प्रश्नाचें उत्तर ' मला ठाऊक नाहीं. ' असें द्यावें, कीं अन्य तऱ्हेनें कांहीं सांगावें, याचा विचार करूं लागले. त्रिंबकराव घोटाळले, हें पाहून बॅरिस्टरसाहेबांनीं त्यांनां अधिकच घाबरविण्याचा व धमकावण्याचा क्रम ठेविला. त्यामुळें सटकन् " नाहीं. " असें सांगून त्रिंबकरावांनीं आपली सुटका करून घेतली.

पुढें डाक्तरसाहेबांची साक्ष झाली. त्यांत मृत्यू कशानें झाला व केव्हां झाला असावा, याविषयीं डाक्तरसाहेबांचा अभिप्राय व त्या अभिप्रायाविषयीं सयुक्तिक शास्त्राधार विचारण्यांत आले. या जबानींत आमच्या वाचकांनां कंटाळवाणा वाटणारा शास्त्रीयभाग व लॅटिन भाषेंतले शब्द फार होते. दुसरे कांहीं किरकोळ साक्षीदार होते, पण त्यांच्याहि जबान्यांत गंमत वाटण्यासारखें कांहीं नव्हतें. एवढ्यानें पोलिसतर्फेचे साक्षीदार संपले.

आरोपीतर्फेच्या साक्षीस आतां सुरुवात व्हावयाची होती. बापूसाहेब हे आरोपीतर्फे वकील होते. ते कायद्याच्या ज्ञानांत पूर्ण वाकबगार असून शिवाय त्यांचे अंगीं वक्तृत्वशक्तीहि चांगली होती; परंतु या खटल्यांत आरोपी-तर्फेच्या पुराव्यांत दोन मोठीं व्यंगें होतीं. एकतर शिदू त्या वेळीं कुठें होता हें षट्कर्णी करण्याची त्याची स्वताची इच्छा नसल्यामुळें तो निरपराधी आहे हें कोर्टापुढें शाबित कसें करावें याची पंचाईत होती; व दुसरी गोष्ट, शिदू निरपराधी आहे या ह्मणण्याच्या बळकटीसाठीं त्या खुनाबद्दलचा संशय दुसऱ्या कोणावरतरी घालावयास पाहिजे व तो पुराव्यानें शिदूवरून उडवून दुसऱ्यावर घालतां आला पाहिजे होता. शिदूनें हा गुन्हा केला नाहीं, तर मग तो कोणीं केला असेल? या प्रश्नाला समर्पक उत्तर शोधण्यांत बापू-साहेबांनीं आपलें सगळें कल्पनाचातुर्य व आपली सगळी करामत खर्च केली; पण बरोबर थांग लागेना. अशा अडचणींत बापूसाहेब सांपडले होते. पण अशा अडचणींनां भिऊन हातचें काम बिघडूं दिलें, तर वकिलाचें चातुर्य तें काय? बापूसाहेबांनीं विरुद्ध पक्षाच्या पुराव्यावर टीका करतांना हळू हळू एकेक मुद्दा हातीं घेऊन त्याचा पोकळपणा मोठ्या चातुर्यानें दाखविला. शिदूचा रुमाल मयताच्या अंगाखालीं सांपडला, या एका क्षुल्लक गोष्टीवर

विरुद्ध पक्षाचे बॅरिस्टरांनीं उठविलेली टोलेजंगी इमारत बापूसाहेबांनीं एका सुरुंगानें ढांसळून खालीं आणली; आणि विरुद्ध पक्षाचाच पुरावा घेऊन तो आरोपीला कसा अनुकूल होतो, तें उत्कृष्ट रीतीनें दाखविलें. बापूसाहेब ह्मणाले "हा रुमालच माझ्या अशीलाच्या निरपराधीपणाबद्दलचा उत्कृष्ट पुरावा आहे. नामदार कोर्ट आणि ज्युरींतील सद्गृहस्थ हो! जो मनुष्य प्रत्यक्ष आपल्या भावाचा खून करण्यास प्रवृत्त होईल, तो आपल्या गुन्ह्याचा पुरावा ह्मणून, अथवा आपल्या मूर्खपणाचें, दुष्टपणाचें अथवा नृशंसतेचें चिन्ह ह्मणून आपला रुमाल मयताच्या अंगाखालीं मुद्दाम घालून ठेवील, अथवा तो तेथें राहूं देईल, ही गोष्ट संभवनीयतरी आहे काय? यापेक्षां आरोपी ह्मणतो 'मी प्रथम रुमाल घालून बाहेर जाण्यास निघालों, परंतु मागाहून माझा विचार बदलल्यामुळें मीं तो रुमाल आळसानें जवळच दाजीच्या खोलींत फेंकला व मागाहून दाजी आला तेव्हां अंधारांत व बेशुद्ध स्थितींत तो माझ्या रुमालावरच येऊन निजला असेल!' हें त्याचें ह्मणणें जास्त सयुक्तिक, जास्त संभवनीय व सर्वस्वीं खरें आहे, असें कुणाला वाटणार नाहीं? आपली मान फांसांत अडकावी ह्मणून आपला रुमाल मयताच्या अंगाखालीं राहूं दिला, इतका वेडेपणा आरोपीच्या पदरीं खास बांधतां येणार नाहीं. यावरून त्याला खुनाची कांहींएक माहिती नव्हती, याचें प्रत्यक्ष प्रमाण हा रुमालच आहे, असें ह्मणण्यास मलातरी कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं."

बापूसाहेबांचें हें आवेशयुक्त आणि मनाची खात्री पटविणारें वक्तृत्व सफल झाल्यासारखें दिसलें. ज्युरीच्या व जजसाहेबांच्याहि मनावर या वक्तृत्वाचा कांहीं परिणाम झाल्याचें चिन्ह त्यांच्या मुद्रेवर स्पष्ट दिसूं लागलें.

याप्रमाणें सरकारी बॅरिस्टराच्या भाषणांतला एकेक मुद्दा घेऊन त्यावर समर्पक उत्तरें देण्यांत बापूसाहेबांनीं आपल्या अंगची पुष्कळ करामत व वाक्चातुर्य दाखविलें. आतां एकच मुद्दा राहिला व हाच मुद्दा अत्यंत महत्वाचा होता. शिदू त्या रात्रीं कोठें गेला होता, हाच तो मुद्दा होय. बापूसाहेबांनीं सगळ्या मुद्द्यांनां उत्तर दिलें, आणि त्यांचें भाषण संपत आलें, तरी या महत्त्वाच्या मुद्द्याचा त्यांच्या भाषणांत कोठेंहि उल्लेख नाहीं, हें पाहून जमलेल्या मंडळीस आश्चर्य वाटलें. कित्येकांतर आपआपसांत असेंहि कुजबुजूं लागले कीं "हा मुद्दा अंगावर येणारा असल्यामुळें बापूसाहेब पहा कशी त्याची टाळाटाळी करित आहेत ती!" ही कुजबूज बापूसाहेबांच्याहि कानीं गेली. तेव्हां ते शांतपणें ह्मणाले

"आतां एकच मुद्दा राहिला आहे; आणि याच मुद्द्यावर आरोपीला गुन्हेगार ठरवूं पहाणारांची सगळी मदार आहे. या मुद्द्याला आतांपर्यंत मीं मुद्दाम उत्तर दिलें नाहीं; ह्मणून मी त्याची टाळाटाळी करित आहें, अशी कुजबुज करणारांनीं इतकी उतावीळ न करतां जरा दमानें घ्यावें, अशी माझी त्यांनां विनंति आहे. त्या दिवशीं रात्रीं खून घडला त्याचे अगोदरपासून तों तो घडून चुकल्यानंतर कांहीं काळपर्यंत आरोपी घरीं नव्हता, तो दुसरीकडे होता, हें मी आतां पुराव्यानिशीं असें तंतोतंत सिद्ध करून देणार आहें कीं, असा बिनतोड पुरावा आजपर्यंत कधीं नामदार कोर्टापुढें आला नसेल! तो पुरावा आल्यानंतर आरोपीला ताबडतोब दोषमुक्त करून त्याच्या हातांतल्या बिड्या इथल्या इथें तोडाव्या असें नामदार कोर्ट फर्मावील, अशी माझी बालंबाल खात्री आहे. सदर खून रात्रीं अका आणि साडेअका यांच्या दरम्यान झाला असावा, असें डाक्तरसाहेबांच्या जबानींत आलेंच आहे; आणि यापेक्षां दुसरी कांहीं निराळी वेळ दुसऱ्या कोणाहि साक्षीदाराच्या जबानींत आलेली नाहीं, किंवा मानण्यास आधारहि नाहीं. तेव्हां अका साडे अका वाजतां आरोपी अमक्या ठिकाणीं होता, घरीं नव्हता, एवढा पुरावा कोर्टापुढें मांडला, ह्मणजे माझें काम झालें; आणि हा अत्यंत विश्वसनीय आणि सर्वांनां आश्चर्यानें थक्क करून सोडणारा पुरावा मी आतांच कोर्टाला सादर करणार आहें. आरोपीतर्फेच्या साक्षीदाराच्या तोंडून या महत्त्वाच्या मुद्द्यावर प्रकाश पडला, ह्मणजे माझ्या ह्मणण्याची सत्यता आपोआप निदर्शनाला येईल!" असें ह्मणून बापूसाहेबांनीं आपलें भाषण संपविलें व आरोपीतर्फेच्या साक्षीदाराला बोलावूं पाठविलें.

कोर्टानें, ज्यूरीनें व प्रेक्षकांनीं, सर्वांनीं बापूसाहेबांचें भाषण लक्ष्यपूर्वक ऐकिलें. जो पुरावा नाहीं असें आतांपर्यंत आपण समजत होतों, तो आतां अकल्पित रीतीनें एकदम पुढें येणार, हें पाहून सर्व आश्चर्यानें थक्क झाले आणि असा हा पुरावा आहेतरी काय, ह्मणून मोठ्या उत्कंठेनें पाहूं लागले.

## प्रकरण ५७ वें.

## पण सुटला !!

बापूसाहेबांचें भाषण संपून आरोपीतर्फेचे साक्षीदार बोलावण्यांत आले, एवढ्यांत मध्यंतरीं थोडकासा वेळ गेला. आतां ऐन दुपारची वेळ असून कोर्टांत लोकांची गर्दी विशेष झाल्यामुळें उष्मा बराच जाणवत होता. तथापि बापूसाहेबांच्या साक्षीदारांकडे लोकांचे डोळे इतके लागले होते कीं, क्षणभर बाहेर उठून जाऊन मोकळी हवा घेण्याची इच्छा कोणासहि होत नव्हती. यदाकदाचित् कोणी तसें उठून गेलें असतेंच, तर त्याची जागा दुसऱ्यानें बळकावल्यामुळें त्याला तसेंच मागें उभें रहावें लागलें असतें.

इतक्यांत पलीकडच्या टोंकाला एक शिपाई "वाट सोडा, साक्षीदाराला येऊं द्या," ह्मणून लोकांनां दोन्ही हातांनीं लोटितलोटित साक्षीदारासाठीं वाट खुली करित होता; आणि त्या शिपायाच्या मागून एक लहानशी मुलगी खालीं मान घालून इकडेतिकडे न पहातां सरळ येत होती. ती साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत येऊन उभी राहीपर्यंत फारशी कोणाला दिसली नाहीं; पण त्या उच्च स्थानीं उभी रहातांच पुष्कळांनीं तिला ओळखलें आणि हिचा या खटल्याशीं काय संबंध? अशी आपआपसांत कुजबुज सुरू झाली. ती इतकी कीं, कोर्टांत बंदोबस्तासाठीं उभे राहिलेल्या शिपायांनां ती बंद करण्यास मोठे प्रयास पडले.

ती मुलगी साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत येऊन उभी रहातांच बापूसाहेबांनीं उठून तिला प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. ती इतकें हळू बोलत होती कीं, चार हातांवरच्या लोकांनां तिचे ओंठ हाललेले तेवढे दिसत होते. तेव्हां जज्जसाहेबांनीं तिला मोठ्यानें बोलण्याबद्दल ममतेनें इशारा केला.

परंतु मोठ्यानें बोलण्यासाठीं तिला कोण प्रयास पडत होते! जी जन्मांत कधीं कोर्टाची पायरी चढली नव्हती, किंवा एवढा मोठा समाज जिनें आजपर्यंत कधींहि पाहिला नव्हता, तिला, एकदम इतक्या लोकांपुढें येऊन बोलण्यास धैर्य कसें व्हावें? ती आपल्याकडून मोठ्यानें बोलण्याचा खूप प्रयत्न करी, पण शब्द तिच्या कंठांत जसे कांहीं अडकत. कांहीं केल्यानें बाहेर ह्मणून पडत नव्हते! तिनें मोठी शिकस्त करून एकदाचें आपलें व आपल्या बापाचें नांव सांगितल्यावर बापूसाहेबांनीं तिला प्रश्न केला "तूं कुठें रहातेस?"

तिनें उत्तर दिलें "शनिवारपेठेंत."

"तुला हा आरोपी शिदू याविषयींची काय माहिती आहे?"

यावर सोनी कांहींच बोलेना. कशा प्रकारचें उत्तर पाहिजे, तें तिला कळेना. जें तिच्या ओंठावर होतें, तें उत्तर तिनें दिलें. ती ह्मणाली "त्यानं दाजीसाहेबांला मारलं नाहीं. त्याला सोडून द्यावं."

"त्यानें मारलें नाहीं, हें तूं कशावरून ह्मणतेस?"

"तो त्या वेळीं घरीं नव्हता, मग मारील कुठून?"

"तो त्या वेळीं घरीं नव्हता, तर कुठें होता."

"तो माझ्या इथं होता. मी व तो त्या वेळीं आमच्या बगिच्यांत बोलत बसलों होतों!"

पण हें उत्तर इतकें हलक्या आवाजांत निघालें कीं, मोठ्यानें बोलण्याबद्दल जज्जसाहेबांनां पुनः सोनीला इशारा करावा लागला.

"तो किती वाजतां तुमच्या घरीं आला होता?"

"साडेनवांच्या सुमाराला."

"आणि गेला तेव्हां किती वाजले होते?"

"एकाचा सुमार झाला होता."

या प्रश्नोत्तरानें बरीच चळवळ झाली. आतांपर्यंत जी एक गोष्ट अत्यंत गूढ होती, ती आतां सर्वांनां अकल्पित रीतीनें कळली, ह्मणून जो तो दुसऱ्याच्या तोंडाकडे आश्चर्यानें पाहूं लागला.

बापूसाहेबांनीं पुढें विचारिलें "तुमच्यापाशीं त्या वेळीं आणखी कोण होतें?"

"कोणीहि नव्हतं. आह्मीच दोघं होतों."

"घरांतलीं माणसें काय करित होतीं?"

"घरांत मावशी होती, पण ती आजारी असल्यामुळं अंथरुणावर पडून होती. गुलाबदाणी होती ती घरांतलं काम आटोपून निजली होती!"

"हं! तर मग एकूण तुह्मांला रागें भरायला घरांत कोणीहि नव्हतें, ह्मणून तुह्मी इतक्या रात्रपर्यंत बोलत बसलां होतां, नव्हे का?"

बापूसाहेबांचें हें अंमळ कडक भाषण सोनीला शल्यासारखें हृदयांत खोंचलें, आणि तिच्या डोळ्यांला टचकन् पाणी आलें. तें पाहून त्या दयाळू जज्जसाहेबांनांहि वाईट वाटलें असें दिसलें. कारण त्यांनीं क्षणमात्र आपल्या नाकावरचा चष्मा काढून रुमालानं एकदा डोळे पुसले, आणि मग कांहीं वेळ स्तब्ध राहून तिच्याकडे सारखी टक लावून पाहिलें. पुनः डोळे पुसून त्यांनीं चष्मा चढविला

आणि मुलीवर दया करण्याविषयीं बापूसाहेबांनां इंग्रजींत सुचवून ते खालीं मान घालून प्रश्नोत्तरें लिहून घेऊं लागले. आणखी कांहीं प्रश्नोत्तरें झाल्यावर पुढें विरुद्धपक्षाच्या बॅरिस्टराकडून खालीलप्रमाणें उलट तपासणी सुरू झाली:—

"हा प्रकार रात्रीं एक वाजेपर्यंत चालला होता, असें तूं मघांशीं सांगितलें ना ?"

"होय."

"हा नेहमीं तुझ्याशीं इतका वेळ रात्रीं बोलत बसत असे काय ?"

"नेहमीं नाहीं. त्याच दिवशीं आह्मी बसलों होतों. याचं कारण मी निजल्यें आहें असं समजून गुलाबदाणीनं दार केव्हां लाविलं तें आह्मांस कळलं नाहीं."

"साडेनऊ वाजेपासून एक वाजेपर्यंत हा तुझ्यापासून दूर झाला नाहीं ?"

"नाहीं."

"तूं हें अगदीं देवाधर्माला स्मरून खरें सांगतेस ?"

"हो, अगदीं खरं सांगत्यें."

"एक अविवाहित तरुण मुलगी इतक्या रात्रीं एका तरुण मुलाबरोबर अशा रीतीनें एकटी तासचे तास घालविते, आणि परांतल्या माणसांनां त्या गोष्टीची गंधवार्ताहि कळत नाहीं, ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे." असें बॅरिस्टरसाहेब ह्मणाले. दुभाष्यानें बॅरिस्टरचें ह्मणणें मराठींत सांगितलें. तें ऐकून सोनीला कृतकर्माचा पूर्ण पश्चात्ताप होऊन एकदम भडभडून आलें. ती कोर्टांत मोठ्यानें हुंदका घेऊन रडूं लागली. जज्जसाहेबांनीं गंभीर मुद्रेनें प्रथम तिच्याकडे आणि नंतर तिला प्रश्न विचारूनविचारून छळणाऱ्या बॅरिस्टरसाहेबांकडे पाहिलें. पण बॅरिस्टरसाहेब दबणारे नव्हते. ते अधिक खोदूनखोदून प्रश्न विचारूं लागले. त्यांनीं पुढें विचारिलें "अशा तुमच्या रात्रीच्या भेटी यापूर्वी कधीं झाल्या होत्या, कीं हीच पहिली भेट होती ?"

शिदू मध्येंच ह्मणाला "ही पहिली आणि शेवटचीच भेट, ह्मणून मघांच तिनं नाहीं का सांगितलें ? पुनः पुनः तोच प्रश्न काय विचारतां ?"

शिदूच्या या बोलण्याचा कांहीं चांगला परिणाम झाला नाहीं. बॅरिस्टर-साहेबांनीं शिदूला मध्यें तोंड न घालण्याविषयीं चांगली ताकीद दिली; जज्ज व ज्यूरीचे लोक त्याच्याकडे अंमळ रागावून पाहूं लागले; आणि सोनी जी आतांपर्यंत खालीं मान घालून व मुठींत जीव धरून उभी होती, ती एकदम

ओळखीचा आवाज ऐकतांच वर मान करून पाहूं लागली--तों शिदू कैद्याच्या पिंजऱ्यांत उभा असलेला तिला दिसला, त्याबरोबर ती एकदम दचकली.

पुढें बॅरिस्टरसाहेबांनीं "आणखी तुला जें काय माहित असेल तें सांग," असें तिला ह्मटलें. तेव्हां "मला अधिक कांहीं सांगायचं नाहीं. शिदू गेला तेव्हां एकाचा सुमार होता, आणि तेव्हांपासून तो माझ्या दृष्टीस पडला नव्हता, तो आतां पडला," एवढेंच सोनी ह्मणाली.

"त्या दिवशीं रात्रीं आरोपी टोपी घालून आला होता कीं रुमाल?"

"टोपी."

एवढीं प्रश्नोत्तरें झाल्यावर सोनीची सुटका झाली व ती परत जाण्यासाठीं चळली. इतक्यांत सहज तिची दृष्टि दूर बसलेल्या एका माणसाकडे गेली. ह्या माणसाचा चेहरा तिच्या पूर्ण परिचयाचा होता, तरी तो आतां मानसिक चिंता व क्लेश यांनीं इतका काळवंडला होता कीं, तिच्यानें तो पहावेना. नारायणरावांनीं गरिबींत बरेच दिवस काढले होते; पण त्यांची वृत्ति समाधानी असल्यामुळें त्यांची मुद्रा सदा प्रफुल्लित असे; त्यांचें तोंड दुर्मुखलेलें कधीं कोणीं पाहिलें नव्हतें; परंतु सध्या त्यांची स्थिति कांहीं विलक्षण झाली होती. ते गुजराथेंत गेल्यावर मागें त्यांच्या घरीं घडलेली ही हकीकत अद्याप-पर्यंत सोनीनें व घरांतल्या इतर माणसांनीं आपल्यापासून लपविली, यामुळें व विशेषतः कुलीन घराणांतल्या उपवर मुलीला कोर्टांत येऊन वरच्यासारखी बोलून रात्रीं बाहेर तरुण परपुरुषाबरोबर बोलत बसल्याबद्दलची हकीगत चार लोकांसमक्ष सांगण्याचा अत्यंत लाजिरवाणा प्रसंग आलेला पाहून, आपली मलीन झालेली अब्रू घेऊन आतां कोणाला तोंड दाखवूं, असे दुःखाचे, निराशेचे आणि वैतागाचे विचार त्यांच्या डोक्यांत काहूर उठवित होते. त्यामुळें त्यांच्या चेहेऱ्यावर विद्रूपता, कालिमा आणि भेसूरपणा आला होता. त्यांची ती मुद्रा दुरून पाहून सोनीला कसेंसेंच वाटूं लागलें. ती अगोदरच भेदरलेली होती, आणि तशांतून आतां बापाची ती मुद्रा पाहून तिची भीति इतकी वाढली कीं, तिच्यानें एक पाऊलहि पुढें टाकवेना. तिच्या डोळ्यांपुढें काजवे चमकूं लागले, तिची कंबर खचली व मूर्च्छा येऊन पडते कीं काय असें झालें. इतक्यांत सुदैवानें अंमळ मोकळ्या हवेंत आल्यावर तिला थोडें बरें वाटलें.

सोनी बाहेर पडल्याबरोबर नारायणरावहि बाहेर आले. ते व गंगाधर हे अण्णासाहेबांच्या दुकानांतून परभारें कोर्टांत आले होते. ते सोनीसह

गाडींत जाऊन बसले. नारायणरावांची मुद्रा अत्यंत खिन्न झाली होती. इतकी कीं, त्यांनीं वर मान करून पाहिलें नाहीं किंवा ते सोनीशीं अथवा दुसऱ्या कोणाशीं एक अक्षरहि बोलले नाहींत. गाडींतल्या गाडींतच एकाएकीं त्यांनां एक झटका आला आणि ते धाडकन् गंगाधराच्या अंगावर पडले. गंगाधरानें वारा वगैरे घालून त्यांनां शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला. अंमळशानें ते डोळे उघडून पाहूं लागले, पण उठून बसण्याची शक्ति त्यांच्या अंगीं राहिली नाहीं. त्यांच्या अर्ध्या अंगावरून वारें गेलें !

हें पाहून गंगाधर अधिकच घाबरला. त्यानें गाडी तशीच थेट बाळशास्त्री वांईकर वैद्य, यांच्या घराकडे वळविण्यास गाडीवानास सांगितलें. वैद्यबुवांनीं नाडी पाहून सांगितलें कीं " हा आक्षेप नांवाचा वातक्षोभ आहे. वाग्भटांनीं निदानस्थानाच्या पंधराव्या अध्यायांत म्हटलेंच आहे—' यदा तु धमनीः सर्वाः कुद्धोऽभ्येति मुहुर्मुहुः तदांगमाक्षिपत्येप व्याधिराक्षेपकः स्मृतः ।' धनुष्याप्रमाणें शरीर वर्तुलाकार झालें असतें, तर त्याला अमस्तंपक किंवा अपतानक म्हटलें असतें. पण तसा प्रकार इथें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. अतएव हा आक्षेपकच खरा. आतां कोणी कोणी माधवनिदानाला प्रमाणभूत मानून—"

पुढें वैद्यबुवा कांहीं बोलणार होते, पण गंगाधरानें त्यांनां म्हटलें "शास्त्रीबुवा ! प्रथम कांहीं उपचार करून यांची तब्यत ताळ्यावर आणा, मग आपण माधवनिदान श्रेष्ठ कीं वाग्भट श्रेष्ठ, याविषयीं चर्चा करूं. "

यावर शास्त्रीबुवांनीं " तेंहि खरें आहे ! बरें, तर तुमच्या म्हणण्याप्रमाणें ' प्रकृतं अनुसरामः ' " असें म्हणून आपल्या बटव्यांतून कांहीं पूड काढून ती हुंगण्यास दिली आणि नंतर दुसरी एक पुडी देऊन ती घरीं गेल्यावर तुपाबरोबर चाटण्यास देण्यास सांगितलें. गंगाधरानें नारायणरावांनां तसेंच गाडींत घालून त्यांच्या घरीं पोहोंचविलें.

इकडे सेशन कोर्टांत साक्षीदारांच्या जबान्या वगैरे होऊन काम संपलें. जज्जसाहेब ज्युरीला खटला समजावून देण्यास लागले. बॅरिस्टर किंवा वकील यांच्या भाषणांत व जज्जसाहेबांच्या भाषणांत विलक्षण तफावत दिसत होती. पहिल्यांच्या भाषणांत अलंकारांची गर्दी, एकतर्फीपणा, चंचलता, आवेश, अत्युक्ति आणि लपंडाव भरले होते. जज्जसाहेबांच्या वक्तृत्वाचा ओघ कांहीं कमी होता, असें नाहीं. पण त्यांच्या भाषणांत गांभीर्य, सरलता, समता आणि

संश्लिष्टता हे गुण विशेष होते. त्यांनीं प्रथम थोडक्यांत खटल्याच्या महत्वाचा एकहि भाग न गाळतां सांगितला; नंतर निरनिराळ्या साक्षीदारांच्या जबानींतल्या मुद्याच्या गोष्टी सांगून, कोणत्या साक्षीदारावर किती विश्वास ठेवावा तें सर्व पुरावा बरोबर तोलून पाहून सांगितलें; नंतर पिनलकोडांतलें खुनाविषयींचें कलम वाचून दाखवून त्यांत दिलेल्या व्याख्येचें स्पष्टीकरण केलें व सदर व्याख्या प्रस्तुत खटल्यांत पुढें आलेल्या व पुराव्यानें सिद्ध झालेल्या गोष्टीशीं मिळवून पाहिल्यावर आरोपीवर सदर गुन्हा शाबित होतो कीं काय, तें नीट विचार करून पहा ह्मणून ज्युरीला सांगितलें; व शेवटीं गुन्ह्याची शाबिती तंतोतंत झाली तरच आरोपीला दोषी ठरवा, आणि पुराव्यांत यत्किंचित वैगुण्य दिसलें, किंवा संशयात्मकता दिसली, तर संशयाचा फायदा आरोपीला देऊन त्याला साफ निर्दोषी ठरवा, असें सांगून आपलें भाषण संपविलें. जज्जसाहेबांचें भाषण संपल्यावर ज्युरी विचार करण्यासाठीं एकीकडे गेली. या वेळीं संध्याकाळचे सहा वाजले होते.

जज्जसाहेब, वकील मंडळी व प्रेक्षक, सगळे ज्युररांच्या येण्याची वाट पहात बसले होते. ज्युररांच्या निकालावर आतां आरोपीच्या आयुष्याचा सगळा आशातंतु अटकून राहिला होता. ज्युरी त्याला निर्दोषी ठरवून सोडते, किंवा दोषी ठरवून फांसावर चढविते, एवढेंच, आतां पहाण्याचें राहिलें होतें. सगळ्या खटल्याचें सार काय तें हेंच होतें. ज्युरीनें विचार करावयाला फार वेळ घेतला, असें नाहीं. पण लोकांची उत्कंठा अति, यामुळें थोडकाच वेळ लोकांनां अति कंटाळवाणा झाला आणि कित्येक उतावीळ लोक ज्युररांनां मंद ह्मणून दोष द्यावयास लागले. तिऱ्हाइतांनां जर इतका कंटाळा आला, तर खुद्द आरोपीला तो किती आला असेल !

शेवटीं ज्युररांच्या खोलीचें दार एकदाचें उघडलें आणि एकेक ज्युरर गंभीरपणानें येऊन आपापल्या जागीं बसल्यावर जज्जसाहेब ह्मणाले "ज्युरींतले सद्गृहस्थहो ! तुमचें एकमत झालें आहे काय ?"

यावर ज्युरीचे प्रमुखांनीं उत्तर दिलें "होय."

"आरोपी दोषी किंवा निर्दोषी याविषयीं तुमचें काय मत आहे?"

ज्युरीच्या प्रमुखानें पुढें सरसावून मोठ्यानें सांगितलें "आरोपी निर्दोषी आहे. असें ज्युरीचें मत आहे."

जज्जसाहेबांचाहि तसाच अभिप्राय पडला.

## प्रकरण ५८ वें.

# एक दुःखाचा प्रसंग.

इकडे शिवापुरांत शिदूवरच्या आरोपाची चौकशी चालली असतां तेथील एका प्रमुख कुटुंबावर दुःखाचा डोंगर कोसळला. अण्णासाहेबांवर आतांपर्यंत परमेश्वराची पूर्ण कृपा होती. त्यांनां लक्ष्मी जशी अनुकूल होती, तशीच लक्ष्मीबाईसारखी सुस्वभावी, आनंदी व प्रेमळ पत्नी मिळाल्यामुळें व एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन सद्गुणी अपत्येंहि त्यांनां ईश्वरानें दिल्यामुळें, त्यांच्यासारखा भाग्यवान् प्राणी शिवापुरांत आणखी कोणीहि नाहीं, अशी सर्वांची समजूत होती. आपल्या लोकांच्या दृष्टीनें ऐहिक सुख ह्मणजे संपत्ति व संतति यांत असतें. आणि हीं दोन्ही प्रकारचीं सुखें परमेश्वरानें त्यांनां दिलीं होतीं. अण्णासाहेबांचा व्यवहार ह्मटला ह्मणजे अगदीं चोख व व्यवस्थित असल्यामुळें त्यांच्या इस्टेटींत कोणत्याहि प्रकारची भानगड नव्हती. त्यांच्या दुकानाचा कारभार विश्वासू मुनिमांच्या हातीं असून त्यावर खुद्द अण्णासाहेबांची देखरेख असल्यामुळें, तो भरभराटींत होता. शिवाय अण्णासाहेबांची अशी कांहीं विचित्र व्यापारी दृष्टि असे कीं, कोणत्या व्यवहारांत कसा धोका लागण्याचा संभव आहे, हें ते चटकन् ओळखीत. व्यापारी दृष्टि होती, ह्मणून मारवाडी क्षुद्रपणा किंवा निष्ठुरता त्यांचे अंगीं मुळींच नव्हती, हें मागील हकीगतीवरून वाचकांनां ठाऊक आहेच. अण्णासाहेबांनां सुशिक्षणाचा लाभहि झाला होता. सुशिक्षितलोकांनां व्यवहार कळत नाहीं, असा आरोप केलेला वारंवार कानीं येतो. पण हा आरोप खरोखर निर्मूल आहे. त्यांनां व्यवहार कळत नाहीं असें नाहीं, तर ते व्यवहारांत लक्ष्य घालित नाहींत. घरचें काम खेरीज करून बाकीच्या उठाठेवींत त्यांचें तनमनधन गुंतलें असतें. कोणा वर्तमानपत्रांत अमक्या विषयासंबंधानें काय लिहिलें आहे, अमक्याअमक्या खटल्यांत कोण जिंकेल किंवा हरेल, तमकें बिल कायदेकौन्सिलापुढें आलें—त्याविरुद्ध चळवळ कशी करतां येईल, तमक्या साहेबानें सामाजिक सुधारणेच्या विरुद्ध भाषण केलें त्याला उत्तर विलायतेंतल्या मासिक पुस्तकांत द्यावें, कीं आपल्या देशांतल्या वर्तमानपत्रांत द्यावें, अमकी एक संस्था सुधारकांनीं काढली आहे तर ती हाणून पाडण्यास व तिच्याविषयीं गैरसमज पसरून देण्यास काय करावें, अशा सार्वजनिक हिताच्या किंवा अहिताच्या गोष्टींच्या चिंतनांत गुरफटून गेलेल्या

आमच्या सुशिक्षित मंडळीला व्यक्तिविषयक व्यवहार समजून घेण्यास फुरसतच मिळत नाहीं! जे अशा सार्वजनिक चळवळींत पडत नाहींत, त्यांनां ' रॉयल मरेज' लावण्यापेक्षां किंवा उंट चालवून प्यादें खाण्यापेक्षां आपापल्या घरचा कारभार पहाण्याचें काम कमी महत्वाचें वाटतें, त्याला त्यांनींतरी बिचाऱ्यांनीं काय करावें! ज्यांना ॲरिस्टॉटलच्या फिलॉसफीचा कीस काढतां येतो, किंवा गणितशास्त्रांतलीं गहन व कूट उदाहरणें सहज सोडवितां येतात, त्यांनां व्यवहारशास्त्रासारखें घडोघडीं अनुभवास येणारें शास्त्र समजूं नये, ही गोष्ट संभवनीयतरी आहे काय? असो. अण्णासाहेब जरी सुशिक्षित होते, तरी नसत्या सार्वजनिक उठाठेवींचा अवडंबर घालून किंवा कागदी हत्तीघोडे नाचवून घरच्या कामाकडे दुर्लक्ष करण्याचा अवगुण त्यांचे अंगीं नसल्यामुळें त्यांनां घरचा कारभार पहाण्यास पुष्कळ वेळ मिळे व त्यांत लक्ष्य घातल्यामुळें ते इतके व्यवहारनिपुण झाले होते कीं, सगळ्या पेठेंत त्यांच्याइतका चाणाक्ष व हुषार पण प्रामाणिक आणि प्रतिष्ठित सावकार कोणीहि नव्हता.

अण्णासाहेबांनां सर्व सुखें अनुकूळ होतीं, असें वर ह्मटलें आहे; पण या शब्दांत थोडीशी दुरुस्ती करणें अवश्य आहे. त्यांचा मुलगा नाना याला लहानपणींच जबर दुखापत होऊन तो नेहमीं आजारी असे, ह्मणून मागें सांगितलेंच आहे. अशाचा असा जरी तो रहाता, तरी त्याच्या आईबापांच्या मनाला पुष्कळ समाधान वाटतें; पण ईश्वरी इच्छा कांहीं निराळी होती! ज्या वेळीं शिवापुरांत सेशनकोर्टांत शिदूच्या चौकशीची गडबड चालली होती, त्याच वेळीं इकडे अण्णासाहेबांचा मुलगा नाना नवज्वरानें आजारी पडून ताप आल्यापासून आठवे दिवशीं, ह्मणजे शिदू सुटला त्याचे दुसरे दिवशीं, त्याला देवाज्ञा झाली! या एकुलत्याएक मुलाच्या मृत्यूनें अण्णासाहेबांच्या सुखांत माती कालवली! अण्णासाहेबांच्या स्वकष्टार्जित अथवा स्वकष्टवर्धित जंगी मिळकतीचा वारस एकाएकीं नाहींसा झाला! अण्णासाहेब व लक्ष्मीबाई यांच्या भावी सुखाशेचा आधारस्तंभ ढांसळून पडला!

मुलगी कुसुम ही नानापेक्षां वयानें लहान होती, तथापि बुद्धीनें तरतरीत, स्वभावानें गोड आणि शरीरानें निरोगी पण सुकुमार होती. ती दिसण्यांत एवढी सुंदर नव्हती, तरी सौंदर्यापेक्षांहि अधिक प्रिय, अधिक गोड, अधिक मोहक, असा एक गुण तिच्या अंगांत होता, आणि तो सौजन्य हा होय. तिची आई

कांहीं शिकलीसवरलेली नव्हती; पण शिक्षणाचें सार जें सौजन्य व कर्तव्यदक्षता तें तिच्या अंगांत पूर्ण भरलें होतें आणि तेंच आईच्या सहवासानें व शिकवणीनें कुसुमच्या अंगांत उतरलें होतें. तिची वाणी मधुर होती, आणि बोलण्या-चालण्याची धाटणीहि कोमल असल्यामुळें तिचें नांव कुसुम असें सार्थ ठेवण्यांत आलें होतें. यामुळें अण्णासाहेब व लक्ष्मीबाई यांची तिच्यावर पूर्वीपासूनच विशेष प्रीति जडली होती; आणि आतां नानाच्या मरणापासूनतर सर्व प्रेमाचें पात्र ती एकटी होऊन बसल्यामुळें अर्थात् सर्व इस्टेटीची भावी स्वामिनी तीच होईल, असा सर्वांचा अंदाज होता.

ह्या लोकांचा अंदाज चुकला होता असें मुळींच नाहीं. आपली स्वताची मुलगी टाकून दुसऱ्याच्या मुलाला दत्तक घेऊन त्याला आपल्या मागें सर्व इस्टेटीचा वारस करणें, ही कल्पना धर्मशास्त्राचे दृष्टीनें जरी सयुक्तिक असली, तरी प्रेमाच्या दृष्टीनें ती अण्णासाहेबांनां किंवा लक्ष्मीबाईला मान्य होण्यासारखी नव्हती. ह्मणून त्यांनीं एखादा दत्तक मुलगा घेऊन त्याला आपल्या इस्टेटीचा वारस न करतां आपल्या कुसुमलाच एकटीला वारस करण्याचें योजिलें. तिलाच चांगलें शिक्षण देऊन हुषार करावें, व एखादा गरीब कां होईना, पण सुशिक्षित, हुषार, आणि विशेषतः सद्वर्तनी व सुस्वभावी मुलगा पाहून त्याला घरजांवई करून ठेवावें, असा त्यांचा विचार होता; आणि हा विचार बऱ्याच रीतीनें आचारांतहि आला, हें पुढें दिसून येईलच. अण्णासाहेबांचें हें कृत्य किती अनुकरणीय आहे!

आमच्या इकडे पुष्कळ जाहागिरदार, सावकार, वगैरे पैसेवाल्या लोकांची अशी वेडी समजूत असते कीं, मुलें झालीं नाहींत किंवा होऊन वांचलीं नाहींत, ह्मणजे दुसरें लग्न करावें, आणि या नूतन विवाहित पत्नीपासून वंशविस्तार होईल अशी आशा करित रहावें! या समजुतीनें ते एकामागून एक लग्नें करित सुटतात! आणि इतकेंहि करून वंशविस्तार झाला नाहीं, ह्मणजे आपल्या भाऊबंदांतला एखादा अल्पवयस्क मुलगा मांडीवर घेऊन त्याच्या हवालीं सगळी जिंदगी करितात! या मुलाच्या शिक्षणाकडे त्या श्रीमंत आईबापांचें लक्ष्य तितपतच असतें. त्यामुळें अशा मुलाला बहुधा लहानपणींच वाईट संगति लागते. बाप जिवंत असतो, तोंपर्यंत हा मुलगा जेमतेम दम धरून रहातो; पण तो मरतांच वाईट नादीं लागून इस्टेटीची धूळधाण करितो, व आई बोला-वयास गेली असतां तिचा उपमर्द किंबहुना छळहि करावयास सोडित नाहीं! मग त्या आईला मुलगा दत्तक घेतल्याचा पश्चात्ताप होऊन ती ढळढळां रडं

लागते, किंवा दत्तविधान सशास्त्र झालें नव्हतें वगैरे कांहींतरी खुसपट काढून तें रद्द करविण्यासाठीं कोर्टाकडे धाव घेते. मुलगाहि आपली बाजू सांवरण्यासाठीं इस्टेटीमधून पुष्कळसे पैसे काढून वकील व बॅरिस्टर यांचीं घरें भरतो. याप्रमाणें कित्येक वर्षं तंटा चालून अखेर जहागीर कर्जाचे पायीं जप्त होण्याची पाळी येते. इतक्या पल्ल्याला गोष्ट आली ह्मणजे मग दत्तविधान सशास्त्र झालें होतें किंवा नाहीं याचा निर्णय होतो. परंतु हा निकाल या वेळीं होऊन उपयोग काय? जहागिर वगैरे इस्टेट आईच्याहि हातांत नसते व मुलाच्याहि हातांत नसते; तिसऱ्याच ठिकाणीं सावकार तिचा उपभोग घेत असतात! पुत्रापासून सुखाचा लाभ होईल, ही आईच्या मनांतली आशाहि पार वितळून जाऊन तिचें स्थान अत्यंत निष्ठुर अनुभवानें आणि पश्चात्तापानें घेतलें असतें. जुन्या जहागिरदार घराण्यापैकीं शेंकडा ८० ची ही स्थिति असते. दत्तक मुलाचा स्वभाव वगैरे कांहीं न पाहिल्याचा किंवा त्याच्या शिक्षणाविषयीं प्रथम काळजी घ्यावयास पाहिजे ती न घेतल्याचा हा असा भयंकर परिणाम होतो! अशीं उदाहरणें प्रत्यहीं डोळ्यांपुढें घडत असूनहि लोक अद्याप सावध होत नाहींत, हें केवढें आश्चर्य आहे!!

मुलगा दत्तक घेण्यांत बहुधा व्यावहारिक हेतू दोनच असतात. एक वंशाचा विस्तार व दुसरा आपल्या नांवाचें स्मारक करणें. वंशविस्तार व्हावा अशी इच्छा प्राचीन काळीं—जेव्हां देशाची लोकसंख्या फार कमी होती व राष्ट्रहितार्थ ती झपाट्यानें वाढविणें श्रेयस्कर होतें तेव्हां—साहजिक किंबहुना योग्यहि होती; पण आतां ती स्थिति राहिली नाहीं. सध्या आपले देशांत लोकसंख्या इतकी वाढली आहे कीं, आपले देशांतली बरीचशी मंडळी बाहेर वसाहती करण्यास गेली नाहीं, तर येथें सर्वांचीच उपासमार होण्याची पाळी यावयाची! अशा वेळीं वंशविस्तारापेक्षां वंशवृद्धीचा संकोच करण्याकडेच लोकांचें लक्ष्य लागावयास पाहिजे आहे. अर्थात् परमेश्वरानें दिलेल्या स्थितींत संतोष मानून न रहातां कृत्रिम उपायानें वंशविस्ताराची हांव धरणें, हा प्रकार निंद्य नसला तरी तो प्रशंसनीय खास ह्मणतां येणार नाहीं.

दुसरा हेतू आपल्या नांवाचें स्मारक करून ठेवणें हा होय. हाहि हेतू दत्तक पुत्राच्या द्वारें फारसा सिद्धीस जात नाहीं, हें सहज दाखवितां येईल. मुलानें आपल्या नांवापुढें बापाचें नांव लावण्यानें त्या बापाच्या नांवाचें स्मरण फार तर त्या मुलाच्या पिढीपुरतें मात्र रहातें, पुढें नाहीं; आणि यांतहि एक धोका असा असतो कीं, मुलगा सद्गुणी, कीर्तिमान् किंवा निदान

मध्यम प्रतीचा तरी असला, तर वरील हेतू थोड्याफार अंशानें सिद्धीस जातो. पण दत्तकपुत्र ह्मटले ह्मणजे शेंकडा ८० याच्या उलट प्रकारचे निघतात. निदान तसे निघण्याची फार भीति असते; आणि ते बापाच्या अदमासा-प्रमाणें चांगले न निघतां दुर्वर्तनी व कुलाला कलंक लावणारे निघाले, ह्मणजे बापाच्या नांवाचें स्मारक ते ज्या रीतीनें करून ठेवितात ती तऱ्हा स्पृहणीय आहे, असें प्रत्यक्ष त्या बापालाहि ह्मणतां यावयाचें नाहीं. यापेक्षां धनवान् गृहस्थांनीं लोकांच्या हितार्थ एखादें परोपकाराचें कृत्य करून किंवा एखादी संस्था स्थापून तिचा खर्च चालण्यासाठीं आपली सगळी जिंदगी लावून दिली, तर तें केवढें उत्कृष्ट स्मारक होईल ! ती संस्था एक पिढी, दोन पिढ्या किंवा दहा पिढ्या जोंपर्यंत टिकेल तोंपर्यंत तिच्या स्थापकाचें किंवा आश्रयदात्याचें नांव लोक भक्तिपूर्वक घेतील, आणि पुढेंहि देशाच्या धर्मकृत्यांच्या इतिहासांत त्यांचें नांव अजरामर होऊन राहील. अहल्याबाईचें नांव आज राहिलें आहे तें तिच्या पुत्रामुळें नव्हे, तर तिच्या परोपकारी धर्मकृत्यांमुळेंच ! ही गोष्ट आमच्यांतले धनिक लोक लक्ष्यांत घेऊन आपलें नांव दत्तकपुत्रांच्या द्वारें नव्हे, तर परोपकारी संस्थांच्या द्वारें चिरस्मरणीय करून ठेवतील, तर देशाचा भाग्योदय किती लवकर होईल ! ज्यांच्या जवळ धन नाहीं पण प्रेम आहे, अशा निपुत्रिक कुटुंबांनींहि दत्तक पुत्राला आपलें प्रेमपात्र न समजतां आपल्या प्रेमाचा झरा एखाद्या सत्कार्यीं लाविला, तर त्याच्या मोबदला त्यांना केवढा आनंद होईल ! ज्या 'रंजल्या गांजल्यां'च्या दुःखपरिहारार्थ त्यांनीं अविश्रांत श्रम केले असतील, ज्यांना त्यांनीं प्रेमानें कुरवाळलें असेल, ज्या अर्भकांची सेवाचाकरी करून त्यांना शिक्षणामृत पाजिलें असेल, तीं अर्भकें त्यांना किती दुवा देतील ! आपलें स्मारक आपल्या हातानें करून ठेवण्याचे हे मार्ग खुले असतां आमच्यांतील ज्ञानवंत माणसेंसुद्धां मतिभ्रंश पावून दत्तकपुत्र घेण्याच्या किंवा आपल्या मागें आपल्या स्त्रीच्या मांडीवर देण्याच्या मोहांत पडतात ! तस्मात् आमच्या देशाचें दुर्भाग्य अद्याप संपत आलें नाहीं, असेंच ह्मटलें पाहिजे, दुसरें काय !

## प्रकरण ५९ वें.

# राधाबाईची पुनः एकदा ओळख.

राधाबाईची भेट झाल्यास पुष्कळ दिवस झाले. तर वाचकहो, चला आपण आज तिकडेसच जाऊं.

त्या पहा राधाबाई घरांतलें सामान साफसूफ करून नीट व्यवस्थेनें मांडून ठेवित आहेत. पांचचार वर्षांपूर्वी त्या जशा होत्या तशाच आजहि आहेत, पण त्यांच्या स्थितींत मात्र महदंतर पडलें आहे. त्या वेळीं त्यांच्यावर दुःखाचा डोंगर कोसळला होता; घरांत अन्नवस्त्राची ददात होती; कमवितें माणूस घरांत कोणी नव्हतें; गोदूताई ज्याच्यात्याच्यापाशीं राधाबाईसंबंधानें तिरस्कारपूर्वक बोलत होत्या; पण आतांचा मत्र सगळा पालटलेला आहे. राधाबाईवर ईश्वराची कृपा झालेली आहे; त्यांना आतां कोणत्याहि गोष्टीची वाण नाहीं; नारायणराव आजारी पडल्यापासून त्यांच्याऐवजीं मुख्य मुनिमाचें काम गंगाधरच पाहूं लागला आहे; त्याला पगारहि पन्नास रुपये झाला आहे; गंगाधराचा धाकटा भाऊ कृष्णा, हा यंदा मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास होऊन त्याला जगन्नाथ शंकरशेट संस्कृत स्कॉलरशिप मिळूं लागल्यामुळें तो एल्फिन्स्टन कॉलेजांत प्रविष्ट झाला आहे; गंगाधरावर अण्णासाहेबांनीं दुकानाचा सगळा भार टाकिल्यामुळें त्यानें स्वतः परीक्षेस जाण्याचा नाद सोडून देऊन दुकानाच्या कारभाराकडेसच आपलें सगळें तनमन अर्पण केलें आहे; गंगाधराची प्रामाणिक आणि सरळ वागणूक यांमुळें अण्णासाहेबांची त्याचेवर मेहेरबानी बसली हें पाहून त्रिंबकरावांनां जरी विषाद वाटला, तरी एकंदरींत लोकांनां त्यापासून संतोषच वाटत आहे; गोदूताई आपल्याच तोऱ्यांत सदासर्वदा राहून राधाबाईला नेहमीं भिकारडी म्हणत असत, पण आतां 'जो चढे तो पडे' या म्हणीप्रमाणें त्यांचा चढेलपणा पार उतरून जाऊन त्यांचें तोंड केविलवाणें दिसूं लागलें आहे; दाजीचा खून आणि शिदूला लागलेला कलंक, या गोष्टींनीं त्यांचें अंतःकरण सदोदित होरपळत आहे; विशेषतः, ज्या राधाबाईला आपण तुच्छ मानित होतों तिच्या मुलांचा भाग्योदय व आपल्या मुलांची चोहोंकडे होत असलेली छीःथू पाहून त्यांचा मत्सराग्नि पेट घेत आहे; या मत्सराबद्दल गांवांतल्या तिऱ्हाईत बायाहि गोदूताईला तोंडावर नांवें देऊं लागल्या आहेत; असो.

राधाबाईला फिरून चांगले दिवस आले आहेत तथापि त्यांच्या राहणींत विशेषसा फरक पडला नाहीं. त्यांची आपली साधी राहणी पूर्वींपासून आहे तशी आहे. पुष्कळ बायांनां काय किंवा पुरुषांनां काय, पैसे मिळूं लागले ह्मणजे वाटतील तसे चोचले करावेसे वाटतात; स्वतः हातानें काम करण्यास लाज वाटूं लागते; त्यांचें परावलंबन वाढतें; त्यांच्या रहाण्यांत सरळपणा आणि साधेपणा रहात नाहीं, कृत्रिमपणा शिरतो ! राधाबाईला हें जसें पसंत नव्हतें, तसें कंजुषपणानें राहून पोटाला चिमटा देणें, किंवा लोकांनां नसतें दारिद्र्य दाखविणें, हेंहि पसंत नव्हतें. ‘ जें सदोदित चालेल तें करावें ’ हा त्यांचा मुख्य मंत्र असे. एक दिवस पंचपक्वान्नी जेवण आणि दुसरे दिवशीं शिवरात्र, किंवा आज भरजरी पोपाख आणि उद्यां दिवाणी तुरुंग अशा तऱ्हेनें न रहाण्याविषयीं त्या आपल्या मुलांनां नेहमीं उपदेश करित असत. ‘ जें सदोदित चालेल तें करावें ’ हें वाक्य एवढेंसेंच आहे, पण त्यांत किती अर्थ भरला आहे ! प्रपंचशास्त्रावरचे पंचवीस ग्रंथ वाचून जें ज्ञान होणार नाहीं, तें या एका वाक्याचा अर्थ मनांत पूर्णपणें बिंबला तर सहज होईल. ‘ जें सदोदित चालेल तें करावें ! ’ पण, आपण या तत्वावर चालतों काय ? असा प्रश्न प्रत्येकानें आपल्या मनाशीं केला, तर काय उत्तर येईल ? काय येणार ? ‘ नाहीं ’ हेंच, दुसरें काय ? आणि ह्मणूनच प्रपंचांत आपणांस पदोपदीं दुःख भोगावें लागतें. राधाबाईचा हा गुरुमंत्र प्रापंचिकांनीं घेतला व त्याप्रमाणें वागण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला, तर जगांतलें कितीतरी दुःख कमी होईल !

राधाबाईला हा मंत्र निष्ठुर अनुभवानेंच मिळाला होता, हें त्यांचें चरित्र बारकाईनें पहाणारास सहज कळणार आहे. गोविंदरावांचा स्वभाव अंमळ खर्चिक असे, आणि राधाबाईनां प्रपंचांत एकदम पडावें लागलें होतें. यामुळें बेतावेतानें खर्च करून शिल्लक टाकावी, हा विचार जरी त्यांच्या डोक्यांत कितीदा आला, तरी त्याप्रमाणें आचरण त्यांचे हातून फारसें झालें नाहीं. पुढें गोविंदरावांनां दुखणें होऊन त्यांतच त्यांचा अंत झाला, तेव्हां राधाबाईचे डोळे एकदम खाडकन् उघडले. राधाबाईच्या अंगावर काय किडुकमिडुक होतें तेवढेंच कायतें त्यांच्या निर्वाहाचें साधन होऊन राहिलें. गोविंदराव आयुष्याचा विमा उतरणार होते. तो उतरला गेला असता, तर आणखी दोन हजारांची रक्कम घरांत आली असती; पण तोहि उतरला गेला नाहीं. यामुळें

राधाबाईनां जे विपत्तीचे दिवस काढावे लागले, त्यांची आठवण त्या जन्मभर विसरल्या नाहींत. असा निष्ठुर अनुभव पुढें आपल्या मुलांनांतरी मिळूं नये, ह्मणून त्या काटकसरीनें रहाण्याविषयीं त्यांनां नेहमीं बजावित असत. आणि आपला अनुभव ' सदोदित चालेल तें करा ' या सूत्रांत त्यांनीं गोंविला होता.

राधाबाईला हात राखून खर्च करण्याला आणखी एक कारण होतें. आपल्या हिंदु समजुतीप्रमाणें घरांत कुंकूं लावण्याला एखादीतरी सुवासिनी असली पाहिजे; परंतु गंगाधरतात्याचें ( आतां गंगाधराला लोक तात्यासाहेब ह्मणूं लागले होते ) लग्न अद्याप व्हावयाचें होतें; आणि तें लग्न लवकर होऊन घरांत चालतीबोलती लक्ष्मी यावी, अशी त्यांची फार इच्छा होती. हळूहळू पैशाशीं पैसा जुळवून सुनेसाठीं पाटल्या, मंगळसूत्र वगैरे अवश्य लागणाऱ्या दागिन्यांची त्या तयारी करून ठेवित होत्या. कांहीं थोडीशी दागिन्यांची जुळवाजुळव झाली, ह्मणजे मग एखादी मुलगी पसंत करूं, असा त्यांचा विचार होता. आतां गंगाधरतात्याला पुष्कळ मुली सांगून येत, पण कांहींना कांहीं निमित्त करून यंदा आह्मांला कार्य कर्तव्य नाहीं, ह्मणून राधाबाई सांगत. मनांतला हेतु हा कीं, लग्नासाठीं लागणाऱ्या रकमेइतकी शिल्लक त्याच्या पगारांतून पडेल, तेव्हां कार्य उरकून घेऊं. लग्नकार्यासाठींसुद्धां कर्ज काढणें त्यांनां पसंत नव्हतें. त्या नेहमीं ह्मणत कीं, कर्ज काढणें ह्मणजे अवदशेचा पाय घरांत शिरकूं देणें आहे. आणि तें खरेंच आहे. कर्ज काढणें ह्मणजे थोड्याफार अंशानें स्वताचें स्वातंत्र्य घालवून दुसऱ्याची गुलामगिरी करण्यासारखें होतें. कर्जदाराला सावकाराच्या तोंडाकडे सरळपणानें पहाण्याची चोरी असते. सावकार केव्हां आपली अब्रू घेईल आणि केव्हां नाहीं, याचा नेम नसतो. कर्ज फिटण्याचे पूर्वींच आपण मेलों, तर आत्म्याला मुक्तिहि मिळावयाची नाहीं ! ही परलोकांतली गोष्ट सोडून दिली व ऐहिक व्यवहारांत पाहूं लागलों, तरी ' ऋणमुक्त तो भयमुक्त ' ही गोष्ट अगदीं खरी दिसते. ऋणमुक्तता ही संसारसुखाला लागणाऱ्या आवश्यक गोष्टींपैकीं पहिली आहे. घरांत मीठभाकर खावी, पण ती स्वताच्या कष्टाची खावी, कोणाचें देणें करून खाऊं नये, असा उपदेश राधाबाई आपल्या मुलांनां नेहमीं करित असत; आणि स्वतः तसें वागवून दाखवीत, हें त्यांत विशेष होतें. अशा बाबतींत नुसत्या कोरड्या उपदेशापेक्षां आचरणाची मातब्बरी जास्त असते. राधाबाईचें सगळें चरित्र मुलांपुढें आदर्शा-

सारखें होतें. मग त्यांच्या मनावर त्याचा परिणामहि तसाच झाला, यांत नवल काय ?

राधाबाईंच्यां स्वभावांतला आणखी एक विशेष सांगावयाचा राहिला. राधाबाईंनां मोठ्या लोकांच्या घरीं उगीच कामावांचून जाणें व त्यांच्या खुशामती करित बसणें बिलकुल आवडत नव्हतें. त्या आपल्या अगदीं जवळच्या नात्यांतल्या पण श्रीमंत घराण्यांतल्या माणसांशीं अगदीं तुटून वागत. गरीबांशीं मन मोकळें करून बोलत, एखादे वेळीं त्यांच्या घरीं जात, किंवा त्यांनां आपल्या घरीं बोलावीत; पण श्रीमंत आणि त्यांतूनहि गोदूताईसारख्या गर्विष्ठ बायकांनां तर आपण जसे रक्तपित्यांच्या संसर्गाला भिऊन त्यांनां टाळतों, तशा त्या टाळित असत. मोठ्यांच्या घरीं वारंवार जाण्यानें आपली किंमत कमी होते, आणि आपण कधीं त्यांचेजवळ कांहीं मागूं बिगूं अशी त्यांनां भीति वाटून मोठे लोक मन मोकळें करून आपल्याशीं वागत नाहींत. शिवाय, दुसऱ्यापुढें आपलें वैभव दाखविण्याची कित्येकांनां वाईट खोड असते; पण तें पाहून दुसऱ्याला काय वाटेल, त्याच्या मनाला स्वताविषयींचा कमीपणा खात राहील कीं काय, या गोष्टीचा ते विचार करित नाहींत, असें राधाबाई ह्मणत. राधाबाईंच्या ह्मणण्याला पूर्णपणें हरताळ लावणारे कांहीं थोडे अपवाद सांपडतात, नाहीं असें नाहीं; पण ते अपवादच ! सामान्य नियम ह्मणजे राधाबाई ह्मणत तोच होय, यांत शंका नाहीं. आणखी, राधाबाई ज्या बोलत, त्या श्रीमंतांच्या बायकांविषयीं–पुरुषांविषयीं नव्हे–हेंहि लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. आपल्या लोकांत विशेषतः श्रीमंतांच्या घरीं बायकांनां शिक्षण नसल्यामुळें त्यांचीं मनें संस्कृत झालेलीं नसतात; किंवा गरिबांच्या घरच्याप्रमाणें सगळा दिवसभर त्या प्रपंचाच्या कारभारांत निमग्न असतात असेंहि नाहीं. मग त्यांनीं आपला वेळ लोकांपुढें आपला दिमाख मिरविण्यांत, किंवा लोकांच्या घरच्या उलाढालींसंबंधानें गोष्टी ऐकण्यांत न घालवावा, तर करावेंतरी काय ? राधाबाईंच्या स्वभावाला हें आवडत नव्हतें. ह्मणून त्या सहसा कधीं कोणा मोठ्याच्या घरीं जात नसत. पुष्कळ वेळां हा त्यांचा स्वभाव विक्षिप्तपणासारखा दिसे; आणि कधींकधीं त्याला तसें स्वरूपहि येई. परंतु गुण ह्मणा, अवगुण ह्मणा, तुटकपणा हा त्यांचा स्वभाव होता खरा; आणि या त्यांच्या स्वभावामुळें स्त्रीसमाजांत त्यांचा कांहीं विशेष वचक बसलां होता, ही गोष्टहि कांहीं खोटी नाहीं.

परंतु कित्येक वेळां राधाबाईंनां आपला स्वभावहि बाजूला ठेवावा लागे. अण्णासाहेबांचा गंगाधरावर विशेष लोभ जडला होता हें मागें सांगितलेंच आहे. संकटाचे वेळीं ते राधाबाईंच्या फार उपयोगीं पडले होते; शिवाय अण्णासाहेबांच्या पत्नी लक्ष्मीबाई इतक्या साध्या असत कीं, आपण श्रीमंत आहों ही कल्पनाहि त्यांच्या डोक्याला क्वचितूच शिवत असे. त्यामुळें कधीं हळदकुंकवाला निघाल्या ह्मणजे, किंवा कधींकधीं एरवींहि, त्या राधाबाईंकडे घटकाघटका येऊन बसत आणि मन मोकळें करून बोलत. त्यामुळें राधाबाईंचें मत इतर श्रीमंत बायांविषयीं ज्याप्रकारचें होतें, तसें लक्ष्मीबाईबद्दल नव्हतें, तरीदेखील आपण लक्ष्मीबाईकडे वारंवार जाऊन घरोब्याप्रमाणें रहावें, असें राधाबाईस त्यांच्या तुटकपणाच्या स्वभावामुळें वाटेना. ह्मणून त्या क्वचित् एखादे प्रसंगीं त्यांच्या समाचारास जात. लक्ष्मीबाईवर नुक्ताच मोठा घोर दुःखप्रसंग गुजरला होता. त्यामुळें राधाबाईंनां अण्णासाहेबांच्या घरीं जाणें प्राप्तच झालें होतें. त्याप्रमाणें त्या एकदा जाऊन आल्या. गंगाधराला मात्र रोज त्यांच्या समाचाराला गेल्यावांचून चैन पडत नव्हतें.

प्रकरण ६० वें.

## लोकमताचा बाऊ व पुढाऱ्यांचें कर्तव्य.

आपल्याला कोर्टांत साक्ष देण्यास जावें लागलें याबद्दल सोनीला वाईट वाटत होतेंच; पण घरीं परत येतांना नारायणरावांची तब्यत एकाएकीं बिघडल्यामुळेंतर तिच्या अंतःकरणाला धक्का बसून तिची बिचारीची जी स्थिति झाली, तिचें वर्णन कोणाच्यानें करवेल ! त्या दिवसापासून तिची सगळीच वृत्ति पालटली. तिला कोणत्याहि गोष्टींत मौज वाटेनाशी झाली. शिदू सुटल्याची बातमी तिला दुसरे दिवशीं कळली. पण त्या बातमीनें तिच्या अंतःकरणांत आनंदाचा एकहि तरंग उठला नाहीं ! ती रात्रंदिवस दुर्मुखलेली आपल्या बापाच्या बिछान्याजवळ बसून राही, आणि त्याची सेवा करण्यांतच आपलें सगळें सुख, आपलें सगळें इतिकर्तव्य मानून वेळच्या वेळीं औषधपाणी करी, आणि त्यांच्या करमणुकीसाठीं एखादे वेळ कांहीं वाचित बसे. त्यांच्या करमणुकीसाठीं ह्मणण्याचें कारण ती नुसती अक्षरें वाचित असे इतकेंच. वाचलेल्या मजकुराकडे सोनीचें लक्ष्य नसे. लोक आपणास काय काय नांवें ठेवित असतील, आपली आतां बायकांत किती कुचेष्टा होईल, आपल्या नांवाचा असा एकदा बोभाट झाल्यावर आपलें लग्न होण्यास किती अडचणी येतील, व आपण बाबांना केवढी काळजी उपस्थित करून ठेवूं, वगैरे विचारांनीं तिचें मन व्याकुळ झाल्यावर तिला वाचणें कसें गोड लागेल ?

मनुष्यावर या संसारांत दुःखाचे नानाविध प्रसंग येत असतात. त्या प्रत्येक प्रसंगीं त्याच्या मनाची स्थिति अशी व्याकुळ होत गेली, आणि नेहमीं ती तशीच राहिली, तर निभाव लागणें कठीण आहे. यासाठीं दयाळू परमेश्वरानें एक अपूर्व योजना करून ठेविली आहे. तिच्यामुळें दुःखाचा आवेग हळूहळू कमी होत जाऊन मनुष्याचें मन इतर गोष्टींत रमूं लागतें. ईश्वरानें काळाच्या अंगीं अशीच कांहीं अद्भुत शक्ति ठेविली आहे कीं, तिच्या योगानें दुःखाची तीव्रता कालगतीबरोबर कमी होत जाते. हा काळाचा अलौकिक प्रभावच या वेळीं दुःखाचा भार सहन करण्याची तिला शक्ति देण्यास कारण झाला. शिदूच्या चौकशीला जसजसे ज़ास्त दिवस लोटत गेले, आणि लोकांचीं क्षुब्ध मनें शांत होऊन ते त्याच्याविषयींच्या गोष्टी विसरत चालले, तसतशी सोनीच्या दुःखाला ओहोटी लागली. इकडे नारायणरावहि दुखण्यांतून उठून आपल्या पायांनीं घरांतल्या घरांत हिंडूं फिरूं लागले व सोनीनें आपल्या दुखण्यांत अत्यंत

प्रेमपूर्वक आस्थेनें आपली शुश्रूषा केली हें पाहून तिचे सगळे अपराध पोटांत घालून तिच्याकडे स्नेहार्द्रदृष्टीनें पाहूं लागले, तेव्हांतर तिला आपल्या व्यथित अंतःकरणावर अमृताची वृष्टि होत आहे कीं काय, असें वाटून अत्यंत समाधान झालें.

एके दिवशीं ती एकटीच आपल्या बापाच्या अंथरुणापाशीं बसली होती. नारायणराव पडल्यापडल्या सोनीकडे टक लावून पहात होते. प्रथम कांहीं वेळ ही गोष्ट तिच्या ध्यानांत आली नाहीं; पण जेव्हां आली तेव्हां तिला अमळ भीति वाटली. झाल्या गोष्टीबद्दल आपणांस कांहीं विचारणारतर नाहींतना ? असा विचार मनांत येतांच ती लज्जित होऊन खालीं मान घालून दुसरीकडे पाहूं लागली. तिचे डोळेहि पाण्यानें भरून आले आणि रडें बाहेर फुटण्याच्या अगदीं बेताला आलें. इतक्यांत नारायणरावांनीं तिच्या पाठीवर हळूच हात टाकून प्रेमानें म्हटलें "सोने !"

बंदुकीच्या दारूच्या खजिन्यावर ज्याप्रमाणें एखादी ठिणगी पडावी, तसें नारायणरावांच्या या एका शब्दानें कार्य केलें. नारायणरावांनीं नुसती सोनीला हांक मारली, पण त्या एका शब्दानें तिच्या अंतःकरणांत सांचलेल्या गहिंवराचा बांध फोडून त्याला वाट करून दिली. त्याबरोबर सोनीला आपल्या दुःखाचा आवेग सहन न होऊन ती बापाच्या गळ्याला मिठी मारून मोठ्यानें रडूं लागली आणि म्हणाली "बाबा, मी खरं सांगत्यें. माझा कांहीं अपराध नाहीं. याउपर मला लोक उगीच नांवं ठेवतील तर भले ठेवोत, पण तुम्हीतरी उगीचच्या उगीच आपल्या मुलीवर रागावूं नका. तुम्ही रागावल्यावर मला कोण पोटाशीं धरणार आहे ?"

सोनीचे ते अंतःकरणास द्रव आणणारे शब्द व विशेषतः तिची त्या वेळची दयाजनक अनाथता दर्शविणारी आणि दुःखी मुद्रा पाहून पाषाणहृदयी बापाचें सुद्धां हृदय द्रवलें असतें; मग नारायणरावांसारख्या—मुलीला सर्वदा जीव कीं प्राण करणाऱ्या—बापाला काय वाटलें असेल, तें शब्दांनीं सांगण्याचा प्रयत्न व्यर्थ आहे. वाचकांनीं त्याची कल्पना केली पाहिजे. ते म्हणाले "तुझ्या या कारभारामुळेंच मला हें दुखणें आलें. तथापि परमेश्वरसत्ता असली, तर यांतूनहि मी उठेन. मी आहें तोंपर्यंत तुला जवळ ये, बस, असेंतरी म्हणणारा आहे. जग काय वाटेल तें तुला म्हणो, पण तूं जर खरोखर अगदीं निरपराधी असशील, तर हा नारायणराव तुला किमपि अंतर देणार नाहीं."

या भाषणानें सोनीला बराच धीर आला, आणि ती ह्मणाली "बाबा बाबा, तुमच्या गळ्याशपथ सांगत्यें, तो शिदू आपल्याइथं घटकाघटका दोनदोन घटका बसत असे, ही गोष्ट खरी आहे. पण लोकांनीं नांव ठेवण्यासारखं कांहीं आमच्या वर्तनांत कधीं घडलं नाहीं."

"नसलें ह्मणजे झालें. आपल्या मनानें खात्री दिली ह्मणजे पुरे. मग लोक काय वाटेल तें ह्मणोत. त्याची मी फिकीर करित नाहीं."

एवढें ह्मणून ते थोडेसे थांबले. लोकांनीं एवढ्याशा पराचा कावळा केला, ही गोष्ट खरी असेल काय? आणि त्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवून आपण प्रत्यक्ष आपल्या मुलीवर—आईविरहित अशा अनाथ अपरिपक्क बुद्धीच्या मुलीवर—रागावण्यांत अन्यायतर करित नसूं ना? असे प्रश्न ते आतां आपल्या मनाशीं करित होतेसें दिसलें. ते आणखी पुढें कांहीं विचारणार होते. त्या प्रश्नाचीं सरळ उत्तरें देऊन आपल्या बापाची—आपल्या जिव्हाळ्याच्या माणसाची—सहानुभूति मिळविण्यास सोनी किती उत्कंठित दिसली! पण इतक्यांत एक विघ्न आलें. गंगाधरतात्या तितक्यांत दाराशीं आलेले पाहून नारायणरावांनीं आपलें बोलणें थांबविलें. सोनीहि तेवढ्यांतल्या तेवढ्यांत पदरानें डोळे पुसून आणि मुद्दाम चर्या बदलून उठून घरांत गेली. गंगाधराचे देखत तिला तेथें बसावयाला हरकत होती असें नाहीं. पण आपलें काळें तोंड घेऊन दुसऱ्याच्या पुढें जाण्यास ती लाजत असे.

जगाची रीततरी किती विलक्षण आहे! जे लोक उघडपणें अनीतीनें वागून समाजांत भ्रष्टपणा माजवितात व निर्लज्जपणानें पुनः धार्मिकपणाचा आव घालतात त्यांच्याविरुद्ध समाज कधीं चकार शब्द काढित नाहीं. बोकेसंन्यासी, गळ्यांत तुळशीच्या माळा घालणारे व गोपीचंदनाचा टिळा लावून बाह्यात्कारीं साधुत्वाचें ढोंग करून आंतून नीचाहून नीचपणाचीं कामें करणारे दांभिक संत, आणि व्यवहारांत दुसऱ्याचे गळे कापून रोज नेमानें गीतेचा पाठ करणारे वेदांती, यांची खरी योग्यता ठाऊक असूनहि समाज त्यांनां मान देतो, त्यांच्या पायां पडून तीर्थ घेतो, आणि त्यांच्या भजनीं लागतो! त्या समाजाला सोनीसारख्या अज्ञान पण पवित्र आचरणाच्या मुलीला नांवें ठेवण्याला आणि तिच्या अविचाराच्या पण निर्दोष अशा वर्तनाबद्दल नानाप्रकारच्या अचकटविचकट कंड्या पिकविण्याला, वास्तविक काय अधिकार आहे? पण तो अधिकार समाज बळेंच आपल्याकडे घेत असतो. अशा वेळीं त्या समाजाला योग्य वळण लावण्यास

उत्तम पुढारी पाहिजे. पण हिंदुस्थानांत समाजाला पुढारीच नाहींत, अशी स्थिति झाली आहे! जे स्वयंसिद्ध पुढारी बनूं पहात आहेत, त्यांच्या अंगीं पुढारीपणाला अवश्य लागणारे गुणांचा पूर्ण अभाव दिसतो. बी ए., एम्. ए., झाल्यानें किंवा एखादें वर्तमानपत्र हातीं आल्यानें, किंबहुना कायदेकौन्सिलांत लोकनियुक्त सभासद झाल्यानेंहि पुढारीपणाच्या' मानास मनुष्य पात्र होतो, असें नाहीं. जो सामान्य जनांपेक्षां विचारानें व आचरणांत अधिक गंभीर व उदात्त असून अंतःकरणानें निष्कपट असेल, जो लोकप्रीतीची अपेक्षा न धरतां सत्यप्रीति व समाजहित यांकडे दृष्टि ठेवून आपल्या व लोकांच्या आचार-विचारांला योग्य दिशा लावण्यास समर्थ असेल, थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे जो आपण खालच्या पायरीवर येऊन सामान्यलोकांशीं समानरूप होण्यांत अभिमान न बाळगतां सामान्य लोकांनां वरच्या पायरीवर चढवून आपल्या-सारखे उन्नत बनविण्यांत अभिमान बाळगील, तोच लोकांचा खरा पुढारी होण्यास लायक होय. या दृष्टीनें पहातां पुढारीपण सत्पात्रीं अर्पण झालें आहे, असे भाग्यवान् समाज किती विरळा दिसतील!

गंगाधरतात्या व नारायणराव यांचें संभाषण बरेच वेळपर्यंत चाललें होतें. त्यांत निघतांनिघतां सोनीबद्दलची गोष्ट निघाली, तेव्हां नारायणराव ह्मणाले "सोनीचा अपराध या बाबतींत खरोखर किती आहे, तें यापूर्वी मला कळतें, तर माझें दुखणें इतकें वाढतेंहि ना. पण कायरे गंगाधर, तिच्याविषयीं लोक काय बोलतात?"

गंगाधर ह्मणाला "लोक ह्मणजे कोण? पुण्याच्या भांग्या मारुतीजवळ बसतात तसले? कीं खरोखर विचार करून मत देणारे? दुसऱ्या प्रतीच्या लोकांच्या शब्दाला जर तुमचेजवळ कांहीं किंमत असेल, तर ते कांहीं सोनीला इतकें वाईट समजत नाहींत. गटारयंत्रें काय वाटेल तें ह्मणोत, पण आमच्या आईसारख्या समजुतदार बायातरी असें ह्मणत आहेत कीं, सोनुताईविषयीं लोकांचे विचार अत्यंत अतिशयोक्तीचे आणि अनुदार आहेत. वास्तविक पाहूं गेलें असतां तिच्याकडे मोठासा दोष नाहीं. तिनें पोरासोरांत आतां उठाबसावयाचे दिवस नाहींत ही गोष्ट खरी; पण ती अर्ध्यारात्र बोलत बसली, तेवढ्यावरून भलभलत्या कंड्या पिकविणें यासारखा नीचपणा कोणता नाहीं!"

"पण अण्णासाहेबांचें व लक्ष्मीकाकूंचें काय मत झालें आहे?" नारायण-रावांनीं विचारिलें.

गंगाधर ह्मणाला "थोड्या दिवसांपूर्वी त्यासंबंधानें एकदा त्यांच्या घरीं गोष्ट निघाली होती. तेव्हां सोनीलाच सगळे दोष देत होते. परंतु त्यानंतर तिच्या वर्तनांत पडलेला फरक पाहून आणि तुह्मांला आज खुद्द तिच्याचकडून कळलेली माहिती ऐकून त्यांचेंहि मत आमच्या आईच्यासारखें होईल, अशी मला खात्री आहे. मला आतां तिकडेच जावयाचें आहे, तेव्हां बोलतांबोलतां हा विषय मी काढीनच. मग काय तें सगळें कळेल."

गंगाधराचें हें बोलणें नारायणराव इतकें लक्ष्यपूर्वक ऐकून घेत होते कीं, त्यावरून अण्णासाहेबांच्या व लक्ष्मीकाकूंच्या मताला ते इतरांहून कांहीं विशेष मानित असावेसें दिसलें. त्यांनीं गंगाधराला खरी हकीगत त्यांच्या कानांवर घालण्याविषयीं वारंवार आग्रह करून प्रेमपूर्वक निरोप दिला.

प्रकरण ६१ वें.

## आमच्या होतकरू तरुणांनीं पुढें काय करावें?

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें गंगाधर अण्णासाहेबांकडे गेला, पण ज्या विषयासंबंधानें तेथें बोलणें निघेल असें त्याला वाटलें होतें, तो विषय मुळींच न निघतां दुसऱ्याच-पेढीवगैरेबदलच्या गोष्टी-निघाल्या. वर्षअखेर असल्यामुळें आपल्या पेढीचे हिशोब तपासण्यांत इतके दिवस गुंतलेले अण्णासाहेब आतां तें काम आटोपून नुकतेच मोकळे झाले होते. हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू करण्याविषयींच्या सरकारच्या विचारावर वर्तमानपत्रांतून जी चर्चा चालली होती ती कितपत यथार्थ आहे, तें अण्णासाहेब गंगाधराला समजावून देण्याचा प्रयत्न करित होते. इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, फ्रान्स वगैरेसारख्या श्रीमंत आणि व्यापार व कारखाने यांच्या भरभराटीच्या देशांतलें अर्थशास्त्र निराळें आणि हिंदुस्थानासारख्या निर्धन आणि कृषिकर्मावर जीवन धारण करून राहिलेल्या देशाचें अर्थशास्त्र निराळें. पहिल्याचे नियम दुसऱ्यास लावून पाहिले असतां दुसऱ्याची हानिच होणार हें निर्विवाद आहे. या सिद्धान्ताच्या स्पष्टीकरणार्थ न्या० मू० रानडे यांच्या अर्थशास्त्रविषयक लेखांतून कांहीं उतारे वाचून दाखवून अण्णासाहेब तो विषय गंगाधराच्या अगदीं गळीं उतरवित होते. इतक्यांत तारहपीसाच्या शिपायानें गंगाधरतात्याच्या नांवची तार आणलेली पहातांच गंगाधर एकदम चकित झाला. त्याचा धाकटा भाऊ कृष्णा याची पी. ई. ची परीक्षा पास होऊन तो पहिल्या वर्गांत पहिला आला व त्याला स्कॉलरशिप मिळाली, हें आनंदाचें वर्तमान वाचतांच गंगाधराच्या चेहेऱ्यावर त्या आनंदाचें प्रतिबिंब लागलीच उमटलें. अण्णासाहेबांनांहि ही बातमी ऐकून फार आनंद झाला, आणि त्या आनंदाच्या भरांत आपल्या संभाषणाच्या विषयाचें त्यांनां विस्मरण होऊन ते पुढें कृष्णाच्या भावी उमेदी व त्या सफळ होण्याचे मार्ग, यासंबंधानें बोलूं लागले. कृष्णा पुढें काय करणार ह्मणून अण्णासाहेबांनीं गंगाधराला विचारिलें, आणि त्यानेंहि त्या प्रश्नाचा रोख पुरतेपणीं लक्ष्यांत न घेतां बी. ए. एम्. ए. पर्यंत शिकणार, एवढें मोघम उत्तर दिलें; परंतु अण्णासाहेबांचें या उत्तरानें समाधान झालें नाहीं. बी. ए. किंवा एम्. ए. होणें, ह्मणजे कोणतातरी धंदा शिकण्यास मन व बुद्धि तयार होईल, अशी तिची मशागत करणें एवढेंच कायतें. बी. ए., एम्. ए., होणें ह्मणजे कांहीं धंदा किंवा जीवनक्रमाची दिशा नव्हे, असें अण्णासाहेबांचें साधारणपणें मत होतें. जसें शेत नांगरणें

निराळें आणि बीं पेरणें निराळें, पण पहिलें काम दुसऱ्याचें पूर्वगामी असलें पाहिजे, त्याशिवाय कृषिकर्मांत यशःप्राप्ति व्हावयाची नाहीं, त्याचप्रमाणें बी. ए., एम्. ए., होणें व जीवनमार्गाची कांहींएक विवक्षित दिशा धरणें, या गोष्टीचा पूर्वापरसंबंध आहे, ही गोष्ट अण्णासाहेबांनां अनुभवानें पूर्णपणें कळली होती. ह्मणून कृष्णाच्या मनांत पुढें कोणता धंदा करावयाचा आहे, असें विचारण्याचा त्यांचा उद्देश होता; परंतु आपल्या देशांतल्या शेंकडा ९९ विद्यार्थ्यांस पुढें आपण कोणता धंदा करणार तें सांगतां येत नसतें, किंवा त्यांनीं तें ठरविलेलें नसतें; तीच गोष्ट कृष्णाची होती. बी. ए., एम्. ए. व्हावयाचें एवढें काय तें ठरलें होतें. पण अशा रीतीनें मन सुसंस्कृत केल्यावर त्या क्षेत्रांत कोणत्या धंद्याचें बीजारोपण करावयाचें, या गोष्टीचा विचार त्यानें केला नव्हता, किंवा गंगाधरानेंहि तो केला नव्हता. कदाचित् द्रव्याच्या अडचणींमुळें बी. ए., एम्. ए. तरी होऊं किंवा नाहीं, याचीसुद्धां त्यांनां शंका वाटत असेल! पण जोंपर्यंत राधाबाईसारखी शहाणी, धीराची आणि चाणाक्ष अशी आई त्यांनां सुदैवानें लाभली होती, तोंपर्यंततरी त्यांनां घाबरण्याचें कांहीं कारण नव्हतें. राधाबाईनीं अजून अगदीं काटकसरीनें खर्च करून संसार चालविला होता तो एवढ्याचसाठीं कीं, पुढें मुलांच्या विद्याभ्यासाच्या कामीं द्रव्याची अडचण येऊं नये. आपल्या समाजांत अशा विचारी व दूरदृष्टि आया किती सांपडतील बरें?

कृष्णा पुढें कोणता उद्योग करणार या प्रश्नावर गंगाधर गोंधळला, असें पाहून अण्णासाहेब समजले कीं, या गोष्टीचा विचारच त्यानें कधीं केला नाहीं. ह्मणून प्रथम त्यांनीं धंद्याची निवड आगाऊ करून ठेवून त्या धोरणानें शिक्षण देण्यापासून कसा फायदा होतो, याविषयींचीं थोडींशीं उदाहरणें देऊन मग धंद्याची निवड करतांना आपल्या मनाची प्रवृत्ति, आपली शारीरिक व मानसिक शक्ति, पैसे व अब्रू मिळविण्याचा संभव आणि देशाची सांपत्तिक स्थिति, वगैरे गोष्टींचा यथार्थ विचार कसकसा करावा लागतो, तें सविस्तर समजावून सांगितलें व त्याबरोबरच आपल्या देशांत सध्या यांत्रिक कारखान्यांच्या उद्योगांत पडणाऱ्या सुशिक्षितांची जी वाण आहे ती कृष्णासारख्या होतकरू मुलानें भरून काढावयाला पाहिजे, असेंहि सुचविलें.

त्यावर गंगाधर ह्मणाला "पण आपण ह्मणतां त्याप्रमाणें यांत्रिककला शिकण्यास जीं साधनें पाहिजेत, तीं आपल्या देशांत कुठें आहेत? आपले देशांत अशा प्रकारची एकच शाळा मुंबईस आहे, आणि त्या शाळेंतल्या विद्यार्थ्यांच्या

तोंडून तेथील शिक्षणाविषयींची जी हकीगत ऐकतों, ती विशेषसी समाधानकारक नाहीं. शिवाय त्या शाळेंतून पास होणाऱ्या इंजिनियरांवर परीक्षकांची इतकी करडी नजर असते ह्मणून ऐकतों कीं, ते ह्या शाळेंतल्या हुषार मुलांनांसुद्धां मुद्दाम नापास करतात; त्यांतहि ब्राह्मणांवरतर कटाक्ष फार! अशी स्थिति असल्यावर यांत्रिककलेकडे आमचे विद्यार्थी वळले नाहींत, याचें मोठेंसें आश्चर्य वाटावयास नको."

अण्णासाहेब ह्मणाले "तूं ह्मणतोस तें सगळें खरें आहे. मुंबईच्या शाळे-विषयींचा आणि विशेषतः परीक्षकांविषयींचा बोभाटा माझ्याहि कानीं आला आहे. पण कृष्णानें त्या शाळेंत जावें, असा माझा मुळींच आग्रह नाहीं. यांत्रिककलेचें शिक्षण घ्यावयाचेंच असलें, तर तें हिंदुस्थानांत घेऊन उपयोगी नाहीं व विलायतेंतहि उपयोगी नाहीं. कारण, विलायतेंतले कारखानदार हिंदुस्थानच्या लोकांनां आपल्या कारखान्यांची गुरुकिल्ली देण्यांत कुचराई करतात; इतकेंच नाहीं, तर कित्येक कारखानदारतर आपला कारखाना हिंदुस्थानच्या लोकांनां पाहूंसुद्धां देत नाहींत, इतके ते मतलबी आणि कोत्या मनाचे लोक आहेत. यासाठीं यांत्रिकशिक्षण पाहिजे असेल, तर त्यासाठीं जपानसारख्या देशांतच गेलें पाहिजे. ते लोक आपल्यासारखे पौर्वात्य असल्यामुळें आणि इतके दिवस आपल्यासारखेच सुधारणेंत मागसलेले होते यामुळें, त्यांनां आपल्या लोकांनां हातीं धरून उन्नतीच्या मार्गाला लावण्यांत एक प्रकारचा अभिमान वाटतो; आणि हिंदुस्थानाविषयीं जपानी लोकांची पूर्ण सहानुभूति असल्यानें हिंदुस्थानच्या विद्यार्थ्यांस जपानी लोक फार आस्थेनें शिकवितात, असें ऐकण्यांत आलें आहे. यासाठीं मलातर वाटतें कीं, कृष्णानें जावयाचेंच झालें, तर जपानांत जाऊन धातुसंशोधनाचा उद्योग शिकावा. यावर तुझें काय ह्मणणें आहे?"

गंगाधर लहानपणापासूनच नोकरींत शिरल्यामुळें त्याचें वाचन तितक्याचपुरतें होतें. यामुळें जपानानें गेल्या तीस वर्षांत कशी झपाट्यानें सुधारणा करून प्रमुख राष्ट्रांच्या मालिकेंत अग्रस्थान पटकाविलें आहे, तें त्याला ठाऊक नव्हतें. त्याची समजूत सामान्य लोकांच्या समजुतीसारखी होती. जी काय सुधारणा व जें कांहीं ज्ञान आहे तें सगळें विलायतेंत आहे, आणि आपण पौर्वात्यलोक थंड झालेल्या ज्वालामुखीप्रमाणें आपली सगळी संपत्ति, शक्ति आणि कर्तृत्व, मागें एका काळीं जोरानें बाहेर फेंकून देऊन आतां स्वस्थ हरिहरि ह्मणत बसलों आहों! ह्मणून अण्णासाहेबांनीं जपानचें नांव काढतांच गंगाधरानें त्या गोष्टीला मनांतून नाक

मुरडलें व तो ह्मणाला "जपानी लोक सुस्वभावाचे खरे, पण उपयोग काय! त्यांनां स्वतालाच यांत्रिकज्ञान बेताचें असलें, तर ते आपल्याला त्यांतून कितीसें देणार?"

ह्या प्रश्न ऐकून अण्णासाहेबांनां त्याच्या अज्ञानाविषयींची कींव आली. ते ह्मणाले " गंगाधर, तुझें वाचन आज बरेच वर्षांत सुटलें आहे असें दिसतें. एरवीं तूं अशी भलती शंका घेतास ना. अरे! ज्या राष्ट्रानें अवघ्या तीस वर्षांत युरोपियन सुधारणेचीं अनुकरणीय अशीं बहुतेक अंगें आपल्या समाजांत प्रविष्ट केलीं, ज्या राष्ट्रानें उद्योग, व्यापार, यंत्रज्ञान, कलावृद्धि वगैरे विषयांत अगदीं खालच्या पायरीपासून झपाट्यानें चढतचढत फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड वगैरे देशाशीं स्पर्धा करण्याइतकी मजल आणून पोंचविली, ज्या राष्ट्रानें आरमार बांधण्यासारख्या प्रचंड उद्योगाला सुरुवात करून त्यांतहि वर नंबर पटकाविला, आणि नकाशांत टीचभर दिसणाऱ्या ज्या राष्ट्रानें आपल्याहून पंचवीस पटीनें मोठ्या अशा चीन, रशिया, जर्मनी आणि ब्रिटिश या राष्ट्रांतसुद्धां असा दरारा बसविला कीं, त्या राष्ट्रांनां याच्याशीं सख्यत्व असावें असें वाटूं लागलें, त्या जपानच्या राष्ट्राची किंमत केवढी समजली पाहिजे! जपान ह्मणजे उद्योगाचा मूर्तिमंत पुतळा आहे. आणि व्यापारांत काय, किंवा दुसऱ्या कोणत्याहि व्यवसायांत काय, उद्योग हा कल्पवृक्ष आहे. तो संपादन केल्यावर राष्ट्राचा उत्कर्ष होण्यास अवकाश लागत नाहीं. हा उद्योगाचा महिमा जपानांत जसा पहाण्यास आणि मनावर बिंबविण्यास मिळतो, तसा अन्यत्र नाहीं. जपानी लोक पराकाष्टेचे उद्योगी आहेत, पराकाष्ठेचे महत्वाकांक्षी आहेत. हिंदुस्थानानें आज जपानचें उदाहरणच डोळ्यांपुढें टेविलें पाहिजे—"

अण्णासाहेब या वेळीं जपानासंबंधीं हरएक प्रकारची माहिती देण्याच्या रंगांत इतके गढले होते कीं, त्यांनां आपण किती बोलत बसलों, याविषयींचें भानच राहिलें नाहीं. त्यांनां आज शेताची पहाणी करण्यासाठीं जावयाचें होतें; परंतु बोलण्याच्या नादांत तें काम ते अगदीं विसरून गेले. इतक्यांत मामलेदारसाहेबहि त्यांनां भेटण्यासाठीं आले आहेत अशी वर्दी पोहोंचतांच त्यांनीं गंगाधराला रजा दिली आणि आपण बाहेर येऊन मामलेदारसाहेबांनां मोठ्या अगत्यानें आंत नेलें. त्यांचें व मामलेदारसाहेबांचें काय संभाषण झालें त्याच्याशीं आपणांस कांहीं कर्तव्य नसल्यामुळें आपण त्यांनां येथेंच सोडून थोडा वेळ सोनीकडे जाऊं या.

## प्रकरण ६२ वें.
## हिंमतबहादर मंडळी.

मागील एका प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें सोनीविषयीं सामान्य लोकांची भलतीच समजूत होऊन शिवापूरच्या स्त्रीसमाजांत त्या गोष्टीला इतकें विचित्र स्वरूप प्राप्त झालें कीं, कांहीं पुसूं नये ! चामुंडादेवीच्या मंदिरांत पुराणाचे वेळीं, नदीच्या घांटावर व घरोघर शेजारणींनां परस्परांशीं बोलण्याचा जेव्हांजेव्हां प्रसंग येई, तेव्हांतेव्हां सोनीच्या वर्तनाबद्दल व एकंदर शिकलेल्या स्त्रियांच्या वागणुकीसंबंधानें कुत्सितपणाची टीका व उपहासात्मक संभाषण झाल्याशिवाय कधीं रहावयाचें नाहीं, असा क्रम कित्येक आठवडे चालला होता. सोनीचें वय कांहीं फार नव्हतें. तिला बारावें वर्ष चाललें होतें. इतक्या वयाच्या अविवाहित मुली अगदीं जुन्या मताच्या घराण्यांतूनसुद्धां आढळतात; पण इंग्रजी शिकलेले लोक आपल्या मुलींनां घोडनवऱ्या करून ठेवतात ह्मणून त्यांनांमात्र तेवढें नांव ठेवण्यास जुने लोक कधीं चुकावयाचे नाहींत ! इंग्रजी शिकलेले लोक ख्रिस्त्यांच्या हातचा चहा पितात किंवा बिस्कुटें खातात, अथवा सोडावाटर पितात, त्यांनां ‘ अब्रह्मण्य ’ ह्मणून अपंक्त करूं पहाणाऱ्या धर्माभिमानी लोकांत यवनी वेश्यांच्या हातचें खाणारे, त्यांची लाळ घोटणारे आणि चोरूनमारून शाक्तपंथाची दीक्षा घेणारे थोडे असतात काय ? पण मनुष्यस्वभावच असा कांहीं विचित्र आहे कीं, त्याला लोकांच्या डोळ्यांतलें कुसळ दिसतें पण स्वताच्या डोळ्यांतलें मोठें थोरलें मुसळ दिसत नाहीं ! यामुळें, ज्या घराण्यांत मुलींचे विवाह प्लेग वगैरे कारणांमुळें, किंवा हुंडा जास्त येईल या लालचीनें, एखाद्या श्रीमंत बिजवरासाठीं मुली राखून ठेवल्यामुळें, रजोदर्शनानंतरसुद्धां उरकून घेण्यांत आले, त्याच घराण्यांतल्या कुटाळ स्त्रीपुरुषांनीं बिचाऱ्या सोनीला बारा वर्षांची होईपर्यंत अविवाहित राहिल्याबद्दल आणि तेंहि नारायणरावांच्या दारिद्र्यामुळें निरुपायास्तव राहिल्याबद्दल नांवें ठेवावीं, हें किती विचित्र आहे ! विचित्र कसलें ? असे प्रकार दुनियेंत रोज शेंकडों घडतात, आणि ह्मणूनच तिला ‘ दुनिया ’ ह्मणावयाचें !

सोनी जसजशी वयानें वाढत चालली तसतशी नारायणरावांची तिच्या विवाहाविषयींची काळजी बळावत गेली. अलीकडे वायूचा झटका आल्यापासून आफिसांत काम करण्याची शक्ति त्यांचे अंगांत राहिली नसल्यामुळें अण्णासाहेबांनीं त्यांनां वीस रुपये पेनशन देऊन घरीं बसविलें होतें. त्यामुळें मोठा हुंडा देण्यासाठीं कर्ज काढण्याची ऐपत त्यांनां राहिली नव्हती. इकडे ही स्थिति आणि तिकडे लोकाप-

वादाचा प्रचंड ओघ, अशा संकटमय अवस्थेंत ते सांपडले होते. त्यामुळें नारायणरावांची कोण दुर्दशा झाली होती! लोकापवादाला तोंड देऊन मुलीला अविवाहित ठेवण्याचा निश्चय कायम राखण्यास लागणाऱ्या धैर्याचा अभाव हें या संकटाच्या मुळाशीं होतें, हें सांगावयास नकोच. या धैर्याच्या अभावाबद्दल नारायणरावांनां दोष देण्यांत अर्थ नाहीं. याहून पुष्कळच सौम्य अशा प्रसंगींसुद्धां आपल्याच्यानें नीतिधैर्य धरवलें नाहीं, असा स्वताचा अनुभव आपल्यापैकीं पुष्कळांनां असेल.

नारायणरावांनां सोनीच्या लग्नाविषयींची लागून राहिलेली फिकीर ईश्वराच्या कृपेनें लवकरच दूर झाली. शिवापुरांत सामाजिक सुधारणेविषयीं आस्था बाळगणाऱ्या तरुणांचा एक लहानसा वर्ग होता. लोकमताच्या प्रवाहाबरोबर वाहवत न जातां त्या विषयासंबंधानें योग्य विचार करणारे व त्या विचारानुरूप वर्तन ठेवण्याविषयीं प्रतिज्ञाबद्ध होऊन रहाणारे थोडेसे तरुण शिवापुरांत होते. या मंडळींत सारे आठच लोक होते; पण ते आठहि जण मोठे धीराचे, विचारी आणि एक जुटीनें रहाणारे असल्यामुळें त्यांनीं हातीं धरलेलें सुधारणेचें काम खात्रीनें सिद्धीस जावयाचें, असा बहुतेक नियम असे. यामुळें या मंडळीला लोकांनीं 'The Band of Hope!' असें इंग्रजींत आणि 'हिंमतबहादर' असें मराठींत नांव दिलें होतें. शिवापुरच्या समाजांत कोठें कांहीं चळवळ झाली ह्मणजे तिच्यांत खरें तथ्य काय आहे तें शोधून सत्यपक्षाचा कैवार घ्यावयाचा व लोकमताला न जुमानतां विवेकवाणीला अनुसरावयाचें, हा या मंडळीचा बाणा असे. सोनीच्यासंबंधांत जेव्हां शिवापुरच्या समाजांत एकदम चळवळ उडून गेली, आणि तिचा बिचारीचा कांहींएक अपराध नसतां लोकांनीं व्यर्थ तिचा छळ मांडिला व तिच्याबद्दलचे लोकापवाद पसरून तिच्या विवाहाविषयींची अगोदरच कमी असलेली उमेद अगदीं समूळ नाहींशी करून नारायणरावांच्या मागें हृद्रोग लावून दिला, तेव्हां या हिंमतबहादर मंडळीनें पूर्ण शोधाअंतीं सोनीचा निरपराधीपणा पाहून नारायणरावांनां काळजींतून मुक्त करण्याचें ठरविलें. या मंडळींत विनायकराव नगरकर या नांवाचे एक तरुण वकील होते. वय पंचविशीच्या आंत असेल. शरीरानें चांगले मजबूत असून निर्व्यसनी होते. ते अद्याप अविवाहित होते. हिंमतबहादर मंडळींतले सगळेच सभासद अविवाहित आणि निर्व्यसनी होते, हें येथें सांगणें इष्ट दिसतें. हुंडा घेण्याच्या प्रकाराचे अगदीं विरुद्ध विनायकराव हे होते. हे घरचे श्रीमंत होते, किंवा वकिलींत त्यांनां बरीचशी प्राप्ति होती, त्यामुळें ते हुंड्याचा निषेध

करित होते, असें मुळींच नाहीं. हुंडा घेणें हा क्रयविक्रयाचा एक प्रकार आहे आणि तो निंद्य आहे, अशा तत्त्वावर ते त्या आचाराच्या विरुद्ध असत. श्रीमंतीचें आणि या प्रचाराचें वांकडें आहे असें मुळींच नाहीं. उलट श्रीमंत आणि सुखवस्तु लोकांतच हा निंद्य क्रयविक्रयाचा प्रकार भूषण ह्मणून मानला जातो! श्रीमंतानें आपल्या मुलाबद्दल जितका जास्त हुंडा मागावा, तितकी त्याची श्रीमंती जास्त समजली जाते, असा मुळीं आपल्या समाजांत प्रकार आहे. तेव्हां हुंडा न घेतां मुलगी करणें ह्मणजे आपली दैन्यावस्था कबूल करणें होय! विनायकरावांनीं या निंद्य लोकाचाराचा निषेध करण्यासाठीं सोनीला आपण होऊन मागणी घालण्याचें ठरविलें, आणि आपल्या स्नेह्यांच्या मार्फत नारायणरावांच्या कानांवर ती गोष्ट घालून त्यांच्या उत्तराची मार्गप्रतीक्षा करित बसले. नारायणराव आपली मागणी कबूल करतील किंवा नाहीं, याविषयीं त्यांनां थोडीशी शंका होती. कारण, विनायकरावांचें ह्मणणें असें होतें कीं, नारायणरावांला ही मागणी कबूल असल्यास वाङ्निश्चय तेवढा आतां करून ठेवावा, आणि खरा विवाहसमारंभ सोनीच्या वयाचें सोळावें वर्ष पुरें होईपर्यंत लांबणीवर टाकावा. सोनीची जिकडेतिकडे विनाकारण छिःथू: होत होती, अशा वेळीं तिला मागणी घातल्याचें ऐकून नारायणरावांच्या जिवाला संतोष वाटला, तितकाच विवाह-समारंभ लांबणीवर टाकण्याची त्याला जोडून असलेली शर्त पाहून त्यांच्या आशेचा विरस झाला. नारायणरावांच्या मनांत सगळाच विवाह आतां उरकून घ्यावा, असें होतें. ते प्रौढविवाहाला प्रतिकूल होते किंवा विनायकराव पुढें प्रतिज्ञाभंग करून तोंडघशीं पाडतील असें भय त्यांनां वाटत होतें, असेंहि नाहीं. पण नुकत्याच झालेल्या वायूच्या झटक्याप्रमाणें दुसरा एखादा झटका येऊन आपले डोळे मिटण्यापूर्वीं सोनीला योग्य ठिकाणीं पडलेली पहावी, ह्मणजे मागें कोणत्याहि गोष्टींत जीव गुंतून रहाणार नाहीं, असें त्यांचें ह्मणणें होतें; आणि तें अगदीं योग्यहि होतें. विनायकरावांलाहि या सयुक्तिक गोष्टीपुढें कांहीं बोलतां येईना. सोनीच्या कल्याणासाटीं जर तिचा आपण कैवार घेऊन लोकनिंदेला न जुमानतां तिचा स्वीकार करण्यास तयार झालों आहों, तर तिच्या आणि तिच्या बापाच्या समाधानासाटीं एवढी गोष्ट करण्यास कांहीं हरकत नाहीं, असा विचार करून विनायकरावांनीं आतांच विवाह उरकून घेण्यास आपली संमति दिली. तरीहि त्यांनीं एक अट अशी घातली कीं, विवाह होतांच तिला पुण्याच्या फीमेल हाय-स्कुलाच्या बोर्डिंगांत पाठविण्याच्या आपल्या निश्चयाच्या आड मात्र नारायण-

रावांनीं येऊं नये. नारायणरावांनांहि ही अट कबूल होऊन लग्ननिश्चय झाला आणि ठरलेल्या सुमुहूर्तावर सोनीच्या व विनायकरावांच्या डोक्यावर 'शुभमंगल सावधान' म्हणून अक्षता पडल्या. त्या अक्षतांबरोबर नारायणरावांचाहि जीव खालीं पडून त्यांनां आपल्या डोक्यावरचें एक मोठें थोरलें ओझें उतरल्यासारखें वाटलें.

सोनीचें लग्न झाल्यावर तिची रवानगी पुण्यास झाली. ती तेथें फीमेल हायस्कुलांत चार वर्षें राहिली. तेवढ्या वेळांत तिला तेथें जें शिक्षण मिळालें, त्याच्या योगानें तिचा स्वभाव अगदीं पालटला. ती आतां अगदीं साधेपणानें व नम्रतेनें रहाण्यास शिकली. तिला मराठी, इंग्रजी व संस्कृत या तिन्ही भाषांतले ग्रंथ वाचतां येऊन ती आतां उच्च विचारांच्या समागमांत आनंद मानूं लागली. विनायकरावांच्या संगतींत तिचा पुढील आयुष्यक्रम फार सुखानें गेला. तिला सुखानें नांदतांना पहाण्यास नारायणराव मात्र तिच्या दुर्दैवानें उरले नाहींत ! जानकीबाई आतां तिच्याचजवळ रहात आहे; आणि तिच्या लहानपणच्या शिकवणीची किंमत सोनीला आतां कळूं लागून ती आतां आपल्या मावशीला अगदीं आईप्रमाणें समजून तिच्या आज्ञेंत रहात आहे.

## प्रकरण ६३ वें.

# अकल्पित योग !

मागें सांगितल्याप्रमाणें गंगाधराशीं झालेल्या संभाषणांत अण्णासाहेबांनीं जपानाविषयीं जी माहिती सांगितली, ती ऐकून कृष्णाला जपानांत पाठविण्याची ऐपत आपल्याला असती तर किती बरें झालें असतें, असें गंगाधराला वाटूं लागलें. गंगाधरानें त्या संभाषणाचा बराचसा भाग घरीं कृष्णाला व राधाबाईला सांगितला व तो त्यांनीं लक्ष्यपूर्वक ऐकिला होता. त्यावरून कृष्णाच्या मनांत तिकडे जाण्याची उत्कंठा उत्पन्न झाली होती; परंतु ती तृप्त होण्याचें साधन दिसेना, ह्मणून तो स्तब्ध बसला. पुनः एके दिवशीं अशाच गोष्टी निघतांनिघतां अण्णासाहेबांनीं कृष्णाला आपल्या खर्चानें जपानाला पाठविण्याचा विचार कळविला आणि या विचारास राधाबाईची अनुकूलता मिळेल किंवा नाहीं ह्मणून गंगाधराला विचारलें. तें ऐकतांच गंगाधराचा आनंद त्रिभुवनांत मावेनासा झाला. विद्येसाठीं मुलाला देशांतराला पाठविण्यास आईकडून हरकत येणार नाहीं, अशी नव्याण्णव हिश्शांनीं गंगाधराची खात्री होती; तथापि आपल्यापासून कधीं दूर न झालेल्या मुलाला एकदम इतकें दूर एकट्याला पाठवावयाचें, ह्मणून कदाचित् आई नाहीं ह्मणेल कीं काय, अशी शंका त्याचें मन घेऊं लागलें. तो ह्मणाला "बहुधा मिळेल असें वाटतें; तथापि खात्री देतां येत नाहीं. मी तिला विचारून तसें कळवीन."

अण्णासाहेबांनां दुसऱ्याहि एका महत्त्वाच्या बाबतींत राधाबाईचा विचार घ्यावयाचा होता. अण्णासाहेबांचा एकुलता एक मुलगा नाना वारल्यापासून त्यांच्या प्रेमाचें आश्रयस्थान कुसुम ही एकटीच होऊन बसली होती. ती सुस्थळीं पडावी व सुखानें नांदूं लागलेली आपल्यास पहाण्यास मिळावें, अशी तिच्या आईची ह्मणजे लक्ष्मीकाकूंची फार इच्छा होती. मुलीच्या अंगावर पुष्कळसे डागदागिने घालण्याजोगें ऐपतदार सासर मिळालें ह्मणजे मुलीला सर्व सुखाचा सांठा मिळाला अशी कित्येक आईबापांची—विशेषतः आयांची—समजूत असतें. नवऱ्या मुलाचा विद्याभ्यास, त्याच्या अंगची हुशारी, त्याची शरीरप्रकृति किंवा आचरण यांकडे, तसेंच मुलींनां सासरीं वागविणारीं वडील माणसें कोणत्या तऱ्हेचीं आहेत, तीं मुलीला पोटच्या पोरीप्रमाणें ममतेनें वागवितील किंवा सासुरवास करतील, इत्यादि गोष्टींच्या विचाराकडे त्यांची दृष्टि जावी तितकी जात नाहीं. श्रीमंतांनांसुद्धां आपल्या मुलींच्या गळ्यांत सोन्याचा वरवंटा

बांधणारें सासुरवाड मिळावें, अशी इच्छा असते. ते एखाद्या निरक्षर, व्यसनी, दुराचरणी पण धनकनकसंपन्न लक्ष्मीपुत्राला आपली मुलगी देऊन तिच्या साऱ्या जन्माचें वाटोळें करण्यास तयार होतील; पण होतकरू, हुशार, कुलीन, सद्वर्तनी अशा एखाद्या गरीब मुलास आपली मुलगी देऊन तिला जन्माची सुखी करण्याचें त्यांच्या मनांत यावयाचें नाहीं! सुदैवानें सुशिक्षित श्रीमंतांच्या डोक्यांतून अशा वेडगळ कल्पना हळुहळू निघत जाऊन मुलींच्या कल्याणाचा खरा मार्ग त्यांनां दिसूं लागला आहे व ते गरीब पण घरंदाज मुलाला आपली मुलगी देऊन आपणास वाटल्यास तिच्याबरोबर आपल्या संपत्तीचा कांहीं अंशहि देऊन तिचा संसार थाटण्याच्या स्तुत्य क्रमाचें अवलंबन करूं लागले आहेत. कुसुमच्या लग्नासंबंधानें असेंच कांहीं करण्याचा अण्णासाहेबांचा विचार पूर्वीपासून होता; आणि त्यांनीं गंगाधराला आपला भावी जांवई ह्मणून आज कित्येक दिवसांपासून योजून ठेविलें होतें. ती योजना आतां राधाबाईला कळवून त्यांचा विचार घेण्याचा काळ येऊन ठेपला होता. ह्मणून अण्णासाहेबांनीं नारायणरावांच्या मार्फत गंगाधराच्या लग्नाचा व कृष्णाला जपानांत पाठविण्याचा, असे दोन्ही विचार राधाबाईंनां कळविले व त्यांची कांहीं हरकत असल्यास ती समजून घेण्यासाठीं आपल्या कुटुंबालाहि मुद्दाम पाठविलें. हा अकल्पित घडलेला प्रकार पाहून राधाबाईंनां जितका हर्ष वाटला, त्याहूनहि अधिक विस्मय वाटून काय उत्तर द्यावें ह्मणून त्या गोंधळांत पडल्या. त्या मुळीं कांहीं बोलत नाहींत असें पाहून लक्ष्मीकाकू विनयानें ह्मणाल्या "तुह्मी कांहींसुद्धां हरकती मनांत आणूं नका. आमच्या कुसुमला एकदाच्या पदरांत घेण्यास कबूल व्हा, ह्मणजे पैसा अडक्या-संबंधानं किंवा घरांत तयारी करण्यास लागणाऱ्या माणसांविषयींची तुह्मांला बिलकूल काळजी करावी लागणार नाहीं. कुसुमला आजपर्यंत आह्मीं जितक्या प्रेमानं वाढविली, तितक्याच प्रेमानं पुढं वागविणारी तुमच्यासारखी सासू मिळाल्यावर ती केवढी धन्य होईल! आज तीन वर्षांपासून गंगाधरताल्याला जांवई ह्मणून तिकडून निवडून काढणं झालं आहे. मी कुसुमच्या लग्नाचं नांव काढलं ह्मणजे ह्मणायचं कीं 'तूं अगदीं काळजी करूं नकोस. तिच्यासाठीं छानदार नवरा पाहून ठेवला आहे!' तो कोण, कुठला, तें आतांपर्यंत मला सांगितलं नव्हतं. कारण, इतके दिवस कुसुमच्या लग्नाची एवढी घाई करण्याचं कारण नव्हतं. पण ( डोळ्यांतून अश्रु गाळून ) परवां आमच्यावर तो प्रसंग आल्यापासून 'कुसुमचा संसार थाटलेला पहाणं आणि तिला सुखांत पाहून सुख

मानणं एवढं राहिलं आहे' असं नेहमीं ह्मणायचं. ह्मणून ह्मणत्यें कीं, कुसुमली एकदाची पदरांत घेण्याचं कबूल करून आह्मांला सुखी करण्याचं आतां सर्वथा तुमच्या हातांत आहे. आणखी, हें कार्य उरकल्यावर मग कृष्णाला शिकण्यासाठीं जपानाला पाठवायचं, असाहि तिकडे विचार ठरला आहे. तोहि तुमचे कानांवर आला असेलच. इतक्या दूर तुह्मी आपल्या मुलाला कशा धाडाल? ह्मणून मीं अगोदरच हरकत घेतली. तर ह्मणायचं कीं 'राधाकाकू कांहीं दुसऱ्या अवांतर बायांसारख्या वेडेपणा करून मुलाची जन्माची हानि करणाऱ्या नाहींत."

यावर राधाबाईच्यानें खरोखर मनापासून कांहींच हरकत घेतां येईना. अण्णासाहेबांनीं राधाबाईविषयीं काढलेले स्तुतिपर उद्गार जितके खरे होते, तितकीच कुसुम राधाबाईची सून व्हावी अशी त्यांची मनापासून इच्छा होती; आणि गंगाधराचें कुसुमशीं लग्न व कृष्णाला जपानाला पाठविणें या दोन्ही गोष्टी निखालस आपल्या मुलांच्या कल्याणाच्या आहेत, हें समजण्याइतका शहाणपणा राधाबाईंत होता. तेव्हां राधाबाई हरकततरी कोणती घेणार? तथापि त्यांनीं एकदा ह्मणून पाहिलं कीं "आह्मी गरीब आहों, आमच्या घरांत चांदीसोन्याचा विटाळहि नाहीं, हें तुह्मी पहातच आहां. तुह्मांला परमेश्वरानं सर्व तऱ्हेनं अनुकूळता दिली आहे, तर कुसुमला एखादं आपल्या तोलाचं मोठं ठिकाण पाहून तिथं न देतां आह्मां गरिबांच्या इथं देण्यासारखं आमच्यापाशीं काय आहे?"

त्यावर लक्ष्मीकाकू ह्मणाल्या "श्रीमंतांच्या इथं नाहीं तें तुमच्या इथं आहे, ह्मणूनतर कुसुम तुमच्याच घरीं पडावी असं वाटतं. श्रीमंतांच्या घरीं पैसा असतो, पण खरी माया कांहीं पैशानं येत नाहीं. दुसरं, श्रीमंतांचीं मुलं बहुधा द्वाड, छांदिष्ट, विद्याहीन आणि वाईट नादीं लागलेलीं असतात. अशा घरीं देण्यापासून कुसुमला काय सुख लागणार आहे? तुमच्या घरचं वळण, मुलांचा स्वभाव व विद्या, आणि तुमच्यासारखी मायाळू सासू मिळाल्यावर मुलीला मीठभाकरीहि पक्वान्नांसारखी गोड लागेल. ही तुमची श्रीमंती 'श्रीमंत लोकांनीं खरोखर हेवा करण्यासारखी आणि चोरांनां लुटून न नेतां येणारी आहे,' असं तिकडे नेहमीं ह्मणायचं! अन् तें माझ्याहि मनाला अगदीं पटतं."

यावर काय उत्तर द्यावें तें राधाबाईला कळेना. त्या ह्मणाल्या "अण्णासाहेबांच्या व तुमच्या आशीर्वादानं गंगाधराला हे दिवस दिसत आहेत. आह्मी सर्व तुमचीं जन्माचीं ऋणी आहों. त्यांत आजच्या या दोन गोष्टी करण्याचं मनांत आणून तुह्मी भर घालूं इच्छित आहां. आपल्या इच्छेच्या विरुद्ध जाण्याची

आमच्यांत शक्ति नाहीं व तसं करणं आमचा धर्महि नाहीं. अण्णासाहेबांची आज्ञा आह्मांला शिरसावंद्य आहे. याहून अधिक काय सांगावं व आपली मनांतली कृतज्ञता कोणत्या शब्दांनीं बोलून दाखवावी, तें मला कळत नाहीं."

राधाबाईचा हा रुकार पडतांच लक्ष्मीबाईला अत्यानंद झाला. नंतर इकडच्या तिकडच्या थोड्याशा गोष्टी झाल्यावर लक्ष्मीबाई कुंकू लावून निरोप घेऊन चालत्या झाल्या.

लग्नाचे मुहूर्त जवळच होते. त्यांपैकीं एका सुमुहूर्तावर गंगाधर आणि कुसुम यांचें लग्न लागलें. अण्णासाहेब गंगाधरासारख्या गरीब मुलाला आपली मुलगी देतील, असा कोणाचा अंदाज नव्हता. कोणातरी गर्भश्रीमंत जहागिरदार, इनामदार, जमीनदार वगैरे दारांच्या घरीं अण्णासाहेबांची मुलगी पडून संपत्तीकडे संपत्ति आकर्षिली जाईल, असें सर्वांना वाटलें होतें; परंतु तसें कांहींएक न घडतां अण्णासाहेबांनीं गंगाधरालाच पसंत केल्याचें पाहून पुष्कळांना आश्चर्य, बऱ्याच जणांना हेवा, आणि फार थोड्यांना कौतुक वाटलें! या लग्नांत त्रिंबकराव व गोदूताई पानसुपारीला किंवा हळदीकुंकवालासुद्धां आल्या नाहींत! त्यांना कृतकर्माचा पुरापुरा पश्चात्ताप होऊन गंगाधराला व एकंदर लोकांना तोंड दाखविण्याची शरम वाटूं लागली होती. अण्णासाहेबांनीं दोन्हींकडचा खर्च व सालंकृत कन्यादान केलें व मुलीच्या नांवानें अर्धी इस्टेट करून दिली. हा विवाहसमारंभ सामान्य प्रतीचा—विशेषसा थाटमाट न करतां—उरकण्यांत आला व थाटमाटासारख्या गोष्टींत जी रक्कम खर्ची पडली असती ती वेगळी काढून तिच्यांतून संस्कृत पाठशाळेंतल्या मुलांना स्कालरशिपा व मधुकऱ्यांसाठीं एक लहानसें उन्हाळ्यापुरतें अन्नछत्र उघडण्यांत आलें.

गंगाधराचा विवाह झाल्यावर लवकरच कृष्णाची जपानाला जाण्याची तयारी झाली, हें सांगावयास नकोच.

### प्रकरण ६४ वें.

## गूढ उकललें !

आतां इकडे त्रिंबकरावांच्या मुलांची काय हकीगत आहे ती आपण पाहूं. वडील मुलगा बाबासाहेब हा वारंवार कर्जबाजारी होऊन बसे आणि समन्स निघालें ह्मणजे तोंडचुकवाचुकवी करी. शेवटीं एकदा दिवाणी तुरुंगाची हवा त्यानें पाहिलीच! वामन हा अगदीं लहान होता, तथापि मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात अशी ह्मण आहे, त्या ह्मणीप्रमाणें आतां लहान वयांतच त्यानें शाळा सोडून देऊन उनाडपणा पतकरला होता; यावरून पुढें त्याचें काय होणार, याचा साधारण अंदाज कोणालाहि करतां येईल. रहातां राहिला शिदू. यानेंतर शिवापुरांत चांगलेंच नांव गाजविलें होतें. खुनाच्या आरोपांतून जरी तो सुटला, तरी लोकांत तोंड दाखवावयाला त्याला शरम वाटूं लागली. रस्त्यांतल्या पोरांनां आणि बायांनां कोर्टांचे निवाडे काय होत? त्यांनीं शिदू रस्त्यानें जाऊं लागला ह्मणजे "हा पहा आपल्या भावाचा गळा कापणारा," असें स्पष्ट ह्मणावें, आणि त्याची छीः थूः करावी. शिदू निगरगट्ट स्वभावाचा होता, तरी रात्रंदिवस अशा तऱ्हेनें जो तो त्याची संभावना करूं लागल्यामुळें तो अगदीं त्रासून गेला होता. तशांत, आतां त्रिंबकरावांनीं त्याला साफ सांगितलें कीं, घरांत होतें नव्हतें तें तुझ्या बचावाचे पायीं वकिलांनां दिलें. आतां तुह्मांला खाऊं घालण्यास मजजवळ कांहीं उरलें नाहीं, यासाठीं आतां तूं आपली पोटापाण्याची सोय पाहून वेगळा रहा! डांबिस ह्मणून ठरलेल्याला सरकारी किंवा खासगी नोकरीतरी कोण देणार? शिदू नोकरी शोधतांशोधतां आणि मोठ्यांचे उंबरठे झिजवितांझिजवितां अगदीं कंटाळून गेला. एके दिवशीं त्याला वर्तमानपत्रांत सहज एक जाहिरात दिसली. दक्षिणआफ्रिकेंत जर्मन वसाहतींत रेलवेच्या कामावर कांहीं लोक पाहिजेत असा त्या जाहिरातीचा मतलब होता. त्या रेलवेकंपनीचा एक एजंट मुंबईस आला होता, त्याच्याशीं पत्रव्यवहार करून एक तीस रुपयांची जागा शिदूनें मिळविली, आणि कोणाला न कळवितां एके दिवशीं मुकाट्यानें आपले दोनचार कपडे व एकदोन भांडीं एवढें घेऊन स्वारीनें प्रयाण केलें. शिदू गेल्याबद्दल प्रथम गांवांत थोडासा गवगवा झाला, आणि थोड्याशा कंड्याहि पिकल्या. पण पुढें लवकरच लोक त्याला विसरले. त्रिंबकरावांनीं मुलगा कोठें गेला याविषयीं विशेषशी चौकशी केली नाहीं. वर्ष दीड वर्षानें आफ्रिकेंतून त्रिंबकरावांच्या नांवचें एक पत्र आलें. त्यांत पुढील मजकूर होताः—

" वडिलांचे चरणीं बालकें शिदू यांचे शिरसाष्टांग नमस्कार.मी एकाएकीं कोणाला न कळवितां न विचारतां निघून आलों, ह्मणून वडिलांनां फार दुःख झालें असेल; परंतु या जगांत जसें पेरावें तसें उगवतें, हा नियम आहे. माझी स्वदेशीं चोहोंकडे छी थूः होऊन अखेर पोटाकरितां मला इतकें लांब यावें लागलें व हमाली करून कसेतरी आठचार आणे पोटाला मिळवावे लागत आहेत, याबद्दलचा सगळा दोष लहानपणीं आमचे केलेले लाड, आमच्या डोक्यांत मोठेपणाविषयींच्या भरविलेल्या विचित्र कल्पना, आणि निरुद्योगी राहून मौजा मारण्याची लागलेली चटक, यांचेकडे आहे. त्याच वेळेस आह्मांला चांगलें वळण मिळालें असतें, तर गंगाधरासारखे आह्मी नांवालौकिकाला चढलों नसतों काय? पण दुर्दैव आमचें, कीं आह्मांला या स्थितीला आणून पोंचविणारीं आईबापें मिळालीं! मी आतां परदेशांत राहूं लागल्यापासून स्वताची खरी किंमत ओळखूं लागलों आहें, आणि उद्योगाच्या आणि नेकीच्या बळावर मनुष्याला काय करतां येईल, तें मला येथें लोकांचीं उदाहरणें पाहून कळूं लागलें आहे. जों जों मी या गोष्टीचा अधिकाधिक विचार करितों, तों तों आह्मांला लहानपणीं मिळालेल्या शिक्षणाविषयीं अधिक खेद वाटून तसलें वळण लावणारे आपले आईबाप नव्हेत, तर मागच्या जन्मीचे वैरी आहेत असें वाटूं लागतें. धन्य त्या राधाबाईची! तिचीं लेंकरें किती भाग्यवान् ह्मटलीं पाहिजेत! तिच्यासारखी आई आह्मांला मिळाली नाहीं, ह्मणून आतां कितीहि शोक केला, तरी काय होणार आहे? आमच्या नशिबीं आतां ही हमाली लागली ती थोडीच सुटणार आहे! भावाचा खून करणारा खरोखर मीच! माझी मान तुह्मीं फांसांतून सोडविली ती असली हमाली करावयास, आणि कृतकर्माबद्दल पश्चात्तापानें जळून खाक होण्यासाठींच काय? माझ्याकरितां त्या सोनीला विचारीला किती छळवाद सोसावा लागला असेल! तिच्या भोळ्या स्वभावाचा फायदा घेऊन म्यां दुष्टानें तिला व्यर्थ लोकनिंदेच्या जाळ्यांत फसविलें! आणखी माझ्या हातून जीं कित्येक घोर पातकें घडलीं आहेत, त्यांचें वर्णन करणें येथें काय उपयोग? माझ्या मनाला तितक्या टोंचण्या सदोदित बोंचत आहेत. कृतकर्माबद्दल अशा रीतीनें रात्रंदिवस शिक्षा भोगित मी राहिलों आहें! आतां जन्मभूमीचें दर्शन मला पुनः कधीं होईल असें वाटत नाहीं. झालें तरी माझ्या सर्वस्वी नाशाला कारण झालेल्या मातापितरांचें पुनः दर्शन घेण्यास माझे डोळे इच्छित नाहींत. आतां परमेश्वराजवळ माझी एकच प्रार्थना आहे कीं, परमेश्वरा! तूं दुसरी हवी ती शिक्षा आह्मांला दे, पण असले आईबाप पुनः देऊं नकोस!

आपला अभागी पुत्र **शिदू.**"

या पत्रांतील प्रत्येक अक्षर त्रिंबकरावांच्या आणि गोदूताईच्या दुःखित अंतःकरणावर डागण्या देत होतें. त्रिंबकरावांच्यानें तें सबंध वाचवेना, इतकें त्यांचें हृदय दुःखावेगानें आणि पश्चात्तापानें भरून आलें. राधाबाईचीं मुलें अत्यंत गरीबींत आणि संकटांत दिवस काढित होतीं त्यांनीं भाग्य काढावें, आणि आपल्या मुलांनां लहानपणापासून थाटानें रहाण्याची व सुख भोगण्याची संवय झाली असून अखेर त्यांच्या दैवीं अशा प्रकारची विपत्ति यावी, हें गोदूताईला मोठें गूढ पडलें होतें; आज शिदूच्या पत्रानें तें गूढ उकललें. मुलें चांगलीं किंवा वाईट निघणें, हें आईबापांच्या सांपत्तिक स्थितीवर एवढें अवलंबून नसून त्यांच्या शिक्षणावर, त्यांनीं लाविलेल्या वळणावर सर्वथा अवलंबून आहे, हें आतां गोदूताईला चांगलें कळलें आणि 'दुःखाअंतीं सुख' ही म्हण त्या पुनः कधींहि विसरल्या नाहींत.

